# HISTORY OF THE MARÂTHÂS.

## TRANSLATED INTO MARÂṬHÎ

FROM

THE ORIGINAL ENGLISH WORK OF

## CAPTAIN GRANT DUFF,

Formerly Resident at Satara,

BY

## CAPTAIN D. CAPON.



**Sixth Edition.**



PUBLISHED BY

TUKÂRÂM JÂVAJÎ,

PROPRIETOR OF THE "NIRṆAYA-SAGAR" PRESS

Bombay:

1916.

*Price 1[illegible] Rupees.*

# मराठ्यांची बखर.

क्याप्टन् ग्रांट् डफ् साहेब

यांनीं केलेल्या मूळ इंग्रजी ग्रंथावरून

क्याप्टन् डेविड् केपन् साहेब

यांनीं महाराष्ट्रभाषेंत केली.

आवृत्ति सहावी.


मुंबईमध्यें

जावजी दादाजी यांच्या

'निर्णयसागर' छापखान्याचे मालक तुकाराम जावजी

यांनीं छापून प्रसिद्ध केली.

१९१६.

किंमत [illegible] रुपये.



# बखर लिहिण्याचें कारण.

कोणी ह्मणेल कीं, ही बखर कोणीं कशी निर्माण केली, व करण्याचें कारण काय; तर त्यानें असें समजावें कीं, बाजीराव पेशवा असतां अलिफ्टन साहेबाच्या हाताखालीं कारभार चालविणार कप्तान ग्रांट डफ साहेब पुण्यास होता, तो पुढें बाजीराव गेल्यावर सातान्यास नेमिला. तो तेथें असतां त्याच्या मनांत आलें की, महाराष्ट्र देशचे लोक इतक्या योग्यतेस कसे चढले, तें समजावयास त्या लोकांचें प्राचीन वृत्त ध्यानास आणिलें पाहिजे, तेणेंकरून विलायतेंतील लोकांसही विदित होईल. ह्मणून त्यानें बहुत जागचे पुरातन लेख जमा केले; त्यांत कितीएक कोणीं आपल्या संतोषें-करून दिले, व कितीएक त्यानें द्रव्य खर्चून घेतले; याशिवाय सरकारचीं दप्तरें पुणें आदिकरून ज्या ज्या जागीं होतीं त्या सर्व जागींचे पुरातन लेख आणिले. याशिवाय जितक्या देवस्थानीं पूर्वींचीं देवास अग्रहार करून दिलेलीं पत्रें होतीं ती, व कोणी मोठे सरदार लोक यांस जहागिरीच्या सनदा करून दिलेल्या त्या, व मुसलमानांनीं लिहिलेल्या बखरा, व पूर्वी साहेब लोकांनीं लिहिलेलें हिंदूंचें वृत्त, यांतील सर्व गोष्टींचा बहुत विचार करून व त्या त्या समयविशेषाचाही शोध करून त्या सर्व विस्तारांतील सारांश निवडून आपले बरोबर घेऊन तो विलायतेस गेला; तेथें इंग्रेजी भाषेंत त्याची बखर लिहून छापिली; तिचे तीन भाग झाले. त्यांतील गोष्टी महाराष्ट्र मुलखींच्या लोकांस फार हितावह आहेतशा समजून सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे आज्ञेवरून कप्तान केपन साहेब यांनी बाबा साने यांच्या साहाय्यानें ती इंग्रेजी भाषेची बखर मराठी भाषेंत लिहून सन १८२९ त मुंबईमध्यें छापिली.

# पांचव्या आवृत्तीची प्रस्तावना.

निर्णयसागर छापखान्याच्या मालकांनीं ही बखर पुनः छापण्याची परवानगी मेहेरबान डायरेक्टर् ऑफ् पब्लिक इन्स्ट्रक्शन् ह्यांजकडून मिळवून, पुस्तकशोधनाचें काम मला सांगितलें, तें मीं यथामति केलें आहे. ह्यांत अलीकडच्या कितीएक ग्रंथांवरून, बरीच नवी माहिती घालतां आली असती, आणि शुद्धीकरणही बरेंच करतां आलें असतें. परंतु, मुळांत फेरफार करावयाचा नाहीं, अशी अट डायरेक्टर साहेबांनीं घातली आहे, तीमुळें तसें कांहीं करतां आलें नाहीं. तथापि ती अट संभाळून जें काय विशेष केलें आहे, तें येणेंप्रमाणें:—

१. पूर्वीं दोन भाग वेगळे वेगळे होते, ते एक केले आहेत.

२. अनुक्रमणिका प्रत्येक भागाच्या आरंभीं घातली आहे.

३. विशेषनामाच्या आरंभींचीं अक्षरें मोठीं घातलीं आहेत.

४. भाषणें अवतरणचिन्हांतर्गत केलीं आहेत.

५. कांहीं थोर पुरुषांचीं चित्रें घातलीं आहेत.

६. तारखा लिहिण्याची पद्धति जुनी होती, ती बदलून नवी केली आहे, ह्मणजे, 'सन पंधराशें दाहाचे दुसरे महिन्याचे सत्ताविसावे तारखेस' असें होतें तेथें, 'सन १५१० चे फेब्रुआरी महिन्याचे २७ वे तारखेस' असें केलें आहे.

७. मूळ ग्रंथावरून कांहीं नांवें शुद्ध केलीं आहेत. ह्मणजे असें:—'खाजे खान गावान' असें होतें, तेथें 'ख्वाजा जहान गावान' असें केलें आहे; 'हुसेन कांगो ब्राह्मणी' बद्दल 'हसन गंगू ब्राह्मणी'; 'कालियान' बद्दल 'कल्याण'; 'कांताजी' बद्दल 'कंठाजी'; 'आठवले' बद्दल 'आटोळे' असें केलें आहे.

८. सन व तारखा चुकलेल्या होत्या त्या मूळ ग्रंथाशीं ताडून शुद्ध केल्या.

९. क्वचित् ठिकाणीं भाषांतर शुद्ध केलें आहे जसें:–'His wealth, which was great, had been left at the disposal of the Bhow, who appropriated one-third for charitable and religious purposes, and shared the remainder equally with the son of the deceased' याचें भाषांतर 'त्याचें द्रव्य पुष्कळ होतें तें त्यानें आपल्या भावाजवळ दिलें असे. त्यांतला तिसरा वांटा त्या भावानें धर्मकृत्यास लाविला आणि उरले जे दोन वांटे, त्यांतून एक रामचंद्रबाबाच्या पुत्रास दिला आणि एक आपण घेतला' असें केलें होतें, तें बदलून 'त्याचें द्रव्य पुष्कळ होतें तें त्यानें भाऊजवळ दिलें असे. त्यांतला तिसरा वांटा भाऊनें धर्मकृत्यास लाविला आणि उरले जे दोन वांटे, त्यांतून एक रामचंद्रबाबाच्या पुत्रास दिला आणि एक आपण घेतला' असें केलें आहे.

**काशिनाथ पांडुरंग परब.**

**सहावी आवृत्ति**—पांचव्या आवृत्तींत कोणत्याही प्रकारचा महत्वाचा फेरफार न करितां ही सहावी आवृत्ति जशाच्या तशीच छापली आहे.

**प्रकाशक.**

# देशमर्यादा.

देशमर्यादा करणारे जे हिंदु त्यांनीं नर्मदा व महानदी या दोहों नद्यांच्या दक्षिण देशाचे विभाग मुख्य पांच केले. त्यांचीं नांवें–एक द्रविड देश, दुसरा करनाटक देश, तिसरा आंध्र देश, ( त्यासच तेलिंगण ह्मणतात, ) चवथा गोंडवण देश, व पांचवा महाराष्ट्र देश.

द्रविड देशाची मर्यादा, रामेश्वरापासून मद्रासेचे उत्तरेपर्यंत. करनाटक देशाची मर्यादा, पूर्वेकडे विंध्याद्रीचें टोंक व पश्चिमेकडे सह्याद्रीचें टोंक या दोहोंमध्यें जितका उंच प्रदेश तो करनाटक देश. त्याच्या उत्तर दिशेच्या मर्यादेचें टोंक तेलिंगण व महाराष्ट्र या दोहींमध्यें मांजरा नदीपर्यंत आहे. तेलिंगण देशाची मर्यादा, द्रविड देशाचे उत्तरेपासून उरसाप्रांतीं शिकाकोळ शहरापर्यंत. गोंडवण देशाची मर्यादा, तेलिंगण व महानदी या दोहोंच्या मध्यें जितका प्रदेश ती. महाराष्ट्र देशाची मर्यादा, चांदोराजवळचा पर्वत व कोळवण व बागलाण व खानदेश उत्तर मर्यादा. असें ज्योतिषशास्त्रांत आहे खरें, परंतु भाषाभेदेंकरून पाहिलें असतां महाराष्ट्र मुलूख उत्तरेकडे सातपुडा पर्वत व नर्मदेपाशीं नांदेड शहर तेथपर्यंत आहे. याची पूर्वेची मर्यादा, नागपुराचे पूर्वेस वैनगंगा नदी व वरधा नदी यांचा संगम होऊन ती नदी तेथपासून माणिकदुर्गपर्यंत वायव्यवाहिनी झाली, व तेथून पुढें पश्चिमवाहिनी माहुरपर्यंत गेली ती. त्यापुढें त्या देशाची मर्यादा नीट दोरीसारिखीच नाहीं, वांकडी तिकडी होत होत नैर्ऋतीचे दिशेस गोमंतकपर्यंत गेली. या इतक्या देशांत बहुधा महाराष्ट्र भाषा आहे. सुरत व भडोच व राजपिपळी यांत गुजराथी भाषा आहे. यांच्या आसमंतात् गुर्जर देश. त्याची व महाराष्ट्र देशाची भेदक मर्यादा सुरतेचे दक्षिणेस दमान बंदर आहे त्यापासून राजपिंपळीपर्यंत.

महाराष्ट्र देश फार मोटा आणि त्याची भाषा बहुधा एकसारखी व त्यांतील ब्राह्मणांच्या मोठ्या समुदायाचें नांव महाराष्ट्र ब्राह्मण, त्यावरून असें वाटतें कीं, दक्षिणेंत मुसलमान लोकांचा संचार होऊं लागल्याचे पूर्वी या सर्व मुलखाचा राजा एक असेल; परंतु याचा निश्चय करतां येत नाहीं. कां कीं, पुराणांतर्गं जशा देवादिकांच्या कथा लिहिल्या त्याप्रमाणें हें लिहिलें नाहीं. या मुलखांतील मूळचे रहाणारे कोण तो सिद्धांत होत नाहीं. पुराणांत लिहिलें आहे कीं, महाराष्ट्र मुलखांत मूळचे रहाणारे घडशी लोक; ते वाजंत्री लोकांत मुख्य आणि जातीचे नीच आहेत. कावेरी आणि गोदावरी या दोहींमध्यें दंडकारण्य देश, तो रावणाचे स्वाधीन होता, तेव्हां तो त्यानें आपले वाजंत्री घडशी यांस दिला, याप्रमाणें पुराणांत आहे. याविषयीं दुसरी गोष्ट अशी आहे कीं, इसवी सनाच्या अगोदर अडीचशें वर्षे हिंदूंच्या मुलखांत मोठी तगर[1] नामें राजधानी होती, तेथें मिस्र मुलखाचे व्यापारी लोक येत जात असत. त्यापुढें कोणी एक शालिवाहन नामें नीच जातींचा पुरुष शककर्ता झाला, त्यानें त्या शहरीं राज्य केलें. तो राजा सन इसवीचे ७७।७८ चे सुमारें झाला. त्या दिवसापासून हिंदूंमध्यें त्याचे नांवें शक चालू लागला.

---

१. तगर नामें शहर कोठें होतें तें आतां निश्चयेंकरून लिहितां येत नाहीं. परंतु हल्लीं गोदावरीचे कांठीं भीर नामें एक गांव आहे त्याचे ईशानी दिशेस असेलसें वाटतें.

# मराठ्यांची बखर.



## भाग पहिला.

### ( इसवी सन १००० पासून सन १४७८ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. मुसलमान लोकांनीं दक्षिण घेतल्याचा प्रकार.—२. ते लोक नर्मदा उतरून देवगडापर्यंत संचार करिते झाले.—३. तें शहर मुसलमान लोकांनीं आपली राजधानी करून त्याचें नांव 'दौलताबाद' ठेविलें.—४. त्या लोकांमध्यें कांहीं कलह उत्पन्न होऊन मुसलमानांच्या राज्याच्या दोन फळ्या झाल्या.—५. ब्राह्मणी वंशाच्या बादशाहाच्या राज्याची गोष्ट.—६. तें राज्य असतां मराठे लोकांचें काय काय वर्तमान झालें तें प्रकरण.—७. दुर्गादेवी नामें मोठा दुष्काळ पडला तें.—८. त्यामुळें मुलूख ओस पडला, आणि किल्ले भलत्यांच्या हस्तगत झाले.—९. त्यांच्या बंदोबस्ताकरितां बादशाहाचें सैन्य निघालें.—१०. दादू नरसू काळे यांनीं सरकारच्या वसुलाचा बंदोबस्त केला.—११. आणखी दोन वेळां राज्याच्या बंदोबस्तास बादशाहानें लष्कर योजिलें.—१२. मुसलमानांनीं कोंकणपट्टी जिंकिली.—१३. ब्राह्मणी बादशाहाच्या वंशाची समाप्ति कोणे कारणानें झाली तें.—१४. निझामउल्मुल्क बहिरी याची गोष्ट.

१. पूर्वीं मुसलमान लोकांनीं हिंदुस्थान घेतल्याचे अगोदर ते उगीच स्वाऱ्या करून तें लुटीत असत; ते सन ११०० च्या सुमारें अटकनदीस येऊन पोंचले.

२. त्यापुढें तीनशें वर्षांनंतर, अल्लाउद्दीन खिलजी या नामें कोणी एक मोठा मुसलमान सरदार झाला, त्यानें आठ हजार सैन्य घेऊन नर्मदा उतरून खानदेशांतून अकस्मात् देवगडासमोर येऊन डेरा दिला. त्या वेळेस कोणीएक मराठा रामदेवराव जाधव ह्मणून त्या किल्ल्याचा राजा होता, त्यानें आपलें संस्थान राखावयासाठीं कांहीं युद्ध केलें, आणि परतला; मग किल्ल्यांत जाऊन अल्लाउद्दिनाशीं तहाचें बोलणें लाविलें; तेव्हां बहुत द्रव्य दिल्यास तो आपला मुलूख सोडून जातो, असें ठरलें. इतक्यांत रामदेवरावाचा पुत्र मुलखांतून फौज जमा करून घेऊन आला, आणि बापानें ठरविलेला तह न मानितां अल्लाउद्दिनाशीं युद्ध करूं लागला. त्या प्रसंगीं राजपुत्राचा पराभव झाला; त्यामुळें ते मुसलमान लोक गर्वेंकरून उन्मत्त झाले; यास्तव राजास आपलें सर्व द्रव्य आणि एलिचपूर द्यावें लागलें. तेव्हां ते मुसलमान लोक किल्ला सोडून निघाले, तेणेंकरून अल्लाउद्दीन मोठा विख्यात झाला; आणखी त्याला दिल्लीचें तक्त सहज प्राप्त झालें.

३. मग त्यानें दक्षिणदेशीं तीन वेळां फौज पाठविली, त्या योगेंकरून बहुतेक दक्षिणदेश व तैलंगण त्याचे हस्तगत झालें; आणि त्या लष्कराचे उपद्रवानें नर्मदे-पासून रामेश्वरापर्यंत मुलखाची मोठी हैराणगत झाली. पुढें अल्लाउद्दिनानें बहुत दिवस राज्य केलें; शेवटीं त्याच्या राज्यांत जागोजाग बंडें उत्पन्न झालीं; आणि तो मेल्यानंतर दिल्लीचे दरबारी लोकांत कित्तीएक वर्षे वैमनस्य पडत गेलें. अशा संधींत हिंदु लोकांस पुनः आपलें राज्य स्थापावयास फावलें. ते एका देवगडावांचून सर्व दक्षिणेंत संचार करूं लागले, आणि देवगडासही घेरा घालून लढूं लागले. तेव्हां दिल्लीमध्यें मुबारीक नामें बादशाह होता, तो सैन्य घेऊन आला. ते समयीं जे लोक किल्ला सभोंवता वेष्टून युद्ध करीत होते, ते बादशाहाशीं युद्ध न करितां पळूं लागले. त्यांचे पाठीस बादशाह लागला, तेव्हां एक हरपाळदेव राजा सांपडला; त्याच्या आंगाचें कातडें काढविलें, तेणेंकरून तो मृत्यु पावला. मुबारिकानंतर दिल्लींत तघलख नामें बादशाह झाला, त्याचें राज्य असतां सन १३२३ त दक्षिणदेशीं पुनः बंड उत्पन्न झालें; तें मोडावयास त्याचा पुत्र जो युनास तो सैन्यासुद्धां येऊन त्यानें तें बंड मोडलें; आणि तैलंगणांतील वरंगूळ नामें राजधानी घेतली; ते वेळेस त्या नगरचे कितीएक मोठमोठे गृहस्थ परागंदा झाले. नंतर बारा वर्षांनीं त्यांतील दोघां गृहस्थांनीं तुंगभद्रेचे तीरीं विजया नामें एक नवीन नगरी वसविली; तिची कांहीं काळेंकरून कोणीएका मोठ्या राजानें राजधानी केली. मग ज्यानें एवढा मोठा पराक्रम केला, असा जो युनास त्याला सन १३२५ त राज्याभिषेक करून दिल्लीचे तक्तावर बसविलें, आणि त्याचें नांव ‘महंमद तघलख’ असें ठेविलें. तो बहुत विद्यांत निपुण असे; परंतु उतावळा, अविचारी, निर्दय, ह्मणून राज्यास अ-योग्य होता. तो राज्य करूं लागल्यापासून दोन वर्षांनीं मोगल लोक मोठी फौज घेऊन दिल्लीचे दरवाज्याजवळ येऊन पोंचले; तेव्हां बादशाहानें त्यांस बहुत द्रव्य देऊन फिरविलें. नंतर तें द्रव्य जितकें खर्चलें होतें तितकें उत्पन्न करावयाकरितां, [1]द्वारसमुद्र नामें एक नगर व कर्नाटक लुटून द्रव्य आणिलें; तरी त्याला पुरेसें झालें नाहीं, यास्तव नानाप्रकारें प्रजेस पीडा करूं लागला. तो प्रकार असा कीं, तांब्याचे पत्र्यांवर शिक्का करून ते रुपयांच्या किमतीनें चालविले; आणि देवगडाचें नांव ‘दौ-लताबाद’ ठेवून दिल्लींत राहणारे लोकांस सांगितलें कीं, ‘तुह्मी सर्वांनीं दौलताबादेस जाऊन राहावें’; आणि सांगितल्याप्रमाणें त्या लोकांस वर्तविलें; तेणेंकरून त्यांस बहुत कष्ट झाले, आणि दिल्ली ओस पडली.

---

१. कोणी ह्मणतात कीं, द्वारसमुद्र नगर कर्नाटकचे बल्लाळदेवाची राजधानी; कोणी ह्मण-तात कीं, तुळवा याचे बंदरचें मोठें शहर होतें; परंतु आतां त्याचा ठिकाण नाहीं.

४. त्यानंतर त्याचे राज्यांत कितीएक जागीं बंडें उत्पन्न झालीं; तीं अशीं कीं, तो बादशाह एक बंड मोडी तों त्याला दुसरे बंडाचें वर्तमान कळे, असें होऊं लागलें. शेवटीं अफगाण लोक व उत्तरेकडचे लोक, हा धनी योग्य नव्हे असें जाणून राज्यांत आपणच सत्ता करूं लागले; यास्तव बादशाहानें फौज उत्तरेकडे दूर योजिली. त्या संधींत जो पूर्वीं मुसलमानांनीं जिंकिलेला तैलंगणच्या वरंगूळ नगराचा राजा, तो मुलखांतून फौज घेऊन आला, आणि मुसलमान लोकांशीं मोठ्या युक्तीनें युद्ध करूं लागला. ते वेळेस बादशाह संपूर्ण दक्षिणेच्या बंदोबस्तास मोठी फौज धरूं लागला. इतक्यांत असें मोठें बंड उत्पन्न झालें कीं, नर्मदेचे दक्षिणेस जितकीं मुसलमान लोकांचीं वेगळीं वेगळीं संस्थानें झालीं तितक्यांचें कारण तें बंड. त्या बंडाचें मूळ असें आहे कीं, पूर्वीं गुजराथी लोकांनीं कांहीं बंड केलें, तें बादशाहानें मोडिलें; तेव्हां ते लोक बादशाहाचे भयानें पळाले, ते दौलताबादकरांची पाठ निघाले. यास्तव बादशाहानें दौलताबादकरांस पदच्युत केलें, आणि सेवकांस आज्ञा केली कीं, 'गुजराथी लोकांस ह्मणावें, तुह्मीं निर्भयपणें हुजूर येऊन भेटावें.' तें सेवकांनीं सांगितल्यावरून गुजराथी लोक विश्वासानें बादशाहाचे भेटीस जाऊं लागले. ते समयीं बादशाह फौजेसहित गुजराथेंत होता ह्मणून ते तिकडे गेले. ते गुजराथेजवळ गेले तों, त्यांस असें वाटलें कीं, बादशाह आह्मांस बोलावून नेऊन कांहीं घात करील. याकरितां जे त्यांना नेणारे बादशाहाचे लोक त्यांचे बरोबर होते, त्यांस तेथेंच मारून बंडाचा झेंडा लावून माघारे दौलताबादेस चालिले. तेव्हां वाटेनें जातां जातां, जे संस्थानी लोक बादशाहापासून त्रास पावले होते, ते त्यांस मिळूं लागले. तें सैन्य असें जमलें कीं, तें दौलताबादेजवळ जातांच त्या किल्ल्यांतल्या लोकांनीं ह्या सैन्यापुढें बादशाहाचें कांहीं चालणार नाहीं, असें जाणून दौलताबादेच्या मुख्य कारभाऱ्यास कैद केलें, आणि किल्ला बंडवाल्यांस दिला. नंतर त्या बंडाचे लोकांस असें वाटलें कीं, ह्या एवढ्या मोठ्या सैन्यास धनी एक असावा; परंतु तें सैन्य एकाएकीं जमलेलें, ह्मणून त्यांत कोणी राज्य करावयास योग्य आहे किंवा नाहीं, हें कोणास कांहींच समजेना; यास्तव एक इस्माएल नामें एकहजार स्वारांचा सरदार होता, त्याला बादशाह करून त्याचें नांव नासिरुद्दीन ठेविलें, आणि तो दौलताबादचा तक्ताधिपति केला. हें वर्तमान महंमदशाह बादशाहास कळतांच, तो फौजेसुद्धां गुजराथेंतून आला. तो दौलताबादेस येतो तों ते बंडवाले युद्धास सिद्ध होते, ह्मणून त्यांचें व या बादशाहाचें तत्काळ युद्ध झालें. त्या प्रसंगीं दोघांतून एकाचाही जय झाला नाहीं, परंतु महंमदशाहाचें सैन्य ज्या जागीं लढाई झाली त्याच जाग्यावर

होतें; आणि नासिरुद्दिनाचें मागें सरलें. तेव्हां त्या बंडवाल्यांनीं असा विचार केला कीं, नासिरुद्दिनानें किल्ल्याचें रक्षण करावें, आणि सरदारांनीं फौजेच्या वेगळ्या वेगळ्या टोळ्या करून त्याचे मुलखांत चोहींकडून शिरावें; आणि मोठी धुमाळी करावी; समोर लढूं नये. मग तसेंच केलें. हें वर्तमान महंमदाला कळतांच, त्यानें दौलताबादेस वेढा घातला, आणि जे सरदार मुलखांत दंगा करावयास जात होते, त्यांत एक जफीरखान नामें मुख्य होता त्याचे पाठीमागें एक आपला इमादउल्मुल्क तेब्रिजी नामें मोठा सरदार लाविला. इकडे सभोंवता वेढा पडल्यामुळें किल्ल्यांतल्या लोकांस अन्नपाणी मिळेनासें झालें. यासाठीं ते असा विचार करूं लागले कीं, आतां युद्ध करूं नये; किल्ला द्यावा. इतक्यांत दिल्लीकडे एक मोठें बंड उत्पन्न झालें, असें वर्तमान महंमदशाहास कळलें; यास्तव किल्ला घ्यावयाचें काम आपले सरदारांस सांगून आपण दिल्लीस गेला. हें वर्तमान दक्षिणी लोकांस कळतांच, ते चोहींकडून आले; आणि जे बादशाहाचे सरदार किल्ल्याशीं लढत होते त्यांस नानाप्रकारें उपद्रव करूं लागले. तेव्हां त्यांस असें भय झालें कीं, किल्ला सोडून लवकर नर्मदा उतरून पार जावें, ह्मणून पळूं लागले. तेव्हां दक्षिणी लोक त्यांचे पाठीस लागले, यास्तव त्यांना वाटेनें दक्षिणी लोकांचा उपद्रव बहुत लागला; परंतु ते तसाच सोशीत सोशीत नर्मदा पार झाले. इकडे जफीरखान पळत होता तो हें आनंदाचें वर्तमान ऐकून पाठीस लागलेल्या इमादउल्मुल्कावर माघारा उलटला; तेव्हां तो आपले फौजेसहित बेदराजवळ ठाणें धरून राहिला. जफीरखान मोठा विचारवंत होता, त्यानें शत्रूशीं तत्काळ युद्ध केलें नाहीं; त्याचे बरोबरीचा आकार मात्र दाखविला. त्याच्या अशा आचरणानें तैलंगणचे राजास मोठा भरंवसा वाटला; ह्मणून त्यानें त्याचे कुमकेस पंधरा हजार फौज पाठविली; आणि दौलताबादेहून पांच हजार आली; आणि त्याची वीस हजार होती; अशी चाळीस हजार फौज झाली; तेव्हां तो इमादउल्मुल्काशीं लढूं लागला. ती लढाई फार मोठी झाली, तींत इमादउल्मुल्क पडला; आणि त्याची फौज बहुत नाश पावली. मग तो मुलखांत जागोजाग ठाणीं घालून आपण फौजेसहित दौलताबादेस आला. त्या वेळेस नासिरुद्दीन बादशाहानें, हा आपणापेक्षां मोठा पराक्रमी आणि विख्यात, असें जाणून किल्ल्यांतून बाहेर आपण त्याला सामोरा आला, आणि भेटला. मग सर्व मानकरी लोकांस ह्मणाला कीं, 'मजपेक्षां हा बहुत योग्य आहे, याला तक्ताच अधिकारी करावा.' अशी बादशाहाची आज्ञा होतांच त्या सर्वांनीं 'अवश्य' ह्मणून नासिरुद्दिनाचे जागीं जफीरखानास बसविलें. त्याचें नांव 'सुलतान अल्लाउद्दीन हसन गंगू ब्राह्मणी' असें ठेविलें.

५. 'ब्राह्मणी' नांव ठेवण्याचें कारण असें आहे कीं, पूर्वीं दिल्लीमध्यें एक गंगू नामें ब्राह्मण होता. त्यानें जफीरखानास त्याचे बाळपणांत विकत घेऊन आपल्या घरचे कामाकरितां बाळगलें होतें. नंतर कांहीं दिवसांनीं हा उत्तम गुणी असें जाणून कांहीं द्रव्य न घेतां त्यास त्या ब्राह्मणानें सूट दिली; आणि जवळचें कांहीं द्रव्य देऊन संतोषेंकरून बोलिला कीं, 'तुला लक्ष्मी प्रसन्न असो!' असे त्याचे उपकार व आशीर्वाद स्मरून जफीरखानानें आपल्या नांवास 'गंगू ब्राह्मणी' अशीं अक्षरें लाविलीं; आणखी त्या ब्राह्मणास बलावून आणून त्यास आपल्या जामदारखान्याचें काम सांगितलें; आणि आपणापासून पुढें जे आपले पुरुष झाले त्यांचेंही नांव 'गंगू' असें चालविलें.[1]

६. असा त्यानें त्या ब्राह्मणाचा मान राखिला. हें वर्तमान सन १३४७ त झालें. ते वेळेस महंमद तघलख नामें दिल्लीचा बादशाह मेला; तेणेंकरून जफीरखानाचें राज्य निर्बाध चालूं लागलें; त्यांत जे जे बादशाह झाले, ते ते आपणांस 'ब्राह्मणी वंश' ह्मणवीत असत. सुलतान अल्लाउद्दीन हसन गंगू ब्राह्मणी बादशाह झाला ते समयीं, दक्षिणेंत हिंदु लोकांचीं कितीएक संस्थानें होतीं, त्यांतून कितीएक संस्थानी लोकांनीं आपलीं संस्थानें स्वसंतोषें त्यास दिलीं, आणि कितीएक त्यानें बलात्कारेंकरून घेतलीं. मग जीं घ्यावयास फार कठिण तीं मात्र राहिलीं. नंतर त्यानें लोकरंजनार्थ कितीएकांस इनाम जमिनी दिल्या; कितीएकांस देशमुख्या व पाटिलक्या दिल्या; कितीएक सरदारांस जहागिरी देऊन फौजेसहित चाकरीस ठेविलें. याप्रमाणें त्यानें लोकप्रीति संपादिली, आणि आपले राज्याचे बळकटीसाठीं कितीएक मुसलमान लोकांस मोठमोठ्या जहागिरी देऊन हिंदु लोकांनीं मुसलमानांचे आज्ञेंत वागावें असें केलें. त्या वेळेस बहुतेक दक्षिण देश व कोंकणपट्टी त्यांनीं घेतली; परंतु दाभोळपासून रामसपर्यंत कोंकण, व घाटमाथा, पुरंदर डोंगर हरणकाशीपावेतों बहुतेक त्यांचे स्वाधीन नाहीं. अशीं शंभर वर्षें गेलीं, नंतर तेंही घेतलें. सुलतान अल्लाउद्दीन हसन गंगू ब्राह्मणी बादशाह दहा वर्षें होता, नंतर मेला. त्याचे जागीं त्याचा पुत्र महंमदशाह ब्राह्मणी स्थापिला, तो सन १३५७ त राज्य करूं लागला. नंतर एक वर्षानें तो सैन्य घेऊन मुलूख घ्यावयास कर्नाटकांत गेला, ते समयीं दौलताबादेंत सैन्य बहुत नव्हतें; आणि असें वर्तमान आलें कीं

---

१. ही हकीगत फिरिस्ता नामें कोणी मुसलमानांचें वृत्त लिहिणारा होता, त्याचे बखरींतून काढून घेतली. ही खरी आहे असें भासतें, कां कीं, जितके ब्राह्मण, मुसलमानांचे 'गंगू' नामें देशपांडेपणासारिखें पद आहे त्या अधिकाराचे आहेत, तितक्यांस अद्यापि 'गंगू' ह्मणतात.

बादशाह कर्नाटकांत मेला. तें ऐकून मुसलमानांतील एक बहिरामखान मुआझिम दुराणी नामें सरदार होता त्यानें कोणीएक मराठा जाधव याचे मसलतीनें मोठें बंड उत्पन्न केलें. त्यापूर्वी अकरा वर्षे मुसलमानांचे राज्यांत बंड नव्हतें. हें बंडाचें वर्तमान बादशाहास कर्नाटकांत कळलें तेव्हां तो बहिरामखान, बादशाहाचे जातीचा मुसलमान, यास्तव बादशाहानें त्याला बहुत युक्तीनें सांगून पाठविलें; निकरानें निरोप पाठविला नाहीं. परंतु मराठे लोकांचे साहाय्यास्तव त्याला तें ऐकतां येईनासें झालें; आणि पैठणाजवळ एक बादशाहाचा मोठा सरदार होता, तेथें फौजेसहित जाऊन युद्ध करूं लागला; आणि त्यापासून पराभव पावला. याखेरीज ब्राह्मणी वंश बादशाहाचे राज्यांत दुसरें बंड झालें नाहीं. त्यांत मराठे लोकही सुखी असतील.

७. यानंतर सन १३९६ चे सालीं एक मोठा दुष्काळ पडला, तो इतर दुष्काळांप्रमाणें नव्हता, ह्मणून त्याचें नांव 'दुर्गादेवी' असें ठेविलें. तो बारा वर्षे होता.

८. नंतर समयीं पाऊस पडूं लागला, परंतु बहुत दिवस दुष्काळ होता ह्मणून मुलूख व प्रांत ओस पडले होते. याजकरितां त्या दुष्काळानंतर तीस वर्षेपर्यंत वसूल अगदीं थोडा येत होता. याशिवाय जे किल्ले मुसलमानांनीं घेतले होते ते पाळेगारांनीं बळकाविले, आणि ते प्रजेस नानाप्रकारें दुःख देऊं लागले.

९. त्याचा सुमार सन १४२९. त्या वेळेस सुलतान अहमदशाह वली ब्राह्मणी नामें बादशाह होता, त्यानें तें बंड मोडिलें, आणि लोकांस सुख व्हावें ह्मणून बंदोबस्तासाठीं एक सैन्य सिद्ध करून पाठविलें, त्याचा मुखत्यार मलिकउलतिजार नामें एक सरदार करून पाठविला. त्याजबराबर एक मोठा शहाणा ब्राह्मण दादू नरसू काळे या नामें पाठविला. ते कोणी पाटील व देशमुख व देशपांड्या आढळला असतां त्याला बरोबर नेऊन त्याचे जागीं त्याला स्थापावा, असें करीत चालिले. तें लष्कर जाऊन त्यांनीं तें बंड मोडून वाई किल्ला घेतला, आणि बेदरास गेले.

१०. मुलखांचा बंदोबस्त दादू नरसू काळे याजकडे होता, त्यानें प्रांताचे सीमांचें स्मरण नाहींसें पाहून सर्व हद्दी नव्या केल्या. त्यांत जे देश फार लहान होते ते वाढविले, आणि लोकांस पहिल्या वर्षी माफीचा कौल दिला; दुसरे वर्षी बिघ्यास एक तोबरा दाणा घेऊन लोक सुखी केले.

११. इतक्यांत घाटमाथ्याचे रामोशी हे लोकांस उपद्रव करूं लागले, तेव्हां बादशाहास असें वाटलें कीं, सर्व डोंगरी किल्ले घेतल्यावांचून रयतेस सुख होणार

नाहीं. यानंतर सुलतान अल्लाउद्दीन बादशाह असतां, त्याचा वजीर मियां मनउल्ला यानें असा मनसोबा केला कीं, सारे सह्याद्रीचे किल्ले व कोंकणपट्टींत जे मुलूख आपल्या हातीं आले नाहींत ते घ्यावे. असा विचार झाल्यावर एक सैन्य नवें सिद्ध करून मलिकउल्तिजार यास नेमिलें. त्या लष्कराचा [illegible]णजवळ पडला; आणि जुन्नराजवळ किल्ला बांधून राहिले; आणि तेथून फौज कोंकणांत पाठवून कितीएक दुष्ट राजे जिंकिले.

१२. मग जुन्नराहून सैन्यासुद्धां कोंकणांत येऊन शिरके यांचे किल्ल्यास घेरा घालून तो किल्ला घेऊन मलिकउल्तिजारानें राजांस व लोकांस 'आपआपले धर्म सोडून मुसलमानांचे धर्मानें चालावें,' ह्मणून बहुत आग्रह केला, तेव्हां शिरके जातीचे अस्सल मराठे, यांनीं मोठ्या युक्तीनें त्याची आज्ञा न मोडिली असें दाखवून उत्तर दिलें कीं, 'सिंहगडकर आमचे आप्त आहेत, त्यांस जिंकून वर्तवावें; नंतर आह्मी वर्तूं. जर आह्मी एकटेच तुमचे धर्मानें वागूं लागलों, तर ते आमचा मुलूख घेऊन आह्मांस जातीनिराळे टाकितील.' असें ते ह्मणाले, यासाठीं तो मुसलमानांचा सरदार सैन्य घेऊन सिंहगड घ्यावयास चालिला; ते समयीं शिरके यांनीं वाटेंतच रात्रीं छापा घालून त्या सैन्याचा बहुत नाश केला; आणि पुनः आपला मुलूख घेऊन पहिल्याप्रमाणें सुखी राहिले. त्यानंतर सोळा वर्षें त्या शिरक्यांचा मुलूख घ्यावयाविषयीं बादशाहाचे दरबारीं उद्योग झाला नाहीं.

१३. पुढें ब्राह्मणी वंशाचें राज्य बुडत चाललें, तें सन १५२६ त अगदीं बुडालें. असें होण्याचें कारण असें झालें कीं, त्या बादशाहानें सर्व संस्थानें घेऊन आपलें राज्य अमर्याद वाढविलें; त्यामुळें मामलतदारच प्रबळ होऊन त्याची आज्ञा मानीनात. असें झालें असतां सन १४७८ त, कोणीएक मोठा शहाणा ख्वाजा जहान गावान प्रधान होता, तो हा सर्व प्रकार पाहून हें राज्य या प्रकारानेंच बुडेल अशी अटकळ करून तें न बुडावें ह्मणून कांहीं बुद्धीचे कल्पनेनें उपायांची योजना करूं लागला. त्यांत पहिल्यानें असें केलें कीं, कितीएक मुलखांच्या तुकड्या नव्या अधिक करून त्या त्या जागीं एक एक शहाणा माणूस नेमिला. त्या तुकड्यांचा प्रकार असा केला कीं, पहिला कुलबर्ग्याचा मामला एक होता, त्याचे भाग दोन केले; एक विजापूर आणि दुसरा आसनाबाद. दौलताबादेचे भाग दोन केले; एक दौलताबाद आणि दुसरा जुन्नरभाग. तैलंगण जुनें, त्याचे दोन केले; एक राजमंद्री व दुसरा वरंगूळ. वराड जुनें, त्याचे दोन केले; एक गावल आणि दुसरा माहूर. याशिवाय त्यानें आणखी कितीएक बंदोबस्ताचे उपयोगीं कल्पना केल्या होत्या, त्या

कांहीं दिवस चालल्या, आणि तोही मोठा वाढला. यासाठीं बहुतांचे मनांत विषम वाटून त्यांनीं त्याजवर कांहींएक निमित्त आणून बादशाहाचे आज्ञेनें त्याला मारिलें. त्यापुढें ब्राह्मणी वंशाची बादशाही सहजच बुडाली.

१४. जे ख्वाजा जहान गावानास मारविणारे त्यांत एक निझामउल्मुल्क बहिरी ह्मणून होता. त्याचें मूळ असें आहे कीं, तो पाथ्री गांवचे कुळकरण्याचा पुत्र. ज्या वेळेस दुर्गादेवी नामें मोठा दुष्काळ पडला ते समयीं तो आपल्या बापाबरोबर कर्नाटक प्रांतीं गेला होता. तेथें काळक्रमण करीत असतां, अहमदशाह वली ब्राह्मणी बादशाहाचें लष्कर आलें, त्या लष्करी लोकांनीं त्याला धरून नेलें. नंतर बादशाहाचे आज्ञेनें त्यास मुसलमान करून बादशाहाचे चाकरीस ठेवून त्याचें नांव मलिक हुसेन ठेविलें. पुढें महंमदशाहाचे राज्यांत त्याला हजार स्वारांची सरदारी दिली. नंतर तो अधिक अधिक योग्यता पावूं लागला असतां ख्वाजा जहान गावानाचे आश्रयानें त्याला तैलंगणाची मामलत व या मुलखाच्याही कितीएक जागा मिळाल्या; आणि 'निझामउल्मुल्क' असें नांव पावला. तो असा कृतघ्न होता कीं, शेवटीं त्यानें आपला संरक्षण करणारा जो ख्वाजा जहान गावान त्यास मारिलें.

---

## भाग दुसरा.

### (इसवी सन १४७८ पासून सन १६३७ पर्यंत झालेलीं वर्तमानें.)

१. ब्राह्मणी वंशाचें राज्य बुडाल्यावर पांच राज्यें उत्पन्न झालीं, त्यांतून कांही दिवसांनीं दोन बुडालीं, आणि तीन राहिलीं. त्यांत एक अहमदनगर, दुसरें विजापूर, तिसरें गोवळकोंडें. या तिहीं राज्यांचे चतुःसीमेचा प्रकार, व त्यांची राज्य करण्याची रीति.—२. मुसलमान लोकांचे राज्यांत मराठे लोक कोणत्या रीतीनें वागत होते, व मुसलमान लोक मराठ्यांची योग्यता कशी ठेवीत होते ते.—३. अदिलशाहीत मराठ्यांनीं बंड केलें ते वेळेस बंड मोडण्याचे प्रसंगीं विजापुरचे बादशाहानें ब्राह्मणांचें माहात्म्य वाढविलें ते; आणि विजापूर व अहमदनगर व गोवळकोंडें या तिहीं राज्यांत बादशाह किती झाले तो प्रकार.—४. फिरंगी लोक जहाजांवर बसून आले, आणि कोंकणांत शिरून गोवें घेतलें; आणखी मोठा उपद्रव करून कोंकणचा वसूल घेतला.—५. विजापुरचा बादशाह व अहमदनगरचा बादशाह हे दोघे मिळून फिरंगी लोकांशीं लढले, परंतु जय न पावले.—६. विजापूर व अहमदनगर या दोहों राज्यांत जितकीं मराठ्यांचीं कुळें होतीं त्यांचें वृत्त.—७. शिवाजीच्या मूळ पुरुषाची कथा.—८. दिल्लीचा अकबर बादशाह यानें दक्षिण देश जिंकिला, व तो मरण पावला तें.—९. मलिकअंबराची वर्तणूक.—१०. लुखजी जाधवरावाचें वृत्त; व शाहाजी भोंसल्याचें वर्तमान.—११. दिल्लीचा बादशाह जहानगीर याचे मरणाचा प्रकार; व त्याचा पुत्र शाहजहान याचे स्थापन; व खानजहान लोदी याचें वृत्त; व शाहाजी भोंसल्याचें वर्तमान.—१२. खानजहान लोदी मेल्यावर त्याचे

सरदारांनीं निझामशाहाचा मुलूख घेतला ते.—१३. विजापूरकर व अहमदनगरकर यांचा तह ठरला.—१४. मूर्तिजा निझामशाह अहमदनगरचा बादशाह त्यास फत्तेखानानें मारिलें.—१५. मोगल लोकांनीं शाहाजी भोंसल्यास दिलेला जो मुलूख तो फत्तेखानानें मोगलांशीं स्नेह करून आपण घेतला, यास्तव शाहाजी भोंसले विजापूरकरांस मिळाले.—१६. मोगल लोक व फत्तेखान यांचा सलूख झाला असतां तो फत्तेखानानें मोडिला, ह्मणून त्यांचा व याचा युद्धप्रसंग पुन: झाला.—१७. शाहाजी भोंसल्यानें अहमदनगरचें राज्य चालविलें.—१८. दिल्लीचा बादशाह शाहजहान मोठें सैन्य घेऊन विजापुराकडे गेला.—१९. विजापूरकर यांशीं शाहजहानानें युद्ध केलें; आणि त्यांचा व याचा सल्ला झाला.—२०. मोगल लोकांनीं शाहाजी भोंसल्यास जिंकिल्यावर तो विजापूरकरांचे चाकरीस राहिला; त्यापुढें बहिरीवंश बुडाला.—२१. तालीकोटचे लढाईचा प्रकार, व विजयानगराचें राज्य बुडालें तें प्रकरण.

१. पहिल्या भागांत असें लिहिलें आहे कीं, ब्राह्मणी वंशाचें राज्य सन १५२६ पर्यंत बुडालें नव्हतें, परंतु त्यापूर्वींच ज्याचें नांव ब्राह्मणी वंश नव्हे असे पांच मुसलमान दक्षिणेंत सत्ता करूं लागले होते. त्यांत जो विजापुरीं होता त्याच्या कुळाचें नांव 'अदिलशाही' होतें; गोवळकोंडें आणि हैदराबाद हीं दोन्हीं एकच, या जागीं जो होता त्याचे कुळाचें नांव 'कुतुबशाही' होतें; तिसरा वराडांत होता, त्याचे वंशास 'इमादशाही' ह्मणत; चौथा अहमदनगरीं असे, तो 'निझामशाही' कुळाचा होता; पांचवा अहमदाबाद बेदरचा राहाणारा, त्याची 'बरीदशाही' कुळी. असे पांच झाले होते. परंतु इमादशाही आणि बरीदशादी या दोन्ही कुळ्या थोडक्याच दिवसांनीं बुडाल्या, आणि अदिलशाही, कुतुबशाही, निझामशाही, ह्या तिन्ही राहिल्या. ते समयीं मराठे लोकांस तेज आलें, त्या योगें ते स्वतंत्रपणा करूं लागले. दुसरें, पहिल्या भागांत लिहिलें कीं, सन १४७८ त ख्वाजा जहानानें राज्यांतल्या परगण्यांचे नवे नवे अधिक भाग करून त्या जागीं एक एक उत्तम माणूस ठेविला. त्यांत जो दौलताबादेस ठेविला तो अदिलखान सावी नामें मुसलमान होता. जोंपर्यंत ख्वाजा जहान होता तोंपर्यंत तो दौलताबादेस होता, नंतर बादशाहानें त्यास विजापुरीं ठेविलें; तेथें सहज कांहीं निमित्तें घडलीं, तीं सर्व दैवयोगें त्यास अनुकूळ झालीं. शेवटीं सन १४८९ चे सालीं तो बादशाहाचें पद पावून सर्व राज्याचा अनुभव घेऊं लागला; असें विजापुरचे बादशाहीचें मूळ झालें. त्या दिवसापासून अदिलशाही वंश दक्षिणेंत मोठा विख्यात झाला. अहमदनगरचे बादशाहीचें मूळ असें झालें कीं, निझामउल्मुल्क बहिरी या नामें ख्वाजा जहान गावान वजीराचा आश्रित होता, त्यानें त्या वजीरास मारवून सुलतानाचें मन प्रसन्न करून घेतलें, आणि तो मेल्यानंतर त्याचे पुत्राची वजीरी तो आपण करूं लागला;

आणि ख्वाजा जहानानें दिलेल्या अधिकारीं मलिक अहमद नामें आपला पुत्र स्थापिला, व आणखी कितीएक जागा आपल्या पुत्रास देवविल्या, त्यांत जुन्नर आणि दौलताबाद एथील परगणे लावून दिले होते. नंतर निझामउल्मुल्कानें जसा आपला पोषक जो ख्वाजा जहान गावान वजीर याचा घात केला, त्या प्रकारेंच दुसऱ्या कोणी दुष्टानें त्यास मारविलें. त्या वेळेस त्याचा पुत्र मलिक अहमद मोठें बंड उत्पन्न करून आला, आणि बादशाही आपण करूं लागला. त्या समयीं ब्राह्मणी वंशाचा बादशाह माहमुदशाह ब्राह्मणी होता, त्यानें तें बंड मोडावयाकरितां फार उद्योग केला, परंतु उपाय चालेना, असा अहमदनगरचा बादशाह झाला, आणि त्याचें नांव 'निझाम' पडलें व त्याला 'बहिरी'[१] ह्मणत होते. कुतुबशाही बादशाहीचें मूळ असें आहे कीं, सन १४९५ त तैलंगणची मामलत कुतुबउल्मुल्क नामें कोणीएक मुसलमान होता त्याला सांगितली होती, ती त्यानें सोळा वर्षेंपर्यंत केली. नंतर तो सन १५१२ त गोवळकोंड्याचे बादशाहाचें तक्त पावला, आणि आपलें नांव कुतुबशाह असें चालविलें. असाच वराडचा मामलेदार वराडची बादशाही पावला. त्याचें नांव फतेउल्ला इमादउल्मुल्क होतें; त्याचें राज्य १५१२ पासून १५७४ पर्यंत चाललें. त्यानंतर अहमदनगरचे बादशाहानें तें राज्य घेतलें. बरीदशाही होती ती इमादशाहीचे अगोदरच बुडाली. तिचे खालीं बेदर व कुलबर्गा यांचे जवळचा मुलूख होता, तो विजापुरचे बादशाहानें घेतला. याप्रमाणें दोन बुडाल्यावर एक विजापुरची, दुसरी अहमदनगरची, तिसरी गोवळकोंड्याची, या तीन राहिल्या. त्यांत विजापुरचे बादशाहीची हद्द, दक्षिणेस निरानदीपासून तुंगभद्रानदीपर्यंत होती; आणि तुंगभद्रेचे दक्षिणतीरीं आंदोणी परगणा व नंदीहाळ शहर होतें, तेंही विजापुरचे बादशाहीखालीं होतें. पश्चिमेस कोंकणपट्टींत बाणकोटापासून रामसपर्यंत मुलूख, मध्यें मध्यें कांहीं कांहीं ठिकाणें सोडून विजापुराकडे होता. पूर्वेकडे रायचूर परगणा व इदगी परगणा व मलखेड परगणा व बेदर परगणा हे चार परगणे विजापुराकडे होते. याखेरीज पूर्वेकडचे दुसरे परगणे जे राहिले ते गोवळकोंड्याकडे होते. उत्तरेकडे अक्कलकोट व नळदुर्ग व कल्याण व सोलापूर इतके मुलूख विजापुरचे बादशाहीखालीं होते. अहमदनगरचे बादशाहीखालीं, वराडसंबंधी कितीएक मुलूख व औरंगाबाद सुभा व जालने परगणा व खानदेशांतील कितीएक परगणे व बाणकोटापासून वसईपर्यंत कोंकणपट्टी इतके मुलूख होते. गोवळकोंड्याची बादशाही अशी कीं, जिचे

---

१. बहिरी नांव पडावयाचें कारण असें कीं, त्याचा बाप योग्यता पावल्याचे पूर्वीं बहिरी पक्षी याचें संरक्षण करावयाचें काम पत्करून शिकारखान्यांत चाकरीस राहिला होता, ह्मणून असें नांव पडलें.

पश्चिमेचे अंगीं विजापूरकर व अहमदनगरकर यांचीं राज्यें होतीं. त्यांपासून पूर्वेस समुद्रापावेतों मुलूख गोवळकोंड्याचे बादशाहीकडे होता; परंतु राजमंद्री शहर व त्याखालचा मुलूख त्याचे स्वाधीन नव्हता, तेथें दुसरा राजा होता. या तिहीं राज्यांत मुलखांचीं नांवें ठेवण्याची रीति अशी होती कीं, मोठें 'सरकार,' त्यामध्यें 'परगणा', त्याचे आंत 'कर्यात,' तिचे पोटीं 'संमत,' तिचेमध्यें 'महाल,' त्याचे आंत 'तालुका', याखेरीज हिंद्वी नांवें दोन, 'प्रांत' आणि 'देश' अशीं होतीं. दुसरी राज्यांत अशी रीति होती कीं, लहानमोठा मामला मखत्यानें सांगावा; कदाचित् कोणीं मखता न केला तर बहुतकरून हिंदु लोकांस द्यावा. मखत्याचा पैका घेणें व मुलखांत चौकीपाहारा इत्यादि बंदोबस्त ठेवणें व मुलखाचे सीमेसंबंधी खटलें असल्यास त्याची चौकशी करणें, या इतक्या कामांवर बादशाहाचे दरबारांतून एके एके जागीं 'अमिल' नामें एक एक कारभारी ठेवीत. त्या कारभाऱ्यानें वतनसंबंधी अथवा लोकांचें भाऊबंदकीचें वगैरे दुसरें कांहीं खटलें असल्यास त्याची पंचाईत करून पंचांचे विचारानुरूप करावें; जातीनें मनास आणूं नये. विजापुरचे राज्यांत एक मोठा अमिल होता त्याचें नांव 'मोकासेदार' ठेविलें असे, आणि दुसरे अमिल त्याचे आज्ञेंत वागत असत. असे कितीएक मोकासेदार वीस वीस वर्षे कामावर होते; त्यांत कोणी मेला असतां त्या कामावर त्याचे पुत्रास ठेवावें, अशी चाल होती; कां कीं, मोकासेदारांस त्या द्रव्याचा कांहीं विभाग होता. कितीएक वेळां एका वर्षांत मोकासेदार पहिला दूर करून दुसरा ठेविला असें झालें. आणखी मोकासेदारी निरंतर मुसलमानांसच द्यावी असें नव्हतें, कधीं कधीं हिंदूंसही देत होते. त्या राज्यांत मोकासेदारीपेक्षां मोठा अधिकार दुसरा बहुतकरून नव्हता. कधीं कधीं 'सुभा' मोठा असे, परंतु सुभ्यानें नेहेमीं त्या प्रांतीं नसावें, बहुधा दरबारींच असावें. त्यानें मुलखाचे वसुलाचें काम न करावें, परंतु त्याचे मुलखाचे दप्तरावर त्याची सही घ्यावी लागत असे.

२. ब्राह्मणी वंशाचें राज्य बुडाल्यानंतर कांहीं दिवस नवीं नवीं राज्यें झालीं, परंतु मराठे लोकांचे वर्तमानांत अंतर पडलें नाहीं. त्या वेळेचे बखरीवरून असें वाटतें कीं, बहुधा डोंगरी किल्ले मराठे लोकांकडे बादशाहाकडून असत; कधीं कधीं बादशाहाकडेच असत; कधीं कधीं देशमुख व देशपांडे यांकडे असत; त्यांत कितीएक प्रांतांतील मोठे मोठे किल्ले बादशाह आपणाजवळच राखी. त्या लोकांत ज्याचे स्वाधीन बहुत स्वार असा जो मोठा सरदार त्याला मोठ्या योग्यतेचें नांव 'मनसब' असें देत होते. तो अधिकार व तें नांव कधीं कधीं हिंदूंस देत, अशी बादशाहाची कृपा हिंदु लोकांवर होती. याशिवाय हिंदूंनीं फौजेसहित आपल्या चाकरीस असावें

ह्मणून कितीएक जहागिरी, इनामें, देत असत. त्यानिमित्त चाकरीकरितां हिंदु लोकांस बहुत फौज ठेवावी लागत नव्हती. त्या समयीं फलटण देशाचा जहागीरदार विजापूरकरांकडे होता, त्यापासून बादशाह पन्नास स्वारांची चाकरी घेत असे; आणि मराठे पेशवे, यांचे वेळेस त्या जहागीरदारापासून साडेतीनशें स्वारांची चाकरी घेऊं लागले.

३. पेशवे यांचे पूर्वीं अदिलशाही बादशाहींत मराठे लोकांस 'बर्गे' असें नांव मुसलमानांनीं ठेविलें होतें, तें आतां बहुतकरून प्रसिद्ध नाहीं. असें वाटतें कीं, जसें सांप्रत 'बारभाई' नांव हलकें आहे, तसेंच त्या वेळेस 'बर्गे' नांव किमतीस उणें असेल. प्रायः तें नांव कर्नाटक प्रांतींचे बंड करणोर स्वारांस होतें. त्यांत कोणी मोठे मोठे जहागीरदारही होते; असें असतां सन १५७८ त त्या बर्ग्यांतील अधिकारी यांनीं कर्नाटकांत मोठें बंड उत्पन्न केलें. तेव्हां विजापुरचा अदिलशाह बादशाह यानें तें बंड मोडावयाकरितां लष्कर पाठविलें, तें एक वर्षपर्यंत लढलें; परंतु उपाय चालेना. ते समयीं बादशाहानें कोणी एक वासूपंत नामें ब्राह्मण सहाय केला, त्याचे हातानें त्या बर्ग्यांतील बहुतेक अधिकारी आपल्या हस्तगत करून कपटानें मारिले. यानंतर ते बर्गे लोक विजापूरचा अदिलशाह याचेच आश्रयानें निझामशाह बादशाहाशीं लढूं लागले. विजापूरकर व अहमदनगरकर यांचे लष्करांत बहुतकरून मराठे लोक फार होते, कां कीं, त्यांचीं राज्यें महाराष्ट्र देशांत होतीं. गोवळकोंडेकर यांचे लष्करांत मराठे लोक बहुत नव्हते. विजापूरकर व अहमदनगरकर व गोवळकोंडेकर या तिघांजवळ मराठे लोक होते, ते परस्परें युद्धप्रसंग पडला असतां, आपल्या जातीचा लोभ न धरितां लढत असत. भाऊबंदकीसंबंधी द्वेष पडला किंवा बापलेंकांत वितुष्ट पडलें असतां भाऊबंद व बापलेंक यांनीं परस्परें निकरानें लढावें, अशी एक मराठे लोकांत चाल होती. ती त्यांचे पूर्वींच्या ब्राह्मणी वंशाचे राज्यापासून चालत आली, तिचा प्रतिबंध त्या वेळच्या बादशाहानें केला नाहीं. कां कीं, जे आपल्या जातींत भांडूं लागले ते दुसऱ्याशीं काय लढतात, असें समजून मोडिली नाहीं, तशीच रक्षिली.

विजापूरकर व अहमदनगरकर यांचे राज्यांत मराठे सरदार कोण कोण होते त्यांचा तपशील मग येईल. आधीं विजापूर व अहमदनगर व गोवळकोंडें या तिहीं राज्यांत किती बादशाह झाले तो विस्तार, त्यानंतर फिरंगी लोक कोंकणांत आले तें प्रकरण, त्यापुढें मराठे सरदार यांचें वर्तमान लिहिलें जाईल. प्रथम विजापूर व अहमदनगर व गोवळकोंडें या तिहीं राज्यांत बादशाह किती झाले तो प्रकारः—

## विजापूर.

विजापूरचा बादशाह प-हिला सुलतान युसफ अ-दिलशाह, तो सन १४८९ त तक्ताधिपति झाला आणि सन १५१० त मरण पावला.

त्याचा पुत्र दुसरा सुल-तान इस्माएल अदिलशाह त्याचे जागीं बसविला, तो स० १५५४ त मरण पावला.

त्याचा पुत्र तिसरा सुल-तान मल्लु अदिलशाह त्याचे ठिकाणीं स्थापिला, तो सन १५५५ त पदच्युत झाला.

त्याचा भाऊ चवथा सु-लतान इब्राहिम अदिल-शाह स्थापिला; तो सन १५५७ त मरण पावला.

त्याचा पुत्र पांचवा सु-लतान अली अदिलशाह झाला, तो सन १५८० त कारभाऱ्यांनीं कपटानें मा-रिला.

त्याचा पुत्र सहावा सु-लतान इब्राहिम अदिल-शाह, तो त्याचे स्थानीं ब-सविलो[1].

१. याचे मरणाचा प्रकार तिसऱ्या भागांत येईल.

## अहमदनगर.

अहमदनगरचा बादशा-ह पहिला मलिक अहमद, तो निझामउलमुल्क बहिरी असें नांव पावून सन १४८७त राज्य करूं लागला आणि सन १५०८ सुमार तेव्हां मृत्यु पावला.

त्याचा पुत्र दुसरा सुल-तान बुऱ्हाण निझामशाह झाला, तो सन १५५३ त मरण पावला.

त्याचा पुत्र तिसरा सु-लतान हुसेन निझामशाह तक्तावर बसविला, तो सन १५६५ त मृत्यु पावला.

त्याचा पुत्र चवथा सुल-तान मूर्तिजा निझामशाह झाला तो त्याचे पुत्रानें १५८७ त मारिला, आणि आपण तक्ताधिपति झाला.

त्याचें नांव पांचवा सुल-तान मिरान हुसेन निझाम-शाह बादशाह. त्यानें दोन महिने राज्य केलें. नंतर कारभाऱ्यांनीं त्यास मारिलें.

त्याचा भाऊ सहावा सुलतान इस्माएल निझाम-शाह झाला. तो तक्ताधि-पति असतां त्याला त्याचे बापानें काढून दिलें आणि आपण तें पद घेतलें.

त्याचें नांव सुलतान बु-ऱ्हाण निझामशाह. तो सा-तवा झाला आणि सन १५९४ त मरण पावला.

## गोवळकोंडें.

गोवळकोंड्याचा बाद-शाह पहिला सुलतान कुतु-बउलमुल्क नामें सन १५१२ त झाला. तो सन १५५१ त कारभाऱ्यांनीं मारिला.

त्याचा पुत्र दुसरा सु-लतान जमशीद, तो सात महिने राज्य करून मेला.

त्याचा भाऊ तिसरा सु-लतान इब्राहिम कुतुबशाह बादशाह झाला, तो सन १५८१ त मृत्यु पावला.

त्याचा पुत्र चवथा सु-लतान महंमद कुली कुतु-बशाह झाला.

तो मेल्यानंतर त्याचा भाऊ पांचवा सुलतान अ-बदुल्ला कुतुबशाह झाला[1].

१. इतकीं प्रकरणें सन इ-सवी शकाचे मुळापासून १६०० पर्यंत झालीं. याखेरीज राहिलीं तीं पुढचे भागी येतील.

४. सन इसवी शकाचे १४९८ चे मे महिन्यांत फिरंगी ( पोर्तुगीज ) लोक यांच्या जातीचा एक वास्को दि गामा नामें मोठा सरदार बरोबर फिरंगी लोक घेऊन जहाजांत बसून आला, तो कारकोळ देशांत समुद्रतीरीं एक कालिकोट नामें शहर आहे तेथें उतरला, आणि युद्ध न करितां त्या देशांत आपल्या लोकांसहवर्तमान सुखवस्तीस राहिला. त्याचा बेत सुखवस्तीस राहावें असा नव्हता, यास्तव सन १५०७ त चौल शहराजवळ मिश्री लोक यांचे लढाऊ गलबतांची व फिरंगी लोकांचे लढाऊ गलबतांची गांठ पडतांच उभयतां मोठ्या निकरानें लढले. नंतर निझामउल्मुल्क बहिरी याशीं पोर्तुगीज लोकांनीं सख्य केलें, आणि समुद्रांत व मुलखांत उपद्रव करूं लागले; ते सन १५०८ त दाभोळचे खाडींतून येऊन दाभोळ लुटून गेले. ते समयीं त्यांचे हातीं कांहींच मुलूख लागला नव्हता. नंतर तुळव्याचा तिमोजी नामें एक समुद्रांतला लुटारू होता, तो पोर्तुगीज लोकांचा जो आल्बुकर्क नामें सरदार होता, त्यास मिळाला. मग त्यानें त्याचे मसलतीनें सन १५१० चे फेब्रुअरी महिन्याचे २७ वे तारखेस छापा घालून गोंवें घेतलें. तें त्या वेळेस विजापुरचे राज्याखालीं होतें, ह्मणून विजापुरचा बादशाह युसफ अदिलशाह फौजेसहित आला, आणि त्यानें लढून गोंवें परत घेतलें. त्यानंतर त्याच वर्षाचे नोव्हेंबर महिन्याचे २५ वे तारखेस पुनः पोर्तुगीज लोकांनीं गोंवें घेतलें, तें आजपर्यंत त्यांजकडेच आहे. त्यापुढें सन १५३२ त ते लोक जहाजांतून आले, ते चिंचणी तारापुरीं येऊन उतरले, आणि त्यांनीं तेथपासून वसईपर्यंत मुलूख लुटला. ते वेळेस वसईचा किल्ला नवाच बांधिलेला होता तो पाडिला; आणि ठाणें व मुंबई शहर यांची खंडणी घेतली. त्यापुढें दोन वर्षांनीं दमाण घेतलें. त्या समयीं गुजराथेंत सुलतान बहादूर नामें बादशाह होता, तो दिल्लीचे बादशाहाशीं लढून केवळ बळहीन झालेला असा पाहून फिरंगी लोक त्याला ह्मणूं लागले कीं, 'आह्मांस वसई परगणा द्यावा, आणि काठेवाडांत दिव एथें किल्ला बांधावयास जागा द्यावी, आणि आरबस्थानचे जहाजांचे जकातींत आह्मांस कांहीं विभाग असावा, ह्मणजे आह्मी दिल्लीचे बादशाहाशीं लढाई करावयास तुमचे कुमकेला येऊं'. याप्रमाणें त्यांचें बोलणें मान्य करावयास सुलतानास मोठ्या अडचणीमुळें अगत्य पडलें. नंतर ते पोर्तुगीज लोक कितीएक वर्षें लोकांस उपद्रव न करितां आपल्या मुलखाचा बंदोबस्त करून राहिले होते. पुढें सन १५४८ त त्यांनीं समुद्रतीरचा मुलूख बाणकोटापासून गोमांतकापर्यंत लुटला, आणि जाळिला. तो मुलूख ते समयीं विजापुरचे राज्याखालीं होता. त्यापुढें सन १५७१ पर्यंत त्या लोकांचें वर्तमान विशेष लिहावें असें झालें नाहीं.

५. त्या वर्षीं विजापुरचा बादशाह व अहमदनगरचा बादशाह हे दोघे मिळून फिरंगी लोकांशीं लढाई करावयास गेले, ते गोंवें आणि चौल शहर या दोहोंस वेढा घालून लढूं लागले, परंतु पोर्तुगीज लोकांपुढें त्यांचें बळ चाललें नाहीं, ते आपणच पराभव पावले. आपल्या जातिस्वभावाप्रमाणें उगेच बोलूं लागले कीं, 'यांचें युद्ध शौर्ययुक्त नाहीं, हे कपटानें लढतात,' असें भाषण करीत करीत पळून गेले.

६. आतां मराठे सरदार यांचें वर्तमान. विजापुरचे बादशाहाचे चाकरीस मुख्यत्वें मराठे सरदार होते. एक चंद्रराव मोरे; दुसरे राव नाईक निंबाळकर, ज्यांस फलटणरावही ह्मणत होते; तिसरे झुंझारराव घाटगे; चौथे राव माने; पांचवे घोरपडे; सहावे डफळे; सातवे सावंतबहादूर, वाडीचे देशमुख; वगैरे विजापूरकरांकडे होते. अहमदनगरकरांजवळ जे होते त्यांत एक राव जाधव, दुसरे राजे भोंसले, यांखेरीज आणखी दुसरे बहुत न्यून पदांचे होते. विजापूरवाल्यांचे चंद्रराव मोरे यांचें मूळ असें आहे कीं, पूर्वीं कर्नाटकांत एक मोरे आडनांवाचा नाईक होता, त्याला युसफ अदिलशाह विजापुरचा बादशाह यानें हिंद्वी पायदळ फौज बारा हजार देऊन निरा आणि वारणा या दोहों नद्यांचे मधला मुलूख, जो घ्यावयास कठिण, फार अडचणीचा, असा होता, तो घ्यावयाचें काम सांगितलें. ते समयीं त्या मुलखांत शिरके यांचे मूळ पुरुष होते. आणि त्यांचे सहाय गुजर, मामूलकर, मोहिते, महाडीक, वगैरे होते. असें असतां मोरे यांनीं तेथें जाऊन ते शिरके व त्याचे सहाय जिंकून तो मुलूख घेतला. एवढें काम केलें ह्मणून बादशाह यानें त्याचे नांवाला 'चंद्रराव' असें पद जोडून तो जावळीचा राजा केला. ते मोरे त्या पुरुषापासून पुढें सात पुरुषपर्यंत तेथेंच होते. त्यांनीं तें राज्य उत्तम नीतीनें केलें ह्मणून बहुत लोक येऊन तो मुलूख वस्तीस योग्य नसतां तेथेंच राहिले. त्या बादशाहानें ठेविलेलें चंद्रराव असें नांव मोरे यांचे सातां पिढ्यांस चालिलें. ते बादशाहाचे आज्ञेंत वागत ह्मणून बादशाह त्यांचे मुलखाचा वसूल आपलें स्वामित्व मात्र राखावयास फार थोडा घेत असे. ज्यांस फलटणराव नाईक ह्मणत तेच निंबाळकर, त्यांचे कुळीचें पूर्वींचें नांव 'पंवार' असें होतें. त्यांचा मूळपुरुष निंबाळिक गांवीं राहात होता, त्या गांवास आतां निंबळक ह्मणतात. हें कूळ मराठे लोकांत पुरातन आहे. याचे पहिल्या पुरुषांत फलटण देशचे देशमुखीचा विभाग होता. सन १६४० चे सुमारें विजापुरचे बादशाहानें त्यांस सरदेशमुखी दिली. त्यांनीं आपलें नांव बदलून दुसरें केलें नाहीं, जें पहिलें नाईक असें होतें तेंच चालविलें. सन १६०० सुमारें त्या कुळाचा एक पुरुष वंगोजी नाईक होता, त्याला लोक 'जगपाळ' ह्मणत, तो मोठी पुंडाई करीत असे. त्याची बहीण ती शिवाजी

राजाची मायआजी. मलावडीचे देशमुख जुंझारराव, ते घाटगे याचे कुळांत श्रेष्ठ होते; त्यांचें राहाणें खटाव देशीं असे. त्यांचे देशाची मर्यादा व निंबाळकर यांचे देशाची मर्यादा या दोहोंमध्यें महादेवाचा डोंगर. ते घाटगे मानपरगण्याचे देशमुख होते. त्यांचे मूळ पुरुषास ब्राह्मणी वंशाचे बादशाहानें मैनसब दिली होती. ती तारीख कोणती व बादशाह कोणे नांवाचा होता तें कळत नाहीं. विजापुरचा बादशाह इब्राहिम अदिलशाह यानें घाटगे यास सैरदेशमुखी व 'जुंझारराव' असें नांव सन १६२६ त दिलें. पूर्वीपासून घाटगे यांचे कुळाचा स्वभाव आपल्या आपल्यांत भांडावें असा लोकांत प्रसिद्ध आहे. माने यांचे मूळपुरुष ह्मसवडचे देशमुख होते, त्यांची जागा व घाटगे यांची जागा दोन्ही शेजारीं होत्या; ते विजापूरकरांजवळ शिलेदारी करून विख्यात झाले. घोरपडे यांचें मूळचें उपनांव भोंसले होतें. त्यांचा एक पुरुष कोंकणचा मोठा कठिण किल्ला घ्यावयाकरितां घोरपडीचे कमरेस व आपल्या कमरेस एक दोरी बांधून घोरपड किल्ल्यावर चढवून त्या दोरीवरून आपण किल्ल्यावर गेला आणि तो किल्ला घेतला. ह्मणून त्याचें नांव 'घोरपडे' पडलें आहे, असें जुने बखरीवरून वाटतें. विजापुरचे बादशाहींत त्याची देशमुखी होती. त्याचे कुळास दुसरीं नांवें त्या नांवांतच दोन होतीं, एक 'कापशीकर' आणि एक 'मुधोळकर.' कापशीकर वारणातीरीं होते, आणि मुधोळकर घटप्रभेचे कांठीं असत. डफळे विजापुराजवळ जथ परगणा आहे तेथचे देशमुख. यांचें पूर्वीचें उपनांव चव्हाण; हे डफळापुरीं पाटिलकी करीत ह्मणून यांचें नांव 'डफळे' असें पडलें. विजापूरकरांतून त्यांस मनसब अधिकार मिळाला होता, परंतु दुसरें कांहीं वेगळें नांव मिळालें नाहीं. सावंत पहिलेपासून वाडीचे देशमुख, त्यांनीं पोर्तुगीज लोकांशीं फार चांगली लढाई केली ह्मणून बादशाहानें त्यांचे नांवांस 'बहादूर' असें पद जोडिलें, त्यापासून 'सावंतबहादूर' असें त्यांस लोक ह्मणूं लागले. यांचें मूळचें उपनांव 'भोंसले.' त्यांजवळ नुसती पायदळ फौज होती, आणि त्या मुलखीं दुसऱ्या फौजेचा उपयोगही नव्हता. त्या वाडीप्रांतास 'कुडाळ देश' ह्मणत.

---

१. मनसब ह्मणजे मोंगलाईंत स्वारांचे सरदारीसारिखा अधिकार होता, तो कधी कधी दहा हजार स्वारांचा असे. ते लोक त्याचे खर्चाप्रमाणें त्यास जहागीर देत असत. २. सरदेशमुखास विजापुरचे बाहशाहींत वसुलाचा विभाग किती होता तो कळत नाहीं, परंतु दिल्लीचा औरंगजेब बादशाह याचे वेळेस कितीएकां सरदेशमुखांना शेंकडा दोन रुपये प्रमाणें विभाग होता. ३. शिलेदार ह्मणजे जो आपल्या सत्तेच्या घोड्यावर बसून धन्याची चाकरी करितो तो, आणि जो धन्याचे घोड्यावर बसून चाकरी करितो तो बारगीर. ४. कापशीकर यांस विजापुरचे सरकारांत 'नव कस' ह्मणत, आणि मुधोळकरांस 'सात कस' ह्मणत.

७. अहमदनगरचे राज्यांत एक मराठा सरदार मुख्य होता त्याचें नांव जाधवराव, तो शिंदखेडचा देशमुख. त्याचा मूळपुरुष देवगडचा राजा असेल. असें वाटतें कीं, सर्व मराठ्यांचे कुळांत जाधवरावाप्रमाणें दुसरा प्रतापी नव्हता. सन १६०० च्या सुमारें निझामशाह सरकारांतून त्याला दहा हजार स्वारांची सरदारी सांगून त्याचे बंदोबस्तास जहागीर दिली होती. दुसरे मुख्य सरदार भोंसले, ते मोठे कुलीन होते. असें वाटतें कीं, त्यांची पाटिलकी बहुतां जागीं होती; परंतु त्यांचें राहावयाचें ठिकाण दौलताबादेजवळ वेरूळ ह्मणून गांव आहे तें. पहिले बाबाजी भोंसले; यांस पुत्र दोघे, त्यांत वडील मालोजी आणि धाकटा विठोजी. मालोजीला जगपाळराव नाईक निंबाळकर, फलटणचा देशमुख, याची बहीण दीपाबाई दिली होती. तो मालोजी भोंसला पंचवीस वर्षांचा झाल्यावर आपल्याबरोबर कितीएक स्वार घेऊन लुखजी जाधवरावाचे आश्रयानें मूर्तिजा निझामशाह बादशाह याचे चाकरीस राहिला. हें वर्तमान सन १५७७ त झालें. त्या मालोजीस पुत्र नव्हता ह्मणून त्यानें मोठी देवसेवा केली, परंतु पुत्र झाला नाहीं. मग अहमदनगरीं एक मुसलमान जातीचा शाह सरीफ नामें मोठा अवलिया होता, त्यानें आपल्या देवाजवळ विनंति करून मालोजीस सांगितलें कीं, 'तुला पुत्र होईल.' नंतर कांहीं दिवसांनीं त्याची स्त्री दीपाबाई गरोदर होऊन प्रसूत झाली, तों पुत्र झाला. मालोजीनें तो सिद्धाचे प्रसादेंकरून झाला असें जाणून त्या मुलाचें नांव शाहाजी ठेविलें. त्यावर दुसरे वर्षी दुसरा पुत्र झाला, त्याचें नांव सरीफजी ठेविलें. त्या शाहाजी भोंसल्याचें जन्म सन १५९४ त झालें. मालोजी भोंसले उत्तम प्रकारें सरकारचाकरी करून अधिक योग्यता पावूं लागले, आणि ज्या जाधवरावाचे आश्रयानें चाकरी मिळविली तो लुखजी जाधवरावही त्यावर बहुत कृपा करूं लागला. मालोजीचा पुत्र शाहाजी रूपानें फार चांगला होता. सन १५९९ त शिमग्यामध्यें मालोजीनें आपल्या पुत्रास लुखजी जाधवरावाकडे भेटावयास नेलें. तेव्हां जाधवराव त्या मुलाचें रूप पाहून बहुत खुष होऊन त्यास जवळ बोलावून जिजाबाई त्याची कन्या मांडीवर होती तिला बोलिला कीं, 'हा तुला नवरा पाहिजे काय?' आणि मंडळीस ह्मणूं लागला कीं, 'हा जोडा कसा दिसतो?' इतक्यांत तीं दोन्हीं मुलें एकमेकांवर गुलाल उधळून खेळूं लागलीं, तें पाहून सर्व मंडळीस चमत्कार वाटला, आणि हांसूं लागले. ते वेळेस मालोजी भोंसले उभे राहून बोलिले कीं, 'ऐका हो सर्व मंडळी. आजपासून जाधवराव आमचे व्याही झाले, यास तुह्मी साक्षी आहांत.' तेव्हां त्या मंडळींत कोणी कोणी ह्मणाले कीं, 'हें ठीक आहे.' तें ऐकून जाधवराव खिन्न होऊन उगाच राहिला, कांहीं बोलिला नाहीं. त्यानंतर दुसरे दिवशीं

जाधवरावानें त्या मालोजीस भोजनास बोलाविलें, तेव्हां तो ह्मणाला कीं, 'तुह्मी व्याही व्हाल तर मी येईन, नाहीं तर येणार नाहीं.' हें ऐकून त्यानें कांहींच मान्य केलें नाहीं, आणि त्याचे स्त्रीस हें कळतांच राग येऊन तीही बोलिली कीं, 'असें भाषण विनोदांतही न व्हावें; माझे कन्येचे आणि त्याचे योग्यतेस किती अंतर आहे!' त्यानंतर मालोजी आपल्या राहावयाच्या ठिकाणीं निघून गेला. परंतु त्यानें तो अर्थ मनांत धरून त्याचे साधनाकरितां कांहीं लबाड्या करून द्रव्य मिळविलें, तें चांभारगोंद्याचा सावकार शेषावा नाईक पुंडे याजवळ ठेविलें, आणि लोकांत अशी प्रसिद्धी केली कीं, भवानी आह्माला प्रसन्न होऊन द्रव्य देऊन बोलली कीं, 'तुमचे कुळांत एक राजा होईल, तो सांबासारिखा गुणवान् होईल, आणि ब्राह्मणांचें पोषण फार चांगलें करील; आणखी त्या पुरुषापासून पुढें सत्तावीस पुरुषपर्यंत त्याचें राज्य निर्बाध चालेल.' इतकें केल्यावर आणखी मोठी कीर्ति व्हावी ह्मणून कितीएक जागीं देवालयें व तळीं बांधिलीं, आणि बहुत घोडे विकत घेतले. ते समयीं त्या राज्याचें सामर्थ्य कमी होऊं लागलें होतें, तें समजून त्यानें त्या दरबारी लोकांस द्रव्य देऊन ते वश केले होते, त्या योगेंकरून त्याला बादशाहापासून पांच हजार स्वारांची सरदारी आणि 'मालोजी राजे' असें नांव मिळालें. याखेरीज शिवनेरी व चाकण या दोहों किल्ल्यांची व त्यांचे खालचे मुलखाची मामलत प्राप्त झाली, आणि पुणें परगणा व सुपें परगणा त्यास जहागीर मिळाला. एवढ्या योग्यतेस आल्यावर बादशाह याचे आज्ञेनें त्याशीं संबंध करावयास जाधवराव सिद्ध झाले. मग जाधवरावाची कन्या जिजाबाई व मालोजीचा पुत्र शाहाजी या दोघांचें लग्न मोठ्या समारंभानें झालें.

८. सन १५९० त दिल्लीचा मोठा यशस्वी अकबर बादशाह यानें मनांत आणिलें कीं, दक्षिणेचे अवघे बादशाह जिंकावे. ते वेळीं ते सर्व परस्परें लढत असत आणि आपआपसांत वैमनस्यें होतीं ह्मणून अकबरास बहुतेक दक्षिणेचें राज्य मिळालें. याखेरीज खानदेश व निझामाचा मुलूख, त्यांत अहमदनगरचा किल्ला आणि कांहीं वराडदेश हे त्याचे हस्तगत झाले. तो बादशाह पंधरा वर्षांत इतकें करून सन १६०५ त मृत्यु पावला. अहमदनगरचा किल्ला ज्या वेळेस अकबराचे लोक मोगल यांनीं घेतला, ते समयीं तेथचा बादशाह बहादूर निझामशाह केवळ बाळ होता, त्याला त्या मोगलांनीं बंदींत ठेविलें. त्याचे पूर्वी अहमदनगरचे राज्यांत दोन फळ्या झाल्या होत्या. एकाचे मुखत्यार हिंदु होते, आणि एकाचे हबशी; ज्यांत कितीएक श्रेष्ठ मुसलमान होते. त्यांत हिंदूंनीं आपल्या कुमकेस अकबराच्या मोगलांस बोलाविलें, ते त्यांची कुमक न करितां मुलुख मात्र घेते झाले.

तेव्हां हिंदूंचे मोठाले मानकरी यांस पश्चात्ताप झाला. मुसलमान लोक यांचा मुलुख मोगलांनीं घेतला आणि बादशाह बंदींत ठेविला तरी ते आपल्या राज्याविषयीं निराश झाले नाहींत. ते आपल्या सामर्थ्येंकरून श्रेष्ठत्व पावले.

९. त्यांत एक मोठा कल्पक फार, शहाणा मलिक अंबर नामें होता, तो त्या लोकांसहवर्तमान बादशाह यानें घेतलेल्या मुलखाखेरीज उरलेल्या मुलखाचा बंदोबस्त राखून राहिला, आणि नवाच एक बादशाह करून त्याचें नांव 'दुसरा मूर्तिजा निझामशाह' असें ठेविलें, आणि दौलताबादेचे किल्यावर बहिरी सरकारचा झेंडा लाविला. त्यानंतर तो मलिक अंबर लवकर प्रसिद्धीस आला. त्या वेळेस दिल्लीचा तक्ताधिपति जहानगीर नामें नवा झाला होता. त्याचे पुत्रानें बंड उत्पन्न केलें, त्यामुळें त्या मोगल लोकांस मलिक अंबराला उपद्रव करावयास अवकाश सांपडला नाहीं. इतक्यांत मलिक अंबरानें आपल्या मुलखाचा बंदोबस्त चांगला केला आणि आपली प्रजा व शेजारचे संस्थानी लोक वश करून घेतले; आणि दौलताबादेजवळ एक खडकी[1] नामें शहर वसविलें, त्यांत मोठे मोठे महाल बांधून ती मोठी राजधानी केली. मग त्यानें कितीएक वेळां मोगल लोकांचा पराभव केला, आणि थोडकेच दिवसांनीं अहमदनगरचा किल्ला व कांहीं वराडचा मुलुख मोगलांपासून घेतला, परंतु मोगलांनीं तो मलिक अंबराकडे फार दिवस टिकूं दिला नाहीं, पुनः माघारा घेतला. त्या मुलखांत पहिली रीति अशी होती कीं, जो मखत्यानें काम पत्करील त्याला मामलत सांगावी. ती रीति मलिक अंबरानें मोडिली, आणि वसुलाचे कामावर मुखत्यार मुसलमान ठेवून ब्राह्मणाचे हातून काम करवीत असे. निरंतर त्याचाच जय होत असे असें नाहीं. कितीएक वेळां मोगल लोकांनीं त्याचा पराभव केला. सन १६२१ त कितीएक मराठे सरदार त्याची चाकरी सोडून मोगलांस मिळाले, त्यांत शिंदखेडचा देशमुख लुखजी जाधवराव होता, त्याचा मोगलांनीं मोठा सन्मान करून त्याला मोठी मनसब दिली. यावरून असें वाटतें कीं, त्या वेळेस मराठे योग्यतेस येऊं लागले होते.

१०. पुढें सन १६२६ त मलिक अंबर मरण पावला. त्यानंतर इब्राहिम अदिलशाह, विजापुरचा बादशाह, तोही एका वर्षानें मेला. त्यानें आणि मलिक अंबरानें प्रजेस सुख दिलें म्हणून अद्यापि लोक त्यांचे गुण आठवितात. आतां विजापुरीं मोठीं मोठीं घरें व देवालयें मोडलेलीं आहेत, त्यांत इब्राहिमाची कबर केवळ नवी बांधल्याप्रमाणें दिसते, आणि फार सुंदर आहे. इब्राहिम अदिलशाह याचा पुत्र माहमुद अदिलशाह तो बापाचे पाठीमागें तक्ताधिपति झाला, तेव्हां त्याचें वय पं-

---

१. खडकी शहराचें नांव औरंगाबाद पडलें. त्याचें कारण पुढें येईल.

धरा वर्षांचें होतें. त्याचेजवळ शिबंदी पुष्कळ होती आणि त्याचे जामदारखान्यांत द्रव्य बहुत असे. आणखी त्याचे राज्यांत प्रजा सुखी होत्या. मलिक अंबराचे पुत्र दोघे; एक फत्तेखान, दुसरा चिंगिजखान. त्यांत फत्तेखान यानें आपल्या बापाचा अधिकार जो मूर्तिजा निझामशाहापाशीं होता तो संभाळिला, आणि मोगलांशीं युद्धें केलीं, परंतु त्याची योग्यता मलिक अंबराप्रमाणें नव्हती. त्यामुळें तो अगदीं बुडाला असता, परंतु खान जहान लोदी नामें एक मोगलांचा मोठा सरदार मुख्य होता त्यास त्याची दया आली, ह्मणून त्यानें त्याशीं सल्ला केला. पुढें मूर्तिजा निझामशाह मोठा झाल्यावर एक वर्षपर्यंत त्यानें फत्तेखानाचे अन्याय ध्यानांत आणून त्याला सन १६२९ त बंदींत ठेविलें. त्यानंतर लुखजी जाधवराव आपला पहिला धनी मूर्तिजा निझामशाह याजकडे यावयाविषयीं इच्छा करूं लागला. तेव्हां त्यानें तो मोगलांस मिळाला ह्मणून त्याचें बोलणें मान्य केल्याप्रमाणें बाह्यात्कारें दाखवून मग कोणे एके दिवशीं कांहीं कामासाठीं ह्मणून त्याला त्याचे सोयरेधायरेसुद्धां दौलताबादेंत बोलावून आणून एकाएकीं दगा करून मारिलें. त्यानंतर त्याची स्त्री भर्त्याची फौज घेऊन शिंदखेडीस गेली, आणि तिचा दीर जगदेवराव जाधव याचे आश्रयानें मोगलांचे लष्करांत जाऊन मिळाली. मग तिचे विनंतीवरून मोगलांनीं जगदेवराव जाधव यास लुखजी जाधवाचा अधिकार व पांच हजार स्वारांची मनसब दिली. तेव्हांपासून शिंदखेडच्या जाधवांचें कुळ मोगलांचा अभिमान धरूं लागलें.

११. दिल्लीचा बादशाह जहानगीर सन १६२७ त मेला. नंतर एके वर्षानें त्याचा पुत्र शाह जहान हा तक्ताधिपति केला. ते समयीं महाराष्ट्र मुलुख जितका मोगलांनीं घेतलेला होता त्याचा अधिकारी खान जहान लोदी नामें होता, त्याशीं शाह जहान बादशाह द्वेष करीत असे. त्यानें त्यास धरावयास फौज पाठविली तेव्हां तो पळून गेला, तो निझामशाह याचे लष्करांत जाऊन त्याचा आश्रय करून राहिला, ह्मणून शाह जहान बादशाह दक्षिणेंत फौज घेऊन चालिला. तेव्हां खान जहान लोदी निझामशाहास सोडून दक्षिण देशांतच आणखी पळाला. ते वेळेस त्याचा सहाय शाहाजी भोंसला होता, तो शाह जहानाचें मोठें सामर्थ्य पाहून खान जहान लोदी याला सोडून त्यास मिळाला. तेव्हां तो शाहाजी व त्याचे बरोबर जे दुसरे सरदार होते ते बादशाहापासून मनसब व मोठा सन्मान पावले.

१२. असें वर्तमान सन १६२९ त झालें. त्या वर्षीं आणि त्याचे पुढचे वर्षीं दक्षिणदेशीं पर्जन्य पडला नाहीं ह्मणून मोठा दुष्काळ आणि महामारीचा रोग एकदांच पडले. तेव्हां खान जहान लोदी सर्व प्रकारें निरुपाय होऊन दक्षिणेंतून

निघून काबुलप्रांतीं जाऊन आफगाण लोकांस मिळावें ह्मणून निघाला. तों त्याला वाटेनें शाह जहान बादशाहाचे सरदार लोक भेटले, त्यांशीं व याशीं युद्ध होऊन तो खान जहान लोदी मरण पावला. त्यानंतर त्या सरदारांनीं अहमदनरचा बादशाह निझामशाह याचे कितीएक जहागीरदार व मनसबदार यांचे अधिकार व मुलुख घेऊन आपल्या लोकांस दिले. तेव्हां तो बादशाह आपलें संस्थान जाईल ह्मणून भ्याला, आणि जो बंदीस ठेविलेला फत्तेखान यास सोडून पहिलेप्रमाणें त्याला वजीरीचें काम सांगितलें. अशी त्या बादशाहाची अनीति पाहून एक त्याचे लष्करचा तकरीबखान नामें मोठा सरदार होता तो त्याची चाकरी सोडून मोगल लोकांकडे जाऊन मिळाला.

१३. ते समयीं विजापूरकर व अहमदनगरकर हे आपापल्यामध्यें एकमत होऊन मोगलांचा पराभव करावा, अशी इच्छा करूं लागले; आणि तो विचार शेवटास न्यावयाकरितां त्यांस असें दिसूं लागलें कीं, जो पूर्वीं विजापूरकरांचा व मोगल लोकांचा तह ठरलेला होता तो कामास येईल. तो तह असा कीं, विजापूरकर व मोगल लोक या दोघांनीं मिळून अहमदनगरचें राज्य बुडवून तो मुलुख उभयतांनीं वांटून घ्यावा, त्यांत धारूर किल्ला व आणखी कांहीं मुलुख व सोलापूर किल्ला विजापूरकरांचे वांट्यांत यावा.

१४. नंतर विजापूरकरांनीं आपलें लष्कर, रणदुल्लाखान सरदार बरोबर देऊन, मोगलाकडे पाठविलें. तो सरदार असें बोलिला कीं, 'आह्मी पूर्वसंकेताप्रमाणें आलों, तुह्मी धारूर किल्ला आमचे स्वाधीन करा.' ते समयीं ते मोगललोकांचे सरदार त्यास किल्ला एकाएकीं देईनात, इतक्यांत अहमदनगरकरांनीं विजापूरकरांस सोलापूर किल्ला द्यावयास कबूल केलें, त्या योगेंकरून त्या उभयतांची मसलत पक्की झाली असतां कांहीं दैवगतीनें मोगल लोकांचें लष्कर व विजापूरकरांचें लष्कर या दोहोंत कांहीं कलह उत्पन्न होऊन मोठें युद्ध झालें. त्यांत विजापूरकर पराभव पावले, तेव्हां ती मसलत सहजच व्यर्थ झाली; आणि तो दुष्ट फत्तेखान यानें आपल्या धन्यास कैद करून त्याचे गळ्यास दोरीचा फांस घालून मारिलें, आणि मानकरी सरदार जे त्याचे इष्ट होते तेही मारिले.

१५. असें त्या फत्तेखानानें दुष्कर्म केल्यानंतर मोगलांचा बादशाह शाह जहान याजकडे आपल्या कर्माची क्षमा होण्याविषयीं विनंतिपत्र पाठविलें कीं, 'मीं हें कर्म तुमच्या कार्याकरितां केलें आणि त्याचे स्थानीं त्याचा पुत्र तुमचें उत्तर येई तोंपर्यंत बसविला आहे.' तेव्हां शाह जहानानें अहमदनगरचा मुलुख फार करून घेतला होता, परंतु कितीएक अवघड किल्ले त्या फत्तेखानाकडेसच राहिले होते, ह्मणून बा-

दशाहानें त्याचें पत्र मान्य केलेंसें दाखविलें, आणि उत्तर दिलें कीं, 'जर त्याचे जामदारखान्यांतले चांगले चांगले अलंकार व त्याचे उत्तम हत्ती असतील ते आह्मांकडे पाठवाल, तर तुह्मीं केलेलें आह्मी मानूं.' त्या उत्तराबरोबर कितीएक जहागिरांची सनद व मोठे सन्मानाचे सूचक कांहीं अलंकारादिक पाठविले. त्यास देणें दिलें त्यांत पूर्वीं शाहाजी भोंसल्यास दिलेला कांहीं मुलुख होता. ते समयीं फत्तेखान निरुपाय होऊन बादशाहानें लिहिल्याप्रमाणें पाठवून देता झाला. नंतर अहमदनगरचा बादशाह लहान ह्मणून तें राज्य फत्तेखानाकडेस राहिलें. हा प्रकार पाहून शाहाजी भोंसला अत्यंत खिन्न झाला, आणि माहमुद अदिलशाह, विजापुरचा बादशाह, याचा आश्रय धरून चाकरीस राहिला. त्या वेळेस विजापुरचा मुख्य कारभारी मोठा सुज्ञ मुरारपंत नामें ब्राह्मण होता, त्यानें शाहाजीचे मसलतीनें फौज तयार करून दौलताबाद घ्यावयास पाठविली. त्या वेळेस फत्तेखान दौलताबादेंत होता, त्यानें आपलें संरक्षण करावयाकरितां मोगलांनीं यावें ह्मणून त्यांस दौलताबाद किल्ला द्यावयास केला. त्यावरून, मोगल लोक दौलताबादेस येऊन पोंचले नाहींत तोंच, विजापुरचें लष्कर दौलताबादेस आलें. तेव्हां शाहाजीचें व दौलताबादच्या लोकांचें मोठें युद्ध झालें. त्यांत शाहाजीचा पराभव होऊन मागें तो आठ कोस हटला.

१६. नंतर हें काम पराक्रमानें होणार नाहीं असें समजून तह करणें इत्यादि युक्ति चालवावयास फत्तेखानाला निरोप पाठविला कीं, 'तुह्मीं त्यास किल्ला दिला असतां उभयपक्षीं हित नाहीं. हीच मसलत कीं, दोघांनीं मिळून त्याला त्याचें पूर्वस्थान दाखवावें; आणि तुमचा व आमचा पहिला संकेत असाच होता.' तें ऐकून त्यानें मान्य केलें. नंतर ते मोगल लोक आल्यावर त्यांवर हे दोघे मिळून तोफा सोडूं लागले, तेव्हां मोगलांचा सरदार मोहबतखान क्रोधयुक्त होऊन निश्चय करिता झाला कीं, 'फत्तेखानाचें पारिपत्य अवश्य केलें पाहिजे.' मग मोगल लढूं लागले, ते समयीं ते किल्लेकरी मोठा पराक्रम करून अठ्ठावन्न दिवसपर्यंत टिकले; नंतर त्यांची बेगमी सरली यास्तव त्यांनीं किल्ला मोगलांस दिला. तेव्हां मोगलांनीं फत्तेखानाला त्या अधिकारावरून काढिलें, आणि त्याचे हातचा स्थापिलेला मुलगा ग्वालेर किल्ल्यावर बंदींत ठेविला. पुढें फत्तेखान वेड लागून मेला.

१७. यानंतर शाहाजीचे मनांत आलें कीं, अहमदनगरचे बादशाहाचा कारभार आपण करावा. ह्मणून निझामशाह याचे स्थानीं दुसरा तक्ताधिपति केला; आणि कितीएक ब्राह्मण जवळ बाळगून राज्य करावयास आरंभ केला; आणि फौज जमा करून कितीएक किल्ले हस्तगत केले; व जागोजाग नव्या बादशाहाचा अंमल

बसवूं लागला. ते समयीं शाह जहान बादशाह यानें दक्षिणेचें सगळें राज्य आपला पुत्र अथवा दुसरा कोणी आत्मीय यांवांचून तिसऱ्यास दिलें असतां त्यापासून आपणास अपाय होईल, असें समजून पुत्र औरंगजेब लहान यास्तव तो मोठा होई तोंपर्यंत राज्याचे विभाग दोन करून एक खान दौरान, व दुसरा खान जुमान, या दोघांस ते अधिकार दिले. त्या विभागांचा प्रकार असा; खानदेशचा जितका मुलुख पूर्वीं मोगलांकडे होता तो व जालना परगणा व वराडचा पैनघाटभाग, इतके मुलुख एक विभाग; दुसरा जो मुलुख निझामशाह बादशाह अहमदनगरकर यापासून घेतला होता तो; असे दोन दोघांचे स्वाधीन करून सांगितलें कीं, 'उभयतांनीं पश्चिमेचा बंदोबस्त ठेवून शाहाजीला जिंकावयास अनुकूळ असावें.'

१८. त्या वेळेस शाहाजी भोंसला मोठें सैन्य जमा करून विजापूरकरांचे आश्रयानें मुलखांत उपद्रव करीत होता, त्यासाठीं शाह जहानास मोठा राग आला. कां कीं, दौलताबाद किल्ला जरी हस्तगत झाला तरी राज्याचा बंदोबस्त होईना. ह्मणून शाह जहानानें मोठें सैन्य मिळवून निश्चय केला कीं, अहमदनगरचें राज्य घ्यावें, याकरितां दक्षिणेचीं राज्यें बुडालीं तरी चिंता नाहीं. पूर्वीं शाह जहानास तें राज्य बुडवावें हें योग्य दिसत नव्हतें, तें कशासाठीं तें कळत नाहीं. कोण जाणे कांहीं राजकारणार्थ, किंवा कांहीं नीतीसाठीं. प्रथम विजापूरकरांकडे वकील पाठवून बोलणें लाविलें कीं, 'अहमदनगरकरांचे किल्ले तुह्मीं घेतले आहेत ते सर्व सरंजामसुद्धां आमचे स्वाधीन करा; त्यांत 'मुलूखमैदान' नामें एक मोठी तोफ, जी परांड्याहून विजापुरास नेली ती द्यावी, याखेरीज शाहाजीचे मसलतीस लागूं नये. याप्रमाणें वागलां तर निझामशाहींत जितका कोंकणपट्टी मुलुख पहिला होता तितका व सोलापुर किल्ला तुह्माला देऊं; नाहीं तर अगदीं बुडवून टाकूं.' हें बोलणें त्यांनीं मान्य केलें नाहीं. तेव्हां शाह जहानानें फौज जमा करून त्या लष्कराचे भाग चार केले. त्यांतले दोन शाहाजी भोंसल्यावर नेमिले, आणि दोन विजापूरकरांवर योजिले. ते वेळेस नासिक व चांदोर यांजवळचे जितके शाहाजीचे किल्ले होते ते मोगलांचे सरदार यांनीं घेतले.

१९. हें वर्तमान सन १६३५ त झालें. त्या वेळेस शाइस्तेखान, मोगलांचा सरदार, विजापुरचे राज्यांत शिरला, आणि त्यानें नळदुर्ग प्रांत घेतला. आणखी सोलापुर व बेदर या दोहोंमध्यें मुलुख आहे तोही घेतला. खान जुमान याचे समूर शाहाजी लढला नाहीं, एकाएकीं छापा घालीत असे; याप्रमाणें फार दिवस लढला. तो पहिल्यानें अहमदनगरासमीप होता, मग लढतां लढतां शेवटीं चांभारगोंदें आणि बारामती या दोहों मुलखांचे मध्यें हटून गेला. नंतर मोगल

मोठा सामर्थ्यवान् ह्मणून मिरज व कोल्हापुर या दोहों मुलखांमध्यें राहिला. तेव्हां विजापुरचें लष्कर शाहाजीस अनुकूळ होतांच त्या खान जुमानाचें सामर्थ्य चालेनासें झालें. तेव्हां मोगलाचे दरबारांतून त्यास अशी आज्ञा झाली कीं, 'मिरज व कोल्हापुर व रायबाग या तिहीं शहराजवळचा मुलूख उद्वस्त करावा.' त्यानें त्याप्रमाणें करून कितीएक लोक धरून आपल्याबरोबर नेले. याशिवाय खान दौरान खानदेशांतून लष्करसहित वाटेनें मुलखास उपद्रव करीत विजापुरास येऊन पोंचला. तो विजापूरही घेता, परंतु त्या बादशाहानें सभोंवतें दहा कोसपर्यंत अन्नपाणी मिळेनासें करून ठेविलें होतें, ह्मणून विजापूर त्यांचे हातीं येईना. यास्तव खान दौराननें त्याशीं सल्ला केला. ती तारीख सन १६३६. त्या सल्लयाचा प्रकार अवश्य जाणावा. कां कीं, ज्यापासून शिवाजी महाराज यांचें माहात्म्य उत्पन्न झालें, त्या सल्लयाचा प्रकार असा; परांडा व सोलापूर व त्याखालचा मुलुख व नळदुर्ग प्रांत व कल्याण परगणा व बेदर मुलुख; याशिवाय कोंकणचा कल्याण परगणा, आणि नीरानदी व भीमानदी या दोहोंमधला मुलुख, इतकें राज्य विजापूरकरांकडे असावें. याखेरीज शाहाजीचे किल्ले जितके असतील ते मोगलांस दिले असतां त्यास अभय आहे; आणखी विजापूरकरांनीं वर्षास वीस लक्ष होन मोगलास खंड द्यावा.

२०. विजापूरकर सल्ला करितात हें वर्तमान शाहाजीला कळतांच तो कोंकणांत जाऊन आपल्या किल्यांचा बंदोबस्त करूं लागला. तेव्हां मोगलांनीं त्याचा त्रिंबक किल्ला आणि शिवनेरी किल्ला व कोंकणचा कितीएक मुलुख घेतला. ते समयीं शाहाजीनें मोगलांचे बादशाहास विनंति केली कीं, 'माझे अपराधांची क्षमा करून मला आपल्या चाकरीस ठेवावें.' याची तारीख सन १६३७. बादशाहानें आपल्या चाकरीस त्याला ठेविलें नाहीं. 'विजापूरकरांचे चाकरीस राहावें' अशी आज्ञा दिली; त्यावरून शाहाजी विजापूरकरांचा आश्रय करून राहिला. मग त्यानें स्थापिलेला बादशाह लहान होता, तो मोगलांचा सरदार खान जुमान यानें धरून ग्वालेर किल्ल्यावर पहिले दोन मुलगे होते तेथें नेऊन ठेविला. असें अहमदनगरचें राज्य, ज्याचे बादशाह बहिरीच्या वंशांचे होते, तें बुडालें.

२१. या भागांत सनाचे अनुक्रमानें तालीकोटचे लढाईचा प्रकार पूर्वी असावा परंतु तेथें लिहिला नाहीं याकरितां एथें लिहिला जातो. तो असा कीं, पूर्वी हिंदूंचें विजयानगरचें मोठें राज्य कर्नाटकांत कानडे लोक यांनीं स्थापिलेलें होतें. मग सन १५६४ त दक्षिणेचे सर्व बादशाह मिळून त्या लोकांशीं जाऊन लढले; तो युद्धप्रसंग फार मोठा झाला, ते समयीं ते राज्य अगदीं बुडालें. ती लढाई ता-

लीकोटाजवळ झाली, त्या तालीकोटाचें नांव 'राक्षसगुड्डी' असें कोणी बखरेंत लिहितात.

---

## भाग तिसरा.

### ( इसवी सन १६३७ पासून सन १६४८ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. शाहाजी विजापूरकरांचे चाकरीस राहिल्यावर कसा वागत होता.—२. मग त्यानें दुसरी बायको केली.—३. त्याच्या पहिल्या बायकोचे दोघे पुत्र; एक संभाजी, एक शिवाजी.—४. दुसरीचा एक व्यंकोजी.—५. तो शाहाजी कर्नाटकांत गेला ते समयीं त्यानें आपली बायको जिजाबाई व पुत्र शिवाजी यांस आपलें जहागीर ठिकाण पुणें एथे पाठविलें; आणि त्यांचा बंदोबस्त दादाजी कोंडदेव यास सांगितला.—६. विजापूरसरकार व गोवळकोंडेसरकार यांची लक्ष्यें कोणते प्रकारची होतीं ते.—७. मोगल दक्षिणेच्या वसुलाचा बंदोबस्त करिता झाला ते, आणि त्यानें फसली तारीख कधी स्थापिली ते वर्तमान.—८. दादाजी कोंडदेव यानें वसुलाचा बंदोबस्त कसा केला ते.—९. मावळे लोक यांची हकीकत.—१०. शिवाजीचे रक्षक यांनीं त्याचे बाळपणीं त्याला कोणते प्रकारें वागविलें ते.—११. त्या शिवाजीचे पक्षपाती पहिले तिघे कोण होते ते प्रकरण.—१२. त्याने तोरणा किल्ला घेतला.—१३. तो आपणाकडेसच राहावा ह्मणून बादशाहास काय काय समजाविलें ते.—१४. राजगड किल्ला शिवाजीनें बांधिला ते वृत्त.—१५. दादाजी कोंडदेवाचा मृत्यु.—१६. चाकण किल्ला व कोंडाणें किल्ला यांचे लोक शिवाजीनें आपणांस अनुकूल केले ते.—१७. सुपें परगणा व पुरंदर किल्ला शिवाजीनें घेतल्याचा प्रकार.

१. ज्या समयीं शाहाजी विजापूरकरांचे चाकरीस राहिला, तेव्हां त्याचा प्रधान मुरारपंत यानें मोठ्या संतोषानें त्याला ठेविलें, आणि सुपें परगणा व पुणें परगणा त्यास दिला. कां कीं, त्याचे गुण व चातुर्य तो मुरारपंत जाणत होता. पुणें व सुपें हें त्याचें पहिलें ठिकाण ह्मणून त्याला दिलें. यानंतर मुरारपंतानें भीमा व नीरा या दोहों नद्यांचे मधला जो विजापूरकरांस नवा मिळालेला मुलुख, त्याचा बंदोबस्त शाहाजीचे साहाय्यानें केला, तेणेंकरून शाहाजीचें चातुर्य फार प्रकट झालें. ह्मणून मुरारपंत यानें त्यावर बहुत संतुष्ट होऊन तो जे समयीं माघारा बादशाहापाशीं आला ते समयीं बादशाहाजवळ त्याची फार स्तुति केली. नंतर बादशाहाचें लष्कर कर्नाटकांत जातेवेळेस बादशाह यानें शाहाजीला त्या लष्कराचा दुसरा अधिकार दिला, आणि त्याचा मित्र रणदुल्लाखान होता तो त्या लष्कराचा मुख्य अधिकारी केला. यानंतर त्यांचा जय झाल्यावर शाहाजीला त्या मुलखांत कोल्हार, बंगळोर, उस्कोटा, बाळापूर आणि सेरा, हे पांच परगणे बादशाहानें जहागीर दिले. याशिवाय कराड[1] परगण्यांत बेविसां गांवांचे देशमुखीची सनद

---

[1] १. कराड शहर सातान्याचे दक्षिणेस पंधरा कोस आहे.

दिली. त्याला बादशाह यानें दोहों जागीं जहागीर देण्याचें कारण असें असेल कीं, शाहाजीनें समजावें कीं, बादशाहाच्या मुलखाचे रक्षणेंकरून माझ्या मुलखाचें संरक्षण होईल.

२. शाहाजी भोंसला यानें मोगलांची चाकरी सोडल्यापासून त्याचे सोयरे शिंदखेडचे देशमुख जाधव यांचें व शाहाजीचें वांकडें पडलें. मग जे समयीं मोगलांशीं शाहाजीचें युद्ध झालें ते समयीं जगदेवराव जाधव, जो शाहाजीची स्त्री जिजाबाई इचा चुलता, तो मोगलांकडून शाहाजीशीं लढत होता. सन १६३० त शाहाजीनें दुसरी स्त्री मोहिते यांची कन्या केली, तेणेंकरून जिजाबाईला विषाद आला, यास्तव ती दुसरा कोणी आप्त होता त्याचे घरीं जाऊन राहिली, ती तीन वर्षें तेथेंच होती. नंतर मोगलांनीं तें स्थान घेतलें, परंतु मोगलांजवळ भोंसले व जाधव होते त्यांनीं तिला सोडविली, आणि शाहाजीचा कोंडाणें किल्ला होता तेथें पोंचविली.

३. तिचे दोघे पुत्र. त्यांत वडील संभाजी व धाकटा शिवाजी. शिवाजीचें जन्म शिवनेरी[1] किल्ल्यामध्यें सन १६२७ त झालें. थोरला पुत्र संभाजी बापास फार प्रिय होता, त्याला आपण कोठेंही गेला असतां बरोबर नेत असे; आणि शिवाजी आईजवळ होता, त्याला आई मोगलांचे हातीं न लागूं देतां फार युक्तीनें जपत असे. नंतर जेव्हां शाहाजी मुरारपंताबरोबर विजापुरास गेला, तेव्हां शिवाजीला घेऊन जिजाबाई त्याबरोबर गेली, ते वेळेस शाहाजीनें पुत्र शिवाजी हा सातां वर्षांनीं पुनः पाहिला. त्यापुढें शाहाजीजवळ जिजाबाई व शिवाजी फार दिवस राहिलीं नाहींत. सईबाई, निंबाळकरांची कन्या, शिवाजीला केली, तेथपर्यंत तीं शाहाजीपाशीं विजापुरीं होतीं; नंतर कर्नाटकांत शाहाजी जावयास निघाला ते वेळेस जिजाबाई व शिवाजी पुण्यास राहावयास गेलीं.

४. शाहाजीची दुसरी स्त्री तुकाबाई, मोहित्यांची कन्या, तिचा पुत्र व्यंकोजी. याशिवाय एक संताजी नामें शाहाजीचा दासीपुत्र होता.

५. जे कोणी मराठे सरदार असतात, ते बहुतकरून ब्राह्मण कारकून बाळगतात. त्यांत शाहाजीजवळ ब्राह्मण बहुतच होते, त्यांमध्यें दोघे अत्यंत विश्वासू. एक दादाजी कोंडदेव आणि दुसरे नारोपंत हणमंते. त्यांमध्यें नारोपंत हणमंते यांस कर्नाटकचे जहागिरीचा बंदोबस्त सांगितला; आणि दादाजी कोंडदेव यांस पुणें प्रांतींचा व बायको व मुलगा यांचा बंदोबस्त सांगितला. तो दादाजी कोंडदेव वसुलाचे कामांत निपुण होता, त्याचे हातून लागवड चांगली होऊन उत्पन्न अधिक

---

१. शिवनेरी किल्ला पुण्याचे उत्तरेस पंचवीस कोसांवर आहे. त्याची पेठ जुन्नर.

होत असे. नंतर शाहाजीच्या शौर्यावरून प्रसन्न होऊन बादशाहानें इंदापूर परगणा व बारामती परगणा व पुण्याजवळचे मावळांतली तळवट जमीन, पुणें प्रांताचे जहागिरीला अधिक लावून दिली; तेव्हां दादाजी कोंडदेव याचीही योग्यता त्या मुलखाच्या संरक्षणेंकरून वाढली.

६. त्या वेळेस गोवळकोंड्याचे दरबारीं आणि विजापूरचे दरबारीं आपआपल्या राज्याची मर्यादा कर्नाटकापर्यंत होती ती वाढवावयाकरितां इच्छा करीत होते. ते दोघे जर मोगलांशीं सावधपणानें वागते, तर उपयोग होता, तें टाकून कर्नाटकांत आणखी आणखी मुलुख घेऊं लागले. त्या दोघांत उपयोगाचें इतकें मात्र झालें कीं, माहमुद अदिलशाह जो विजापुरचा बादशाह त्यानें गोवळकोंड्याचा कुतुबशाह बादशाह याचे कन्येशीं आपलें लग्न केलें. माहमुद अदिलशाह जातीनें शूर नव्हता, त्याचे लष्करास सरदार संभाळीत होते. त्यानें विजापुरची रचना मात्र फार चांगली केली, आणि त्या शहरांत पाण्याचे नळ बांधून आणिले, ते अद्यापि आहेत.

७. मोगलांचा बादशाह शाह जहान यानें दक्षिणेच्या बादशाहाशीं सल्ला केल्यावर आपले नवे घेतलेले मुलूख यांचा बंदोबस्त करूं लागला, तेव्हां पूर्वीं जे दक्षिणेचे दोन भाग केलेले होते ते एकत्र करून त्याचा अधिकारी पुत्र औरंगजेब यास केलें. त्या शाह जहानाचे राज्यांत दक्षिणदेशाचे वसुलाचे हिशेबाची रीति नवी झाली. त्याचा करणारा तोडरमल्ल नामें मोठा युक्तिवान् एक हिंदु होता. त्यानें उत्तम मध्यम कनिष्ठ जमिनी पाहून त्यांचे उत्पन्नाचा अर्धांशापासून सप्तमांशपर्यंत अंश घ्यावा असें ठरविलें. त्यांत जो हिस्सा सरकारी देणें त्याचा पैका द्यावा असें केलें. याप्रमाणें कितीएक वर्षें गेल्यानंतर सरकारचे दप्तरांत जमिनीच्या सर्व उत्पन्नाचा आकार करून जो हिशेब ठरला त्याचा चतुर्थांश सरकारानें घ्यावा, असें करून पाहाणी करणें टाकिलें; जो चौथाई हिशेब झाला तोच सारा नेमिला. ही रीति शाह जहानानें भीमेचे उत्तरेच्या मुलखांतही स्थापिली, तेथें ती रीति पुरती होण्यास वीस वर्षें लागलीं. ती रीति 'तनखा' या नामें प्रसिद्ध होती. 'तनखा' असें नांव पडलें याचें कारण असें कीं, त्यापूर्वीं तांब्याचा टक्का घेत होते ती चाल मोडून यानें टक्क्याचें रुपें घ्यावें असें करून त्याचें नांव 'तनखा' असें ठेविलें. त्याचा सुमार सन १६३८. त्याच वेळेस मराठे लोकांत फसली शक चालू झाला.

८. दादाजी कोंडदेव याचा मुलुख मोगलांचे मुलखाजवळच होता, परंतु त्यानें मलिक अंबरी रीति चालविली. ती अशी कीं, प्रतिवर्षीं पाहाणी करून शेताचे उत्पन्नाचा वसूल घ्यावा. कधीं जिन्नस घेतला तर त्याचा पैका देत. असें दिसतें

कीं, मोगलाचे रीतीपेक्षां दादाजी कोंडदेव याची रीति शेतकरी यांस भारी पडे, परंतु तो मुलुख फार सुखी असे. यावरून असें वाटतें कीं, त्या मुलखाला ती रीति योग्यच होती.

९. मावळांत राहणारे जे लोक होते ते केवळ दरिद्री, परंतु शरीरेंकरून सुदृढ. त्यांनीं अतिमेहेनत करावी, तेव्हां त्यांस उदरनिर्वाहापुरतें मिळत असे. मग तो मुलुख जेव्हां दादाजीचे स्वाधीन झाला, तेव्हां त्यानें त्या लोकांची अवस्था अशी पाहिली कीं, ते झोंपड्यांतून राहत, आणि ज्यांस वस्त्रें पात्रें धड नाहींत, आणि व्याघ्रादिक हिंस्र प्राणी यांपासून शरीराचें संरक्षण झालें पाहिजे यासाठीं सर्वांनीं शस्त्रें मात्र बाळगलेलीं होतीं. तेव्हां त्यानें त्या लोकांच्या पोषणाकरितां कितीएक वर्षें त्यांपासून वसूल घेतला नाहीं; आणि त्यांखेरीज दुसऱ्या लोकांकडचा वसूल जमा करावयाच्या कामावर कितीएक ते मावळे लोकच चाकरीस ठेविले; त्या योगेंकरून ते सहज पोसले गेले.

१०. जे समयीं जिजाबाई व शिवाजी यांजबरोबर दादाजी कोंडदेव पुण्यास गेला, ते वेळेस त्या दादाजीनें पुण्यांत एक मोठा वाडा बांधिला, आणि त्यांत जिजाबाई व शिवाजी यांस ठेवून आपण शिवाजीला जे गुण धनीपणाचे उपयोगी ते शिकविता झाला. बहुधा मराठे सरदार यांस लिहितां आणि वाचतां येत नाहीं; ते असें समजतात कीं, हें काम कारकुनानें करावें. त्यांत शिवाजीला तर कधीं आपलें नांवही लिहितां येत नव्हतें, परंतु शौर्याचे उपयोगी जें धनुर्विद्या इत्यादि कौशल्य त्यांत तो प्रवीण होता. जसें त्याला घोड्यावर बसतां येत होतें तसें कोण-त्याही मराठे सरदारास येत नव्हतें. त्या शिवाजीला बाळपणीं भारती, रामायणी व भागवती युद्धकथा अत्यंत प्रिय असत. पुढें त्याचे मोठेपणांतही त्यानें कोठें कथा होते असें ऐकिलें ह्मणजे जरी वाटेमध्यें कांहीं मोठें भय असलें तरी तें न मा-नितां कथेस जावें. त्याची हिंदु धर्मावर प्रीति होती, आणि मुसलमान लोकांचे धर्माचा तो लहानपणापासून तिरस्कार करी. जेव्हां त्याचें वय सोळा वर्षांचें झालें, तेव्हां त्यानें अप्रयोजक लोकांची संगत धरिली. यावरून तो बादशाहाची आज्ञा न मानितां आपण नवेंच बंड करील असें दिसूं लागलें. तेव्हां दादाजी कोंडदेवानें त्या शिवाजीचें असें विपरीत लक्ष्य पाहून त्याला आपल्या युक्तींचा कांहीं चांगला उपदेश वारंवार केला; आणि त्याची चित्तवृत्ति मुलखाचे बंदोबस्ताकडे व्हावी ह्म-णून जहागिरीचे बंदोबस्ताचें काम त्यावर टाकूं लागला; तेणेंकरून त्याचा मान ब-हुत झाला, आणि मराठे सरदार लोक त्याचे भेटीस येऊं लागले. तोही त्यांचा सन्मान करी, त्या योगें ते सरदार लोक त्यावर प्रीति ठेवीत होते; कां कीं, तो स-

वांशीं लीनपणानें वागत असे. असें असतांही त्याला लोक ह्मणत कीं, कोंकणांत जे दरवडे पडतात त्यांत शाहाजीचा पुत्र याचें आंग आहे.

११. तो शिवाजी मावळे लोकांवर निरंतर प्रीति करीत असे. कां कीं, ते लोक वेडे आणि केवळ मूर्ख दिसत, परंतु त्यांचे योग्य त्यांस कांहीं काम सांगितलें असतां त्यांनीं तें काम अतिसावधपणानें करीत असावें. त्यांना मावळच्या सर्व चोरवाटा ठाऊक होत्या; ह्मणून शिवाजी त्यांस आपल्या शिकारीचे कामांत घेई; त्यांनीं त्याला सारे डोंगरी किल्ले माहीत करून दिले. त्यानंतर त्याला असें वाटलें कीं, जर यांतून एक किल्ला आपणास मिळेल तर त्या लाभास उपमा नाहीं. त्या वेळेस मुसलमान लोकांचे राज्यांत डोंगरी किल्ल्यांच्या बंदोबस्ताची फारशी हुशारी नव्हती. कां कीं, ते जागे पर्जन्यकाळीं वस्ती करणारांस रोगकारक, आणि त्या लोकांस यत्न न करितां प्राप्त झाले, ह्मणून त्यांना डोंगरी किल्ल्यांचें माहात्म्य वाटत नव्हतें. ज्या समयीं शिवाजीनें आपणास किल्ला असावा असें मनांत आणिलें, त्या वेळेस त्याचे जहागिरींत किल्लेकरी बादशाह याकडचे होते. कोंडाणें[1] किल्ल्यावर अधिकारी मुसलमान असे, आणि पुरंदरावर मुरारपंताचा ठेवणाईत नीळकंठराव नामें ब्राह्मण होता. ते दोघे किल्लेकरी व शाहाजीचें कुळ यांचा स्नेह होता. मावळांत तिघे शिवाजीचे सोबती प्रसिद्ध होते. एक एसाजी कंक, दुसरा तानाजी मालुसरे, तिसरा बाजी पासलकर, मिळून तिघे.

१२. जे समयीं शिवाजी लष्कर मिळवूं लागला, तेव्हां ते तिघे पहिल्यानें त्यास मिळाले; त्यांनीं सन १६४६ त तोरणा किल्ल्याचे लोक वश करून, तो किल्ला शिवाजीला देवविला.

१३. त्यानंतर शिवाजीनें विजापुरास वकील पाठवून बादशाहास विनंति केली कीं, 'मीं किल्ला घेतला हा आपल्या राजधानीपासून फार लांब आहे, आणि एथचे लोक मोठे उत्पाती, यास्तव ही जागा विश्वासू सेवकाचे स्वाधीन असल्यास राज्याचा बंदोबस्त उत्तम होईल.' त्यावरून किल्ला त्याकडे असावा अशी आज्ञा तर झाली नाहीं, परंतु त्यानें बादशाहाचे दरबारी लोक यांस लांच दिला त्यामुळें त्या दरबारीं ती गोष्ट पुनः निघाली नाहीं, आणि किल्ला त्याकडेसच राहिला. अशीं कितीएक वर्षे गेल्यावर शिवाजीनें मावळे लोक चाकरीस ठेवून किल्ल्याची दागदुजी केली. मग कोणे एके दिवशीं त्या किल्ल्यांत खणूं लागला तों त्याला दैवयोगेकरून कितीएक प्राचीन काळचा कोणीं ठेवलेला मोहोरांचा हांडा सांपडला. तेव्हां

---

१. कोंडाणें किल्ल्यास हल्लीं 'सिंहगड' ह्मणतात.

त्यानें युक्तीनें लोकांत अशी प्रसिद्धि केली कीं, 'भवानी आह्माला प्रसन्न झाली, ती द्रव्य देते.' हें ऐकून लोक त्याला भजूं लागले.

१४. तेव्हां शिवाजीनें दारूगोळी व शस्त्रें इत्यादि युद्धोपयोगी पदार्थ विकत घेऊन तोरणा किल्ला याचे आग्नेयी दिशेस दीड कोशावर मोरबद नामें उंच डोंगर आहे त्यावर अतिमेहेनतीनें मोठ्या त्वरेंकरून दुसरा किल्ला बांधिला, आणि त्याचें नांव 'राजगड' ठेविलें. हें वर्तमान सन १६४७ त झालें. तो किल्ला बहुतेक बांधला गेला, इतक्यांत विजापुरीं बादशाहास तें वर्तमान कळलें. तेव्हां त्यान शिवाजीला मनाईपत्र पाठविलें, आणि कर्नाटकांत शाहाजीला लिहिलें कीं, 'हें तुमचे पुत्रानें तुमचे आज्ञेवांचून केलें नसेल.' यावरून त्यानें उत्तर दिलें कीं, 'हा अपराध मजकडे नाहीं, परंतु माझा पुत्र सरकारचा विश्वासू चाकर आहे. त्यानें कांहीं तरी सरकारहित पाहिल्यावांचून केलें नसेल.'

१५. जे समयीं शिवाजी किल्ला बांधावयास लागला, तेव्हांपासून दादाजी कोंडदेव यानें वारंवार हितोपदेश केला कीं, 'अशानें सर्व कुळ बुडेल.' शिवाजीनें तें ऐकून मान्य केल्याप्रमाणें दाखविलें. तेव्हां दादाजी असें समजला कीं, 'हा आपल्या मनांतील अर्थ सिद्धीस नेईल, माझें ऐकणार नाहीं.' असें त्याचे मनांत येतांच त्याला अत्यंत चिंता लागली, आणि वार्धक्यामुळें दुखणें लागलें; तेणेंकरून तो मरणोन्मुख झाला. ते समयीं शिवाजीला बोलावून आणिलें, आणि बोलिला कीं, 'मी आपल्या धन्याचे हिताविषयीं तुह्माला निषेधीत होतों, परंतु आतां माझी विनंति ऐकावी. आपण स्वतंत्रपणानेंच वागावें, परंतु गाई व ब्राह्मण व प्रजा यांचा प्रतिपाळ करून मुसलमानांपासून हिंदूंचीं देवस्थानें रक्षावीं.' इतकें बोलून आपलीं सारीं कुटुंबाचीं माणसें शिवाजीचे हातीं देऊन प्राण सोडिला. शिवाजीचे मनांत पूर्वींच होतें कीं, आपण स्वतंत्रपणानें असावें; त्यावर दादाजीनेंही आपल्या अंतकाळीं तसेंच सांगितलें, त्यावरून त्याचे मनांत विशेष आलें; आणि दुसरे जे त्याचे जहागिरींत अधिकारी होते तेही दादाजीनें शेवटीं सांगितलेलें ऐकून शिवाजीस अनुसरले. असें वाटतें कीं, प्रथम शिवाजी आपलें मात्र हित इच्छीत होता, तो दादाजीनें शेवटीं सांगितलें तें ऐकून आपला मुलुख व गाई ब्राह्मण सुखी असावे असें मनांत आणूं लागला असेल, तेव्हां त्याचा स्वभाव श्लाघ्य होऊं लागला. दादाजी कोंडदेव याचे मरणानंतर शिवाजी आपले पित्याचे जहागिरीचा वसूल पित्याचेच नांवें घेऊं लागला, परंतु शाहाजीचेही आज्ञेंत वागूं नये असें त्याचे मनांत होतें. कां कीं, दादाजी कोंडदेव मेल्यावर त्यानें कारकून पाठवून जहागिरीचा वसूल खर्चास मागितला, तेव्हां शिवाजीनें उत्तर केलें कीं, 'एथचा पैसा एथेंच पुरत नाहीं.' त्या-

नंतर आणखी कितीएक वेळां शाहाजीनें द्रव्य मागावयास कारकून पाठविले, परंतु शिवाजीनें दिलें नाहीं. त्या शाहाजीचे जहागिरींत दोन अधिकारी होते. एक फिरंगोजी नरसाळा, चाकणचा किल्लेकरी; दुसरा बाजी मोहिते, तुकाबाई शाहाजीची दुसरी स्त्री तिचा बंधु, तो सुपें परगण्याचा मामलतदार. हे दोघे शिवाजीला अनुकूळ नव्हते. यासाठीं शिवाजीनें फिरंगोजीस वश करून घेऊन चाकण किल्ला व त्याशेजारचे कितीएक गांव घेतले; मग त्यालाच त्या मामलतीची सनद दिली.

१६. बाजी मोहिते यांजवळ सुपें परगणा यामध्यें उत्तम स्वार तीनशें होते. तो कधींही वश होऊन शिवाजीला वसूल देईना, ह्मणून शिवाजीनें मावळे लोक बरोबर घेऊन रात्रीस सुप्यांत शिरून बाजी मोहिते व त्याचे मुख्य कारभारी यांस धरून कैद केलें, आणि जे चाकरी करावयास अनुकूळ झाले त्यांस चाकरीस ठेविलें; जे वश न झाले ते शाहाजीकडे कर्नाटकांत पाठविले. याप्रमाणें चाकण किल्ला व सुपें परगणा आपल्या सत्तेंत आणिला. यांखेरीज कोंडाणें किल्याचे मुसलमानानें बहुत लांच घेऊन किल्ला शिवाजीला दिला, त्याचें नांव शिवाजीनें 'सिंहगड' असें ठेविलें. सुपें परगणा व चाकण किल्ला या दोहोंपेक्षां सिंहगड किल्ला मिळाला तो मोठा लाभ.

१७. पुरंदर किल्याचा अधिकारी मुरारपंताचे हातचा ठेवणाईत नीलकंठराव, तो दादाजी कोंडदेव मृत्यु पावला त्याच सुमारें मेला; त्याचे पुत्र तीन, त्यांत जो वडील त्यानें विजापुरचे आज्ञेची वाट न पाहतां आपल्या बापाचें काम संभाळिलें; तेव्हां त्याचे कनिष्ठ बंधु दोघे, त्यांनीं आपणांस त्या अधिकारांत व गुरें चरावयास कुरणांत कांहीं विभाग असावा ह्मणून वाद आरंभिला, तेव्हां तो देईना; यास्तव त्यांनीं शिवाजीला विनंति केली कीं, 'आमचे कलहाची मध्यस्थी आपण करावी.' असें ते ह्मणतांच त्यानें मान्य केलें, आणि त्यांस असें समजाविलें कीं, 'मला आंतून पक्ष तुह्मा दोघांचा, बाहेर मात्र तिऱ्हाईतपणानें तिघे सारिखे.' त्यानंतर 'सुप्यास जातों' असा आकार दाखवून लष्करासहित पुरंदर किल्याखालीं येऊन उतरला, तेव्हां त्यांनीं त्यास बोलावणें पाठविलें; तें असें कीं, 'आपण थोडके शिपाई बरोबर घेऊन किल्यावर यावें.' नंतर तो त्याप्रमाणेंच वर गेला, आणि रात्रीस बोलतां बोलतां त्या तिघांतला थोरला भाऊ निजावयास गेल्यावर त्यानें त्या दोघां भावांस अशी मसलत दिली कीं, 'याला जर बंदीस घातलें तरच हा तुमचें ऐकेल. कदाचित् त्याचे शिपाई कांहीं गडबड करितील तर मी मावळे लोक वरते आतांच बोलावून बंदोबस्त करवितों.' तेव्हां त्या दोघांनीं मान्य केलें, त्यावरून त्याच रात्रींत मावळे लोक किल्याचे माचीस व बालेकिल्यावर नेऊन पहांटेस किल्ला आपण घे-

तला, आणि त्या तिघांचा बंदोबस्त केला. तेव्हां त्यांस असें समजलें कीं, 'आह्मी तिघेही बंदिवान, किल्याचा धनी शिवाजी.' मग शिवाजी त्यांस ह्मणाला कीं, 'मी आपल्या हिंदुधर्माचे रक्षणार्थ अशीं कामें करितों; तुह्मीं माझे चाकरीस राहावें; तुमचे किल्ल्याचे बद्दल तुह्मांला कितीएक गांवें इनाम देतों.' तेव्हां त्यांनीं तें मान्य करून त्याचे चाकरीस राहिले. अशा युक्तीनें एकही मनुष्य न मरतां युद्ध केल्यावांचून चाकण किल्ला व नीरा नदी या दोहोंमधला मुलुख शिवाजीनें घेतला. त्या वेळेस माहमुद अदिलशाह विजापूरकर आपलें नगर स्वस्थपणें बसून सुशोभित करीत होता. त्याला शिवाजीचें कृत्य कळलें असलें, तरी तो अस मानीत असेल कीं, जोंपर्यंत शाहाजी जहागीरदार आपल्या लष्करांत आहे तोंपर्यंत चिंता नाहीं. इकडे शिवाजी तर केवळ व्याघ्राप्रमाणें लपून लपून जेथें जेथें कार्य साधेल तेथें तेथें युक्तीनें कार्य करून घेणारा, असा त्याचा स्वभाव बादशाहाचे ध्यानांत आला नाहीं.

---

## भाग चवथा.

### ( इसवी सन १६४८ पासून सन १६५७ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. शिवाजीनें घेतलेल्या मुलखाचे सभोंवते कोणकोणते अधिकारी व जहागीरदार होते तो प्रकार, व वाडीचा सावंत आणि जंजीऱ्याचा सिद्दी यांचें प्रकरण.—२. शिवाजीनें छापा घालून बादशाहाचा खजीना लुटला.—३. त्या शिवाजीनें कितीएक किल्ले युक्तीनें घेतले.—४. कल्याणी परगणा शिवाजीनें घेतला तो विस्तार.—५. विजापुरचे बादशाहानें शाहाजी कैद करून विजापुरी आणविला.—६. त्याची सुटका कोणे प्रकारें झाली तें.—७. तो शाहाजी कर्नाटकांत गेला, आणि आपला पुत्र संभाजी कोणीएका किल्लेदाराचे पारिपत्यास योजिला असतां तो मृत्यु पावला.—८. शिवाजीनें जावळीचा राजा घातानें मारविला, आणि त्याचा मुलुख घेतला.—९. शिवाजीनें पहिला पेशवा शामराजपंत नामें ब्राह्मण होता तो केला.—१०. सन १६३६ पासून मोगलांची वर्तणूक कसकशी झाली तें.—११. गोवळकोंडेकरांचा कारभारी मीर जुमला याचे वृत्त.—१२. दिल्लीचे मोगल विजापूर घ्यावयास गेले तो विस्तार, व शाह जहान दिल्लीचा बादशाह दुखण्यांत पडला.—१३. तो जीवंत असतां त्याचे चौघे पुत्र राज्याची इच्छा करूं लागले, व त्या चौघां जणांत एक औरंगजेब नामें होता त्याचे स्वभावाचे वर्णन, व तो बापास कैद करून आपण बळेंच तक्ताधिपति झाला.

१. येथपर्यंत दक्षिणेच्या हद्दी व अधिकारी यांचा प्रकार लिहिला, परंतु शिवाजीनें घेतलेल्या मुलखाचे सभोंवते कोण कोण जहागीरदार होते यांचें वृत्त लिहिल्यावांचून शिवाजीचें संपूर्ण वर्तमान कळणार नाहीं, यास्तव तें लिहिलें पाहिजे. त्याचा प्रकार असा. सन १६४८ त नीरेचे दक्षिणतीरीं पूर्वेचे अंगीं शिरवळपर्यंत,

आणि दक्षिणेस कृष्णेचे उत्तरेच्या डोंगरापर्यंत मुलूख, बंदल नामें हिरडस मावळचा देशमूख याजकडे होता; त्याखेरीज रोहिडा किल्ला त्याचे स्वाधीन असे. तो शिवाजीला कृत्रिमी जाणून नेहमीं फौज बाळगीत असे. वांईमध्यें विजापूरसरकारचा मोकासेदार होता, त्याचे स्वाधीन किल्ला पांडवगड व कमळगड, व दुसरे कितीएक किल्ले असत. घाटमाथा कृष्णेपासून वारणेपर्यंत मुलूख, चंद्रराव मोरे, जावळीचे राजे, यांजकडे होता. कोल्हापूर परगणा व मोठा सुदृढ पन्हाळा किल्ला हे कोणी मुसलमान सरदार बादशाह याचा ठेवणाईत होता त्याचे स्वाधीन असत. पूर्वी विजापुरचे सरकारांत जो मुलूख होता त्यांतील कितीएक स्थळें जहागीरदार व वतनदार देशमूख यांजकडे असत, परंतु रत्नागिरी व राजापूर व दाभोळ व अंजनवेल, व इतक्यांचे खालचा मुलूख बादशाह याचे सरदारांकडे असे. याखेरीज मुख्य सरदार वाडीचे देशमूख सावंत. ते तेथचे पुरातन वतनदार. असेच शृंगारपुरचे वतनदार पुरातन दळवी होते. यांशिवाय पहिला अहमदनगरचे सरकाराकडे कल्याण परगणा, त्याचे भाग दोन; एक उत्तरेस भिंवडीपासून नागोठण्यापर्यंत, दुसरा दक्षिणेस. उत्तरेचा भाग व त्यांतले सारे किल्ले एक बादशाहाचा मुसलमान सरदार होता, त्याजकडे असत. दक्षिणेचा भाग कोणीएका सिद्दयाला जहागीर देऊन त्यानें लढाऊ गलबतें ठेवून सावकारी गलबतांचें संरक्षण करावें, आणि जे मक्केस तीर्थयात्रेकरितां जाणारे त्यांस पोंचतें करावें, असें काम त्यास सांगितलें होतें. लढाऊ गलबतांची चाकरी जहागिरीसुद्धां एकासच वंशपरंपरेनें द्यावी असें नव्हतें; कोणी एखादा योग्य सिद्दी पाहून त्याला देत असत. त्या सरदारांचें राहावयाचें मूळ स्थान दंडाराजपुरी. त्या वेळेस जो मुख्य सिद्दी सरदार होता त्याचें नांव फत्तेखान. त्याचे स्वाधीन तळें, घोसाळें व रायरी वगैरे कितीएक स्थानें होतीं. याप्रमाणें शिवाजीनें घेतलेल्या मुलखाचे आसमंतात् राहणारे संस्थानी होते.

२. आतां पुनः शिवाजीचें वर्तमान. तो मावळे लोक चाकरीस ठेवून कोंकणचे लोकांचें वर्तमान आपणास कळावें व त्यांनीं वश व्हावें ह्मणून कितीएक ब्राह्मण कारकून कोंकणांत पाठवीत असे. नंतर एकंदर त्याला असें समजलें कीं, कल्याणचा सुभेदार मुलाना अहमद, तो विजापुरास मोठा खजिना पाठवितो, तेव्हां त्या शिवाजीनें सुपेंपरगण्यांतले तीनशें घोडे घेतले होते; त्यांवर आपले विश्वासू बारगीर बसवून कितीएक मावळे लोक बरोबर घेऊन एकाएकीं वाटेंत छापा घालून तें द्रव्य त्या स्वारांजवळ चोरांसारिखीं ओझीं होत असें वाटून दिलें आणि मोठ्या त्वरेनें रायगडास नेलें.

३. हें छाप्याचें वर्तमान विजापुरीं कळल्यावर शिवाजी मोठा पुंड असें लोक

समजून आश्चर्य करितात, तों दुसरें वर्तमान गेलें कीं, शिवाजीनें कांगोरी, तुंग, तिकोना, भोरप, कुंवारी, लोहगड, आणि राजमाची, हे सात किल्ले बलात्कारें घेतले. याखेरीज कोंकणांत गेलेले जे त्याचे कारकून त्यांनीं तेथचे लोक वश करून तळें, घोसाळें, आणि रायरी, हे किल्ले घेतले; आणि मावळे लोक यांनीं कितीएक मोठीं मोठीं कोंकणचीं गांवें लुटून तें द्रव्य राजगडास नेलें.

४. शिवाजीचे कारकूनमंडळींत एक दादाजी कोंडदेवाचे शिक्षेचा कारकून मोठा चतुर आणि शूर आबाजी सोनदेव नामें होता, त्यानें कांहीं शिपाई लोक बरोबर घेऊन अकस्मात् कल्याणास जाऊन तेथचा सुभेदार यास कैद केलें; तेव्हां तेथचे आसमंतात् किल्ले सहज सही झाले. शिवाजीला आपलें ऐश्वर्य इतकें वाढेल असें वाटत नव्हतें, तो हें आनंदाचें वर्तमान ऐकतांच अत्यंत हर्षेकरून युक्त होत्साता कल्याणास जाऊन त्या आबाजी सोनदेवाचा बहुत सन्मान करून त्यालाच त्या मुलखाचा सुभेदार केला. त्यानंतर त्या मुलखाचे वसुलाचें काम चालविलें. तें असें; शिवाजीनें पुरातन चाली कशा होत्या त्या ध्यानांत आणून त्या चालविल्या; आणि देवस्थानांचें व ब्राह्मणांस जें पूर्वीचें दिलेलें तें तसेंच चालविलें. शिवाजीनें ज्या सिद्द्याचे किल्ले घेतले होते तो मोठा शूर होता, ह्मणून त्याचे भयानें त्या किल्ल्यांचे बंदोबस्ताकरितां, घोसाळ्याजवळ बिरवाडी किल्ला आणि रायरीजवळ लिंगाणा किल्ला, असे दोन बांधिले. जो मुलाना सुभेदार आबाजी सोनदेवानें कैद केला होता, त्याचा शिवाजीनें मोठा सन्मान करून माघारां विजापुरास पाठविला. तो तेथें पोंचल्याचे पूर्वींच तें स्थान शिवाजीनें घेतल्याचें वर्तमान बादशाहास कळलें होतें, यास्तव त्याला दुसरा कांहीं अधिकार मिळाला नाहीं; बादशाहाची भेट मात्र झाली.

५. त्या वेळेस विजापुरचा माहमुद अदिलशाह बादशाह यानें शिवाजीचा बाप शाहाजी याचें ऐश्वर्य कर्नाटकांत फार वाढविलें होतें. तो बादशाह असें समजला कीं, हें बंड शाहाजी अनुकूळ झाल्यावांचून होणार नाहीं. ह्मणून त्याच समयीं शिवाजीकडे फौज न योजितां, बाजी घोरपडा मुधोळकर नामें एक मोठा सरदार शाहाजीबरोबर असे, त्याला सांगून पाठविलें कीं, 'शाहाजीस कैद करावें;' त्यावरून त्यानें त्याला भोजनास बोलावून आणून दग्यानें कैद केलें. त्यानंतर सन १६४९ त शाहाजीला विजापुरीं बाजशाहाजवळ नेलें, तेव्हां बादशाहानें आज्ञा केली कीं, 'हें बंड तूं मोडावें; कां कीं, हें तुजपासूनच उत्पन्न झालें.' तेव्हां तो बहुतप्रकारें विनंति करून बोलिला कीं, 'शिवाजी माझाही बहुत उपमर्द करितो.' परंतु तें बादशाह याला सत्य वाटेना, यास्तव त्याला चिरेबंदी कोठडींत घालून त्या कोठडीचें दार वारा मात्र जाई असें छिद्र राखून बंद केलें; आणि सांगितलें कीं, 'शि-

याजी अमुक दिवसांत अपराधांची क्षमा मागावयास न आल्यास हेंही छिद्र बंद होईल.' हें वर्तमान शिवाजीला कळल्यावर त्याचे मनांत आलें कीं, 'क्षमा मागावयास जावें;' परंतु त्याची स्त्री सईबाई तिनें मसलत दिली कीं, 'विजापुरचें सरकार केवळ अविश्वासास्पद आहे, त्यास हेंच बरें कीं, आपलें महत्व वाढवावें आणि त्यास भयप्रदर्शन करावें.' तेव्हां शिवाजीनें मोगलांचा आश्रय करून शाह जहान दिल्लीचा बादशाह यास आपल्या बापाचे मुक्ततेविषयीं पत्र पाठविलें; त्यांत 'मी तुमची चाकरी करीन' ह्मणून लिहिलें. त्यावरून त्यानें विजापुरचे बादशाहास कांहीं सूचना लिहिली असेल ती, व मुरारपंत नामें विजापुरकरांचा मुख्य कारभारी होता त्याचें व शिवाजीचें इष्टत्व होतें तें, या दोनी योगांनीं शाहाजीला कोठडींतून काढून किल्ल्यामध्यें बंदींत ठेविलें. अशी त्याची सुटका झाल्यावर शिवाजी मोगलांचे चाकरीस कांहीं निमित्तेंकरून बोलीप्रमाणें जाईना; आणि वकील पाठवून बोलणें लाविलें कीं, 'अहमदनगर व जुन्नर परगणा यांत आमची पहिली बाकी राहिली आहे, ती द्यावयास आज्ञा व्हावी.' तेव्हां शाह जहानाचें उत्तर गेलें कीं, 'तुह्मी एथें येऊन भेटल्यानंतर तुमचे देण्याचा विचार केला जाईल.' असें सन १६५० त घडलें.

६. त्यापुढें चार वर्षेंपर्यंत शाहाजी विजापुरीं कैदेंत होता. तेव्हां विजापुरकरांस असें वाटलें कीं, 'शाहाजीला जर उपद्रव केला तर शिवाजी मोगलांस मुलुख देईल.' शिवाजीला असें वाटलें कीं, 'मी जर विजापूरकरांशीं वांकडा वागेन तर बापास पीडा होईल;' ह्मणून त्या चोहों वर्षांत बहुतकरून दंगा झाला नाहीं. परंतु एक हिंदू बाजी शामराज नामें होता, त्यानें शिवाजीला महाडाहून धरून बादशाहाकडे न्यावयाचा बेत केला; तो सिद्धीस गेला नाहीं. शाहाजी बंदींत असतां त्यानें कितीएक वेळां कर्नाटकांत जावयास बादशाहाजवळ आज्ञा मागितली, परंतु बादशाहानें दिली नाहीं. शेवटीं कर्नाटकांत मोठें बंड उत्पन्न झालें, त्यामुळें बादशाह त्याचे बोलण्यास अनुकूळ झाला. परंतु आधीं शपथ घेतली कीं, 'मुधोळकर जहागीरदार यांशीं तुझें वैमनस्य नसावें.' याप्रमाणें करार ठरून शाहाजीची सुटका सन १६५३ त झाली. तो सुटतांच त्यानें शिवाजीला पत्र पाठविलें कीं, 'तूं जर माझा पुत्र खरा आहेस तर मुधोळकरांचें पारिपत्य कर.' ही शाहाजीची आज्ञा शिवाजीनें मनांत राखून कशा प्रकारें सिद्धीस नेली, तें वर्तमान पुढें लिहिण्यांत येईल.

७. मग शाहाजी कर्नाटकांत गेला, ते समयीं त्यानें असें पाहिलें कीं, तेथचे मांडलिक आपआपल्यांत भांडतात, त्यामुळें आपल्या जहागिरींस उपद्रव लागतो; या-

---

१. हें शाह जहानाचें उत्तरपत्र व आणखी कितीएक शाह जहानाचीं व औरंगजेब बादशाह याचीं पत्रें मुंबईचे किल्ल्यांत साहेबांचे पुस्तकसंग्रहस्थानीं आहेत.

साठीं त्यानें आपला थोरला पुत्र संभाजी यास एक कनकगिरीचा किल्लेदार याचें पारिपत्य करावयास पाठविलें. तो जाऊन त्याशीं लढला, तेव्हां त्यापासून पराभव पावून संभाजी आपले बरोबरचे कितीएक लोकांसुद्धां मेला गेला. त्यानंतर कर्नाटकांत फार दंगे झाले, तेणेंकरून विजापुरचे दरबारांत शिवाजीचे चौकशीविषयीं अवसर झाला नाहीं.

८. तो शिवाजी बापाची मुक्तता ऐकून कोंकणांतील घेतलेल्यांखेरीज उरलेलीं स्थळें व संपूर्ण घाटमाथा घ्यावयास मसलत आणखी करूं लागला. त्यांत प्रथमतः जावळी परगणा आपल्या हातीं यावयाविषयीं उद्योग केला. तो असा; त्या मुलखाची माहितगारी व्हावयाकरितां गुप्त पाहाणी करावयास एक राघो बल्लाल नामें ब्राह्मण व संभाजी कावजी नामें एक शूद्र असे दोघे कारकून तेथचे राजे चंद्रराव मोरे यांचे कन्येशीं आपण विवाह करणार असें निमित्त करून त्या बोलण्यासाठीं ह्मणून पाठविले; त्यांबरोबर पंचवीस मावळे लोक दिले. ते कारकून त्याकडे जातांच त्या राजानें त्यांचा सन्मान केला. ते कितीएक दिवस बोलणें करीत तेथें राहिले. शेवटीं त्या ब्राह्मणाचे मनांत आलें कीं, 'चंद्रराव मोरे यांस मारून टाकणें अवघड नाहीं.' हें त्या शूद्रासही ठीक वाटलें. मग शिवाजीला याप्रमाणें लिहिलें. त्यानें उत्तर दिलें कीं, 'हें योग्य आहे. आह्मी तुमचे साहाय्यास लष्कर घेऊन येतों.' त्यानंतर शिवाजी राजगडाहून पुरंदरास आला. तेथून रात्रीस निघून कृष्णेचे उगमीं महाबळेश्वर आहे तेथें रानांत त्याचे लोक गुप्तरूपें राहिले होते त्यांत जाऊन मिळाला. नंतर राघोजीला ही सारी सिद्धता समजली. तेव्हां तो त्या संभाजी कावजीला बरोबर घेऊन मोऱ्याचे घरीं जाऊन त्यास ह्मणाला कीं, 'आपण व आपले बंधु या उभयतांशीं एकांत करावयास आलों.' त्यांनीं तें मान्य करून दोघे भाऊ त्यांशीं बोलावयास एकांत स्थळीं गेले. तेव्हां राघो बल्लाळ यानें त्या राजाचे काळजांत खंजीर खुपसून त्याला ठार मारिलें, आणि संभाजी कावजीनें त्याचा भाऊ मारिला. नंतर ते दोघे तेथून पळून रानांत गेले, तेथें त्यांचे साहाय्यास शिवाजीचे लोक येत होते त्यांची गांठ पडली. इकडे जावळीमध्यें लोक राजाचे मरणाचा विस्मय करितात, तों शिवाजीचे लोकांनीं येऊन हल्ला केला; त्या समयीं हिंमतराव नामें त्याचा प्रधान व त्या राजाचे पुत्र, यांनीं त्यांशीं बहुत निकरानें युद्ध केलें; शेवटीं तो हिंमतराव मेला तेव्हां तें युद्ध मोडलें, आणि तें स्थान शिवाजीचे हातीं लागलें. यानंतर वांसोटा किल्ला शिवाजीनें घेतला, तेणेंकरून जावळी मुलूख संपूर्ण शिवाजीचे स्वाधीन झाला. शिवाजीनें दुसरा रोहिडा किल्ला घेतला. तो प्रकार असा; मावळे लोक बरोबर घेऊन रात्रीस जाऊन किल्ल्याचे लोक सावध नसतां किल्ल्यास शिडी लावून वर चढून गेला; तेथें हिरडस मावळचा देश-

मूख बंदल या उपनांवाचा होता, त्यानें त्या लोकांचा तो गलबला ऐकून हत्यार घेऊन उठला आणि लढूं लागला. त्याचेबरोबर जे लोक होते तेही बहुत लढले; शेवटीं तो बंदल पडला तेव्हां तें युद्ध संपलें. त्यांत जावळीचा देशपांड्या बाजी परभू नामें होता, त्याचें शौर्य पाहून शिवाजीनें त्याचा सन्मान केला, आणि त्याचा अधिकार त्याकडे ठेवून तो आपलेजवळ चाकरीस ठेविला.

९. यानंतर सन १६५६ त शिवाजीचे मनांत आलें कीं, निरा व कोयना या दोहीं नद्यांचे कांठीं जो आपला मुलूख आहे तो व पारघाट याची वाट, यांचे संरक्षणार्थ एक किल्ला कृष्णेचे उगमीं बांधावा. मग त्या कामावर एक आपल्या कृपेंतला देशस्थ ब्राह्मण मोरो त्रिमळ पिंगळे नामें योजिला; त्या किल्ल्याचें नांव 'प्रतापगड' ठेविलें. त्या वेळेस एक शामराजपंत नामें शिवाजीचा मुख्य कारभारी होता त्यास 'पेशवे' असें पद देऊन त्याचे स्वाधीन कितीएक फौजेचीं सरदारी ठेविली. इतके दिवस शिवाजी विजापुरचे राज्यांत मात्र उपद्रव करीत होता; मोगलांचे वाटेस गेला नाहीं. यापुढें सन १६५७ त मोगलांच्याही राज्यांत उपद्रव करूं लागला. असें त्याचें धैर्य वाढून रीतीस विपर्यास झाला.

१०. सन १६३६ त मोगल लोकांनीं दक्षिणेच्या बादशाहाशीं स्नेह केला, त्यापासून ते दक्षिणेंत उपद्रव न करितां आपल्या राज्याची बळकटी करीत होते. त्यांचा धनी औरंगजेब, तो दिल्लीचे बादशाहाचा पुत्र होता. त्यानें व्यापारी लोकांस हितावह आणि प्रजेस सुखकारक असे नवे कायदे केले; आणि जें मलिक अंबरानें वसविलेलें खडकी शहर, ती आपली राजधानी केली. तिचें नांव 'औरंगाबाद' ठेविलें. परंतु तो युद्धनिपुण होता तेणेंकरून त्याचे मनास युद्धावांचून उगेंच राहणें आवडत नव्हतें; यास्तव त्यानें संधि पाहून गोवळकोंड्याचे सरकाराशीं कलह आरंभिला. तो प्रकार असा; सन १६५५ त गोवळकोंड्याचा बादशाह कुतुबशाह याशीं आणि त्याचे वजिराच्या पुत्राशीं वितुष्ट पडलें होतें; तेव्हां त्या बादशाहानें कांहीं निमित्त त्यावर आणून त्यास शिक्षा दिली, ह्मणून त्या वजिरास राग आला. त्यानें औरंगजेब बादशाह याचा आश्रय केला, आणि त्याचा पिता दिल्लीचा बादशाह शाह जहान त्याजकडे फिर्याद केली; त्यावरून शाह जहानानें कुतुबशाह याला निषेधपत्र पाठविलें. तेणेंकरून त्याला राग आला; आणि त्यानें वजिराचे पुत्रास कैद करून त्याचे पित्याचे दौलतीची जप्ती केली.

११. त्या वजिराचें नांव मीर जुमला; त्याचा परिचय सर्व मुसलमानी दरबारांत होता. तो पहिला जोहारीपणा करीत असे, यास्तव हिरे इत्यादिक जवाहीर विकावयास मोठमोठ्या दरबारीं त्याचें जाणें घडे; शेवटीं तो आपलें चातुर्य व

द्रव्यसंपत्ति या दोहों साधनांनीं कुतुबशाह याचा वजीर झाला. त्याचे पुत्राचें नांव महंमद अमीन. जेव्हां औरंगजेब यास कळलें कीं, आपला पिता दिल्लीचा बादशाह, याची कुतुबशाह यानें अमर्यादा केली, तेव्हां औरंगजेब यानें तो अमर्यादेचा प्रकार विस्तृत करून शाह जहानास विनंतिपत्र लिहिलें; त्यावरून बादशाह याची आज्ञा झाली कीं, 'सैन्य तयार करून मीर जुमला याचा अंगीकार करावा.' तेव्हां औरंगजेब यानें आपला पुत्र सुलतान महंमद, बरोबर फौज देऊन हैदराबादेस लग्नाचें मिष करून पाठविला, त्यामागून आपण मोठी सेना घेऊन त्याचे पाठोपाठ निघाला. तो कुतुबशाह असें जाणत होता कीं, 'हा लग्नास येतो आहे.' मग जेव्हां हैदराबादेच्या दरवाज्याजवळ आला तेव्हां त्याला त्याचा वैरभाव समजला; ते समयीं कुतुबशाह यानें तो वजिराचा पुत्र महंमद अमीन सोडिला, आणि त्याचे बापाचे दौलतीची जप्ती उठविली; आणि त्याच वेळेस आपले सरदार यांस युद्धाचे कुमकेस बोलावणें पाठविलें. ते सरदार येऊन पोंचले नाहींत तों सुलतान महंमद यानें हैदराबाद शहर लुटलें, आणि त्या बादशाहास पीडा करून करार करविला कीं, 'आपली कन्या सुलतान महंमदास द्यावी, व खंडणीची बाकी एककोटि रुपये द्यावे.' हें वर्तमान दिल्लीचा बादशाह शाह जहान यास समजल्यावर, त्यानें मान्य करून वीस लक्ष माफ करून ऐशीं लक्ष घेतले. यानंतर सन १६५६ त औरंगजेब व मीर जुमला हे दोघे एकचित्त होऊन मसलत करिते झाले कीं, 'विजापूर व गोवळकोंडें हीं दोन्हीं राज्यें मोगलांचे सत्तेंत आणावीं.' नंतर कांहीं दिवसांनीं मीर जुमला यास दिल्लीचे बादशाहानें बोलावून नेलें, आणि आपल्या वजिरीचें काम सांगितलें; तेव्हांपासून तो बादशाहाजवळ बोलत असे कीं, 'हीं दोन्हीं राज्यें आपल्या सत्तेंत असावींत.' तें बोलणें बादशाह मानीत नसे. पुढें माहमूद अदिलशाह विजापुरचा बादशाह त्याच वर्षाचे नोव्हेंबर महिन्याचे ४ थे तारखेस मेला; तेव्हां बादशाह यानें तें मान्य करून विजापुरावर लष्कर योजिलें; त्यांत मीर जुमला मुख्य करून औरंगजेब त्याखालीं केला. मग ते दोघे एकचित्त होऊन तो मीर जुमला औरंगजेबाचे आज्ञेंत वागूं लागला.

१२. इकडे विजापुरीं माहमूद अदिलशाह याचा पुत्र, अली अदिलशाह तक्ताधिपति झाला. त्यानें दिल्लीचे बादशाहाचें अनुमोदन घेतलें नाहीं. त्यावरून मोगल 'हा त्याचा पुत्र नव्हे' असें लटकेंच निमित्त करून, युद्धास गेले. असें निष्कारण युद्ध कधीं झालें नव्हतें. ते मोगल विजापुरीं येतात असें समजतांच त्यानें युद्धाची सिद्धता यथाशक्ति केली. परंतु अवकाश केवळ थोडा ह्मणून मोगलांशीं मैदानांत युद्ध करावयाजोगी फौज मिळाली नाहीं. यास्तव आपल्या मुलखाचे मर्यादेंत आणि वाटेवर

अवघड अशीं जितकीं स्थानें होतीं तितक्या जागीं फौज पाठवून बंदोबस्त ठेविला. आणखी जे कांहीं घोडेस्वार उरले होते त्यांचा खान महंमद मुख्य सरदार करून व दुसरे मुसलमान सरदार होते ते त्याजबरोबर देऊन त्यांस आज्ञा केली कीं, 'ज्या स्थळीं युद्धप्रसंग होईल तेथें तुह्मीं कुमक करावी.' त्या वेळेस विजापूरकरांचे मराठे जहागीरदार लोक सर्जेराव घाटगे व बाजी घोरपडे, निंबाळकर वगैरे कितीएक फौजेसहित येऊन कुमक करिते झाले. सन १६५७ चे मार्च महिन्यांत लष्करसहित औरंगजेब पूर्वेचे वाटेनें विजापूरकरांचे मुलखांत शिरला, आणि तत्काळ कल्याण किल्ला घेतला; व ज्याचा विजापूरकरांस मोठा भरंवसा होता, असा जो बेदर किल्ला तोही एका दिवसांत घेतला; नंतर कुलबर्गा किल्ला एकाएकीं हल्ला करून घेतला. असा प्रवेश झाल्यानें औरंगजेबास आनंद वाटला, परंतु जे विजापूरकरांचे स्वार कुमकेस फिरत असत त्यांचा उपद्रव फार लागूं लागला. तेव्हां त्यानें जो विजापुरचा मुख्य कारभारी खान महंमद नामें सरदार होता, त्याला कांहीं देऊन तो आपल्या शक्तीप्रमाणें लढेनासा केला. त्या मुख्याची वृत्ति पालटतांच दुसरे जे सरदार होते, ते त्याचे कुमकेवांचून बळहीन झाले. तेव्हां तो औरंगजेब मोठ्या त्वरेनें विजापुरास गेला, त्यामुळें तेथचे लोकांस, त्याला दाणापाणी मिळेनासें करावयास फावलें नाहीं. त्यानें लागलाच शहरास वेढा घातला आणि मोठे निकरानें युद्ध आरंभिलें. ते समयीं विजापूरकर त्याशीं बहुत आर्जवानें सल्याची गोष्ट बोलूं लागले, परंतु त्या औरंगजेबाचे मनांत तें राज्य अगदीं बुडवावें असें होतें, यास्तव तो ऐकेना. इतक्यांत त्याची बहीण रोषनारा बेगम होती, तिनें दिल्लीहून पत्र पाठविलें कीं, 'शाह जहानाचे शरीरास फार असमाधान झालें.' तो लेख पाहतांच औरंगजेबानें त्यांपासून कांहीं द्रव्य घेऊन जो त्यांचा मुलुख घेतला होता, तो त्यांचे स्वाधीन करून आपले फौजेसुद्धां विजापुराहून निघून माघारां दिल्लीस आला.

१३. दिलीचा बादशाह शाह जहान याचे पुत्र चवघे. त्यांत एक बापापाशीं दारा शेखो नामें होता; एक सुलतान सुजा, तो बंगाल्याचा संस्थानाधिपति; एक औरंगजेब; एक सुलतान मुराद, तो गुजराथेचा तक्ताधिपति. हे चौघेही आपल्या बापाचा अंतकाळ जवळ आला असें जाणून आपणास दिल्लीचें तक्ताधिपत्य मिळावें ह्मणून सैन्यें सिद्ध करिते झाले. त्यांत जो दारा शेखो नामें बादशाहाजवळ होता, तो बापाची शक्ति क्षीण पाहून राज्यकारभार आपण करूं लागला. तो स्वभावानें सरळ होता. औरंगजेब मोठा कपटी होता. तो मुसलमान लोकांस निरंतर असें समजावीत असे कीं, 'आपले वडील धर्माचे कामांत सावधपणा ठेवीत नाहींत; मी हें राज्य अशासाठीं

इच्छितों कीं आपला धर्म उत्तमप्रकारें चालवावा.' नंतर आपला भाऊ सुलतान मुराद यासही तसेंच समजावून भुलथाप दिली कीं, 'तुह्मी व आह्मी एकचित्त असतां मी धर्मकृत्यें मात्र चालवीन.' तें त्यास खरें वाटलें, आणि दोघांनीं मिळून दारा शेखोशीं युद्धें करून कितीएक वेळां त्याचा पराभव केला. शेवटीं तो परागंदा झाला. नंतर औरंगजेबाचे हातीं सांपडला. त्यानें त्यास मारून टाकिलें. इतक्यांत शाह जहान समाधान पावला. त्यानें वारंवार पुत्रांस आज्ञा केली कीं, 'तुह्मी आपआपल्या संस्थानीं जा, परंतु ते जाईनात. शेवटीं औरंगजेब यानें सर्व आपल्या हातीं आणून बापास आपलेजवळ बंदींत ठेविलें; आणि सुलतान मुराद याचें लष्कर वश करून घेऊन त्यासही कैद केलें. तेव्हां सन १६५८ त तो औरंगजेब दिल्लीचा तक्ताधिपति झाला. यानंतर त्यानें दक्षिणेंतून मीर जुमला यास बोलावून आणिलें; आणि दोघे मिळून जो उरलेला सुलतान सुजा नामें तिसरा भाऊ त्याचे पाठीस लागले. तो पळून बंगाल्याचे पलीकडे आराकान प्रांतीं गेला, त्यास तेथें कोणी दुष्टानें मारिलें. याप्रमाणें औरंगजेब यास कोणी प्रतिपक्षी नाहींसा होऊन तो दिल्लीचा तक्ताधिपति झाला.

---

## भाग पांचवा.

### ( इसवी सन १६५७ पासून सन १६६२ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. शिवाजी औरंगजेबाशीं नम्रभावेंकरून बोलत असून मोगलांशी कृत्रिम केलें.—२. शिवाजीनें आपल्या लष्करांत स्वार वाढवून पठाण मुसलमान लोक चाकरीस ठेविले.—३. विजापुरचे मानकरी लोकांत वैमनस्यें पडलीं, त्यांपासून काय झालें तें.—४. शिवाजीचा शामराजपंत पेशवा राजापुरचे सिद्दीपासून पराभव पावला, त्यावर शिवाजीचा राग होऊन त्यानें मोरो त्रिमळ पिंगळा नामें दुसरा पेशवा केला.—५. वाडीचे सावंत पहिल्यानें शिवाजीस मिळाले, मग लवकरच विजापुरकरांकडचे झाले.—६. विजापूरकरांकडून शिवाजीचे पारिपत्यास मोठें सैन्य आलें.—७. त्या सैन्याचा मुख्य सरदार अफझुलखान तो शिवाजीनें कशा युक्तीनें मारिला तें प्रकरण.—८. शिवाजीनें विजापूरचा रुस्तुम ज़ुमान सरदार याचा पराभव करून विजापूरचे दरवाज्यापर्यंत मुलूख लुटला, व त्वरेनें कोंकणांत जाऊन राजापूर व दाभोळ हीं लुटलीं.—९. त्या शिवाजीचे पारिपत्यास दुसरें पुन: सैन्य नेमून त्याचा मुख्य सरदार सिद्दी जोहर केला, त्यानें पन्हाळ्यावर शिवाजी असतां त्या किल्ल्यास वेढा घातला.—१०. असें असतां तो शिवाजी वांचला कसा; व त्याचा कारकून हिरडस मावळचा देशपांड्या बाजी परभू यानें काय पराक्रम केला तें.—११. विजापुरचा बादशाह अल्ली अदिलशाह यानें शिवाजीनें घेतलेला मुलूख आपण सैन्यासुद्धां येऊन सोडविला तें.—१२. पुन: शिवाजीनें कितीएक किल्ले घेतले तें; व त्याचे बापास ज्यानें धरून विजापुरीं नेलें तो बाजी घोरपडा त्यास सांपडला; त्याला मारून त्याचें गांव मुधोळ तें जाळिलें.—१३. सावंतांचा वाडीप्रांत शिवाजीनें घेतला तो प्रकार.—१४. विजापूरकरांशीं

तह केला तें वर्तमान; व शाहाजी शिवाजीचे भेटीस आला तें प्रकरण.—१५. रायगड किल्ल्याची गोष्ट.—१६. शिवाजीचें लष्कर किती होतें तें, व त्याचे मुलखाची हद्द किती होती तें.

१. औरंगजेब ज्या वेळेस विजापुरकरांशीं लढूं लागला, त्या वेळेस त्याला शिवाजीनें विनंतिपत्र पाठविलें कीं, 'मी मोगलांचा चाकर आहें, त्यास विजापुरकरांचा जो मुलूख मीं घेतला आहे, त्याचे संरक्षणाविषयीं मला कृपा करून सनद द्यावी;' तेव्हां औरंगजेब यानें त्यास तो मुलूख दिला, आणि आज्ञा केली कीं, 'दाभोळ व त्याखालचा मुलूख दिल्लीच्या सरकारचा असून तेथें विजापूरकर उगेंच सत्ता करितात, त्यास तोही मुलूख घ्यावा.' नंतर शिवाजीनें औरंगजेब याचें लष्कर दूर, आणि विजापुरकरांचे शहास गुंतलें, असें जाणून आपले स्वार पुंडाई करून वाढवावे, असा मनसोबा करून त्यानें सन १६५७ त मोगलांशीं कृत्रिम केलें. तें असें; रात्रीस फौजेसहित एकाएकीं जाऊन जुन्नर शहर अगदीं लुटलें, तेथून तीन लक्ष होन व दोनशें घोडे व कितीएक मोठे मोठे अलंकार व कितीएक उंच उंच वस्त्रें इत्यादि संपत्ति घेऊन पुण्यास गेला, आणि तेथें त्याचे दुसरे लोक होते त्यांजवळ ती सर्व दौलत देऊन राजगडास पाठविली. मग आपण चोरवाटेनें जाऊन अहमदनगरास दाखल झाला. त्याची इच्छा अशी होती कीं, त्या नगराची पेंठ सगळी एकाएकीं लुटून तेथील द्रव्य न्यावें. पण तो त्याचा मनोरथ पूर्ण झाला नाहीं; तरी त्यास लाभ मोठा झाला. तो असा; सातशें घोडे व चार हत्ती सांपडले, तितकेच घेऊन तो पळाला. कां कीं, त्या किल्ल्यांतून स्वार आले ते त्याचे लोकांस ठार मारूं लागले.

२. नंतर शिवाजीनें पुण्यास येऊन कितीएक बारगीर व कितीएक शिलेदार चाकरीस ठेविले; त्यांत एक शिलेदार माणकोजी दुतोंडे नामें त्याचे बापाचे ओळखीचा होता, त्याला 'सरनोबत' पद दिलें; पुढें तो मेल्यावर तें पद मोठा धाराशूर नेताजी पालकर नामें होता त्यास दिलें. यानंतर मोगलांनीं विजापुरचें राज्य बुडविलें ह्मणजे पुढें आपणास भय होईल, असें समजून शिवाजीनें औरंगजेबास बहुत आर्जवेंकरून विनंतिपत्र लिहिलें कीं, 'निश्चयें मी यापुढें तुमचे आज्ञेबाहेर वागणार नाहीं. माझे अपराधांची क्षमा असावी.' या लेखाचे बळकटीसाठीं कांहीं बोलणें करावयाकरितां शिवाजीनें आपला परम विश्वासू रघुनाथपंत नामें वकील पाठविला. नंतर मोगलांनीं विजापुरकरांशीं सल्ला केला, व शाह जहानाचे शरीरीं समाधान नाहीं असें वर्तमान कळल्यावर दुसरा वकील कृष्णाजी भास्कर नामें पाठविला. त्यानें बोलणें लाविलें कीं, 'आह्मीं आपल्या चाकरीकरितां पुष्कळ स्वार जमा केले आहेत, त्यास जे समयीं आपण बाहेर निघाल तेव्हां आज्ञा झाल्यास आह्मी आपल्या मुलखाचा बंदोबस्त राखूं; अशी चाकरी आमचे हातून घडली असतां आमची तु-

मचे मुलखीं पहिली देशमुखी होती ती आह्मांस द्यावी.' याखेरीज दुसरें असें समजाविलें कीं, कोंकणांत अदिलखान आहे त्याची वर्तणूक नीट नाहीं, त्यास तो जर मुलूख आमचे स्वाधीन होईल तर प्रजा सुख पावेल.' त्या वेळेस औरंगजेब आपले भावांशीं कलह करण्यांत गुंतला होता, ह्मणून शिवाजीचें इतकें धट्टाईचें बोलणें त्यानें कांहीं अन्यकार्यावर लक्ष्य ठेवून मान्य केलें; त्यावरून शिवाजीनें कितीएक नवे लोक चाकरीस ठेवून, ज्यांचा बंदोबस्त चांगला नव्हता, असे समुद्रतीरचे कितीएक किल्ले घेतले; आणि तो तेथें कांहीं गलबतें बाळगून चांचेपणाही करूं लागला. यानंतर, औरंगजेब जातांच विजापूरकरांनीं दूर केलेलें सातशें पठाण लोकांचें पायदळ आलें, तें शिवाजीनें चाकरीस ठेविलें. त्यापूर्वीं त्यानें कधींही मुसलमान लोक चाकरीस ठेविले नव्हते. ज्यानें चंद्रराव मोऱ्यास मारिलें त्या राघो बल्लाळास त्या पठाणांचा सरदार केला; मग ते लोक त्याचे फार कामास पडले.

३. औरंगजेब निघून गेल्यावर विजापुरीं मानकरी लोकांत वैमनस्य पडलें होतें. ते सर्व मिळून जर शिवाजीचें बंड मोडिते तर तो प्रकार बरा होता; परंतु तें टाकून ते आपआपल्यांत एकमेकांच्या नाशास प्रवृत्त झाले. तेथचा मुख्य वजीर खान महंमद, यानें आपले धन्याचा घात केला, ह्मणून तो आला ह्मणजे त्याचें पारिपत्य करावें असा त्या दरबारीं निश्चय ठरला होता. त्यास शिक्षा नीतीनें करावी तशी केली नाहीं. त्याला अभय देऊन बोलाविलें, परंतु तो विजापुरच्या दरवाज्याशीं येतांच त्यास हत्तीवरून ओढून मारिलें. अशी अव्यवस्था होण्याचें कारण असें कीं, तेथचा तक्ताधिपति अल्पवयाचा होता, आणि कारभारी लोकांत वैमनस्यें पडलीं होतीं.

४. शिवाजीचे मनांत होतें कीं, सारी कोंकणपट्टी घ्यावी. यास्तव त्यानें आपला शामराजपंत पेशवा, सिद्दीचा मुलूख घ्यावयास पाठविला. त्या वेळेस फत्तेखान नामें सिद्दी होता, त्यानें लढून त्या शामराजपंताचा अगदीं मोड केला. हें वर्तमान सन १६५९ त घडलें. हा शिवाजीचे फौजेचा पहिला मोड केला. व यावरून त्याची उत्साहशक्ति क्षीण झाली. त्यानें शामराजपंत पेशव्यास माघारें बोलावून नेलें, आणि त्याचा अधिकार मोरो त्रिमळ पिंगळे यास दिला, आणि ज्या लोकांचा मोड झाला होता त्यांचे कुमकेस दुसरी फौज पाठविली.

५. त्या मोडाचे पूर्वीं, वाडीचे सावंत यांनीं शिवाजीची चांगली तयारी व विजापूरकर केवळ आळशी, असें पाहून आपण शिवाजीला मिळावें, अशा मसलतीनें शिवाजीकडे वकील पाठविला. तेव्हां असें ठरलें कीं, सावंतांची देशमुखी सोडून अर्धा वसूल शिवाजीनें घेऊन त्यांचें रक्षण करावें. असें ठरल्यावर सावंत यांस पुढें थोडकेच दिवसांनीं असें वाटलें कीं, आपण जें केलें

तें ठीक नाहीं, ह्मणून ते पहिल्याप्रमाणें विजापूरकरांशीं मिळाले. जें दुसरें लष्कर, मोड झालेल्या लोकांचे कुमकेस, बरोबर रघुनाथपंत देऊन पाठविलें, तें पावसाळा येई तोंपर्यंत जय पावलें नाहीं; नंतर ते लोक निघून आपले मुलखीं गेले.

६. शेवटीं विजापुरचे दरबारांत असा निश्चय झाला कीं, शिवाजीचें बंड अवश्य मोडिलें पाहिजे; तेव्हां त्यांनीं सैन्य सिद्ध केलें. तें असें; पांच हजार स्वार आणि सात हजार पायदळ, व कितीएक तोफा, व कितीएक जेजाला, व कितीएक बाण, तयार करून त्यांवर कोणीएक मोठा कुलीन अफझुलखान नामें मुसलमान मुखत्यार केला. तो बादशाहाची आज्ञा घेऊन निघतेसमयीं आपले जातीचे गर्विष्ठपणानें बोलिला कीं, 'शिवाजी केवळ क्षुद्र जीव आहे. त्यास बांधून स्वामींचे सिंहासनाचे पायरीवर आणून टाकीन.'

७. मग पर्जन्यकाळ गेल्यावर सन १६५९ त तें लष्कर पंढरपुरावरून वांईस आलें. तें शिवाजीला कळतांच तो प्रतापगडीं जाऊन राहिला, आणि तेथून वकील पाठवून त्यानें त्या अफझुलखानाशीं फार गरिबीचें बोलणें लाविलें. तें असें कीं, 'तुजसारिखा महाप्रतापी सरदार याशीं माझी लढण्याची शक्ति किती? जर तुमचे योगेंकरून बादशाह माझे अपराधांची क्षमा करील, तर मजवर मोठे उपकार होतील. त्यास, हें सिद्ध झालें ह्मणजे तुह्मांस मी आपला सर्व मुलूख देईन.' तो अफझुलखान उन्मत्तपणानेंच आपणास राज्यकारभाराविषयीं दक्ष असें मानीत होता, ह्मणून तो शिवाजीचें ज्ञान गणित नसे. त्याला पूर्वीं कांहीं दिवस वाई परगण्याची मामलत सांगितली होती, त्यावरून त्याला असें ठाऊक होतें कीं, हा मुलूख केवळ पराक्रमेंकरून घ्यावयास अवघड आहे. हीं सर्व कारणें आणि शिवाजीचें गरीबीचें बोलणें मिळून त्याचें मन कांहींसें प्रसन्न झालें; तेणेंकरून त्यानें पंतोजी गोपीनाथ नामें एक कारकून कांहीं बोलणें करावयाकरितां पाठविला. तो पारगांवास पोंचल्यावर शिवाजी त्याचे भेटीसाठीं किल्ल्यावरून खालीं उतरला; तेव्हां तो ब्राह्मण शिवाजीशीं बोलिला कीं, 'अफझुलखान शाहाजीचा इष्ट आहे, तो तुमचा नाश इच्छित नाहीं. तुह्मी लढाई न करितां जर मुलूख द्याल, तर तो बादशाहाकडून क्षमा करवील, आणि तुह्मांला कांहीं जहागीर देववील.' ही गोष्ट शिवाजीचे मनास आली. तेव्हां त्यानें तो वकील व त्याजबरोबरचे लोक यांचे सन्मानार्थ जाग्याचा वगैरे बंदोबस्त केला. त्यांत त्या कारकुनास त्या लोकांपासून कांहीं दूर अशी वेगळीच राहावयास जागा दिली. असें करून रात्रीस कोणाला कळूं न देतां, त्या ब्राह्मणाकडे शिवाजी येऊन बहुत नम्रतेनें दंडवत करून बोलिला कीं, 'तुह्मी ब्राह्मण आह्मां, शूद्रांचे गुरु आहां; त्यास मी आपणास विनंति करितों कीं, मला भवानी प्रसन्न

होऊन बोलिली कीं, तूं गाईब्राह्मण यांचा प्रतिपाळ कर. यास्तव मी जें कर्म करितों तें केवळ गाईब्राह्मणांच्या पालनार्थच करितों. त्यास जर तुह्मी मला अनुकूळ व्हाल तर तुह्मांस, आपले भावांत व सोयऱ्यांत सुखी ह्मणवून राहावयास, हिंवरें गांव जहागीर करून देईन.' त्यावरून तो ब्राह्मण वश होऊन त्यानें शिवाजीला निष्कपटपणाविषयीं शपथ दिली. मग ते दोघे मसलत करूं लागले कीं, 'सांप्रत जें भय निर्माण झालें आहे याचें निवारण कसें करावें?' त्यांस त्या ब्राह्मणाचे अटकळींत असें आलें कीं, 'अफझुलखान यास शिवाजीशीं एकांतांत आणावयाचें अवघड नाहीं.' तेव्हां शिवाजीनें आपला वकील कृष्णाजी भास्कर त्या पंतोजी गोपीनाथाबरोबर अफझुलखानाकडे पाठविला. त्यांनीं त्यास असें सांगितलें कीं, 'तुह्मांला शिवाजी फार भितो. कदाचित् तुह्मी जाऊन जर त्याला अभय द्याल, तर तो विश्वासेंकरून आपले स्वाधीन होईल, आणि युद्ध न करितां मुलूख देईल.' असें त्यांचें कृत्रिमाचें बोलणें अफझुलखानानें सत्य मानिलें, आणि तो गैरसावधपणानें त्या पंतोजी गोपीनाथानें सांगितल्याप्रमाणें वागूं लागला. तेव्हां विजापुरकरांचें लष्कर जावळीस गेलें होतें. ते समयीं शिवाजीनें मोरोपंत व नेताजी पालकर व पुष्कळ मावळे लोक कोंकणांतून आणून प्रतापगड व जावळी या दोहों जागीं गुप्त ठेविले. यानंतर अफझुलखान भेटीची तयारी करून बरोबर दीडहजार फौज घेऊन प्रतापगडाजवळ आला; तेव्हां पंतोजी गोपीनाथानें शिवाजी भिईल असें समजावून फौज मागें ठेवविली, आणि एक हत्यारबंद बरोबर घेऊन एकटा अफझुलखान यास त्या हत्यारबंदासुद्धां भेटीच्या संकेताचे जाग्यावर नेऊन शिवाजी येतो ह्मणून वाट पाहत बसविलें. इकडे किल्ल्यामध्यें शिवाजीनें स्नान करून नित्यनियम उरकून मातेच्या चरणांवर मस्तक ठेवून आशीर्वाद घेतला, आणि आंगांत चिलखत चढवून त्यावर आंगरखा घालून आपले उजव्या अस्तनींत गुप्त बिचवा नामक शस्त्र घातलें, आणि डाव्या हातीं वाघनखें घेऊन आपण भेटीस निघाला. त्याबरोबर त्याचा पुरातन विश्वासू शिपाई तानाजी मालुसरा हत्यारबंद होता. तें भेटीचें स्थान जवळ आलें तेव्हां शिवाजी दबकत येऊं लागला. तेव्हां पंतोजी गोपीनाथानें असें समजाविलें कीं, 'तो तुमचे जवळच्या हत्यारबंदास भितो, कां कीं, त्याची आकृति फार सुकुमार आणि लहान आहे; याकरितां हा एकीकडे झाला पाहिजे.' त्यावरून त्याला अंमळसें दूर केलें. नंतर शिवाजी व अफझुलखान एकमेकांस भेटतां भेटतां शिवाजीनें अफझुलखानाचे पोटांत वाघनखें खुपसलीं, तीं बळकट लागलीं. परंतु तो अफझुलखान त्वरेनें त्यापासून दूर होऊन तरवार उपसून शिवाजीवर वार करून 'अरे घात आहे,' असें बोलिला. त्याच वेळेस शिवाजीनें त्यास आपल्या अस्तनींतला बिचवा काढून मारिला, तेव्हां तो भूमीवर पडला. त्यानें

जो शिवाजीस वार केला तो त्याचे चिलखतामुळें लागू झाला नाहीं. इतकें सर्व एका क्षणांत झालें, तों त्या अफझुलखानाचे बरोबर आलेला हत्यारबंद सय्यद बंडू नामें होता, तो आपल्या धन्याजवळ आला; इतक्यांत त्याचे हातची तरवार शिवाजीनें घेतली; आणि तानाजी व शिवाजी हे दोघे त्या एकट्याबरोबर लढूं लागले. ते त्यास कितीएक वेळां बोलिले कीं, 'तुला आतां आह्मी जीवदान देतों,' परंतु त्या बोलण्याचा धिक्कार करून तो त्यांशीं लढून मेला. असा तो आपल्या धन्याचा अभिमानी, परम योग्य, ह्मणून त्याचें नांव लिहिलें. तो मृत्यु पावला ते समयीं शिवाजीचे लोकांनीं येऊन त्या अफझुलाचें शिर कापून किल्ल्यावर नेलें. तें शिर किल्ल्यावर नेतांच संकेताप्रमाणें तोफेचा बार केला. तो बार होतांच एकाएकीं प्रतापगडचे व जावळीचे लोकांनीं येऊन अफझुलखानाचे लष्करावर छापा घातला, तेव्हां त्या लष्कराचा बहुत नाश झाला. त्या वेळेस शिवाजीला चार हजार घोडे व कांहीं हत्ती व कांहीं उंटें आणि बहुत द्रव्य व तोफा व जेजाला वगैरे पुष्कळ सरंजाम सांपडला. अशा अधर्मेंकरून वैभव संपादन केलें असतांही त्याचे जवळचे लोकांनीं त्याची प्रशंसा केली. त्यांनीं धर्माधर्माचा विचार चित्तांत आणिलाच नाहीं. त्या छाप्यांत कितीएक लोक धरून नेले. त्यांतून जे कोणी गेले, त्यांस दुःख न देतां शिवाजीनें जाऊं दिलें. त्यांत एक जुंझारराव घाटगे या नामें सरदार मोठा कुलीन होता त्याच्या बापाचें आणि शाहाजीचें इष्टत्व होतें. त्यानें राहावें ह्मणून शिवाजीनें फार आग्रह केला, परंतु तो ऐकेना; तेव्हां त्याचा मोठा सन्मान करून त्याला बादशाहाकडे जाऊं दिलें. याखेरीज त्या धरलेल्या लोकांत अफझुलखानाची स्त्री व पुत्र हीं सांपडलीं; तीं, शिवाजीचा सरदार एक खंडूजी कांकडे नामें असे, त्याचे स्वाधीन होतीं. त्यानें त्यांपासून कांहीं लांच घेऊन त्यांस सोडून दिलें, यास्तव शिवाजीनें त्या कांकड्याचे डोकें मारविलें. त्या लढाईत जे जखमी झाले त्यांचा शिवाजीनें मोठा सन्मान करून त्यांस कितीएक अलंकार वस्त्रें दिलीं; या योगेंकरून त्याची मोठी कीर्ति झाली; आणि शिपाई लोक युद्धाविषयीं तत्पर झाले. मग दगा केलेल्या त्या पंतोजी गोपीनाथास संकेताप्रमाणें शिवाजीनें हिंवरें गांव देऊन त्याचा मोठा सन्मान केला, आणि त्यास सरदारीचा अधिकार देऊन आपल्या चाकरीस ठेविलें.

८. यानंतर शिवाजीनें पन्हाळ्याच्या किल्लेदारास वश करून तो किल्ला घेतला. नंतर कृष्णेचे उभयतीरची खंडणी घेत चालला; याखेरीज कोंकणचे व सह्याद्रीवरचे कितीएक किल्ले त्यास लढाई न करितां त्या लोकांनीं दिले, परंतु रांगणा व खेळणा हे दोन किल्ले युद्ध करून घेतले; त्या वेळेस त्या खेळण्याकिल्ल्याचें नांव 'वि-

---

१. अद्यापि शिवाजीचे पुरुष त्या अफझुलखानाचे तरवारेस अमोलिक मानून फार जपतात.

शाळगड' पडलें, तें अद्यापि तसेंच चाललें आहे. हें वर्तमान सन १६५९ चे डिसेंबर महिन्यांत विजापुरीं कळलें, तेव्हां त्या बादशाहानें आपला सरदार मिरजेस रुस्तुम जुमान नामें होता, त्यास आज्ञा केली कीं, 'कोल्हापुरचे बंदोबस्तास निघावें.' तेव्हां त्याजवळ तीन हजार स्वार आणि कांहींसें पायदळ मात्र होतें. तो पन्हाळ्याजवळ येतांच शिवाजीनें आपले स्वार जमा करून त्याचा अगदीं पराभव केला, आणि त्यास कृष्णेच्या पार घालविलें. यानंतर पायदळ आणून शिवाजीनें विजापूरपर्यंत खंडणी घेतली, आणि अतिस्वरेनें माघारां विशाळगडास गेला. असा कीं, त्याचे पाठीस कोणी सरदार लागावयास अवकाश झाला नाहीं. त्यानंतर, सन १६६० चे जानेवारी महिन्यांत शिवाजीनें कोंकणांत समुद्रतीरचीं राजापूर व दाभोळ हीं दोन्ही स्थानें लुटून बहुत द्रव्य राजगडास नेलें.

९. हें सारें शिवाजीचें कृत्य विजापुरीं कळल्यावर, तेथचे दरबारी लोकांत जें पूर्वीं वैमनस्य पडलें होतें तें मोडून सर्व एकचित्त होऊन कर्नाटकांत कर्नोळास एक जोहर नामें सिद्दी मोठा विख्यात पुरुष होता, त्याजबरोबर अफझुलखानाचे दुप्पट फौज देऊन त्यास शिवाजीचे पारिपत्यास योजिलें. तेथें असें ठरलें होतें कीं, 'आधीं पन्हाळा किल्ला घ्यावा, आणि तो शिवाजीचे जवळ पोंचतांच, दंडाराजपुरीचा फत्तेखान सिद्दी व वाडीचे सावंत या दोघांना त्याचे कुमकेस जावयास आज्ञा करावी.' इकडे शिवाजीनें कोंकणांत बंदोबस्तासाठीं राजपुरीचे सिद्दीवर रघुनाथपंत योजिला, आणि कल्याण व भिंवडी यांचे संरक्षणार्थ आबाजी सोनदेव नेमिला. आणि वाडीच्या सावंतांवर बाजी पासलकर सरनोबत यास पाठविलें. मोरोपंत यास देशांत सिंहगड व पुरंदर व प्रतापगड यांचे व मुलखाचे रक्षणार्थ आज्ञा केली. आणि पन्हाळा किल्ला हा असा मजबूद कीं, कोणाचे हातीं लागावयाचा नाहीं, असें समजून तेथें आपण मोठ्या बंदोबस्तानें राहिला. त्या शिवाजीनें विजापुरकरांचें लष्कर येत असतां वाटेनें त्यास कांहीं उपद्रव केला नाहीं; मग जेव्हां तें अगदीं जवळ येऊन पडलें, तेव्हां नेताजी पालकर याजबरोबर स्वार देऊन त्या लष्कराभोंवतालचा मुलूख स्वाऱ्या घालून लुटून ओस पाडून त्या लष्करास धान्यादि मिळेनासे केलें. तो रात्रीस किल्ल्यांतून मावळे लोक कुमकेस पाठवून छापा घालवी. अशा प्रकारें त्यानें त्या लष्कराचा फार नाश केला. शेवटीं त्या सिद्दी जोहरानें आपल्या लष्करास अशी आज्ञा केली कीं, 'असें क्रूर कर्म करणारा सांपडला असतां त्याला जिवंत ठेवूं नये.' मग त्यानें किल्ल्यास वेढा असा घातला कीं, अगदीं दुसऱ्याचा प्रवेश आंत न होय. असे चार महिने ते राहिले तेव्हां शिवाजीस असें समजलें कीं, 'मी या किल्ल्यावर राहिलों हें ठीक केलें नाहीं. कां कीं, आतां आपल्यास पळावयास

वाट नाहीं, व मुलखांत काय होतें आहे तें समजत नाहीं; त्यास आतां कसा तरी आपला जीव वांचेल अशी युक्ति करावी.'

१०. इकडे चार महिने झाल्यावर त्या वेढा घालणारांस असें वाटलें कीं, आतां शिवाजी आपल्या हातीं लागला; तेणेंकरून त्यांस बहुत आनंद झाला आणि अत्यंत सावधपणानें ते बंदोबस्त करूं लागले. शिवाजीचा मुलूख कोंकणांत होता तेथें ते समयीं जागोजाग युद्धें होत होतीं. फत्तेखान सिद्दीनें कितीएक वेळां रघुनाथपंताचा पराभव करून लढाऊ गलबतें बाळगून त्यांचे मुलखांत जाऊन कितीएक जागीं उपद्रव केला. याखेरीज वाडीचे सावंतांशीं बाजीराव पासलकर लढाई करीत होता; ती लढाई अशी झाली कीं, दोन्ही लष्करांचा सारखा नाश झाला, आणि दोहोंकडचे दोघे मुख्य सावंत व पासलकर हे पडले. शिवाजीचे मनांत आलें कीं, 'आतां आंतच राहून मरावें हें योग्य नाहीं, कसें तरी बाहेर पडावें;' ह्मणून सिद्दी जोहरास निरोप पाठविला कीं, 'जर माझे जिवास भय नसेल, तर मी तह्याचें बोलणें करावयास येतों.' मग त्याचें अभयवचन ऐकून बरोबर थोडकीं माणसें घेऊन संध्याकाळचा थोडा दिवस असतां शिवाजी किल्याखालीं उतरला. मग सिद्दी जोहराचे शिपायांनीं मोरचा बांधिला होता, त्याजवळ सिद्दी जोहराची व शिवाजीची भेट झाली. नंतर त्या दोघांचें बोलणें झालें त्यावरून लोकांस असें वाटलें कीं, आतां शिवाजी युद्ध करीत नाहीं. तो तर बोलतां बोलतां युक्तीनें बहुतेक मोठीं मोठीं कलमें बोलून कांहीं हलकीं कलमें राहिलीं तीं युक्तीनें न संपवितां 'आतां संध्याकाळ झाला, उद्यां बोलेन,' असें समजावून माघारां किल्ल्यावर गेला. तेव्हां ते घेरा घालणारे लोक असें समजले कीं, 'आतां किल्ला हस्तगत झाला; इतःपर बहुत सावधपणा राखण्याचें कारण नाहीं.' त्यावरून ते असावध राहिले. तो त्यांचें दुर्लक्ष्य पाहून बरोबर मावळे लोक घेऊन रात्रीस अंधारांतच निघून किल्ला उतरून त्या लोकांस कळूं न देतां रांगण्याकडे पळाला. तो बहुत दूर गेल्यावर लोकांस समजलें, तेव्हां त्याचे पाठीमागून त्या सिद्दी जोहराचे स्वार व पायदळ लोक धांवले. त्यांनीं रांगण्याचे आलीकडे सुमारें तीन कोस एके खिंडींत त्यास चढतांना पाहिलें, तेव्हां त्यानेंही त्यांस पाहिलें. मग त्यानें त्या खिंडींतच मावळे लोक ठेवून त्यांस सांगितलें कीं, 'मी जोंपर्यंत किल्ल्यावर जाऊन तोफांचे बार पांच करीन, तोंपर्यंत तुह्मी हे येताहेत यांशीं एथूनच लढत असावें.' त्या वेळेस त्या मावळ्यांचा बाजी परभू यास मुख्य करून आपण किल्ल्यावर गेला. नंतर त्या लोकांशीं तो परभू दोन प्रहरपर्यंत मोठ्या शौर्येंकरून लढला. त्यानें कित्येक वेळां त्या मोगलांस हटविलें, शेवटीं

१. मराठे लोकांत अद्यापि असा विश्वास आहे कीं सिद्दी लोक वचनाचे खरे प्रामाणिक.

दुसरी मोठी फौज आली, तेव्हां फार मोठें युद्ध झालें. त्यांत ते मावळे लोक अर्धे पडले, आणि तो परभूही पडला. ते समयीं त्यानें किल्यावरचे तोफांचे पांच बार ऐकिले, आणि ह्मटलें कीं, 'आतां मी सुखी झालों.' इतकें करून त्यानें प्राण सोडिला. हें सर्व वर्तमान विजापुरचे बादशाहास कळलें, तेव्हां त्या सिद्दी जोहराविषयीं त्याचे मनांत वांकडें येऊन तो रागें भरला. कां कीं, त्यास असें वाटलें कीं, यानें कांहीं लांच घेऊन शिवाजीला सोडून दिलें. मग सन १६६१ त तो बादशाह आपण अंगें सैन्य घेऊन कऱ्हाडास आला. तेथें जे कोणी सभोंवतीं संस्थानी लोक होते, त्यांनीं त्याचे सेवेंत तत्पर असून त्यास असें समजाविलें कीं, 'आह्मांस शिवाजीचा पक्ष किमपि नाहीं.' तो सिद्दी जोहर बादशाहाचे भेटीस आला, त्यानें बादशाहाचे मनांतील संशय उडविला, आणि आपण आपल्या ठिकाणीं कर्नोळास गेला.

११. मग त्या बादशाहानें रांगणा किल्ला व विशाळगड या दोहोंखेरीज शिवाजीचा पन्हाळा व त्यासंबंधी कितीएक किल्ले घेतले. पुढें पर्जन्यकाळ जवळ आला तेव्हां तो फौजेसहित कृष्णेचे कांठीं चिमुलगे शहरीं जाऊन राहिला. शिवाजी बादशाहाचे समोर कधींही लढला नाहीं; परंतु कांहीं संधि पाहून सन १६६२ त त्यानें राजापूर लुटून तेथें कोणी व्यापारी इंग्रेज लोक राहात होते, त्यांस, धरून नेऊन कैदेंत ठेविलें.

१२. त्यानंतर शिवाजीनें युद्ध करून शृंगारपूर घेतलें; तेथें दळवी नामें एक पाळेगार होता, तो युद्धांत पडला. याप्रमाणें शिवाजीनें हिंदूंचीं दोन ठिकाणें घेतलीं, एक जावळी व एक शृंगारपूर. तें हिंदु लोकांस फार अयोग्य वाटलें; यास्तव तें लोकांचे मनांतून जावें ह्मणून शिवाजी केवळ धार्मिकपणा करूं लागला. तो असा कीं, आपणास तुळजापुरचे भवानीचे दर्शनास जावयास फावेना ह्मणून त्यानें प्रतापगडास मोठ्या समारंभानें देवीची स्थापना केली; आणि रामदासस्वामी नामें एक महासाधु ब्राह्मण होता, तो गुरु केला, अशीं हीं दोन कृत्यें; आणि तिसरें कृत्य असें कीं, शृंगारपुरचे राहणारे सुर्वे या नामें मराठे होते ते वश करून घेतले. यामुळें जे शृंगारपुरचे राहणारे लोक होते, ते सिद्दीच्या मुलखांत राहावयास गेले नाहींत. तेथेंच राहिले. मग कर्नाटक प्रांतीं कितीएक जागीं बंडें उत्पन्न झालीं, तेणेंकरून विजापुरचे दरबारांत असा विचार पडला कीं, 'आधीं शिवाजीचें पारिपत्य करावें, किंवा त्या बंडाचे पारिपत्यास जावें?' इतक्यांत वाडीकर सावंतांनीं लिहून पाठविलें कीं, 'आह्माला तुमची कुमक असेल तर आह्मी शिवाजीला जिंकूं.' त्यावरून असा निश्चय ठरला कीं, बादशाहानें फौज घेऊन कर्नाटकांत जावें, आणि बाजी घोरपडा मुधोळकर व बहलोलखान मुसलमान या दोघांनीं सावंताचे कुमकेस असावें. मग

बादशाह कर्नाटकांत चालिला, व इकडे शिवाजीवर जाणारांची तयारी होऊं लागली; ते समयीं बाजी घोरपडे आपल्या कांहीं कामानिमित्त आपले ठिकाणीं गेला. हें वर्तमान कोणीं शिवाजीस सांगितलें. तें ऐकतांच तो शिवाजी कांहीं लोक बरोबर घेऊन मोठ्या त्वरेनें चोरवाटेनें जाऊन अकस्मात् मुधोळ शहरीं पोहोंचला. तेथें छापा घालून त्यानें मुधोळकर व त्याचे कितीएक भाऊबंद व कितीएक शिपाईलोक, यांस ठार मारून गांव जाळून टाकिलें, आणि आपण लवकर निघून विशाळगडीं माघारा गेला.

१३. इकडे बादशाह कर्नाटकांत जाऊन रायचूर व तुर्गळ हीं दोन्हीं ठिकाणें घेऊं लागला. तेथें शिपाई लोक होते त्यांनीं मोठ्या शौर्येंकरून लढाई केली; आणि त्या बादशाहानेंही मोठा पराक्रम करून तीं स्थानें घेतलीं. हें वर्तमान सन १६६२ त घडलें. त्या सिद्दी जोहरास बादशाहाचें भय पडलें, तें असें; तो समजला कीं, 'बादशाहाचे मनांत माझेविषयीं संशय आहे, यास्तव त्याचा विश्वास धरूं नये.' असें मनांत आणून त्यानें बंडाचा आश्रय केला. नंतर त्यानें अशी संधि पाहिली कीं, जुंझारराव घाटगे व फलटणचे राव नाईक निंबाळकर, या दोघांचें लष्कर बादशाहाचे लष्करापासून दूर, आणि त्या दोहों लष्करांमध्यें तुंगभद्रा नदी. असें त्यानें जाणून एकाएकीं जाऊन त्या लष्करावर छापा घालून मोठी धुंदाई करून त्या लोकांस पिटून लाविलें. इतक्यांत तो बहलोळखान नवें सैन्य कुमकेस घेऊन माघारां उलटला, आणि त्यानें सिद्दी जोहराच्या सैन्याचा नाश केला. नंतर त्या सिद्दी जोहराचे लोकांनीं आपल्या जिवाच्या रक्षणार्थ, बादशाहानें क्षमा करावी ह्मणून, आपला धनी सिद्दी जोहर ठार मारिला. त्या योगेंकरून तिकडचें बंड बहुतेक मोडलें; परंतु त्याची समाप्ति व्हावयास दोन वर्षें लागलीं. तोंपर्यंत बादशाह तेथेंच होता, नंतर विजापुरीं आला, तरी त्याचीं कांहीं कामें राहिलीं. बादशाहाचें लष्कर कर्नाटक प्रांतांत बंड मोडावयास गुंतलें; तेणेंकरून शिवाजीला मोठा उपयोग झाला. तो असा कीं, त्या बादशाहानें जे सरदार शिवाजीवर नेमिले होते, त्यांसही, शिवाजीला आपल्या कुमकेस बोलावून बंडाचे बंदोबस्तास न्यावें लागलें. नंतर शिवाजीनें जाऊन वाडीचे सावंतांचा मुलूख घेतला, ते वेळेस सावंत पळाले. त्यांनीं गोंव्याचे पोर्तुगीस लोकांकडे जाऊन त्यांचा आश्रय केला; परंतु शिवाजीनें त्या लोकांस भय दाखवितांच त्यांनीं त्यांस हांकून दिलें. मग सावंत शिवाजीला शरण गेले, ते समयीं शिवाजीनें त्यांचें देशमुखीचें वतन त्यांस दिलें. तेव्हांपासून ते शिवाजीचे चाकर झाले.

१४. त्यानंतर शिवाजीनें रेडी व सिंधुदुर्ग—ज्यास मालवण असें ह्मणतात—हे

दोन किल्ले बांधिले, आणि कुलाबा व सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग हे किल्ले नीट केले; आणखी कितीएक लढाऊ गलबतें तयार केलीं. तीं पुष्कळ झालीं तेव्हां त्यांचें ठेवण्याचें मुख्य ठिकाण कुलाबा, जो मुंबईचे दक्षिणेस दहा कोसांवर आहे तो, केला; आणि त्यांचे मुख्य सरदार दोन केले; एक दर्या सागर आणि एक मैनाक भंडारी. ते फार चांचेपणा करीत असत; त्यांच्या उपद्रवास भिऊन गोंव्याचे पोर्तुगीस लोकही त्यांस तोफा वगैरे कितीएक युद्धाचे उपयोगी पदार्थ देऊन त्यांशीं इष्टत्व राखीत. असें झाल्यावर विजापुरचे बादशाहाचा वजीर अबदुल महंमद, यानें शिवाजीशीं गुप्तपणें तहाचें बोलणें लाविलें. त्यांत बारीक गोष्टी काय काय होत्या त्या आतां समजत नाहींत; परंतु असें दिसतें कीं, त्याचा घटक शिवाजीचा बाप शाहाजी असेल. कां कीं, ते समयीं शाहाजीनें कर्नाटकांतून बादशाहाचा निरोप घेऊन बरोबर पुत्र व्यंकोजी घेतला, आणि मोठ्या समारंभानें तो शिवाजीस भेटला; मग दोन महिने राहून बहुत आनंदेंकरून कितीएक अपूर्व पदार्थ शिवाजीपासून घेऊन ते त्यानें बादशाहाचे भेटीस नेले. त्या दिवसापासून शाहाजी जिवंत होता तोंपर्यंत, बादशाह आणि शिवाजी यांची परस्पर प्रीति होती.

१५. शाहाजीची व शिवाजीची भेट झाली त्याच सुमारें शिवाजी राजगडाहून निघून रायरी किल्ल्यावर राहावयास गेला. त्या किल्ल्याचें तें नांव बदलून 'रायगड' असें दुसरें ठेविलें. तेथें राज्यकारभाराचे उपयोगी हवेल्या बांधिल्या, आणि मोठी मेहनत करून तो असा मजबूद केला कीं, कोणाचे हातीं लागूं नये.

१६. त्या वेळेस शिवाजीचे मुलखाची मर्यादा इतकी होती कीं, कल्याणपासून गोंव्यापर्यंत कोंकणपट्टी, आणि भीमेपासून वारणेपर्यंत घाटमाथा. त्याचे मुलखाची विशेष रुंदी सुप्यापासून जंजिऱ्यापर्यंत होती. तो पुंडाई करी ह्मणून त्याचें थोडकें राज्य असून त्याजवळ फौज फार असे. त्याचें पायदळ पन्नास हजार होतें, आणि सात हजार स्वार होते. असा तो शिवाजी पराक्रमी झाला, यास्तव विजापुरकरांनीं त्याशीं इष्टत्व केलें, आणि तेणेंकरून तो अंमळसा रिकामा झाला. तेव्हां त्याचे मनांत आलें कीं, आतां मोंगलांशीं युद्ध करावयाची मसलत करावी.

---

## भाग सहावा.

**( इसवी सन १६६२ पासून सन १६६७ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )**

१. शिवाजीनें मोगलांचा मुलूख घेण्याचा उद्योग केला.—२. ह्मणून त्यावर औरंगजेब बादशाह यानें शाइस्तेखान नामें सरदार याची योजना दिल्लीहून केली.—३. त्या शाइस्तेखानानें पुण्यास येऊन चाकण किल्ला घेतला.—४. त्यापुढे शिवाजीनें काय पराक्रम केला ते प्रकरण.—५. दिल्लीहून बादशाहानें त्या शाइस्तेखानाला माघारें बोलावून सुलतान मुआझिम नामें दुसरा सरदार

दक्षिणेस योजिला.—६. शिवाजीनें सुरत लुटली.—७. शाहाजीचा मृत्यु.—८. शिवाजीनें आपल्या नांवास 'राजा' असें पद जोडून आपल्याच नांवानें शिक्के चालविले; आणि तेच समयीं अहमदनगर लुटलें.—९. जे लोक मक्केस तीर्थयात्रेकरितां जाणारे ते शिवाजीच्या लढाऊ गलबतांनीं जाऊन लुटले.—१०. तो शिवाजी मालवणापाशीं गलबतावर चढून समुद्रांतून जाऊन गोंव्याचे दक्षिणेस बारसिलोर नामें शहर होतें ते लुटिता झाला.—११. शिवाजीस जिंकावयास राजा जयसिग व दिलेरखान हे दोघे त्याला न कळतां त्याचे मुलखीं जाऊन पोंहचले.—१२. त्यांनीं कांहीं स्थानें घेतलीं ह्मणून शिवाजीस भय प्राप्त झालें तें.—१३. पुरंधर किल्ल्यास घेरा घातला ते वर्तमान.—१४. शिवाजी युद्ध सोडून राजा जयसिंग व दिलेरखान या दोघां सरदारांच्या आज्ञेंत चालूं लागला; आणि त्या वेळेस त्यानें कांहीं ठराव करून घेतला.—१५. त्यावरून विजापूरकरांचा व त्या सरदारांचा युद्धप्रसंग घडला.—१६. त्यापुढे शिवाजी बादशाहाचे भेटीस दिल्लीस गेला तेव्हां औरंगजेबानें त्याला बंदींत ठेविलें असतां त्यानें आपला जीव कोणत्या प्रकारानें वांचविला ते.—१७. विजापूरकरांशीं जयसिग लढला; त्या जयसिगानें विजापुरास घेरा घातला असतां त्यांनीं तो मागें हटविला; तो जयसिग माघारां दिल्लीस जात असतां वाटेनें मृत्यु पावला.

१. शिवाजीनें मोगलांस जिंकावयाकरितां मोठें सैन्य जमा केलें. त्यांत, पायदळाचा मोरोपंतास, आणि नेताजी पालकर यास स्वारांचा, सरदार केला. त्या मोरोपंतानें पर्जन्यकाळीं जुन्नराचे उत्तरेकडचे कितीएक किल्ले घेतले; मग पाऊसकाळ गेल्यानंतर मार्ग चांगले झाल्यावर, नेताजी पालकर हा, स्वारांसहित औरंगाबादेपर्यंत मोगलांच्या मुलखांत जाऊन मोठी लुटालूट करून बहुत द्रव्य घेऊन माघारां पुण्यास गेला. तो त्या मुलखांत कोठेंही एके ठायीं वस्ती करीत नसे; वाटेनेंही सरळ मार्ग सोडून वांकडेतिकडे आडमार्गेंकरून भलत्या गांवाहून भलतेच गांवीं जावें, असें करीत फिरत असे. तेणेंकरून मोगलांचे सरदारांस त्याला धरावयास अवकाश सांपडला नाहीं. ह्मणून तो ती सर्व लूट घेऊन स्वस्थपणें पुण्यास पोंचला. हें वर्तमान सन १६६२ त झालें.

२. त्या वेळेस दक्षिणेंत शाइस्तेखान नामें मुसलमान सुभेदार होता, त्यास दिल्लीचा तक्ताधिपति जो औरंगजेब बादशाह यानें आज्ञा केली कीं, 'शिवाजी फार अमर्याद झाला आहे, त्यास तूं त्याचे मुलखीं जाऊन तो मुलूख बलात्कारेंकरून घे.' तेव्हां तो शाइस्तेखान मोठें सैन्य जमा करून औरंगाबादेहून निघाला. त्यानें अहमदनगर व पारगांव यांवरून येऊन पुणें शहर घेतलें.

३. त्यानंतर तो जुन्नर किल्ला घ्यावयास निघाला, तेव्हां त्या वाटेवर लहानसा चाकणचा किल्ला होता, तो पाहून त्यास असें वाटलें कीं, 'हा लहान किल्ला आहे व माझें एवढें मोठें सैन्य आहे; यास्तव एथचे लोक भिऊन मला किल्ला देतील.'

परंतु तेथचा किल्लेकरी फिरंगोजी नरसाळे नामें मोठा शूर असे. तो सोळा वर्षें तेथचा अधिकार मुख्यत्वेंकरून करीत होता. तो किल्ला देईना, तेव्हां तो शाइस्तेखान आपल्या सैन्यासुद्धां दोन महिने त्या किल्ल्याशीं लढला, तरी किल्ला मिळाला नाहीं. तेव्हां ईशान्य दिशेचे बुरुजाखालीं सुरंग पाडून तो बुरुज उडविला; तो उडतांच त्या मोगलांनीं मोठा हल्ला करून ते एकाएकीं धांवले; परंतु तो फिरंगोजी व त्याचे लोक मोठे पराक्रमी, त्यांनीं त्या मोडक्या बुरुजाचे शिखरावर चढून कितीएक वेळां त्या मोगलांस मागें हटविलें. याप्रमाणें दिवस मावळे तोंपर्यंत युद्ध झालें. नंतर रात्रीस ते मोगल लोक लढेनातसे झाले, तेव्हां किल्लेकरी सहजच उगे राहिले. मग दुसरे दिवशीं फिरंगोजीनें आपल्या संतोषानें किल्ला दिला. असें त्याचें शौर्य पाहून शाइस्तेखानानें त्यास, आपल्या चाकरीस राहावयासाठीं, फार आग्रह केला; परंतु तो राहीना, यास्तव त्याचा मोठा सन्मान करून त्याला जाऊं दिलें. तो जाऊन शिवाजीला मिळाला. तेथेंही त्याचा फार मान होऊन त्याची योग्यता वाढली.

४. त्या शाइस्तेखानाला चाकणचा किल्ला घ्यावयास इतके श्रम पडले, त्यावरून त्याचे मनांत आलें कीं, 'डोंगरी किल्ले फार उंच आणि मोठे कठिण, ते आमचे हातीं कसे लागतील?' ह्मणून त्यानें औरंगजेबास तें लिहून पाठविलें. परंतु त्यावरून त्याला तें काम मोठें कठिणसें वाटलें नाहीं. कां कीं, तो मराठे लोकांस केवळ अप्रयोजक मानीत असे; तथापि त्यानें जोधपुरचा राजा जसवंतसिंग रजपूत यास शाइस्तेखानाचे कुमकेस सैन्यासुद्धां पाठविलें. तो येऊन पोंहचे तोंपर्यंत खानाचें लष्कर पुण्याजवळ उगेंच पडलें होतें. इतक्यांत नेताजी पालकरानें औरंगाबादेजवळचा व अहमदनगराचे भोंवतालचा मुलूख मातक्यान् लुटून जाळून ओस पाडला; परंतु त्याला पहिल्याप्रमाणें मोकळेपणानें दंगा करावयास फावलें नाहीं. कां कीं, मोगलांनीं त्यास पिटून लाविलें, तेव्हां त्याचे कितीएक स्वार पडले आणि त्यालाही जखमा लागल्या. तें मोगलांचें लष्कर जेव्हां समीप आलें तेव्हां शिवाजी राजगड सोडून सिंहगडास गेला; तेथें त्याला असें वर्तमान कळलें कीं, शाइस्तेखान, पुण्यामध्यें जी हवेली दादाजी कोंडदेवानें जिजाबाईस राहावयाकरितां बांधली आहे, तींत राहिला. तेव्हां तो त्याला धरून न्यावयाची मसलत करूं लागला. तो शाइस्तेखानही, शिवाजी एथून जवळ आहे, त्यास तो कोणे वेळेस घात करील न कळे, असा संशय धरून पुण्यामध्यें परवानगीखेरीज कोणे मराठ्यास येऊं देत नसे. मग कांहीं सिद्धता करून सन १६६३ चे एप्रिल महिन्यांत शिवाजी, पंचवीस मावळे लोक बरोबर घेऊन मोठ्या युक्तीनें, पुण्यांत कोणे एका मराठ्याचें लग्न होत होतें त्याचे सोयऱ्यांत मिसळून, शहरांत शिरला. नंतर तो रात्रीस हळूच जाऊन त्या हवेलीचे

माडीवर एक स्वयंपाकघर होतें त्याची एक खिडकी फोडून आंत गेला. तो फोडितांना त्या शाइस्तेखानाच्या बायकांनीं ऐकिलें, आणि शाइस्तेखानास कळविलें. तें ऐकतांच तो शाइस्तेखान दुसऱ्या एका खिडकीला दोर लावून त्या दोरावरून उतरूं लागला. इतक्यांत शिवाजीनें तेथें जाऊन त्यास तरवारेचा वार केला, तेणेंकरून त्याचें एक बोट मात्र तुटलें, आणि तो वांचला गेला. मग त्याचा पुत्र अबदुल फत्तेखान व त्याचे जवळचे कोणी शिपाई होते ते शिवाजीनें जिवें मारून टाकिले. तो असा नाश करून त्या मावळे लोकांसहित तेथून निघाला. त्यानें वाटेंत कितीएक शिपाई लोक ठेविले होते ते त्यास जाऊन मिळाले. मग ते लोक पुण्यापासून दोन कोसांवर जाऊन आपणांस मोगलांचें भय नाहीं असें लोकांस कळवावयाकरितां चुडी पेटवून सिंहगडावर गेले. मग दुसरे दिवशीं सकाळीं ते मोगलांचे स्वार तरवार चमकावीत आणि नगारा वाजवीत त्या किल्ल्याजवळ आले; त्यांस अगदीं जवळ येऊं दिलें, मग एकाएकीं किल्ल्यावरून तोफांचा भडिमार करून त्यांना फार घाबरें करून माघारें हटविलें. त्यांत एक कार्टोजी गुजर नामें शिवाजीचा सरदार होता त्यानें फारच पाठ घेतली, आणि त्यांस दूर पिटून घालविलें.

५. याशिवाय आणखी कितीएक वेळां पराभव झाले. तेणेंकरून तो शाइस्तेखान उदासचित्त होऊन त्यानें केवळ अप्रयोजकपणें औरंगजेबास पत्र पाठविलें कीं, 'जसवंतसिंग फितुरी झाला, व लष्करी लोकांची वर्तणूक बिघडली.' त्या वेळेस तो काश्मीरास जाण्याची सिद्धता करीत होता. खानाचा पराभव झाला आणि जसवंतसिंगाशीं व त्याशीं वैमनस्य पडलें असें औरंगजेबास समजलें, तेव्हां तो दिल्लींत होता. त्यानें सुलतान मुआझिम नामें मुसलमान होता त्यास दक्षिणेचा सुभेदार करून तिकडे पाठविलें, व त्याचे हाताखालीं जसवंतसिंगानें वागावें असें केलें; आणि शाइस्तेखानास बंगाल्याची सुभेदारी सांगितली. त्यानंतर जसवंतसिंगानें सिंहगडास घेरा घालावयाचा थोडासा उद्योग केला, परंतु तो शेवटास गेला नाहीं. मग ते मोगल लोक कांहीं मोठीं मोठीं पतकें चाकणेस व जुन्नरास ठेवून सारें लष्कर घेऊन औरंगाबादेस गेले.

६. त्यापुढें शिवाजीनें कल्याणजवळ व दंडाराजपुरीपाशीं लष्करें जमा करून बाह्यात्कारें असें दाखविलें कीं, 'मी पोर्तुगीस लोकांचा वसई किल्ला व चऊल घेणार.' परंतु त्याच्या मनांत सुरत लुटावयाची होती. ते समयीं तेथें बहुत संपत्ति होती. त्या शोधास त्यानें बहिरजी नाईक नामें एक जासूद पाठविला होता, तो सर्व मराठे लोकांत प्रसिद्ध होता. याप्रमाणें तयारी करून शिवाजी निघाला, तो उत्तरेकडे जाऊं लागला, ते समयीं त्यानें लोकांत असें दाखविलें कीं, 'आपण देवदर्श-

र्थ नाशिकास जातों'; त्यावरून लोक कल्पना करूं लागले कीं, तो उगाच देव-दर्शनार्थ जातो आहे; इतक्यांत एकाएकीं चार हजार स्वारांसहित तो सुरतेस जाऊन दाखल झाला. तेथें कांहीं मोठीशी अडचण न भोगितां त्यानें सहा दिवसपर्यंत मनास येईल तसें तें शहर लुटून सावकाशपणें तें द्रव्य नेऊन रायगडीं ठेविलें. ते वेळेस ती नवीन राजधानी झाली होती. तेव्हां सुरतेंत कितीएक मोठीं मोठीं भांडारें इंग्रेजलोकांचीं व डचलोकांचीं होतीं. तेथें जे लोक होते त्यांनीं युद्ध करून तें द्रव्य रक्षिलें, त्याबरोबर आणिकही जवळचे जवळचे लोकांचीं द्रव्यें राखलीं गेलीं; नाहीं तर त्यास अतिशयित धन सांपडलें असतें. तो शिवाजी सुरतेस दाखल झाला हें वर्तमान सन १६६४ चे जानेवारी महिन्याचे ५ वे तारिखेस घडलें.

७. शिवाजी जेव्हां सुरतेहून माघारां रायगडास गेला, तेव्हां त्याला वर्तमान कळलें कीं, शाहाजी तुंगभद्रेचे कांठीं बिदनुराजवळ बसवपट्टण नामें गांव आहे, तेथें शिकारीस गेला असतां दैवगतीनें घोड्यावरून पडून मृत्यु पावला.

८. त्यानंतर शिवाजी आपल्या बापाची क्रिया होई तोंपर्यंत सिंहगडास होता; मग रायगडास जाऊन आपल्या राज्याचा बंदोबस्त करीत कांहीं महिने तेथें राहिला. तो बंदोबस्त झाल्यावर आपल्या नांवास 'राजा' असें पद जोडून आपल्या नांवाचा शिक्का चालवूं लागला. तेच समयीं त्या शिवाजीनें आणखी कांहीं कृत्य केलें, तें असें; सन १६६४ च्या आगस्ट महिन्यांत अहमदनगरची पेंठ लुटून औरंगाबादेचे सभोंवतालचे मुलखांतही धामधूम केली. त्या वेळेस विजापुरकरांचे दोघे सरदार फौजेसहित पन्हाळ्याजवळ राहिले होते, त्यांनीं शिवाजी फार दूर गेला असें पाहून कोंकणपट्टी,—जी पूर्वीची त्यांची होती—ती घ्यावयाविषयीं भगीरथ प्रयत्न केला. तेव्हां त्यांच्या हातीं कांहीं कांहीं स्थळें लागलीं; तों अकस्मात् शिवाजी मोठें सैन्य घेऊन आला आणि मोठी लढाई करून त्यानें त्यांचा पराभव केला. शिवाजीचें युद्धादिप्रसंगीं जेथें जेथें प्रयोजन लागे, तेथें तेथें तो अकस्मात् प्रकट होई; यास्तव त्या वेळचे लोकांत जर कोणास असें भासलें असेल कीं शिवाजीला एक शरीर नाहीं, बहुत आहेत, तर तें आश्चर्य नव्हे. कां कीं, असाच त्या शिवाजीचा चपळपणा व सावधपणा होता.

९. शिवाजीच्या लढाऊ गलबतांनीं कितीएक दुसरीं गलबतें जिंकून बहुत द्रव्य जमा केलें होतें, आणि मोगल लोकांच्या जहाजांवर बसून मक्केस जाणारे कितीएक द्रव्यवंत यात्रेकरू यांस लुटून बंदींत ठेवून त्यांपासून फार पैका घेऊन सोडून दिलें होतें.

१०. पुढें सन १६६५ चे जानेवारी महिन्यांत शिवाजीला असें समजलें कीं,

मोगलांनीं आपलें जें लष्कर जुन्नराजवळ ठेविलें होतें तें वाढविलें. ह्मणून तें आपणास बाधक आहे कीं काय, या शोधासाठीं तो सिंहगडास जाऊन राहिला. मग तें लष्कर आपणास बाधक नाहीं असें जाणून तो दुसऱ्या कांहीं कार्याविषयीं उद्युक्त झाला. तो असा कीं, मोगलांस जिंकावयास जातों असें दाखवून एकाएकीं फौजेसहित कोंकणांत जाऊन मालवणापाशीं ती फौज जहाजांवर चढवून गोंव्याचे दक्षिणेस साठ सत्तर कोसांवर बहुत द्रव्यानें भरलेलें बारसिलोर नामें शहर होतें, तेथें जाऊन तें शहर लुटून पुष्कळ द्रव्य घेऊन चार हजार फौजेसहित गोकर्णमहाबळेश्वरीं उतरला. तेथून बहुतेक जहाजें परतविलीं आणि आपण फौजेसहित त्या देवाचे दर्शनास गेला. मग त्या फौजेच्या लहान लहान टोळ्या करून मुलखांत गांवें लुटावयास पाठविल्या. त्या मुलखीं पेंठांचे गांव बहुतेक होते ते लुटून त्यानें फार द्रव्य आणिलें. मग पायवाटेनें आपलें लष्कर पाठवून आपण जहाजावर बसून माघारां रायगडास चालिला. तेव्हां त्या जळमार्गांत मोठा वारा येऊन तें गलबत दक्षिणेस हटलें; तें कितीएक दिवस कडेस लागलेंच नाहीं. ह्मणून तो फार दुःख पावून असें समजला कीं, 'ही माझी जळमार्गाची पहिलीच खेप. यांत मला भवानी अनुकूळ नाहीं. तिच्या क्रोधेंकरूनच मी एवढ्या संकटांत पडलों.'

११. त्यापुढें त्या शिवाजीवर समुद्रांतल्या संकटापेक्षां एक मोठें विघ्न आलें होतें. तें असें; एक मिर्झा राजा जयसिंग नामें रजपूत व दुसरा दिलेरखान नामें अफगाण, हे दोघे औरंगजेबानें मोठी फौज देऊन शिवाजीला जिंकावयास पाठविले. जर कोणी ह्मणेल कीं, 'त्याचे इतके अन्याय होईत तोंपर्यंत औरंगजेबानें कां उपेक्षा केली? पारिपत्य कां केलें नाहीं?' तर त्यानें असें समजावें कीं, तो औरंगजेब आपण कृत्रिमानें तक्ताधिपति झालेला, यास्तव त्याला आपलाच बंदोबस्त राखणें अवघड पडलें होतें. त्या वेळेस औरंगजेबानें पारसी लोकांचे बादशाहाशीं कांहीं बोलणें लाविलें होतें, तेंही एक निमित्त पारिपत्य न होण्यास झालें. तो औरंगजेब असें मानी कीं, 'आपण जेव्हां मनावर घेऊं तेव्हां सगळी दक्षिण एकदांच घेऊं.' तो ह्मणे कीं, 'शिवाजी आह्मांस डोंगरांतील उंदरासारिखा आहे, त्याला धरावयास व मारावयास कांहीं अवघड नाहीं.' शिवाजीनें आपणास 'राजा' ह्मणविलें, सुरत लुटली, व असे कितीएक दुसरे अन्याय केले; तथापि ते औरंगजेबास मोठेसे वाटले नाहींत. परंतु त्यानें मक्केस जाणारे यात्रेकरू लोक लुटले, त्यावरून तो फारच क्रोधाविष्ट झाला. कां कीं, त्यानें केवळ धार्मिकपणाचें व साधुपणाचें सोंग केलें होतें. ह्मणून त्याला शिवाजीच्या पारिपत्यास आवश्यक उद्योग करणें भाग पडलें.

१२. जे दोघे सरदार बरोबर फौज देऊन दक्षिणेंत शिवाजीवर नेमिले होते,

ते मोगलांत मोठे प्रबळ असत. त्यांनीं पूर्वीं औरंगजेबाची अवज्ञा केली होती. यास्तव त्यांस दूरचे चाकरीवर नेमिलें, आणि त्या कामास पुरेसें सैन्यही दिलें नव्हतें. त्याचा मनोदय त्यांस वाढवावयाचा नव्हता. त्याची मसलत अशी असेलसें वाटतें कीं, दक्षिणेचें राज्य समयास आपल्या हातीं लागेल असें ठेवावें. पुढें औरंगजेबाचे ते दोघे सरदार लष्कर घेऊन निघाले, तेव्हां मिर्झा राजा जयसिंग याचा पुत्र रामसिंग नामें होता तो औरंगजेबानें आपलेजवळ ठेवून घेतला. त्यास बाह्यात्कारें तर स्नेहानें ठेविलें, परंतु मनांत असें होतें कीं, त्याचे बापापासून कांहीं आपणास अपाय न व्हावा.

१३. ज्या समयीं शिवाजी जहाजावर चढला असतां गोंव्याचे दक्षिणेस जाऊं लागला, ते समयीं ते औरंगजेबाचे दोघे सरदार लष्करासहित नर्मदेस येऊन पोंचले. तें वर्तमान शिवाजीला कळलें नाहीं. मग तो जेव्हां सुरक्षित माघारां रायगडास आला, तेव्हां त्यास समजलें कीं, त्या दोघां सरदारांनीं पुण्यास येऊन पुरंधर किल्ला आणि सिंहगड यांस घेरा घातला; आणि त्यांचे कितीएक लोक रायगडासही येऊन पोहोंचले. तो राजा जयसिंग मोठा विख्यात आणि त्याजवळ फौज पुष्कळ; तो अकस्मात् आल्यानें शिवाजी फार भ्याला, आणि कांहीं मसलत करावयाकरितां त्यानें आपले मोठे मोठे मानकरी लोक रायगडास बोलाविले; तेही भय पावले म्हणून एकचित्तें मसलत होईना. मग लोकांमध्यें वर्तमान असें उठलें कीं, भवानी शिवाजीचे स्वप्नांत येऊन बोलली कीं, 'हा जयसिंग हिंदूंचा राजा आहे, यापुढें तुमचें कांहीं चालावयाचें नाहीं.' मग तर कोणीच धैर्य करून एकचित्त होईनात. असे ते रायगडचे दरबारी लोक भयभीत झाले; परंतु पुरंधरकर किमपि भ्याले नाहींत. ते मोठ्या धैर्यानें लढत होते. त्यांत मुख्य किल्लेकरी महाडचा देशपांड्या बाजी परभू[1] नामें होता. त्याजवळ मावळे लोक व हेटकरी लोक होते, त्यांनीं फार दिवस किल्ला रक्षिला; शेवटीं दिलेरखान किल्ल्याचे माचीच्या बुरजाखालीं सुरंग पाडूं लागला असतां कितीएक वेळां त्या हेटकऱ्यांनीं व मावळ्यांनीं किल्ल्याबाहेर येऊन त्यावर छापा घातला, तथापि त्या सुरंग फोडणारांनीं आपला मनोदय सिद्धीस नेला. तेव्हां त्या किल्ल्याची माची त्यांचे हातीं लागली आणि ते किल्ल्यावर जाऊं लागले; तेव्हां त्या दिलेरखानाचे लोकांस असें वाटलें कीं, किल्ला हस्तगत झाला; त्यावरून आपला सावधपणा टाकून ते निर्भयपणें लुटूं लागले. तेव्हां त्या हेटकरी लोकांनीं वरून गोळ्यांचा भडिमार असा केला कीं, त्या लोकांस आपले जिवाचे

---

१. हा बाजी परभू ज्यानें पूर्वीं शिवाजीस पन्हाळ्यावर रक्षिलें तो नव्हे व त्याचा कोणी संबंधीही नव्हे. हा दुसराच.

रक्षणार्थ कोठें तरी आश्रय पाहावा लागला. त्याच वेळेस मावळे लोकांचा सरदार सारे मावळे लोक जमा करून हातीं तरवारा घेऊन त्यांवर एकदांच पडला; तेव्हां मोगलांचे जे लोक उभे राहून लढले ते मारले गेले, वरकड पळाले. दिलेरखान किल्याखालीं हत्तीवर बसून आपल्या लोकांचें चातुर्य पाहात होता. त्यानें आपल्या मोगल लोकांचा पराभव झाला असें पाहून आपले जवळचे पठाणांचे टोळीस बोलावून त्या पळालेल्या लोकांस धीर देऊन आपले हातचे धनुष्याचा टणत्कार करीत ते सारे लोक आपले हत्तीपुढें चालविले; तेव्हां ते जय पावलेले मावळे लोक मोठ्या धैर्यानें असे लढले कीं, त्या पठाणांतलेही कितीएक शूर मागें हटूं लागले. त्या समयीं दिलेरखान यानें आपले हत्तीवरून मावळे लोकांचा सरदार मोठा पराक्रमी असें पाहून त्याला तीर मारिला, तेणेंकरून तो तत्काळ मृत्यु पावला, मग ते सारे मावळे लोक पाठ दाखवून माघारें बालेकिल्यावर पळून गेले. नंतर मोगल लोक फिरून माचीवर चढले; परंतु त्यांनीं पुनः वरून गोळ्यांचा मार केला, तेव्हां ते मातक्यान् माघारे हटले. ते समयीं दिलेरखान असें समजला कीं, 'या किल्याचे उत्तरेकडून लढाई करणें ठीक नाहीं.' मग त्या किल्याचे ईशान्य दिशेकडे वेगळा लहानसा वज्रगड नामें किल्ला आहे, त्याला शिड्या लावून वर चढून तेथून बालेकिल्यावर तोफांचा मार चालविला. तो कितीएक दिवसपर्यंत तसाच चालला होता, परंतु त्या किल्याचा फारसा नाश झाला नाहीं; आणि पावसामुळें मोगल लोकांचा उपाय चालेना. असें असतांही पुरंधरकरांनीं निराश होऊन शिवाजीला पत्र पाठविलें कीं, 'आतां आमचा उपाय नाहीं, आह्मी किल्ला शत्रूस देतों.' तेव्हां शिवाजीचें उत्तर आलें कीं, 'तूर्त देऊं नये.' त्यावरून किल्ला त्यांनीं तसाच रक्षिला.

१४. जेव्हां जयसिंग शिवाजीचे मुलखांत आला, तेव्हांपासूनच शिवाजीनें त्याशीं सल्याचें बोलणें लाविलें होतें; व जयसिंगही तेव्हांपासून त्यानें पूर्वीं केलेलीं कृत्रिमें जाणून आपले बंदोबस्तांत किमपि उणें पडूं देत नव्हता. तें पाहून शिवाजीनें मोगलांशीं चाकरीचा करार केला होता त्याप्रमाणें तो सरळ भावानें चालूं लागला. तो सन १६६५ चे जुलै महिन्यांत थोडके लोक बरोबर घेऊन जयसिंगाचे लष्करांत पोहोंचला. त्यानें त्याचा सन्मान करून त्यास आपले उजव्या बाजूस बसविलें. मग दुसरे दिवशीं शिवाजी पुरंधरास दिलेरखानाचे भेटीस गेला, तेव्हां जयसिंगानें शिवाजीशीं मसलत करण्याचा विचार खानास न पुसतां केला, ह्मणून त्याचे मनांत राग होता, यास्तव त्यानें शिवाजीला असें सांगितलें कीं, 'आह्मी किल्ला बलात्कारेंकरून घेऊं, आणि तेथच्या लोकांस मारून टाकूं.' ते समयीं शिवाजीनें

त्याशीं आर्जवाच्या गोष्टी बोलून किल्ल्याची किल्ली त्याचे स्वाधीन केली. तेव्हां असें ठरलें कीं, मोगलांचे जितके मुलूख शिवाजीकडे होते ते सारे द्यावे, आणि निझामशाही मुलखांतले बत्तीस किल्ले शिवाजीकडे होते, त्यांतले वीस मोगलांस द्यावे, त्यांत पुरंधर व सिंहगड असावे. बाकीचे बारा उरले ते शिवाजीनें दिल्लीच्या बादशाहापासून चाकरीकरितां जहागीर करून घ्यावे. त्याखेरीज शिवाजीचा पुत्र संभाजी आठां वर्षांचा होता, त्यास पांच हजार स्वारांची मनसब द्यावी असें ठरलें. ते वेळेस जो मुलूख शिवाजीकडे होता, त्याचा वसुल सुमारें एक लक्ष होन येत. तो जयसिंगाच्या आश्रयानें मोगलांचे लष्करांत फिरत असे. अशा प्रकारें तो अनर्थ शांत झाला. याशिवाय शिवाजीनें औरंगजेबास विनंतिपत्र लिहिलें कीं, 'विजापुरचे बादशाहाकडे जो मुलूख आहे, त्यांत मला चौथपैकीं चौथाई आणि सरदेशमुखीचा दहावा अंश द्यावा.' हीं दोन्हीं मिळून उत्पन्न सुमारें पांच लक्ष होन होतें. याप्रमाणें शिवाजीनें औरंगजेबापासून मागून घेऊन त्याला वर्षास तीन लक्ष होन स्वामित्व द्यावें; असा चाळीस लक्षपर्यंत भरणा होई तों देत असावें, असें कबूल केलें. त्या वेळेस औरंगजेबाचे मनांत होतें कीं, विजापुरचें राज्य बुडवावें, ह्मणून त्यानें तें मान्य करून लिहिलें कीं, 'एक हप्ता आतांच द्यावा. व विजापुरकरांचा मुलूख घेण्याविषयीं राजा जयसिंग यास फौजेसहित साहाय्य व्हावें.' याशिवाय शिवाजीनें जयसिंगाशीं ठरविलें तेंही मान्य केलें. मग शिवाजी आपले पहिले कराराप्रमाणें दोन हजार स्वार आणि आठ हजार पायदळ बरोबर घेऊन जयसिंगास कुमक करीत होता. त्यानें प्रथम फलटण घेतलें, व त्याचे मावळे लोक यांनीं ताथवडा किल्ला शिडी लावून घेतला.

१५. इकडे विजापूरकर अली अदिलशाह यानें आपले सेनेची सिद्धता करून मोगलांनीं आपले विजापुरीं न यावें ह्मणून फार फार बोलणें केलें; आणि पूर्वीचें राहिलेलें जें स्वामित्वसंबंधीं देणें तेंही तक्ताधिपतींला द्यावयास तो सिद्ध झाला; परंतु जयसिंग ऐकेना. तो मध्यें न खोळंबतां मंगळवेढ्यापर्यंत पोंचला. तेथें विजापूरकरांचे स्वार आले, त्यांची व यांची गांठ पडतांच ते मोठ्या शौर्येंकरून लढले. त्यांत अबदुल महंमद, विजापुरचा प्रधान, मुख्य सरदार होता, त्याचे आज्ञेंत तें लष्कर वागत असे. याखेरीज जे दुसरे सरदार होते, त्यांचीं नांवें:—अबदुल करीम, बहलोलखान, खवासखान, व सिद्दी अझीझ नामें सिद्दी जोहराचा पुत्र, व व्यंकोजी राजे भोंसले या नामें शिवाजीचा सावत्र भाऊ होता तो, व रत्ताजी माने ह्मसवडचा देशमुख; या दोघांनीं विजापूरकरांचे फौजेंत मराठे स्वारांचें आधिपत्य

स्वीकारिलें. त्यांनीं व त्यांजवळचे मराठे लोकांनीं त्या लढाईंत मोठीं शर्थ केली. शिवाजी व त्याचा सरदार नेताजी पालकर या दोघांनीं मोगलांचा पक्ष स्वीकारल्यावर ते आपले पराक्रमेंकरून मोठे विख्यात झाले. त्यांची कीर्ति औरंगजेबापाशीं गेली, ती ऐकून तो प्रसन्न झाला, आणि त्यानें शिवाजीला बहुमानाचीं वस्त्रें पाठविलीं; याखेरीज ज्यामध्यें शिवाजीची बहुतप्रकारें स्तुति असें एक पत्र पाठविलें.

१६. मग कांहीं दिवसांनीं दुसरें एक पत्र पाठविलें, त्यांत असें लिहिलें कीं, 'तुह्मीं येऊन भेटावें ह्मणजे तुमचा मोठा सन्मान होईल; आणि तुह्मांला ज्या वेळस दक्षिणेस जावयाचें असेल त्या वेळेस कांहीं अडचण पडणार नाहीं.' असा त्या पत्राचा मजकूर व जयसिंगाची मसलत, यावरून शिवाजीचा निश्चय झाला कीं, दिल्लीस जावें. तेव्हां त्यानें आपले सारे मानकरी लोक यांस सांगून पाठविलें कीं, 'सर्वांनीं रायगडीं येऊन हजर व्हावें.' मग ते सारे येऊन हजर होत तावत्काळपर्यंत त्यानें आपल्या अवघ्या किल्ल्यांचा बंदोबस्त आपण जाऊन केला. नंतर रायगडीं येऊन त्यानें सर्व मानकरी यांचे समक्ष मोरो त्रिमळ पिंगळे व आबाजी सोनदेव व अण्णाजी दत्तो, या तिघां जणांस आज्ञा केली कीं, 'मी दिल्लीस जाऊन येईं तोंपर्यंत तुह्मीं मुख्यत्वेंकरून कारभार करावा.' मग तो संभाजी नामें पुत्र यास बरोबर घेऊन सन १६६६ चे मार्च महिन्यांत दिल्लीस जावयाकरितां निघाला. त्याचे बरोबर पांचशें स्वार व एक हजार मावळे लोक होते. मग तो दिल्लीजवळ गेला तेव्हां औरंगजेबानें रामसिंग, राजा जयसिंगाचा पुत्र, व दुसरा एक लहानसा सरदार, असे दोघेच त्याचे भेटीस सामोरे पाठविले; आपण किंवा आपले जवळचा कोणी मोठा माणूस पाठविला नाहीं. हा अपमान शिवाजी मनांत समजला, परंतु त्यानें त्या वेळेस त्याचें सहन केलें. यापुढें शिवाजीनें जेव्हां दरबारांत बादशाहास भेटून नजर दिली, तेव्हां त्यास पांचपांचहजार स्वारांच्या मनसबदारांचे ओळींत बसविलें. तेव्हां शिवाजीला राग आटपेना, यास्तव जे त्या ओळींत लोक बसले होते त्यांशीं आपली खिन्नता समजेसें कांहीं तो बोलिला. तेव्हां त्यांनीं तें बादशाहास कळविलें. त्यावरून दरबारी लोक आपआपले घरीं गेल्यावर शिवाजीकडे बादशाह याचा असा निरोप गेला कीं, 'त्यानें फिरून दरबारीं येऊं नये.' यावरून शिवाजीचे मनांत कांहीं भय उत्पन्न झालें. मग त्यानें औरंगजेबास विनंति केली कीं, 'मीं स्वामीची सेवा कशी केली व आज्ञेप्रमाणें निघून कसा आलों तें सर्व ध्यानांत आणावें; आणि जर माझे चाकरीचें एथें प्रयोजन नसलें तर माझे मुलखीं मला मा-

१. त्या लढाईवरून विजापुरकरानें रुस्ताजी मान्यास कांहीं इनाम मुलुख जहागीर दिला, त्याची सनद अद्यापि त्याचे वंशीयांजवळ आहे.

घारें जावयास आज्ञा द्यावी; मी व माझे बरोबरचे लोक यांस एथचें पाणी मानत नाहीं.' त्यावर औरंगजेबानें कांहीं स्पष्ट उत्तर दिलें नाहीं; आणि शहरचे कोतवालास सांगून ठेविलें कीं, 'शिवाजी ज्या हवेलींत आहे तिजभोंवतीं चौकी बशीव, आणि जर तो कोठें वाड्याबाहेर जाऊं लागला, तर तो आपले हातून सुटून न जाई असा बंदोबस्त राख.' त्यानें त्याप्रमाणें केलें. तेव्हां शिवाजीनें पुनः विनंति केली कीं, 'हा मजवर जुलूम गुदरला; त्यास जे माझे बरोबरचे लोक आहेत त्यांस तरी माघारें जावयास आज्ञा द्यावी.' ही विनंति औरंगजेबानें तत्काळ मानिली, आणि लोकांस जाऊं दिलें. मग शिवाजी पक्का हातीं लागला असें मनांत समजून तो मोठा हर्ष पावला. शिवाजीनें तर आपल्या मसलतीकरितां तसें केलें. त्याचे लोक गेल्यावर तो तेथचे दरबारी मोठे मोठे मानकरी लोक यांचे घरोघर नित्य नित्य जाऊन त्यांस कितीएक पदार्थ भेटी देऊन त्यांशीं स्नेह पाडूं लागला. मग जेव्हां बहुतेक स्नेही झाले तेव्हां आपले शरीरास समाधान नाहीं असें सोंग करून थोडकेच दिवसांत केवळ मरणोन्मुख झाल्यासारिखें दाखविलें. पुढें थोडकेंसें समाधान झालेंसें करून दाखविलें, आणि कितीएक ब्राह्मणांस धर्म केला. नंतर कितीएका वैद्यांस नजरा पाठविल्या; याखेरीज आपले इष्ट यांचे घरोघर व कितीएक देवस्थानीं व ब्राह्मण व फकीर वगैरे कितीएक गरीब लोक यांस मिठाया वगैरे पदार्थ द्यावयाकरितां मोठे मोठे बुरडी पेटारे भरून पाठवूं लागला. असें कितीएक दिवस चालविलें. मग एके दिवशीं आपला पुत्र व आपण असे दोघे दोहों पेटाऱ्यांत निजून माणसांकडून ते पेटारे शहराबाहेर एकीकडे आपले संकेतस्थळीं नेवविले, आणि तेथें बाहेर निघून दोघे एका घोड्यावर बसून पळाले, ते दुसरे दिवशीं मथुरेस जाऊन पोहोंचले. तेथें कोणे एका दक्षिणी ब्राह्मणाचे घरीं पुत्रास ठेवून आपण आपले बरोबरच्या लोकांसहित गोसांव्याचा वेष धरून तीर्थें करीत करीत माघारां दक्षिणेस गेला. तो शिवाजी सन १६६६ चे डिसेंबर महिन्यांत रायगडीं पोहोंचला.

१७. शिवाजी दिल्लीहून माघारां आपल्या मुलखीं रायगडास आला, तेव्हां त्यानें पाहिलें कीं, सर्व गोष्टी आपणास अनुकूळ आहेत. त्या अशा; जयसिंगानें विजापुरास वेढा घातला होता, तो तेथें जय पावला नाहीं. व त्या मोगल लोकांचें काम फार धिमें यास्तव गोवळकोंड्याच्या बादशाहानें आपला एक मोठा सरदार फौजेसहित विजापुरकरांचे साहाय्यास पाठविला. मग तो जयसिंग पुरंधर व सिंहगड इत्यादिक किल्ल्यांतून आपले लोक ठेवून माघारां दिल्लीस गेला. हें वर्तमान सन १६६७ त घडलें. तो जयसिंग गेल्यावर मोरो त्रिमळ पिंगळे यांनीं ते मोगल लोक हांकून दिले; आणि शिवाजी कोंकणांत आल्यावर थोडकेच दिवसांत

कल्याण परगणा बहुतेक हस्तगत केला. औरंगजेब, शिवाजी पळून गेला ह्मणून, फार खिन्न झाला; परंतु आपले मनांत शिवाजीस मोठा सन्मान करून पाठवावयाचा होता असें दाखवून, जयसिंगाचा पुत्र रामसिंग शिवाजीला पळून जाण्यास अनुकूळ होता ह्मणून त्याला दरबार मना केलें; आणि त्याचा बाप जयसिंग पराभव पावला या निमित्तेंकरून त्यास माघारां दिल्लीस बोलाविलें. नंतर त्या कामावर सुलतान मुआझिम नामें दुसरा सरदार नेमिला. तो सुलतान पूर्वीं दक्षिणेस पाठविला असतां जेव्हां जयसिंग नेमिला, तेव्हां त्यास माघारां बोलावून नेलें, तों जयसिंग याचा पराभव झाल्यावर पुनः पाठविलें. तेव्हां जयसिंग दक्षिणेहून माघारां दिल्लीस येत असतां वाटेसच असमाधान होऊन मृत्यु पावला.

---

## भाग सातवा.

### ( इसवी सन १६६७ पासून सन १६६९ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. सुलतान मुआझिम आणि जसवंतसिंग यांच्या स्वभावांचा प्रकार.—२. त्यांचे योगेकरून शिवाजीस बादशाहाकडून कांहीं उपकार घडला.—३. विजापूरकरांशी आणि मोगल लोकांशीं सल्ला झाला.—४. विजापूरकर व गोवळकोंडेकर यांनीं वर्षास शिवाजीला खंडणी द्यावी असा नेम ठरला.—५. गोवें आणि जंजीरा घ्यावयास शिवाजी गेला, परंतु जय पावला नाही.—६. शिवाजी आपल्या मुलखी वसुलाचा व लष्कराचा बंदोबस्त करीत असतां लोक नानाप्रकारच्या अटकळी करीत होते तें.—७. त्यानें नवे कायदे चालविले तो प्रकार.—८. त्याचे जवळ राज्यकारभार चालविणारे कोण कोण कसकसे होते तें प्रकरण.

१. सुलतान मुआझिम नामें सरदार औरंगजेबानें पुनः दक्षिणेचा अधिकारी केला; त्याचे बरोबर दुसरा जसवंतसिंग आला ह्मणून शिवाजी आनंद पावला. कां कीं, दिल्लीमध्यें त्याचें याशीं इष्टत्व पडलें होतें. त्या जसवंतसिंगास लोक थोर, कुलीन, ह्मणत होते; परंतु तो कृपण होता. हा गुण रजपूत लोकांमध्यें बहुधा असतो. तो हिंदु धर्मास फार मानीत असे. औरंगजेबाचा विश्वास त्यावर फारसा नव्हता; कां कीं, तो पूर्वीं त्यास प्रतिकूळ होता. सुलतान महंमद मुआझिम याच्या अंगीं बहुत प्रकारचे उत्तम गुण होते; पण तो मोठा उधळ्या आणि अत्यंत विषयी असे, त्यास कांहीं कार्याविषयीं वश करून घेणें केवळ सुलभ असे. तो बहुधा जसवंतसिंगाचें बोलणें मानीत असे.

२. या दोघांचा स्वभाव पाहून शिवाजी असें समजला कीं, यांना कांहीं द्रव्य दिलें असतां आपलें कार्य सिद्धीस जाईल. ह्मणून त्यानें कांहीं द्रव्य खर्चून सुलतान मुआझिमास विनंति केली कीं, 'दिल्लीचे बादशाहाचे चाकरीविषयीं माझें मन निष्कपट आहे; त्यास तुह्मीं मजविषयीं बादशाहास विनंति करून मजवर पहिल्याप्रमाणें

त्याची कृपा होई असें करावें.' तेव्हां सुलतान मुआझिमानें बादशाहास कांहीं लिहिलें. त्यावरून शिवाजीला 'राजा' असें पद प्राप्त झालें; आणि पुणें व चाकण व सुपें परगणा, हे त्यास मिळाले. त्यांतील पुरंधर व सिंहगड हे औरंगजेबानें आपल्याकडे ठेविले. त्या शिवाजीचा पुत्र संभाजी यास पूर्वी मनसब देऊं केली होती तीही दिली; आणि वऱ्हाडांत एक जहागीर दिली. त्या औरंगजेबाची एवढी कृपा हो-ण्याचें कारण असें दिसतें कीं, शिवाजी कधीं तरी दिल्लीस येईल, मग दगा करावा, असें त्याचे मनांत असेल. कां कीं, त्याचा पहिल्यापासून असा दुष्ट स्वभाव होताच.

३. सन १६६८ मध्यें विजापुरकरांचा वकील आग्रा शहरांत येऊन औरंगजेब आणि अली अदिलशाह विजापूरकर यांशीं तह झाला. इतःपर युद्ध न व्हावें ह्म-णून विजापुरकरानें औरंगजेबास सोलापूर परगणा व किल्ला यांचा वसूल एक लक्ष ऐशीं हजार होन येत होता तो देऊं केला.

४. त्याच वेळेस जसवंतसिंगाचे आश्रयानें शिवाजी विजापूरकरांकडे चौथ व सरदेशमुखी मागूं लागला. तेव्हां त्याचेबद्दल वर्षास तीन लक्ष रुपये गुप्तपणें द्यावयास केले. हें वर्तमान लोकांत प्रसिद्ध होऊं दिलें नाहीं; कां कीं, पूर्वी मुसलमानांनीं हिंदु जिंकिले होते, त्यांस खंडणी देणें ह्मणजे त्या लोकांस केवळ लाजिरवाणें होई. गोवळकोंड्याचा बादशाह तोही अशाच कांहीं निमित्तेंकरून शिवाजीला वर्षास पांच लक्ष रुपये देऊं लागला.

५. त्यानंतर शिवाजीचे मनांत आलें कीं, गोंवें एकाएकीं छापा घालून घ्यावें; परंतु ते पोर्तुगीस लोक त्याची मसलत समजून सावध झाले. मग त्यानें जंजीरा घ्यावयाचा उद्योग केला, तो बहुत युद्ध झालें तरी हातीं लागला नाहीं.

६. शिवाजी दोन वर्षेपर्यंत रिकामा होता, तेव्हां कितीएक लोक कल्पना करूं ला-गले कीं, यानें जो एवढा लौकिक मिळविला आहे तो आतां व्यर्थ जाईल; कां कीं, हा अगदीं रिकामा बसला. शिवाजी तर उगाच राहिला नव्हता, तो आपले रा-ज्याचे व लष्कराचे वर्तणुकीचे कायदे कांहीं नवे नवे करून व कांहीं कांहीं जुने मो-डून चौकशी करीत होता. त्या कायद्यांचा प्रकार लिहिला पाहिजे. कां कीं, त्यापुढें जे मराठे राजे झाले ते त्या कायद्यांप्रमाणें चालत होते. शिवाजीच्या प्राबल्यास मूळ मावळे व हेटकरी लोक. त्यांचे योगेंकरून त्यानें प्रथम मोठे मोठे किल्ले घेऊन मग मुलूख लुटून तें द्रव्य त्या घेतलेल्या किल्ल्यांवर नेऊन ठेविलें. तो कालपर्यंत त्यानें स्वार फारसे बाळगले नव्हते, आणि त्यापूर्वी त्याचा लौकिकही मोठा झाला नव्हता; तो त्यापुढें फारच वाढला. शिवाजीचे मावळे लोक घाटमाथां राहात होते, व हे-

टकरी कोंकणांत राहत असत. ते हत्यारें वगैरे सरंजाम आपला जातीचा बाळगीत असत, आणि दारूगोळा वगैरे सरकारचें मागून घेत. त्यांचीं वस्त्रें एकसारखीं नव्हतीं. बहुधा ते लोक मल्लांसारिखे मांडचोळणे घालून कांचे भिडवीत, आणि डो-कीस पागोटें असे. कितीएक जण आंगरखे घालीत, आणि कितीएक धोत्रें पांघरीत. त्यांचीं हत्यारें तरवार व ढाल व बंदूक याप्रमाणें असत. दहांमध्यें एक तीरकमाण बाळगी; कां कीं, रात्रीस बंदुकेच्या बारानें लोक सावध न व्हावे. ते हेटकरी लोक बंदुकेच्या कामांत मोठे निपुण होते, परंतु त्यांस मावळे लोकांप्रमाणें तरवार घेऊन दुसऱ्याचे आंगाशीं आंग भिडवून युद्ध करितां येत नव्हतें. हेटकरी लोक व मा-वळे लोक यांस जसे मोठे मोठे डोंगराचे कडे चढून जातां येत होतें तसें इतर लो-कांस येत नव्हतें. त्यांमध्यें दहा लोकांस एक 'नाईक', पन्नासांस एक 'हवालदार,' शंभरांस एक 'जुमलेदार,' हजारांस एक 'हजारी' नामें सरदार, असे. त्याहून मोठा 'पांचहजारी' असे, त्यापेक्षां 'सरनोबत' नामें मुख्य असे. त्याचे स्वारांत दोन भेद होते. एक 'बारगीर,' एक 'शिलेदार;' बारगीर सरकारचे घोड्यांवर बसणारे, आणि शिलेदार आपल्या खासगत घोड्यांवर बसणारे होते. त्यांत बारगीर यांचे समुदा-यांस 'पागा' अशीं नांवें ठेवून युद्धप्रसंगीं शिलेदारांचे वर्तणुकेच्या बंदोबस्तास त्या पागांची नेमणूक करीत असे. मराठे स्वार यांचीं वस्त्रें अशीं; चोळणा व रूदार आं-गरखा व कंबरबंध. त्यांतच तरवार बळकट बांधीत; आणि पागोट्याचे वेढे डोकीवरून हनवटीखालून घेऊन कान सुद्धां झांकून मोठ्या बंदोबस्तानें गुंडाळीत; आणि मिशा मोठमोठ्या राखीत. बहुतकरून त्या लोकांचें हत्यार भाला, त्याविषयीं ते बहुत कु-शल असत; आणि कितीएक ढालतरवारवाले व कितीएक बंदुकवालेही होते. त्यांत पंचविसां स्वारांस एक 'हवालदार' असे; आणि सवाशें स्वारांस एक 'जुमलेदार'; पांचां जुमलेदारांस एक 'सुभेदार'; दर सुभेदारास एक एक कारकून हिशेब लिहिणारा, व एक एक त्या हिशेबाची चौकशी करणारा, असे शिवाजीनें ठेवून दिले होते. ते लि-हिणारे व चौकशी करणारे ब्राह्मण किंवा परभू असत. दहा सुभेदारांस एक मुख्य सरदार, त्याचें नांव 'पांचहजारी' असे. त्याचे जवळ सरकारचा ठेवणाई हिशेबाची चौकशी करणारा 'मुजुमदार' नामें हुद्देदार असे, तो ब्राह्मण, आणि त्याचे हाताखालीं 'अमीन' नामें सरकारचा परभू असे. याखेरीज कितीएक सरदारांजवळ कितीएक सर-कारी कारकून व कितीएक त्या सरदारांचे खासगीचे कारकून असत. याशिवाय सर्व मोठे मोठे सरदार यांजवळ गुप्तरूपेंकरून बाहेरली बातमी कळविणारे जासूद होते. शिवाजी-जवळ एक बहिरजी नाईक नामें जासूद होता, तो बातमीच्या कामांत फार कुशल होता. लोक कल्पना करीत कीं, भवानी येऊन शिवाजीला अत्यंत गुप्त वर्तमान कळविते;

परंतु त्याचें कारण तो बहिरजी जासूद होता. सरनोबत दोन असत, एक स्वारांचा असे आणि एक पायदळाचा असे. जेव्हां शिवाजी फौज ठेवूं लागला तेव्हां कोणा आपल्या जुने चाकरास जामीन घेतल्यावांचून नवा ठेवीत नसे. कोणास कांहीं लूट किंवा शत्रूचा कांहीं जिन्नस सांपडला असतां त्यानें तो जिन्नस सरकारांत नेऊन द्यावा; मग त्याचे योग्यतेप्रमाणें त्यास कांहीं विभाग बक्षीस देऊन त्याची प्रशंसा करावी, अशी चाल होती. शिवाजीनें शत्रूस लुटावयाची मनाई केली नाहीं; परंतु गाई व शेतकरी लोक व बायका यांस उपद्रव करूं नये; आणि मुसलमान लोक व त्यांचे पक्षपाती कोणी द्रव्यवंत हिंदुलोक असतील त्यांस धरून नेऊन पैका घेऊन सोडून द्यावें, असें केलें होतें. शिवाजीचे लष्करांत कोणी बायको बरोबर नेऊं नये. जर कोणीं नेली तर त्याचें डोकें मारावें असा नेम होता. कोणी शिपाई शौर्येंकरून लढत असून जर त्यास वार लागला, तर त्याला तो नांवास चढवून कांहीं बक्षीस देत असे. तो शिवाजी बहुधा कोणास जहागीर देत नसे; कां कीं, आपल्या मुलखांत जहागीरदार फार न वाढावे असें त्याचे मनांत असे. किल्ल्यांत ब्राह्मण व रामोशी व महार व मांग हे शिवबंदीखेरीज असत. त्यांना किल्ल्याचे सभोंवतीं शेतजमीन वतनें करून दिलीं असत; त्यांनीं किल्ल्याची चौकशी राखावी असें होतें. जे ब्राह्मण होते त्यांस 'सबनीस' ह्मणत. त्यांनीं तेथील धान्यादिकांचा बंदोबस्त राखावा; आणि किल्ल्यांत राहावें. इतर जे रामोशी व महार व मांग यांस 'गडकरी' ह्मणत; त्यांनीं बाहेर राहून बाहेरची चौकशी करावी. ते गडकरी किल्ला ह्मणजे केवळ आपली माता असें मानीत असत. प्रतिवर्षीं दसऱ्यास शिवाजी मोठा समारंभ करी, त्या वेळेस आपल्या सर्व लष्कराची हजीरी घेत असे; घोडें व माणूस व हत्यारें यांच्या खुणा लिहीत असे. हजीरी झाल्यावर ते लोक बहुधा स्वारीस निघत असत. प्रतिवर्षीं सरकारांत हिशेबाची चौकशी होऊन कोणाचें देणें राहिलें असल्यास प्रांतांतील वसूल जमा करणारास त्याचा पैका द्यावयास आज्ञा देई; परंतु गांवांस उपद्रव करीत नसे.

७. शिवाजीनें जे वसुलाचे कायदे केले होते, त्यांस मूळ दादाजी कोंडदेवानें जो नेम ठरविला होता तें. तो दरवर्षास पिकाची पाहणी करून वसूल ठरवीत असे. असें वाटतें कीं, जमिनीचें उत्पन्न असेल त्यांतील तीन भाग रयतेस राखून दोन भाग सरकारानें घ्यावे असें होतें. नवा मुलुख शिवाजीचे हातीं लागला असतां लष्कर वगैरेसंबंधीं खर्च घ्यावयाची चाल असल्यास ती मोडी, आणि मखत्यानें वसूल घेण्याचा शिरस्ता आढळला असतां तोही मना करी. त्याचे मुलखीं सर्व देशमुख व देशपांडे यांनीं आपला हक्क जो घेणें तो त्यांनीं सरकारची आज्ञा झाल्यावांचून घेऊं नये.

असें होतें. शिवाजीचे कितीएक मानकरी लोक मसलत करीत कीं, लष्करास खर्चाची नेमणूक परभारें गांवगन्ना करावी, परंतु तें शिवाजीच्या मनास येईना; कां कीं, ते लोक स्वयें सत्ता करूं लागतील आणि रयतेस उपद्रव होईल हें तो जाणत असे. त्या शिवाजीनें विजापूरचे मुलखांत अशी अवस्था पाहिली होती; याच कारणावरून तो, आपली फौज ठेवावयास योग्य नाहीं असा किल्ला अथवा भुईकोट पाहिला असतां, ह्मणून टाकी. त्यानें घेतलेल्या नव्या मुलखीं जें जें देवस्थानांकडे पूर्वीं कोणीं दिलेलें तें तें तसतसें चालविलें. शिवाजीनें वसुलाचे कायदे फार सवघड केले ह्मणून मराठे लोक त्याची प्रशंसा करीत, आणि या योगेंकरून प्रजेस सुख होतें असें ह्मणत; परंतु त्याचें तें कृत्य एवढें वर्णनीय नव्हतें. कां कीं, तो स्वयें पाहाणी करावयास रिकामा नव्हता, त्यामुळें त्याचे कायदे चांगले असले तरी लोकांस सुख होणें दुर्लभ असे. त्या वेळेचा एक मुसलमान बखर लिहिणारा होता, आणि एक इंग्रेज मुलुख पाहावयाकरितां गेला होता; त्या दोघांच्या लेखांवरून असें वाटतें कीं, दुसऱ्या मुलुखांपेक्षां शिवाजीचे मुलखीं प्रजा बेजार होती; आणखी त्या मुसलमानाचे लिहिण्यांत असें कीं, शिवाजी मोठा नाशकर्ता. शिवाजीच्या हातीं जे विजापूरचे मुलुख लागले होते त्यांतील पहिली मखत्याची चाल मोडून प्रतिवर्षीं पाहाणी करून वसूल घेत असे, त्यामुळें तेथचे प्रजेस मात्र हितावह पडलें असेल. शिवाजीच्या राज्यांत जमीनसंबंधें किंवा द्रव्यसंबंधें फिर्यादीची पंचाईत चौघां शाहाण्यांचे विचारें करीत, इतर न्याय बहुधा शास्त्ररीति पाहून करीत; आणि पूर्वीं मुसलमानांनीं आपले कुराणांतली जी रीति लाविली होती तीही थोडीशी घेऊन मनसोबी करीत. या दिवसांत हिंदूंच्या शास्त्रास आणि मराठे लोकांच्या रीतीस अंतर दिसतें याचें कारण हेंच असेल.

८. शिवाजीनें आपला राज्यकारभार चालवावयाकरितां आठ प्रधान नेमले होते. त्यांचीं नांवें आणि कामें यांचा तपशील असा; पहिला प्रधान 'पेशवा,' तो सर्वांमध्यें श्रेष्ठ, त्यानें सर्व चौकशी करावी. दुसरा 'मुजुमदार,' त्यानें सर्व जमाबंदी करून खर्चाची चौकशी करावी. तिसरा 'सुरनीस,' त्यानें दप्तराचें रक्षण करावें, आणि स्मरणार्थ सर्व सनदांच्या वगैरे नकला सरकारचे दप्तरीं लिहाव्या. चवथा 'वांकनीस,' त्यानें खासगी शिबंदी व खासगी दप्तर यांचा सर्व बंदोबस्त राखावा. पांचवा 'सरनोबत,' तो लष्करांत मुख्य, त्यानें मुख्यपणानें लष्कराचा बंदोबस्त राखावा. सहावा 'डबीर,' त्यानें परराज्याची चौकशी करीत असावें, आणि परकी राजांशीं बोलण्याचें कांहीं काम पडलें असतां तें त्यानें करावें; व कोणी बाहेरचा वकील आला तर त्याशींही बोलणें त्यानेंच करावें. सातवा 'न्यायाधीश,' तो न्याय करणारा. आठवा

'न्यायशास्त्री,' त्यानें शास्त्रार्थसंबंधीं कामें करावीं. शिवाजीचे वेळीं हे आठ प्रधान कोण कोण होते त्यांचीं नांवें:—

पेशवे–मोरो त्रिमळ पिंगळे.

मुजुमदार–आबाजी सोनदेव, कल्याणी परगण्याचा सुभेदार.

सुरनीस–अण्णाजी दत्तो.

वांकनीस–दत्ताजीपंत.

सरनोबत दोघे,–एक स्वारांचा प्रतापराव गुजर, दुसरा पायदळाचा येसाजी कंक.

डबीर–सोमनाथपंत.

न्यायाधीश दोघे,–एक निराजी रावजी, दुसरा गोमाजी नाईक.

न्यायशास्त्री–शंभु पाध्ये पहिल्यानें, आणि त्यांचे पाठीमागून रघुनाथपंत.

या अष्टप्रधानांतले न्यायाधीश व न्यायशास्त्री या दोघांवांचून वरकडांस शिवाजीच्या लष्करांत अधिकार होते, त्यामुळें त्यांस बहुधा आपआपले प्रधानकीचे अधिकार संभाळावयास फावत नव्हतें; यास्तव ते आपआपला एकेक कारकून ठेवून कामें चालवीत होते; त्यांत ज्याला मोर्तब ठोकावयाची आज्ञा होती, त्याला 'मुतालिक' ह्मणत. त्यांचीं व्यवहारी नांवें अशीं—'कारभारी,' 'मुजुमदार,' 'फडनीस,' 'सबनीस,' 'कारखाननीस,' 'चिटणीस,' 'जामदार,' 'पोतनीस.' त्यांत फडणीस यानें खर्चाची चौकशी करावी; सबनीस यानें दप्तराची चौकशी करावी; कारखाननीस यानें किल्याचे व लष्कराचे उपयोगी अन्नादि सर्व पदार्थांचा बंदोबस्त राखावा; चिटणीस यानें कागदपत्र आले कोठून व कोठें पाठवावयाचे याचा बंदोबस्त राखावा; जामदार यानें नाण्यावांचून सर्व प्रकारचें जवाहीर व अलंकार संभाळावे; पोतनीस यानें पैका संभाळावा. शिवाजी, फडनीस व जामदार व चिटनीस व फारशी कागदपत्र वाचणारा 'फारसनीस,' यांस आपल्याजवळ निरंतर ठेवीत असे. त्यांत बाळाजी आवजी नामें परभू चिटणीस होता, त्याला शिवाजीनें एक वेळ मुंबईस कांहीं कामासाठीं इंग्रेजी सरकारांत पाठविलें होतें, तेव्हां तो साहेबलोकांस मोठा चतुर असा वाटला. फडनीस बाळकृष्णपंत हणमंते, हा शाहाजीच्या मुख्य कारभाऱ्याचा भाऊबंद होता. शेषावा नाईक पुंडे चांभारगोंदेकर, ज्याजवळ शाहाजीच्या लग्नाचे पूर्वीं मालोजी भोंसल्याचा पैका होता, त्याचा नातू, तो शिवाजीचे जवळचा जामदार.

---

## भाग आठवा.

**( इसवी सन १६७० पासून सन १६७६ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )**

१. पूर्वीं लोकांस असें वाटत होतें कीं आतां दक्षिणदेशीं बहुत दिवसपर्यंत उपद्रव होणार नाहीं,

परंतु त्यास अंतर पडलें तो प्रकार.—२. तानाजी मालुसरा यानें सिंहगड घेतला, आणि त्याच वेळेस तो तेथें मृत्यु पावला.—३. आणखी कितीएक किल्ले शिवाजीचे हस्तगत झाले.—४. जंजिरा शिवाजीनें घेतलाच असता, परंतु तिघां सिद्दीमुळें त्याचे हातीं लागला नाहीं, व ते सिद्दी आपला मुलूख मोगलास देऊन त्याचे चाकरीस राहिले तें.—५. शिवाजी सुरत लुटून माघारां गेला त्या वेळेस त्याला धरावयाकरितां मोगल जे गेले ते त्यानें जिंकिले.—६. शिवाजीनें खानदेश लुटला, आणि वसुलाची चौथाई प्रतिवर्षी घेत जावी असें ठरलें, व आंवढा, पटा व सालेरी हे किल्ले घेतले.—७. मोगल लोक शिवाजीस जिकायास आळस किंनिमित्त करीत होते तें.—८. मोगलांच्या राज्यांतून दक्षिण देशाचा कांहीं नवा बंदोबस्त झाला तें, आणि मराठे लोक व मोगल लोक यांचे युद्धांत मराठे जय पावून मोठे विख्यात झाले तें प्रकरण.—९. शिवाजीचें आणि इंग्रेजांचें कांहीं बोलणें झालें तें.—१०. शिवाजीनें गोवळकोंड्यामध्यें स्वारी केली असतां त्याचे पाठीमागें जंजिऱ्याहून आणि सुरतेहून लढाऊ गलबतें येऊन समुद्रतीरचे त्याचे गांव लुटले.—११. विजापूरचा बादशाह अली अदिलशाह याचा मृत्यु.—१२. शिवाजीनें हुबळी शहर लुटलें, आणि विजापूरचे सरकाराशी युद्ध केलें, व परळी वगैरे किल्ले घेतले.—१३. शिवाजी आणि प्रतापराव यांमध्यें कांहीं वैमनस्य पडलें तें.—१४. शिवाजीनें कांहीं क्रोधेंकरून निरोप पाठविला म्हणून तो प्रतापराव विजापूरचे लष्कराशी अविचारानें युद्ध करून मृत्यु पावला ते.—१५. त्या युद्धांत मराठे सरदार कोण कोण होते व त्यांनीं आपले लष्कर वांचवून विजापूरकरांच्या लष्कराचा पराभव केला, आणि शिवाजीनें त्यांचा सन्मान केला.—१६. शिवाजीला राज्याभिषेक झाला, व शिवाजीनें सुवर्णतुळा केली ते.—१७. त्यानें मोगल लोकांशी तह केलेला मोडला.—१८. शिवाजीनें कितीएक नवे किल्ले बांधिले, व त्याचे शरीरीं साताऱ्यामध्यें समाधान नाहीं असें झालें.

१. सन १६७० चे सुमारें असें दिसत होतें कीं, इतःपर दक्षिणेंत बहुत दिवस गडबड होणार नाहीं. कां कीं, विजापूरकर व मोगल यांचा सल्ला झाला, आणि शिवाजीस जें मिळालें आहे तितक्यानेंच तो तृप्त होऊन स्वस्थ राहील, असा एक सुमार होता. असें असतां औरंगजेबास समजलें कीं, आपला पुत्र सुलतान मुआझिम जो दक्षिणेचा मुख्य अधिकारी तो व जसवंतशिंग हे शिवाजीपासून कांहीं पैका घेतात. यावरून शिवाजी कांहीं घात करील, असें समजून त्यानें पुत्रास लिहिलें कीं, 'शिवाजी व त्याचे कितीएक सरदार व मुख्य कारभारी यांस धरून अवश्य कैद करावें.'

२. तेव्हां शिवाजी औरंगजेबाचा दीर्घ द्वेष समजून पुनः पहिल्याप्रमाणें सावधपणानें वागूं लागला. ते समयीं त्याचे मनांत आलें कीं, पहिल्यानें पुरंधर आणि सिंहगड हे दोन्ही किल्ले घ्यावे; कां कीं, पुण्यास आणि चाकणेस आपली येण्याजाण्याची सोय नाहीं. त्या वेळेस सिंहगडचा सरदार उदेबान नामें होता, त्याचे हाताखालीं निवडक रजपूत लोक होते, आणि तो मोठा विख्यात शूर होता; आ-

णखी तो किल्ला फार अवघड; ह्मणून लोक असें समजत कीं, या किल्ल्याचा घेण्याचा उद्योग व्यर्थ आहे. परंतु तो किल्ला घेणें सुलभ होण्याचें कारण हेंच झालें कीं, किल्ला सुदृढ ह्मणून त्या भरंवशावर ते किल्लेकरी फारशी सावधगिरी ठेवीत नव्हते. यावरून शिवाजीनें तानाजी मालुसरा सरदार याशीं मसलत केली कीं, 'छापा घालून किल्ला घ्यावा.' तेव्हां असें ठरलें कीं, तानाजी मालुसरा यानें आपला कनिष्ठ बंधु सूर्याजी व मावळे लोक यांस बरोबर घेऊन त्या कामाला जावें. तो सिंहगड सह्याद्रीच्या पूर्वेचे आंगीं पुरंधर किल्ल्याचे डोंगराचें टोंक लागलें आहे तेथें आहे; त्याचे दक्षिणेस व उत्तरेस सह्याद्रीचा संबंध नाहीं; त्याचा अर्ध अर्ध कोस उंच कडा तुटलेला आहे; त्यास पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे मोठे मोठे पर्वत यांच्या धाकट्या धाकट्या टेंकड्या लागलेल्या आहेत; तो अर्धकोस चढून गेल्यावर केवळ भिंतीप्रमाणें सभोंवता सारखा तीस तीस हातपर्यंत उंच असा काळा दगड आहे; त्यावर चिरेबंदी तट आणि जागोजाग बुरूज आहेत; त्याचे आंत किल्ल्यावरची जागा त्रिकोणाकृति आहे; सभोंवता तटाचा घेर कोस सवाकोस सुमारें आहे; अशा अवघड किल्ल्यांत दरवाज्यावांचून प्रवेश व्हावयाचा नाहींसें दिसतें. त्या किल्ल्यावरून पूर्वेकडे पाहावें तों, तेथें एक लहानसें लवण आहे, त्यांतून निरा नदी चालते. तें ठिकाण पाहून मनास आनंद वाटतो. उत्तरेकडे मोठें मैदान आहे. तिकडे समूर पुणें शहर दिसतें, तें पुणें पूर्वी लहानसें गांव होतें, परंतु त्या स्थानाचा योग असा होता कीं, काळेंकरून ती मोठ्या राजांची राजधानी झाली. त्या सिंहगडचे दक्षिणेस आणि पश्चिमेस दूर मोठे मोठे पर्वत आकाशास लागल्यासारिखे उंच दिसतात; त्या लगत्यासच रायगड आहे. त्या रायगडाहून तानाजी मालुसरा माघ कृष्ण ९ स एक हजार मावळे लोक बरोबर घेऊन चोरवाटेनें रात्रीस सिंहगडाजवळ येऊन पोंहोचतांच त्यानें त्या हजार लोकांचे दोन भाग करून एका भागाचे लोक पुढें चालविले. ते जेथें भिंतीसारिखा काळा दगड तीस तीस हात उंचीचा आहे तेथें जाऊन पोंहोचले, आणि दुसऱ्या भागाचे अंमळसे मागून चालविले, ते कांहींसे मागें राहिले. जे पुढें जाऊन पोंहोचले, त्यांतील कोणीएक शूर आणि चतुर माणूस होता त्यानें असें केलें कीं, आपले कमरेस दोरीची शिडी बांधून वर चढला; मग त्या शिडीवरून एक एक माणूस जातां जातां तीनशें लोक वर चढले आणि लपून राहिले. आणखी लोक चढत होते तों किल्ल्यांत कांहीं तयारीची गडबड होत आहे, असें समजून ते मावळे लोक हळूच सुगावा घेतात तों कोणीएक माणूस आपल्याकडे येतो आहे असें दृष्टीस पडतांच त्याला आपल्या लोकांस कांहीं शब्दादि खुणेनें वर्तमान कळावयास वेळ न सांपडूं देतां त्यांनीं तत्काळ मारिलें. असें अस-

तांही किल्लेकरी अधिक तयारी करीत आहेत असें मावळ्यांस वाटलें, तेव्हां जे जवळ जवळ मावळे लोक होते ते घेऊन तानाजी मालुसरा जिकडे ती गडबड होत होती तिकडे चालला. तो कांहींसा पुढें गेला तों त्या किल्लेकऱ्यांनीं अकस्मात् हिलालांचा व चुडींचा मोठा उजेड केला. तेव्हां ते रजपूत लोक तयार होऊन येतात, व कितीएक कंबरा बांधितात, व मावळे त्यांवर चालून जातात, तें सारें एकसमयावच्छेदेंकरून परस्पर दृष्टीस पडलें. तेव्हां त्यांचें तें युद्ध मोठ्या निकराचें झालें; त्यांत मावळ्यांपेक्षां रजपूत फार होते, तरी मावळ्यांचा जय होईलसें दिसूं लागलें. इतक्यांत तानाजी मालुसरा पडला, तेव्हां मावळे लोक जिकडे दोरीची शिडी होती तिकडे पळून गेले. ते त्या भिंतीशीं जाऊन पोंहोचतात तों सूर्याजी मालुसरा, तानाजीचा भाऊ, बाकीचे मावळे लोकांसहित येऊन पोंहोचला; तों हे लोक पळतात, असें पाहून मोठ्यानें ओरडून निषेध करून बोलिला कीं, 'तुमच्या बापाचें प्रेत महार नेऊन अमंगळ जागीं टाकितील, त्या दोषाचे अधिकारी मात्र तुह्मी व्हाल; आह्मीं तर दोरीची शिडी तोडिली, आतां मोगल तुह्मांस मारतील किंवा तुह्मी त्यांस माराल.' असें ह्मणून आपल्या बरोबरचे लोकांसहित त्या लोकांस पुनः युद्धास नेलें. तेव्हां ते लोक एकदांच 'हर हर महादेव' ह्मणून चालून जाऊन मोगलांचा पराभव करिते झाले; अशा प्रकारें तो किल्ला घेतला. मग दिवस उगवल्यावर असा ठिकाणा लागला कीं, मावळे लोक तीनशें पडले, व रजपूत पांचशें पडले. याखेरीज सुमारें दोनतीनशें रजपूत जीव घेऊन पळाले, ते किल्ल्याचे भिंतीवरून बाहेर उड्या टाकून मृत्यु पावले. त्या मावळे लोकांचा असा नेम होता कीं, जय झाला ह्मणजे घर किंवा दुसरें कांहीं आग घालून पेटवून जय झाल्याची खूण करावी, त्याप्रमाणें त्यांनीं तेथें एक मोठें छपरी घर होतें तें जाळिलें. तेव्हां शिवाजी आपल्या लोकांचा जय झाला असें समजून बहुत आनंद पावला, परंतु तानाजी पडला असें ऐकिल्यावर कष्टी होऊन बोलिला कीं, 'गड सांपडला, पण सिंह गेला.' नंतर त्यानें सर्व मावळे लोक यांस एकेक रुप्याचें कडें दिलें; व सूर्याजीस किल्लेदार केलें.

३. यानंतर एका महिन्यानें सूर्याजीला पाठवून छापा घालून पुरंधर किल्ला घेतला; तेथें फारसें युद्ध करावें लागलें नाहीं. कोंकणांत माहुली किल्ला घ्यावयास बरोबर फौज देऊन मोरोपंत पाठविला. त्याला तेथें दोन महिने युद्ध करावें लागलें. त्या युद्धांत मोरोपंताचें एक हजार माणूस मेलें; नंतर किल्ला हस्तगत झाला.

४. त्यानंतर कर्नाळा किल्ला घेतला, आणि त्या वर्षाच्या जून महिन्यापर्यंत कल्याणचा संपूर्ण परगणा हस्तगत केला. त्याच वर्षांत शिवाजीनें लोहगडही घेतला, आणि जंजिरा घ्यावयास तो फौज घेऊन चालिला. त्यापूर्वीं त्यानें नऊ वर्षें मो-

रचा लावून प्रतिवर्षीं त्या किल्याशीं युद्ध चालविलें होतेंच, परंतु या वेळेस जितकें सामर्थ्य असेल तितकें खर्चून किल्ला घ्यावयाचाच असा निश्चय केला; आणि तेथें जाऊन युद्ध चालविलें. तेव्हां तेथें सिद्दींचा फत्तेखान मुख्य होता, तो किल्ला द्यावयास तयार झाला, परंतु दुसरे तेथें तिघे जण मोठे सिद्दी होते, ते असें समजले कीं, 'यानें किल्ला दिला ह्मणजे धनी आह्मांस ठार मारील;' यास्तव त्यांनीं आपले जातीचे लोक वश करून घेतले, आणि फत्तेखानास कैद करून किल्ला दिला नाहीं; आणि सुरतेस एक मोठा मोगलांचा सरदार होता त्याला लिहिलें कीं, 'या समयीं जर तुह्मी आमचे कुमकेस याल तर आह्मांकडे विजापूरकरांचा मुलूख आहे हा, आणि जितकीं लढाऊ गलबतें आह्मांजवळ आहेत तीं तुह्माला देऊं.' तें त्यानें मान्य करून कुमक केली, तेव्हां किल्ला हातास न येतां शिवाजी उठून गेला. त्या तिघां सिद्दींचीं नांवें; एक सिद्दी संबूल, एक सिद्दी याकूत, एक सिद्दी खैरू.

५. त्याच वर्षीं पर्जन्यकाळ पुर्ता गेला नाहीं तोंच शिवाजी पंधरा हजार फौज घेऊन सुरतेस आला. त्या वेळेस तेथें फौज नव्हती ह्मणून तीन दिवस सावकाशपणें शहर लुटून मनास येईल तसें पुष्कळ द्रव्य जमा केलें. चवथे दिवशीं बऱ्हाणपुराहून त्याला कांहीं लिहिणें आलें. त्यावरून आपली सारी फौज घेऊन तो सालेरी किल्याचे वाटेनें आपल्या मुलखीं चालिला; तो सुरतेंतून निघतांना तेथच्या लोकांस एक पत्र देऊन निघाला; त्यांत असें लिहिलें होतें कीं, 'तुह्मी प्रतिवर्षीं बारा लक्ष रुपये खंडणी द्याल तर मजपासून तुह्माला उपद्रव होणार नाहीं.' शिवाजी लष्करसुद्धां चांदोरपावेतों पोहोंचला तेव्हां त्यास समजलें कीं, एक मोगलांकडचा पांच हजार स्वारांचा सरदार आपल्या पाठीमागें लागला आहे; याखेरीज समोर एक मोठी फौज नाशिकाचे वाटेवर पिंपरीच्या घांटाशीं येऊन वाट पाहत बसली आहे. ते समयीं शिवाजीनें आपल्या फौजेच्या चार टोळ्या करून एकीस तें सारें द्रव्य संभाळून न्यावयाचें सोंपविलें; इतरांस त्या सरदारावर जावयाचें काम नेमिलें; त्या दोन्ही टोळ्या तिहींकडून जाऊन मोगलांशीं युद्ध करूं लागल्या. इतक्यांत त्या एका टोळीनें तें द्रव्य नेऊन कोंकणांत पोंहोचविलें. नंतर शिवाजी समोरचे फौजेस आणि पाठीस लागलेल्या सरदारांस जिंकून कोंकणांत गेला. त्या मोगल लोकांत एक मराठे फौजेची टोळी होती, तीमध्यें मुख्य माहुरच्या देशमुखाची स्त्री असे, तिचा भ्रतार पूर्वींच गत झाला होता; शिवाजीनें त्या बाईचा सन्मान करून तिला तिच्या मुलखीं पाठविलें.

६. यानंतर शिवाजीनें आपला सरदार प्रतापराव गुजर याजबरोबर फौज दे-

ऊन त्यास खानदेश लुटावयाकरितां पाठविलें; तेथेंही मोगलांचें लष्कर नव्हतें ह्मणून त्यानें यथेच्छ लूट केली. या लोकांचे जाण्यांत विशेष हा कीं, यांनीं जातांना गांवोगांव लोकांपासून लिहून घेतलें कीं, 'आह्मी शिवाजीस व शिवाजीच्या सरदारांस वसुलाची चौथाई देऊं;' आणि आपण लिहून दिलें कीं, 'जे चौथाई देतील त्यांस दुसरा कोणी उपद्रव करील तर त्यापासून आह्मी संरक्षण करूं; आणि चौथाई दिल्याची पावती देत जाऊं.' त्यापुढें मराठे लोक मोगलांचे मुलखीं चौथाई घेत होते, परंतु त्याचा आरंभ तोच. सन १६७१ चे प्रारंभीं मोरोपंतानें कितीएक किल्ले घेतले; त्यांत आंवढा, पटा आणि सालेरी हे तीन श्रेष्ठ होते.

७. 'असा शिवाजीचा जय होत चालला असतां मोगल लोक कसे उगेच राहिले?' असें कोणी ह्मणेल तर त्याचें कारण असें समजावें कीं, शिवाजी आणि सुलतान मुआझिम यांची मैत्री आहे असें लोकांस दिसत होतें; आणखी जसवंतसिंग शिवाजीचा हितकर्ता होता, तें सर्व लोक जाणत असत. तो सुलतानास मसलत देई कीं, 'दिल्लीहून कुमकेस फौज मागावी, कुमकेस दुसरी फौज आल्यावांचून युद्ध करूं नये;' आणि तो पक्कें जाणत होता कीं, मागितली असतांही आपल्या घाताच्या शंकेनें औरंगजेब फौज देणार नाहीं. त्या सुलतान मुआझिमानेंही त्याची मसलत ऐकिली; त्यावरून लोकांस असें वाटूं लागलें कीं, शिवाजीशीं मिळून बापाशीं युद्ध करून स्वतंत्रपणानें असावें, असें सुलतानाचे मनांत आहे. हें खरें असेल कीं नसेल हें समजत नाहीं, परंतु इतकें खरें असेल कीं, 'बाप मेल्यावर आपण तक्ताधिपति न झालों तर, दुसरा होईल तो आपल्यास मारील,' ही एक शंका त्याच्या मनांत होती यास्तव शिवाजीचें बंड उपयोगीं पडेल ह्मणून तसेंच रक्षिलें; आणि 'त्याचे पारिपत्याचे मिषेंकरून आपलेजवळ पुष्कळ फौज असावी; कां कीं, समयीं आपल्या कामावर पडेल;' असा त्यानें मनसोबा केला. हा मनसोबा त्याला शेवटास न्यावयास अवकाश सांपडला नाहीं; कां कीं, थोडकेच दिवसांत औरंगजेबानें जसवंतसिंगास आपल्याजवळ बोलावून नेलें, आणि मोहबतखान नामें दुसरा एक सरदार चाळीस हजार फौज बरोबर देऊन दक्षिणेंत पाठविला. तो सुलतान मुआझिमास विशेष मानीत नसे.

८. त्या मोहबतखानानें दक्षिणदेशीं येतांच आंवढा, पटा, हे किल्ले घेतले. मग पर्जन्यकाळ गेल्यावर दिलेरखानाबरोबर अर्धें लष्कर देऊन तो चाकणचा किल्ला घ्यावयास पाठविला; आणि आपण अर्धें लष्कर घेऊन सालेरी किल्ल्यास वेढा घातला. हें वर्तमान सन १६७२ त घडलें. तेव्हां शिवाजीनें मोरोपंत व प्रतापराव गुजर यांजबरोबर वीस हजार स्वार देऊन आज्ञा केली कीं, 'मोगलांस हांकून द्यावें.'

ही बातमी मोहबतखानास कळल्यावर, त्यानें आपल्याजवळ थोडकेंसें सैन्य ठेवून बहुतेक युद्धास पाठविलें; त्या दोहों लष्करांची सालेरी किल्ल्याजवळ गांठ पडली. ते समयीं प्रतापराव पुढें होता, त्यानें आपल्या लोकांस आज्ञा केली कीं, 'मोगलांनीं हल्ला केला असतां आपण मोड झाल्याप्रमाणें कांहींसें पळाल्यासारिखें करून त्यांस अंगावर घेऊन त्यांचा बंदोबस्त मोडलासा झाला ह्मणजे आपण हल्ला करावा.' मग त्या लोकांनीं तसेंच केलें, तेणेंकरून मोगलांचा फार नाश झाला. तेव्हां मोगल आपला मोडलेला बंदोबस्त नीट करीत करीत मोठ्या शौर्येंकरून लढले, परंतु उपाय चालेना. त्या युद्धांत त्यांचे मोठे मोठे सरदार बेवीस मेले, आणि कितीएक जखमी झाले व कितीएक सांपडले गेले. मराठ्यांकडील एक सुरेराव कांकडे नामें पांच हजार स्वारांचा सरदार पडला, आणि पांचशें लोक मेले. त्या लढाईचा शेवट असा झाला कीं, सालेरी किल्ल्यासभोंवतीं जो मोगलांचे लष्कराचा वेढा होता तो काढून मोगल लोक पिटून लाविले, ते औरंगाबादेस पळून गेले. त्यापूर्वीं कधींही मोगलांशीं मराठे लोक असे झटून लढले नव्हते, ह्मणून त्या युद्धापासून मराठे मोठे विख्यात झाले. जे लोक शिवाजीचे हातीं सांपडले, त्यांस रायगडास नेऊन ठेविलें; मग त्यांच्या जखमा बऱ्या झाल्यावर जे चाकरीस राहिले ते ठेविले, आणि जे न राहिले त्यांस मोठ्या सन्मानानें आपले ठिकाणीं जाऊं दिलें. त्या दिवसापासून विजापूरकरांचे लष्करी लोक, आणि मोगलांचे लष्करी लोक त्यांची चाकरी सोडून शिवाजीस भेटून त्याचे चाकरीस राहूं लागले.

९. यानंतर शिवाजी पोर्तुगीज लोकांपाशीं खंडणी मागूं लागला, तेव्हां त्यांनीं मान्य न केलें ह्मणून वसईजवळच्या साष्टी परगण्यांत घोडबंदर किल्ला आहे तो घ्यावयास तो गेला, परंतु तो त्याचे हातीं लागला नाहीं; त्या लोकांनीं त्यास मागें हटविलें. त्या वेळेस मुंबईमध्यें इंग्रेज लोक इतका जवळ शिवाजी आला ह्मणून भिऊन आपल्या किल्ल्याचा बंदोबस्त करूं लागले. तों कालपर्यंत इंग्रेजांचें व शिवाजीचें कधीं युद्ध झालें नव्हतें; कां कीं, परस्परें दोघांस एकमेकांची गरज होती. ती अशी; मुंबईचे लोक धान्य आणि जाळण्याचीं लांकडें शिवाजीच्या मुलखांतून आणीत असत; आणि मराठे लोकांस त्यांपासून असा उपयोग होई कीं, ते लोक मोगलांचीं लढाऊ गलबतें मुंबईवरून पुढें शिवाजीच्या मुलखाकडे जाऊं देत नसत; ह्मणून त्यांचा व शिवाजीचा सल्ला होता. यामागें एक वेळ सन १६६१ त शिवाजीनें राजापूर लुटलें, तेव्हां इंग्रेजांचें द्रव्य सुमारें दहा हजार होन गेलें होतें, तें परत घ्यावयाकरितां त्यांनीं उद्योग कितीएक वेळां केला, परंतु त्यानें दिलें नाहीं. मग या वेळेस त्याशीं तह करून पैका घ्यावयाचा त्यांनीं नवा उद्योग केला. तेव्हां त्यांस शिवाजी ह्मणाला कीं,

'आह्माला जंजिरा घ्यावयास तुह्मी कुमक कराल, तर तुमचे होन परत देईन; हें जर मर्जीस येईना तर राजापुरीं फिरून कोठी करून पहिल्याप्रमाणें व्यापार चालवावा, ह्मणजे होन देतों.' त्यावर इंग्रेजांनीं उत्तर केलें कीं, 'आह्मी व्यापार करावयासच येथें आलों. जो आमचे वाटेस जातो त्यावर मात्र आह्मी शस्त्र धरितों, निष्कारण उपद्रव करावा असें आमच्या धर्मांत नाहीं. आतां आह्मी राजापुरीं व्यापार चालवूं, परंतु इतःपर उपद्रव होणार नाहीं असा पक्का जामीन पाहिजे.' तेव्हां ती गोष्ट तशीच राहिली.

१०. इतक्यांत मोगलांचे मुलखांत कांहीं विशेष बंदोबस्त झाला. तो असा; औरंगजेबानें सुलतान मुआझिम व मोहबतखान यांस आपल्याजवळ बोलावून नेलें आणि गुजराथेचा अधिकारी खान जहान बहादूर होता तो दक्षिणेचा अधिकारी करून पाठविला. तो दक्षिणेस येऊन असें समजला कीं, शिवाजीच्या वाटेस जावयाजोगें आपल्याजवळ सैन्य नाहीं, यास्तव आपल्या मुलखाचें मात्र संरक्षण करावें. ह्मणून त्यानें कितीएक देशांत जावयाच्या घांटांच्या वाटा बंद केल्या. तेव्हां शिवाजी दुसरी नवीच वाट काढून फौजेसहित घांटावर जाऊन अहमदनगर व औरंगाबाद यांचे आसमंतात् लुटूं लागला; तेव्हां त्याचे पारिपत्याकरितां खान जहानानें चहूंकडे लोक पाठविले; परंतु त्याची कोठेंही गांठ पडली नाहीं. मग पर्जन्यकाळ जवळ आला ह्मणून भीमेचे कांठीं पेंडगांवापाशीं छावणी करून राहिला; तेथें एक किल्ला बांधून त्याचें नांव 'बहादरगड' ठेविलें. तो मोगलांचा सरदार किल्ला बांधीत असतां शिवाजी गुप्तरूपें लष्करासहित गोवळकोंड्यांत शिरला, आणि तेथून पुष्कळ खंडणी घेऊन स्वस्थपणें रायगडास गेला. यानंतर मोगलांच्याही मुलखांत शिवाजीनें स्वार पाठविले, त्यांनीं जेथें बळ चालेल तेथें लुटावें, आणि मोगलांचे लष्कराची गांठ पडली असतां ती लूट बरोबर घेऊन पळावें, यांतच त्या लोकांस पुरुषार्थ आहे असें वाटत असे. शिवाजी गोवळकोंड्यांत होता, इतक्यांत समुद्रतीरच्या त्याच्या गांवांचा फार नाश झाला. तो असा; सुरतेचीं आणि जंजिऱ्याचीं लढाऊ गलबतें येऊन त्यांनीं ते गांव लुटले, परंतु तेणेंकरून त्याचें बळ किमपि उणें झालें नाहीं; कां कीं, त्या हानीपेक्षां गोवळकोंड्यांत लाभ विशेष झाला.

११. सन १६७२ च्या डिसेंबर महिन्याचे १५ वे तारखेस विजापूरचा बादशाह अली अदिलशाह याचे शरीरास वायूचा उपद्रव होऊन एकाएकीं हातपाय गेले. तेव्हां तो आपल्या राज्याचा कांहीं बंदोबस्त करून थोडकेच दिवसांनीं मरण पावला. त्याला पुत्र एकच पांच वर्षांचा सुलतान शिकंदर नामें होता, आणि एक कन्या होती. त्या वेळेस त्याचा वजीर अबदुल महंमद मोठा कुलीन आणि सुज्ञ

होता. परंतु त्या काळाप्रमाणें त्यामध्यें सामर्थ्य नव्हतें. दुसरे मोठे मोठे तिघे मुत्सद्दी होते. एक खवासखान; दुसरा अबदुल करीम, त्यालाच बहलोलखान ह्मणत; तिसरा मुजफरखान. हे तिघेही सरकारचें हित न पाहतां आपलें मात्र प्राबल्य असावें असें इच्छीत होते. तो वजीर अल्पसामर्थ्य होता यामुळें त्याला त्या तिघांस आज्ञेंत वागवावयाची शक्ति होईना, आणि ते तर आपलें माहात्म्य वाढवावें ह्मणून अमार्गवर्ती झाले. तेणेंकरून आंतल्याआंत वैमनस्यें पडलीं; यास्तव त्या राज्याची दशा अशी झाली कीं, बाहेर शिवाजी आणि मोगल तें राज्य घ्यावयास टपलेले; आणखी आंत फितूर. यावरून असें दिसूं लागलें कीं, हें राज्य आतां लौकर बुडेल. असें असतां अबदुल महंमद यानें बादशाहास मरतेसमयीं मसलत दिली कीं, 'सुलतान शिकंदर प्रौढ होई तोंपर्यंत खवासखान मुख्य कारभारी करावा, आणि जे दुसरे दोघे मुख्य राहिले त्यांस व मला मुलखांमध्यें जागोजाग वेगळा वेगळा अधिकार द्यावा.' तेव्हां बादशाहानें निरुपाय होऊन तें मान्य केलें; आणि खवासखानाला जवळ बोलावून त्याचे हातांत पुत्राचा हात दिला; आणि वजीरानें मसलत दिली होती त्याप्रमाणें वागावयाची आज्ञा दिली. मग बादशाह मृत्यु पावल्यावर तो खवासखान मुख्य झाला. त्यानें तिघां मुख्यांतील एक मुजफरखान यास मात्र कर्नाटकांत पाठविलें. दुसरे दोघे मोगलांचे आश्रयेंकरून प्रबळ होतील अशा भयानें पाठविले नाहींत, आपल्याजवळ ठेविले. त्या चौघांजवळ ब्राह्मण आश्रित होते, त्या योगेंकरून तेथचें बारीक वर्तमान शिवाजीला कळत असे. त्या शिवाजीला विजापुराची अशी अवस्था समजतांच त्यानें असें मनांत आणिलें कीं, पूर्वीं जो अबदुल महंमद याशीं तह ठरविला होता तो बादशाह याचे मरणपर्यंत झाला, आतां आपला लाभ साधावा हेंच मुख्य.

१२. याप्रमाणें निश्चय करून सन १६७३ च्या मार्च महिन्यांत शिवाजीनें विशाळगडांत मोठें सैन्य जमा केलें, त्यांतून कितीएक लोक पाठवून पन्हाळा किल्ला छापा घालून घेतला; परंतु त्याचे मनांत हुबळी नामें मोठें शहर, ज्यामध्यें व्यापार मोठा चालतो आहे, तें लुटावयाचें फार होतें. तें काम त्यानें अण्णाजी दत्तो यास सांगितलें; त्यानें तेथें जाऊन तें शहर लुटून असें द्रव्य जमा केलें कीं, ज्याचा अजमास करितां येत नाहीं. मग ते लोक तेथून गेल्यावर तेथें संरक्षणार्थ पूर्वींपासून राहिलेले जे विजापूरकरांचे लोक होते त्यांनीं जें शेष राहिलें द्रव्य तें सर्व नेलें. याखेरीज शिवाजीनें विजापूरकरांचा समुद्राचे तीरचा मुलूख लुटावयास लढाऊ गलबतें पाठविलीं; आणि गांवोगांव देशमुख आदिकरून अधिकारी यांस मसलत दिली कीं, 'विजापूरकरांचे लोकांस हांकून तुह्मीं स्वतंत्रपणानें वागावें.' त्या वेळेस बिदनूरचा

राणा हुबळी शहराची ती दशा पाहून शिवाजीला शरण आला, आणि खंडणी द्याव्यास कबूल होऊन अभय मागितलें. त्यावर दिढा महिन्यानें मावळे लोक पाठवून शिवाजीनें परळी किल्ला घेतला; त्यानंतर सातारा किल्ला, जेथें विजापूरचे सरकाराचा बंदोबस्त असे, त्यास घेरा घातला; चार महिने लढल्यानंतर तो शिवाजीचे हातीं लागला. त्या किल्ल्याविषयीं कांहीं विशेष मजकूर आहे, तो असा; ज्यापासून फितूर इत्यादिक अन्याय झाले असा जो सरकारचा मोठा अपराधी त्यास सातोऱ्या किल्ल्यावर बंदींत ठेवावें, अशी चाल कितीएक पिढ्या विजापूरकरांची होती, ती अदिलशाही वंशापासून किंवा त्याचे अगोदरपासून चालत आली. तो किल्ला त्यानें घेतला आणि मोठा हर्ष पावला, परंतु त्याचे वंशाचे पुरुष त्यांत पुढें बंदीस पडतील हें त्याला समजलें नाहीं. त्या वर्षीं पर्जन्यकाळामध्येंच चंदन, वंदन, पांडवगड, नांदगिरी, आणि ताथवडा हे पांच किल्ले शिवाजीचे हस्तगत झाले.

१३. इकडे विजापुरांत सुलतान शिकंदर बादशाह लहान ह्मणून जो मुख्य केलेला खवासखान होता, त्यानें शिवाजीचें असें सामर्थ्य जाणून कांहीं फौज पाठविली, त्या लोकांनीं जाऊन पन्हाळ्या किल्ल्याचे आसमंतात् मुलूख घेतला. इतक्यांत शिवाजीकडचा प्रतापराव गुजर विजापुराचे सभोंवतीं लुटूं लागला, आणि मोठा उपद्रव करूं लागला; तेव्हां विजापूरकरानें आपलें लष्कर माघारें बोलाविलें. प्रतापराव यानें त्या लष्कराची वाटच बंद केली, आणि त्यास दाणापाणी मिळेना असें नानाप्रकारें दमविलें. तेव्हां त्या विजापूरकरांच्या लष्करांत मोठा सरदार अबदुल करीम होता, तो त्या प्रतापरावाशीं आर्जवाच्या गोष्टी बोलून आपलें लष्कर वांचवून विजापुरीं गेला. त्यावरून शिवाजीला मोठा राग येऊन त्यानें निर्भर्त्सना करून लिहिलें. तेणेंकरून प्रतापराव फार खिन्न होऊन शिवाजीची आज्ञा नसतां त्यानें वराडांतील पैनघाटचे मुलखांत सैन्य चालविलें.

१४. पुढें अबदुल करीम प्रतापराव दूर गेला असें समजून सन १६७४ च्या फेब्रुआरी महिन्यांत पुनः सैन्य घेऊन पन्हाळा किल्ला घ्यावयास चालिला. तो त्या किल्ल्याचे जवळ जाऊन पोंहोचला तों प्रतापराव पुष्कळ फौजेनिशीं तेथें त्याचे दृष्टीस पडला. त्यास त्यापूर्वीं शिवाजीचा निरोप आला होता कीं, 'असा अन्यायी जो तूं तो विजापूरकरांचें लष्कर लुटल्यावांचून मला तोंड दाखवूं नको.' यास्तव तेणेंकरून तो आपला बंदोबस्त न पाहतां एकाएकीं त्या लष्करावर उडी घालून आपण मरून गेला, मग त्याचे सैन्याची दुर्दशा झाली.

१. अपराधी लोकांस बंदींत ठेवावयाचा जसा सातारा विजापूरकरांचा, तसाच पूर्वीं लोहगड अहमदनगरकरांचा होता.

१५. ते लोक पळाले ते पन्हाळ्याचे तोफेखालीं गेले. तेव्हां त्यांस आश्रय सांपडला. ते वेळेस एक मराठा हंसाजी मोहिते नामें पांच हजार स्वारांचा सरदार होता, तो अकस्मात् आला. त्यानें विजापूरकरांचे लोक मराठे लोकांचे पाठीस लागले आहेत, आणि त्यांत बंदोबस्त नाहीं असें पाहून त्यांवर आपण हल्ला केला; मग त्यांचा मोड झालासा पाहून मराठे लोकांनीं माघारें उलटून आपल्या पाठीस लागणारांस पळविलें. ते समयीं विजापूरकरांचा सरदार मोठ्या लज्जेनें माघारां विजापुरीं गेला. त्या हंसाजी मोहित्याचे लोकांत दोन सरदार मोठ्या शौर्यैकरून लढले; एक संताजी घोरपडे, आणि दुसरा धनाजी जाधव. त्यापुढें ते दोघे अशा आचरणेंकरून मोठे विख्यात झाले. जें जें हंसाजी मोहित्यानें कार्य केलें तें तें शिवाजीला मोठें हर्षास्पद झालें, तेणेंकरून त्यानें त्याचें 'हंबीरराव' असें नवें नांव स्थापून लष्करचे सरनोबतकीचा अधिकार त्यास दिला. त्या प्रतापराव गुजरानेंही पूर्वीं मोठीं मोठीं कामें केलीं होतीं आणि या वेळेस तर मरूनच गेला; यास्तव त्याची फार प्रशंसा करून शिवाजीनें त्याचे सोयरेधायरेसुद्धां त्याच्या मुलांमाणसांचें पोषण केलें; आणि त्याची कन्या व आपला पुत्र राजाराम यांशीं विवाह केला. तो प्रतापराव मृत्यु पावला त्याच सुमारें आबाजी सोनदेव याचा काळ झाला. त्याचा पुत्र रामचंद्रपंत यास मुजुमदार केला. त्या शिवाजीची चाल अशी होती कीं, गुणी असल्यावांचून पुत्रास बापाचा अधिकार देऊं नये.

१६. शिवाजी फार दिवस आपणास 'राजा, महाराज' असें ह्मणवीत असे; आणि आपले राज्यांत त्यानें नव्या टंकसाळा घातल्या होत्या; आणखी तो ब्राह्मणांस ह्मणूं लागला कीं, 'तुह्मीं मला राज्याभिषेक करून ज्या दिवशीं मी तक्ताधिपति होईन तो दिवस वर्षारंभाचा करावा'. त्या वेळेस काशीहून एक गागाभट्ट नामें मोठा विद्वान् ब्राह्मण आला होता; त्यास तें काम सांगितलें. मग त्यानें शास्त्रार्थ बहुत पाहून सन १६७४ चे जून महिन्याचे ६ वे तारिखेस, शके १५९६ चे ज्येष्ठ शुद्ध १३ चे दिवशीं सुमुहूर्तीं रायगडीं शिवाजीस यथाविधि राज्याभिषेक केला. पूर्वीं कारभारी यांचीं अधिकारसंबंधीं नावें फारशी शब्दांचीं होतीं, मग शिवाजीला राज्याभिषेक झाल्यावर तीं बदलून नवीं संस्कृत ठेविलीं. तीं नांवें शिवाजी जिवंत होता तोंपर्यंत चालत होतीं; त्यापुढें अष्टप्रधानांचीं मात्र राहिलीं. त्या नांवांचा तपशील आणि त्या अधिकाऱ्यांचीं नांवें अशीं:—

---

१. त्यापुढें पंधरा दिवसांनीं शिवाजीची आई जिजाबाई मेली, ह्मणून त्यास पुनः राज्याभिषेक केला, परंतु वर्षारंभाचा दिवस ज्या दिवशीं पहिला राज्याभिषेक झाला तोच ठेविला, दुसरा केला नाहीं.

| फारशी. | संस्कृत. | अ. नांवें. |
|---|---|---|
| पेशवा, | मुख्य प्रधान, | मोरोपंत पिंगळे. |
| मुजुमदार, | पंत अमात्य, | रामचंद्रपंत बावडेकर. |
| सुरनीस, | पंत सचिव, | अण्णाजी दत्तो. |
| वांकनीस, | मंत्री, | दत्ताजीपंत. |
| सरनोबत, | सेनापति, | हंबीरराव मोहिते. |
| डबीर, | सुमंत, | जनार्दनपंत हणमंते. |
| न्यायाधीश, | न्यायाधीश, | बाळाजीपंत. |
| न्यायशास्त्री, | पंडितराव, | रघुनाथपंत. |

यानंतर शिवाजीनें आपली सुवर्णाची तुळा[1] केली, आणि मोठा अधिकार पावून आपणास उत्तम रजपूत ह्मणविलें; आणखी नाना गुणांनीं युक्त महत्त्वाचे सूचक जे 'क्षत्रियकुलावतंस राजा श्रीशिवछत्रपति' इत्यादि शब्द ते जोडून आपलें नांव लिहावयाची चाल घातली.

१७. पूर्वीं शिवाजी सन १६७३ त जेव्हां विजापूरकरांशीं युद्ध करूं लागला, ते वेळेस त्यानें मोगल लोकांशीं तह केला होता ह्मणून ते लोक त्यास उपद्रव करीत नव्हते; परंतु सन १६७५ त मोगलांचा दिलेरखान नामें सरदार यानें शिवाजीच्या मुलखास उपद्रव केला. तेंच तह मोडावयास शिवाजीला निमित्त झालें. त्यानें मोरोपंतास पाठवून पुनः आंवढा, पटा, हे किल्ले घेतले; आणि हंबीरराव सेनापति यानें सुरतेजवळच्या घांटावर जाऊन आपल्या फौजेच्या वेगळ्या वेगळ्या टोळ्या करून बऱ्हाणपूरपावेतों मुलूख लुटला. तेथून पुढें माहुरपर्यंत लुटीत गेला; त्यांतल्याच एके टोळीनें जाऊन भडोच परगणा लुटला. त्यापूर्वीं कोणी मराठा नर्मदा उतरून पलीकडे गेला नव्हता. त्या शिवाजीनें आपण अंगें जाऊन पन्हाळा व ताथवडा यांमध्यें ठाणें बसवून कोंकणांत फोंडे किल्ला यास घेरा घातला. तो शिवाजी फौजेसहित कोंकणांत गेला असें पाहून विजापूरकरांकडचे सरदार निंबाळकर व घाटगे व फलटणराव, मलावडीचे देशमुख, यांनीं शिवाजीनें बसविलेलें ठाणें उठवून तो मुलूख घेतला. हंबीरराव गोदावरी उतरून माघारां आल्यावर दिलेरखान मोठ्या निकरानें त्याचे पाठीस लागला, परंतु त्यानें जी लूट मिळविली होती ती मोठ्या कष्टानें वांचवून रायगडास नेली. त्या समयीं मोगलांनीं कल्याणी पर-

---

१. रायगडीं शिवाजीला राज्याभिषेक झाला. ते समयीं इंग्रेज लोकांशीं आणि शिवाजीशीं तह झाला. त्या कामास मुंबईहून एक साहेब गेला होता; त्यानें शिवाजीच्या तुळेस सोळा हजार होन लागलेले पाहिले.

गणा लुटला. शिवाजीनें फोंडे किल्ल्याचा बुरूज सुरंगानें उडवून तो किल्ला घेतला. त्यानंतर त्यानें दक्षिण कोंकणांत जाऊन कितीएक ठिकाणें लुटून कितीएका जागची खंडणी घेऊन घांटावर जाऊन सौंदें प्रांतांतील द्रव्य घेऊन रायगडीं फिरून आला. विजापुरांत जो मुख्य झालेला खवासखान होता, तो शिवाजीच्या भयानें राज्याच्या रक्षणाचें अगत्य सोडून केवळ आपल्याच हितासाठीं खान जहानाबरोबर तहाचें बोलणें करूं लागला कीं, 'इतःपर आह्मी तुमचे ह्मणवून राहूं. आणि सुलतान शिकंदर बादशाह याची बहीण पादशाह बिबी, औरंगजेबाच्या पुत्रास देऊं.' हें वर्तमान विजापूरकरांचे मानकरी सरदार लोक यांस समजतांच त्यांनीं मारेकरी घालून त्या खवासखानास मारून टाकिलें. नंतर अबदुल करीम कारभार चालवूं लागला. त्यानें मुलखाच्या रक्षणाविषयीं आज्ञा केलेली सरदार लोक खवासखानाच्या आज्ञेपेक्षां विशेष मानीत होते. नंतर जेव्हां दिलेरखान विजापुरचे मुलखांत गेला, तेव्हां अबदुल करीम लष्करसुद्धां युद्धास सिद्धच होता; मग त्याची आणि याची कितीएक वेळां लढाई झाली, आणि विजापूरकरांचा कांहींसा जय झाला, तेव्हां दिलेरखानही, तो अबदुल करीम याचे जातीचा ह्मणून, त्यास कांहीं अनुकूळ झाला, तेणेंकरून त्यास तह करणें सुलभ पडलें.

१८. सन १६७६ त ताथवडा व पन्हाळा यांचे मधला मुलूख शिवाजीनें तिसऱ्यानें घेतला; आणि विजापूरच्या जहागीरदारांचा उपद्रव न लागावा ह्मणून किल्ले बांधिले. त्यांचीं नांवें:—वर्धनगड, भूषणगड, सदाशिवगड, मच्छिंद्रगड. हे चार किल्ले फार मोठे नव्हते, परंतु मुलखाचे रक्षणास मोठे उपयोगी अशा जागीं बांधिले होते; आणि त्यांचे संबंधी जे मुलूख होते त्यांचा वसूल पुष्कळ उत्पन्न होत असे. असा बंदोबस्त करीत असतां त्या शिवाजीच्या शरीरीं समाधान नाहींसें झालें, तेणेंकरून तो सातान्यास कांहीं महिने पडला होता. तेव्हां त्यानें बहुत देवांची सेवा व अनुष्ठानें करविलीं; आणि त्या दुखण्यांतच त्यानें कर्नाटक प्रांतीं जाऊन तें राज्य घ्यावयाची अशी मोठी मसलत केली कीं, त्यापूर्वीं कधीं तशी केलीच नव्हती. ती सुलभ करावयास व शेवटास न्यावयास काय काय त्यानें केलें, तें पुर्तेपणें समजावयाकरितां पूर्वीं लिहिलेल्या वर्तमानांतील कांहीं प्रकरणांची सूचना लिहिली पाहिजे, ती या भागाचे पुढल्या भागीं लिहिण्यांत येईल.

---

## भाग नववा.

**( इसवी सन १६७६ पासून सन १६८० पर्यंत झालेलीं वर्तमानें. )**

१. शिवाजी कर्नाटक प्रांत घ्यावयास गेला तो प्रकार, व तो शिवाजी तिकडे जातांना वाटेनें देवस्थान पाहून तपश्चर्या करावयास गेला.—२. त्यानें कर्नाटकीं जाऊन युद्ध कोणे प्रकारें केलें तें,

आणि त्याचा सावत्र भाऊ व्यंकोजी याशीं बोलणें झालें तो प्रकार.—३. मोगल आणि विजापूरकर यांनीं मिळून गोवळकोंडेकर यांचें राज्य बुडवायास सैन्य पाठविलें, परंतु तें कार्य शेवटास गेलें नाहीं; अबदुल करिमाचा मृत्यु, आणि त्याचे जागीं मसाउदखानाची स्थापना.—४. व्यंकोजी शिवाजीच्या लष्करावर छापा घालून आपणच पराभव पावला तो प्रकार.—५. जनार्दनपंत व हंबीरराव व मोरोपंत यांनीं युद्धें कशी केलीं.—६. सुलतान मुआझिम यास दक्षिणेचा अधिकार मातक्यान् दिला तें वर्तमान.—७. मोगलांचें लष्कर विजापूर घ्यावयास आलें ह्मणून मसाउदखानानें शिवाजीपाशी कुमक मागितली; व तो शिवाजी मोगलांचे मुलखीं जाऊन उपद्रव करिता झाला, आणि तेथून लूट घेऊन माघारां येत असतां वाटेंत मोगलांच्या लष्करापासून मोठें संकट पावला; नंतर आपल्या मोठ्या शौर्येंकरून आणि जासुदांचे चातुर्येंकरून तो व त्याचें सैन्य वांचलें.—८. संभाजीची वर्तणूक.—९. मोगलांनीं विजापूरचा घेरा उठविला. नंतर शिवाजीनें विजापूरकरांस कुमक केली होती तीपासून तो काय लाभ पावला.—१०. तेणेकरून व्यंकोजी निरुत्साह झाला, यास्तव त्यास शिवाजीने हितोपदेशार्थ पत्र लिहिलें.—११. त्या शिवाजीचा मृत्यु व त्याचे स्वभावाचें वर्णन.—१२. तो मेल्यानंतर तक्ताधिपति कोण कोण झाले तें वर्तमान.

१. पूर्वीं औरंगजेबानें आपल्या मनांत निश्चय केला होता कीं, सर्व दक्षिणेचें राज्य आपल्या सत्तेंत ठेवावें. परंतु मग तो आपलें राज्य संभाळीत असतां काळेंकरून तें विसरला असेल असें समजूं नये. पहिल्यापासून त्याची मसलत अशी होती कीं, दक्षिणेचे अधिकारी व राजे हे आपआपल्यांत कलह करून निर्बळ झालेले तसेच राखावे, नंतर जेव्हां आपले चित्तास येईल तेव्हां आपणास जाऊन त्यांचें राज्य घेतां येईल. तें काम त्याला दुसऱ्यास सांगतां येईना; कां कीं, ज्याचें हातीं तें राज्य लागेल तोच प्रबळ होईल अशी मनांत शंका होती, यावरूनच समजतें कीं, शिवाजीनें एवढी धामधूम केली असतां मोगलांनीं त्यास तत्काळ बुडविलें नाहीं. शिवाजी गोवळकोंडेकरांशीं आणि विजापूरकरांशीं कलह करी, त्यांतही औरंगजेब आपलें हितच जाणत असे; आणि या कामासाठीं त्याचा उद्योगही असाच होता कीं, आपले वकील राज्यांत पाठवून कांहीं युक्तीनें वैमनस्यें पाडावीं. त्याला असें वाटे कीं, अशाच आचरणेंकरून आपलें कल्याण होईल; परंतु येणेंकरूनच आपलें अहित आहे असें तो समजला नाहीं; कां कीं, दुष्ट कर्में अंगीकारलीं असतां कोणेके समयीं तींच त्या करणारास बाधक होतात. शेवटीं त्याचींच कुकर्में त्याला घातक झालीं. यावरून अर्थ असा दिसतो कीं, उत्तम आचरण केवळ एकाचेच उपयोगीं पडतें असें नाहीं; मोठ्या बादशाहापासून गरीब रयतेपर्यंत सर्वांचे उपयोगीं सारखेंच पडतें. विजापुरीं अबदुल करीम यानें मोगलांशीं आणि आपणाशीं सल्ला राखला होता, परंतु त्यांशीं बहुत काळपर्यंत तशीच मैत्री ठेवावी असें त्याचे मनांत नव्हतें. कां कीं, त्यानें आपले हिताच्या युक्ति वेगळ्याच

कल्पिल्या होत्या. त्याचे लोक व मोगलांचे लोक एका जातीचे होते. त्यानें मोगलांशीं सल्ला केला याचें कारण हेंच असेल; नाहींतर तो आपल्या शाहाणपणानें शिवाजीशीं तह करिता. कां कीं, शिवाजीच्या हिताचें आणि त्याच्या हिताचें कारण एकच होतें; आणखी मोगल त्यास बुडवावयास पाहात होते. गोवळकोंडें येथील मानकरी लोक बहुतां दिवसांपासून मोगलांस वश झाले होते. ज्या समयीं कुतुबशाह मेला, त्या समयीं औरंगजेब समजला कीं, आतां आपलें हित होईल, कां कीं, तेथचा तक्ताधिपति होणार जो कुतुबशाहाचा जांवई अबू हुसेन, तो केवळ विषयी होता. परंतु बादशाह झाल्यावर तो आपले सर्व दुर्गुण टाकून उत्तम प्रकारें राज्यकारभार चालवूं लागला, तेव्हां औरंगजेबाची निराशा झाली. त्या अबू हुसेनाजवळ मसलत देणारे ब्राह्मण दोघे भाऊ होते; एक आकण्णापंत, एक मादण्णापंत. त्यांत मादण्णापंत फार चतुर होता, परंतु त्याचा स्वभाव ब्राह्मणाचे जातीप्रमाणेंच कपटी असे. त्या दोघांचे मसलतीनेंच तो अबू हुसेन बहुधा वागे. याप्रमाणें दक्षिणेच्या राज्यांत ज्या वर्तणुकी झाल्या, त्या बहुतेक लिहिल्या. आतां शिवाजी कर्नाटकांत गेला तें प्रकरण. सन १६७६ चे अखेरीस शिवाजी तीस हजार स्वार आणि चाळीस हजार पायदळ बरोबर घेऊन गोवळकोंड्यास जाऊन पोंहचल्यावर तेथच्या बादशाहाशीं मादण्णापंताचे योगेंकरून तह केला; आणि त्यापासून तोफा वगैरे सरंजाम घेऊन सन १६७७ च्या मार्च महिन्यांत तेथून निघून कृष्णेचे पलीकडे उतरून गेला. तिकडे जातांना त्या वाटेच्या एके बाजूस श्रीशैल मल्लिकार्जुन नामें देवस्थान आहे, तिकडे आपण लष्कर सोडून एकटा देवदर्शन करावयाकरितां गेला. तेथें तो बारा दिवसपर्यंत मोठें दुर्घट तप करून शेवटीं तरवार काढून प्राण देऊं लागला, ते समयीं भवानी प्रत्यक्ष येऊन त्याचें निवारण करून बोलिली कीं, 'राजा, प्राण देणें योग्य नाहीं; कां कीं, तुझ्या हातून अद्यापि हिंदु धर्म वाढवायाचा आहे; आतां ऊठ, तुझा जय होईल.' असें सांगून ती गुप्त झाली, असें त्या वेळचे लोक बोलत होते. इकडे इतक्यांत लष्कर कर्नाटकच्या पैनघांटचे मुलखांत पोंहचलें होतें, तेथें शिवाजी जाऊन त्यास मिळाला. मग जिंजी नामें विजापूरकरांचा किल्ला होता, तेथच्या सरदारानें विजापूरच्या मुख्याचे आज्ञेवरून तो किल्ला दिला. तेथें कोणी मावळा सरदार शिवाजीनें ठेविला; आणि आपल्या देशच्या कायद्याप्रमाणेंच तेथें वसूल वगैरे घेण्याची रीति चालविली; त्या कामावर ब्राह्मण ठेविला होता.

२. यानंतर विजापूरकरांचा एक पांच हजार स्वारांचा सरदार होता तो शिवाजीच्या निवारणाचा उद्योग करूं लागला, तेव्हां शिवाजीनें त्याचा पराभव करून

त्याचे घोडे घेतले. तो शिवाजी आपल्या पाठीमागें कांहीं सैन्य ठेवून आपण पुढें आला होता; त्या सैन्यानें जाऊन येल्लुर किल्ल्यास वेढा घातला; आणि शिवाजी तंजावर प्रांत हस्तगत करावयाचा यत्न करीत होता. त्यानें आपला सावत्र भाऊ व्यंकोजी यास तंजावराहून त्रिवादी एथें भेटावयास बोलाविलें कीं, 'तुह्मी एथें येऊन भेटावें, ह्मणजे वडिलांचे मुलखाचा विभाग करून घेऊं.' तेव्हां तो निरुपाय होऊन आला, त्यास शिवाजी मोठ्या समारंभानें भेटला, आणि त्याजवळ मुलखाची अर्धी वांटणी मागूं लागला; परंतु तो ऐकेना. तेव्हां शिवाजीचे मनांत आलें कीं, बलात्कारावांचून मसलत सिद्धीस जात नाहीं. तथापि तो आपले संतोषेंकरून भेटीस आला ह्मणून शिवाजीनें त्यास माघारें तंजावरास जाऊं दिलें; परंतु मनांत असा निश्चय धरिला कीं, 'एक तंजावर न घेतां जितका शाहाजीचा जहागिरीचा मुलूख आहे तितका सारा घेऊं.' त्या वेळेस त्यानें व्यंकोजीस पत्र पाठविलें कीं, 'माझे जवळ मुलूख पुष्कळ आहे, आणखी मुलखाची इच्छा नाहीं, परंतु माझी वतनाची जागा जर मीं न घेतली तर मला योग्य नव्हे. त्यास कलह न करितां तंजावराचा अर्धा भाग व अरणी किल्ला व वरकड किल्ले व मुलूख यांतील अर्धा भाग बरोबर द्यावा.' यानंतर शिवाजी येल्लुरास आला, आणि थोडकेच दिवसांत त्यानें तीन किल्ले घेतले. आणखी एक वेदो भास्कर नामें ब्राह्मण अरणी किल्ल्याचा अधिकारी शाहाजीपासून होता, तो स्वतां येऊन शिवाजीस किल्ला देऊन आपण त्याचे चाकरीस राहिला. मग त्याच वर्षी त्यानें शाहाजीचे जहागीरसंबंधीं कोल्हार व बंगळोर व उस्कोटा व बाळापूर व सेरा हे पांच परगणे घेतले. आणि त्याचे स्वारांनीं सर्व कर्नाटक प्रांतांत जाऊन विजापूरकरांच्या मुलखीं सरदेशमुखी व चौथ या निमित्तेंकरून लुटालूट केली.

३. शिवाजी या मोहिमेस निघाल्याचे पूर्वी त्यानें खान जहान नामें मोगलांचा सरदार होता त्याशीं स्नेहाचा तह केला होता. हें तहाचें वर्तमान औरंगजेबास कळलें तेव्हां तें त्यास बरें वाटलें नाहीं. त्या वेळेस त्याचा दिलेरखान नामें दुसरा सरदार यानें मसलत केली कीं, 'आह्मांला विजापूरकरांचें लष्कर सहाय झालें असतां आह्मी गोवळकोंड्याचें राज्य अगदीं बुडवून टाकूं.' तेव्हां औरंगजेबानें त्या खान जहानास बोलावून घेऊन त्याचे जागीं दिलेरखानास पाठविलें. याप्रमाणें मोगल आणि विजापूरकर मिळून गोवळकोंडेकरांचा द्वेष करूं लागले. याचें कारण असें; गोवळकोंडेकरांनीं शिवाजीशीं स्नेह केला होता, व त्यांच्या मादण्णापंतानें, हीं दोन्ही लष्करें एकदाच येऊन मोठा अनर्थ करितील, असें समजून आपण मोठें सैन्य जमा केलें होतें. मग तीं दोन्हीं लष्करें आलीं तेव्हां त्यानें आपल्या

सैन्याच्या सामर्थ्येंकरून त्या दोन्ही लष्करांचा पराभव केला. त्यांत विजापूरकरांचा असा नाश झाला कीं, त्यांतले कितीएक लोक लष्कर सोडून पळाले, आणि जे राहिले ते रोजमुरा मिळेना ह्मणून युद्धास झटेनातसे झाले. याखेरीज अबदुल करीम याचे शरीरीं समाधान नाहींसें होऊन सन १६७८ चे जानेवारी महिन्यांत तो मरण पावला. तेव्हां दिलेरखानाच्या योगेंकरून सिद्दी जोहराचा जांवई मसाऊद्खान सिद्दी अबदुल करीमाचा अधिकार चालवूं लागला; नंतर दिलेरखान पेंडगांवीं लष्करासुद्धां गेला.

४. हें सर्व वर्तमान शिवाजीला कळल्यावर तो आपल्या मुलखाकडे जाऊं लागला, ते समयीं आपला भाऊ संताजी नामें जो शाहाजीचा दासीपुत्र, त्यास आणि रघुनाथ नारायण व हंबीरराव सेनापति यांस तें कर्नाटकचें काम सोंपवून आपण माघारां चालिला. तो बेल्लारीजवळ येऊन पोंहचला तों तेथचा अधिकारी देसाई गत झाला होता, आणि त्याची स्त्री तें स्थान संभाळून होती. तेथें त्या शिवाजीच्या लष्करचें बुणगें मारिलें गेलें, तेव्हां शिवाजीनें तिला तें वर्तमान कळविलें, परंतु तिनें तें मनासच आणिलें नाहीं. यास्तव शिवाजीनें त्या किल्ल्यास घेरा घालून सत्तावीस दिवस युद्ध करून तो घेतला. नंतर कोपळ नामें दुसरा किल्ला आणि बहादुरबिंडा नामें तिसरा हे घेतले; आणि जनार्दनपंत सुमंत यास तेथचा बंदोबस्त राखायास सांगून पुढें चालिला. तो तुर्गळ शहरीं पोंहचल्यावर, व्यंकोजीनें पाठीमागें राहिलेल्या लष्करावर छापा घातला, परंतु आपणच पराभव पावला, असें वर्तमान शिवाजीला कळलें; तेव्हां त्यानें त्यास लिहिलें कीं, 'तुमच्या अशा अयोग्य वर्तणुकीस्तव मला बलात्कारेंकरून मुलूख घ्यावा लागला; आणि आतां तुमच्या दांडगाईमुळें माझ्या सरदारांसही तुमचें पारिपत्य करावें लागलें. आतां तुह्मीं सावधपणानें विचार केला तर, तुमचा आणि माझा स्नेह येणेंकरूनच राहील, व कल्याण होईल असें तुमचे ध्यानांत येईल. अझून मी तुह्मांशीं स्नेह करावयास सिद्ध आहें, परंतु तुह्मांकडे वडिलांचा जितका मुलूख आहे तितका सर्व माझे स्वाधीन करावा लागेल; मग मी तुह्मांला योग्य असा दुसरा कांहीं मुलूख देईन.' त्यानंतर व्यंकोजीनें रघुनाथ नारायणाचे योगेंकरून वडिलांचे वेळच्या जिनगीचा आणि मुलुखाचा अर्धा भाग करून दिला, आणि कांहीं द्रव्य देऊन शिवाजीस वश केलें. तेव्हां त्यानें तंजावर आणि दुसरा संपूर्ण वडिलांचे परगण्यांतील कर्नाटकचा मुलूख त्याकडे राखिला; नंतर शिवाजी रायगडीं आगोठीस पोंहचला. इतकें काम करावयास त्याला दीड वर्ष लागलें.

५. तिकडे कर्नाटकांत हंबीरराव व जनार्दनपंत यांनीं विजापूरकरांचें लष्कर

तुंगभद्रा व कृष्णा या दोहोंमध्यें होतें, तेथें जाऊन छापा घातला, आणि पांचशें घोडे व पांच हत्ती आणिले. त्यांकडील कोपळ व बेल्लारी यांचे सभोंवते मोठे मोठे प्रबळ जे दंगा करणारे देसाई व देशमुख होते ते शिवाजीनें वश करून घेतले. शिवाजी कर्नाटकांत होता ते वेळेस मोरो त्रिमळ पेशवे यांजकडे जो मुलूख सोंपविला होता तो युक्तीनें संभाळून तो जंजिऱ्याच्या सिद्दीशीं मोठ्या निकरानें लढत होता. या सिद्दीस मोगलांचा आश्रय असे. ते समयीं त्या ठिकाणीं सिद्दी संबूल होता, तो औरंगजेबानें दूर करून त्याच्या जागीं सिद्दी कासीम नामें दुसरा ठेविला, आणि त्याचे नांवास 'याकूतखान' असें पद जोडिलें; तें पूर्वी सिद्दी संबूल याचेही नांवास होतें.

६. त्या वेळेस विजापूरकरांनीं रजा दिलेले स्वार मोरोपंत ठेवूं लागला; कां कीं, त्यास दिलेरखान येऊन छापा घालील असें भय होतें. परंतु दिलेरखानानें जो दक्षिणेचा बंदोबस्त केला होता, तो औरंगजेबाचे मनास न येऊन त्यानें त्याचा तो अधिकार काढून सुलतान मुआझिमास दिला, आणि मातक्यान् त्यास दक्षिणेंत पाठविलें; परंतु युद्धादिकांचीं कामें दिलेरखानाकडेसच राखिलीं होतीं. त्या वेळेस विजापुरचे मानकरी लोकांत वैमनस्यें पडलीं होतीं; ते लोक आपला मुख्य जो मसाऊद्खान त्याशीं वांकडे होते, आणि मोगलांशीं तर फारच द्वेष करीत असत. असें असतां औरंगजेब याचा वकील विजापुरीं होता, तो मसाऊद्खानाचे स्थापनसमयीं जो करार झाला होता त्याप्रमाणें पादशाह बिबी, अल्ली अदिलशाह याची कन्या मागूं लागला; आणि बोलिला कीं, 'न द्याल तर आमचें लष्कर येऊन राज्य घेईल.' तेव्हां मसाऊद्खान तें मान्य करीना, यास्तव औरंगजेबाचें लष्कर विजापुरावर येऊं लागलें. इतक्यांत ती पादशाह बिबी आपल्या सुशीलतेकरून मनांत समजली कीं, 'मी जर संतोषानें मोगलांस जाऊन मिळालें, तर माझे भावाचे जिवास आणि राज्यास भय नाहीं. ह्मणून दिलेरखान औरंगजेबाचें लष्कर घेऊन येत होता त्यांत ती जाऊन मिळाली. हें वर्तमान सन १६७९ त घडलें. याप्रमाणें तिनें अनर्थाचे शमाविषयीं यत्न केला, परंतु तो उपयोगीं पडला नाहीं. कां कीं, त्या दिलेरखानानें तिच्या बरोबर कांहीं लोक देऊन तिला औरंगाबादेस पाठवून आपण पुढें चालला.

७. अशा संकटसमयीं त्या मसाऊद्खानानें शिवाजीपाशीं मदत मागितली, तेव्हां त्यानें मान्य करून पन्हाळ्यास पुष्कळ स्वार जमा करून विजापुराकडे चाल केली. तो जवळ येऊन पोंहचला तेव्हां त्यास समजलें कीं, 'मोगलांचें लष्कर बहुत मोठें आणि त्यांत पठाण फार आहेत, त्यांपुढें एकाएकीं युद्ध करावयाचा

उपाय नाहीं.' यास्तव तो भीमा उतरून पलीकडे जाऊन मोगलांचे मुलखांत दंगा करूं लागला. मग पुढें जाऊन त्यानें गोदावरीचे उत्तरेस जालना शहर लुटलें. त्या शिवाजीला त्याचे जासुदांनीं जेथें जेथें द्रव्य होतें त्याचा ठिकाणा लावून कळविलें होतेंच, त्यावरून त्या समयीं त्यानें द्रव्याविषयीं पीरांचींही स्थानें सोडिलीं नाहींत; असें तीन दिवस झालें. सुलतान मुआज्जिम ते समयीं औरंगाबादेस होता; त्यानें तेव्हांच त्याचें पारिपत्य करावें, परंतु तें घडलें नाहीं. मग तो शिवाजी तें द्रव्य घेऊन रायगडास जाऊं लागला असतां, संगमनेरास पोंहचला. ते समयीं त्याचे पाठीमागें मोगलांचें सैन्य आलें, तेव्हां तेथें मोठें युद्ध झालें. त्यांत मराठे लोकांचा पराभवच व्हावा, इतक्यांत शिवाजीनें अत्यंत शौर्येंकरून झटून युद्ध केलें आणि त्यांस मागें हटवून आपण वाट चालूं लागला. तो फारसा दूर गेला नाहीं तों आणखी मोगलांचें लष्कर आलें, त्यापुढें त्याचा उपाय चालेना. ते समयीं त्याचे जासुदांनीं मोगलांच्या लष्करास सांपडेनात अशा चोरवाटांनीं नेऊन त्या शिवाजीचें लष्कर वांचविलें, तें पटा किल्ल्यास स्वस्थपणें पोंहचलें. मग मोगलांचें सैन्य औरंगाबादेस माघारें परतलें. त्यानंतर शिवाजीनें चांगला समय पाहून पट्याचे जवळ आसमंतात् किल्ले होते ते घ्यावयाचा उद्योग केला, व तें काम मोरोपंताकडे नेमिलें.

८. शिवाजी पटा किल्ल्यावर असतां मसाऊदखानानें त्याला बहुत आर्जवाचें पत्र लिहिलें कीं, 'तुह्मीं या समयीं कृपा करून मला कुमक केली तरच माझें राज्य राहील. नाहीं तर मोगलांचें कार्य शेवटास जाईल, अवकाश राहिला नाहीं.' तेव्हां शिवाजी लष्करसुद्धां उठून विजापुरीं जाऊं लागला, तेव्हां त्याला वाटेनें असें वर्तमान समजलें कीं, आपला वडील पुत्र संभाजी, ज्यानें ब्राह्मणाची स्त्री बलात्कारें भोगिली ह्मणून जो पन्हाळा किल्ल्यावर बंदींत पडला होता, तो तेथून पळून जाऊन दिलेरखानास मिळाला. यास्तव शिवाजीनें विजापुरीं जावयाचें काम हंबीररावास सांगितलें; आणि आपण संभाजीला माघारां आणावयाकरितां पन्हाळ्याकडे गेला. तो संभाजी दिलेरखानानें मोठ्या प्रीतीनें संभाळिला, आणि औरंगजेबास पत्रीं लिहिलें कीं, 'हा संभाजी आपल्या हातीं लागला आहे; याचें खूळ माजविलें असतां हे दोघे पितापुत्र युद्धें करितां करितां बळहीन होऊन मराठे लोक सहज निस्तेज होतील.' ही कल्पना औरंगजेबाचे मनास आली नाहीं. त्यानें उत्तर पाठविलें कीं, 'असें केलें असतां बंड मात्र वाढेल, तें कामाचें नाहीं.' या उत्तरावरून असें दिसतें कीं, औरंगजेब पहिल्यापेक्षां शाहाणा झाला; परंतु पूर्वीं बंड करणारे मराठे लोक प्रबळ झाले नव्हते तेव्हांच त्यानें आपल्या मुसलमान

लोकांचीं राज्यें रक्षून तीं बंडें मुळींच वाढूं दिलीं नसतीं तर मराठे लोक इतके सामर्थ्यवान झाले नसते. शेवटीं तो औरंगजेब त्या बंडाच्या प्राबल्येंकरूनच नाश पावला. दिलेरखानानें औरंगजेबाकडून पत्राचें उत्तर आलें नाहीं तोंच आपल्या कल्पनेनें वागावयास प्रारंभ केला. तो असा; संभाजीचें नांव 'मराठ्यांचा राजा' असें ठेवून त्याबरोबर आपलें कांहीं सैन्य देऊन शिवाजीचा किल्ला भूपाळगड घ्यावयास त्यास पाठविलें, तेव्हा त्यानें जाऊन तो किल्ला घेतला. हंबीरराव जो लष्करसुद्धां विजापूरकरांचे कुमकेस जात होता, त्याला वाटेनें मोगलांचे स्वार नऊ हजार भेटले, तेव्हां तेथें युद्धप्रसंग होऊन मोगलांच्या स्वारांचा अगदीं पराभव झाला. त्यानंतर हंबीरराव तेथून पुढें जाऊन दिलेरखानाचे लष्कराजवळ राहिला, आणि त्यांस नानाप्रकारें उपद्रव देऊं लागला. मोरोपंत, ज्यास किल्ले घ्यावयाचें काम सांगितलें होतें, त्यानें अहिवंत किल्ला आणि नाहावागड हे दोन्ही घेतले, नंतर आपल्या लष्कराच्या लहान लहान टोळ्या करून अवघ्या खानदेशभर पसरून, त्या लोकांस जेर केलें.

९. दिलेरखान विजापूर घ्यावयाविषयीं फार्च यत्न करीत होता, परंतु लष्करास अन्नादिसामग्री शिवाजीच्या उपद्रवामुळें कमी होऊं लागली, यास्तव उपाय चालेना, तेव्हां निराश होऊन विजापुरचे सभोंवता घेरा घातला होता तो उठवून मुलूख लुटूं लागला. तो कर्नाटक प्रांतांतही जाऊन उपद्रव करूं लागला. तेथें जनार्दनपंत होता त्यानें कोणे एके वेळेस त्या दिलेरखानाजवळ फारशी फौज नाहीं अशी संधि पाहून सहा हजार स्वारांनिशीं जाऊन छापा घातला, तेणेंकरून त्याचा फार नाश झाला, आणि तो पळाला. दक्षिणेंत असें वर्तमान झालें हें ऐकून औरंगजेबानें सुलतान मुआझिमास माघारां बोलावून नेलें, आणि त्याचे जागीं पुनः खान जहानास पाठविलें. त्याच वेळेस दुसरी आज्ञा आली कीं, 'संभाजीस कैद करून दिल्लीस पाठवून द्यावें.' परंतु दिलेरखान संभाजीला अनुकूळ होता ह्मणून ती औरंगजेबाची आज्ञा शेवटास जावयाचे पूर्वींच त्याला पळून जावयास अवकाश सांपडला. मग शिवाजी आणि संभाजी एकचित्त झाले; परंतु संभाजीचा दुष्ट स्वभाव गेल्याची संशयनिवृत्ति होई तोंपर्यंत त्याला शिवाजीनें पन्हाळ्या किल्ल्यावर राहावयाची आज्ञा दिली. शिवाजी ज्या समयीं विजापूरकरांस वश झाला, त्या समयीं असा नेम ठरला होता कीं, कोपळ व बेल्लारी या दोहों ठिकाणांसंबंधीं जो मुलूख आहे तो शिवाजीचे स्वाधीन व्हावा; याखेरीज द्रविडदेशांतील जितका मुलूख शिवाजीनें घेतला होता त्याविषयीं विजापूरकरांनीं स्पर्धा न करावी; आणखी तंजावर वगैरे जितका मुलूख शाहाजीचा कर्नाटकांत जहागीर असेल तितका तसाच असावा.

याप्रमाणें बंदोबस्त झाल्यावर शिवाजी विजापुरीं गेला आणि त्या मसाऊदखानाशीं व त्याशीं एकांत झाला.

१०. शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी, याला असें वाटलें कीं, विजापूरकर शिवाजीला इतके अनुकूळ झाले, त्यास आतां आपला स्वतंत्रपणा राहिला नाहीं. मग तो निरिच्छ झाला आणि राज्यकारभार टाकून विरक्ताप्रमाणें वर्तूं लागला. ते समयीं शिवाजीनें त्याला हितोपदेशार्थ पत्र लिहिलें, त्या पत्रांतील अर्थ खालीं लिहिला आहे. 'तुह्मांकडून फार दिवस पत्र आलें नाहीं. तेणेंकरून आमचे चित्तास सुख वाटेनासें झालें. तुह्मांविषयीं आह्मांस राघोपंतानें लिहिलें आहे कीं, तुह्मी निरिच्छ होऊन पहिल्याप्रमाणें आपल्या शरीरास जपत नाहीं आणि मनोत्साहायोग्य दिवसही मानीत नाहीं. तुमचें लष्कर उगेंच बसलें, आणखी तुह्मी राज्यकारभार टाकून विरक्ताप्रमाणें वागूं लागलां, येणेंकरून मला मोठी चिंता वाटते. आह्मी असें ह्मणतों कीं, आपले वडील किती सावध होते, आणि तुमचा असा स्वभाव कसा झाला, हें तुह्मांस योग्य नव्हे. त्यास आजपासून हें विरक्तपण टाकून स्वस्थपणें प्रजेचें पालन करावें, आणि आपलें सैन्य चांगलें रक्षून उत्तम कामामध्यें मन ठेवावें. सर्व कारभारी यांजपासून चाकरी घेऊन आपली प्रतिष्ठा संभाळावी. जो माझा कनिष्ठ बंधु तूं आहेस त्या तुझी स्तुति मी कानानें ऐकेन तरच मला आनंद होईल. रघुनाथपंत तुह्मांजवळ आहे तो माझ्याप्रमाणें तुमच्या उपयोगीं पडेल. जें करणें तें त्यास विचारून करावें. सारांश, आळशीपणा करूं नये. तारुण्य बहुत उपयोगाचें आहे; यांत वैराग्य कामाचें नाहीं. आतां तुह्मीं सावधपणा धरून मला त्याचा प्रत्यय दाखवावा.'

११. यानंतर शिवाजीचा अंतकाळ समीप आला. तो प्रकार असा; शिवाजी रायगडीं असतां त्याला गुडघी ह्मणून रोग झाला, तो प्रतिदिवशीं वृद्धिंगत होत चालला. मग त्याच्या योगेंकरून मोठा ज्वर आला. ज्वर आल्यापासून सातव्या दिवशीं तो मृत्यु पावला. तो दिवस सन १६८० च्या एप्रिल महिन्याची ५ वी तारीख. तो मेला त्या वेळेस त्याचें वय त्रेपन्न वर्षांचें होतें. शिवाजी मोठा विलक्षण चमत्कारिक पुरुष होता. त्याचीं कितीएक कृत्यें वाईट होतीं, तथापि त्याचे शौर्यादिक गुण या लेखांत असून लेख पूर्ण व्हावा हें उत्तम दिसतें. यास्तव त्याचे गुण पुरतेपणें ध्यानामध्यें यावयाकरितां पहिल्यापासून त्याच्या कृत्यांचा विचार केला पाहिजे. प्रथमतः मावळे लोक अर्धे नग्न आणि अरण्यांत राहाणारे, अशांची संगत धरून त्या शिवाजीनें आपल्या मोठेपणाचे वृद्धीस आरंभ केला. तो असा; त्यानें शीत, उष्ण, पर्जन्य, यांचें सहन करून आपल्या कार्यासाठीं त्या रानवट लोकांचीं

मनें वश करून घेतलीं. याप्रमाणेंच आलेले अर्थ सिद्धीस न्यावयाकरितां ज्या ज्या कल्पना त्यानें योजिल्या, तशा पुढें दुसरा कोणी योजील असें दिसत नाहीं. तो युद्धप्रसंगामध्येंही प्रजेच्या बंदोबस्तांत अंतर पडूं देत नसे. आणखी प्रजांच्या हितासाठीं त्यानें नवे नवे कायदे केले होते. आणि बहुत वेळ संकटसमयीं त्यानें आपला जीव फार युक्तीनें वांचविला. चोरगस्तीनें किल्ला घेणें किंवा मुलूख हस्तगत करणें, आणखी धाकट्या पागांचा बंदोबस्त राखणें, इत्यादि लहानमोठ्या सर्व कामांविषयीं त्याचें चातुर्य सारखें होतें. तो मोठ्या योग्यतेस आला आणि त्याजवळ बहुत द्रव्य झालें तरी त्यानें आपल्या कायद्याखेरीज खर्च केलाच नाहीं. आणि जें विशेष द्रव्य मिळविलें त्यापैकीं शिपाई लोकांस देऊं केलें तें लोभेंकरून आपणास ठेविलें नाहीं. या गुणांवरून असें



शिवाजी महाराज.

वाटतें कीं, तो अद्वितीय पुरुष होता. परंतु राज्यकार्य करण्यांत त्याचे बुद्धीस सरळ मार्गापेक्षां कुटिल मार्ग चांगला वाटे, हा एक, व त्याचप्रमाणें त्यानें कितीएक वेळां आपला क्रूरपणा व घातकपणा प्रसिद्ध करून दाखविला, हा दुसरा, असे हे दोन त्यामध्यें दुर्गुण होते. त्या शिवाजीची स्तुति करणार जे मराठे लोक ते ह्मणतात कीं, तो अवतारी पुरुष होता; तो आपल्या कुटुंबांत केवळ साबडा दिसे आणि भिडस्थपणानें वागत असे; बाहेर तर सर्वांशीं गोड भाषण करी, परंतु कोणाचा वरचढपणा होऊं देत नसे. त्याचा स्वभाव शीघ्रकोपी असे, परंतु तो आपले सोयरेधायरे व पदरचे लोक यांच्या हिताचें फार अगत्य बाळगी. त्याची आकृति लहान होती, आणि त्याचे अंगीं बळापेक्षां चापल्य विशेष होतें. त्याचें मुख सुरेख होतें, त्यावरूनच तो गुणवानसा वाटे; त्याचे उंचीपेक्षां हात लांबीस अधिक होते. त्यानें आपल्या तरवारेचें नांव 'भवानी' ठेविलें होतें. ती तरवार अद्यापि साताऱ्यांत त्याचे वंशपुरुष देवीप्रमाणें पूजितात.

१२. शिवाजीला चौघी स्त्रिया होत्या. एक सईबाई, निंबाळकरांची कन्या; एक सोयराबाई, शिरके यांची कन्या; एक पुतळाबाई, मोहित्यांची कन्या; आणि चवथी एक होती. त्यांत दोघी शिवाजी असतांच मरण पावल्या, आणि सोयराबाई व पुतळाबाई या दोघी होत्या. त्यांत पुतळाबाई शिवाजीच्या मरणानंतर महिना

दीड[1] महिन्यानें सती गेली. सोयराबाईचा पुत्र राजाराम. संभाजीची आई सई-बाई, ती अगोदरच मेली होती. शिवाजीचे मरणापूर्वी अण्णाजी दत्तो व मोरोपंत वगैरे कोणी मोठे मोठे लोक जवळ असतां शिवाजी बोलिला कीं, 'माझ्या मरणा-नंतर संभाजीच्या दुष्ट स्वभावेंकरून राज्यास अपाय होईल असें दिसतें.' ही गोष्ट सोयराबाईस कळली तेव्हां तिचे मनांत आलें कीं, संभाजीस एकीकडे करून आपला पुत्र राजाराम ह्याच तक्ताधिपति करावा. यास्तव तिनें सर्व प्रधान वश करून घेतले. त्यावरून ते प्रधान ह्मणाले कीं, 'राजाराम लहान आहे तोंपर्यंत त्याचे नांवें आह्मी राज्यकारभार चालवूं.' ही मसलत सिद्धीस न्यावयाकरितां जनार्दनपंत सुमंत यास पन्हाळे किल्ल्यास लष्करसुद्धां पाठविलें, आणि रायगडास शिबंदी नवी ठेविली; आणिकही लष्कराचा कांहीं बंदोबस्त ठेविला. त्या वेळेस पन्हाळ्यावर संभाजीच्या बंदोबस्तास जो हिरोजी फर्जंद होता, त्यास या साऱ्या मसलतींचें पत्र पाठविलें. तें जासूद किल्ल्यांत नेऊन देत असतां संभाजीचे हातीं लागलें, तेणेंकरून त्याला सर्व विदित झालें. तेव्हां त्यानें तेथची शिबंदी वश करून घेतली, आणि जे तेथें मुख्य सरदार दोघे होते, त्यांस जिवें मारून आपण किल्ल्याचें स्वामित्व करूं लागला; आणि कोणी शत्रुमित्र न जाणतां किल्ल्याचा बंदोबस्तही ठेवूं लागला, तेव्हां जनार्दनपंत सैन्यासहित आला. त्यानें किल्ल्यासभोंवता घेरा मात्र घातला, आणि तेथें उगाच महिना दोन महिने राहून शेवटीं आपण जाऊन कोल्हापुरास राहिला. इतक्यांत रायगडीं राजारामास तक्ताधिपति करून राज्यकारभार चालविला. तो सुमार सन १६८० मे महिना. नंतर थोडक्याच दिवसांनीं पेशवे आणि सचीव यांमध्यें वैमनस्य पडलें. इकडे पन्हाळ्यावर संभाजी होता त्यानें जनार्दनपंताचे लष्करांतले कितीएक लोक वश केले. आणि आपल्या किल्ल्यांतील कितीएक मावळे लोक बरोबर घेऊन रात्रीस त्या लष्करांतून कोल्हापुरास जाऊन जनार्दनपंतास धरून पन्हाळ्यावर नेलें. हें वर्तमान मुलखांत प्रसिद्ध झालें तेव्हां हंबीरराव सेनापति संतुष्ट होऊन बोलिला कीं, 'हा शिवाजीचा पुत्र खरा.' मग तेव्हांपासून त्या सेनापतीनें त्या संभाजीची चाकरी धरिली. तसाच मोरोपंतही त्यास अनुकूळ झाला. हंबीरराव संभाजीचे भेटीस गेला तेव्हां तो पन्हाळा सोडून रायगडीं जावयास निघाला. तो तेथें जाऊन पोंहचला नाहीं तोंच तेथील शिबंदीनें त्याचें अगत्य

---

१. दीड महिन्यानें सती जावयाचें कारण असें; शिवाजी मरण पावला हें वर्तमान त्याचे कारभारी यांनीं संभाजीस न कळावें ह्मणून गुप्त रक्षिलें. त्याचाच कोणी भाऊबंद साबाजी भोंसला नामें होता, त्याचे हातून त्याचें दहन वगैरे अत्यंत गुप्तपणें करविलें.

धरिलें, आणि इतरही लष्करें त्यास राजी झालीं. तो संभाजी सन १६८० च्या जून महिन्यांत रायगडीं दाखल झाला.

---

## भाग दहावा.

### ( इसवी सन १६८० पासून सन १६८९ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. संभाजी राज्य घेत असतां त्यानें काय काय निर्दयपणा केला.—२. त्यानें खांदेरीपासून सिद्दीला हांकून द्यावयाचा उद्योग केला, परंतु तो व्यर्थ गेला.—३. औरंगजेबाचा पुत्र सुलतान महंमद अकबर तो आपल्या संरक्षणार्थ संभाजीजवळ राहिला, मग त्या संभाजीचा सावत्र भाऊ राजाराम यास अधिपति करून संभाजीला काढावा असें त्याच्या जवळच्या लोकांनीं योजिलें, त्यावरून संभाजीनें कितीएक लोक जिवें मारिले.—४. त्यानें सिद्दीच्या जंजिऱ्यास घेरा घातला, आणि उठून गेला; मग पोर्तुगीज लोकांशी युद्ध करूं लागला.—५. त्याचा वजीर कलुषा याची गोष्ट; पूर्वी शिवाजीचे वेळेस जो लष्करचा बंदोबस्त होता तसा संभाजीचे राज्यांत चालिला नाहीं; त्याचा परिणाम कमा झाला ते प्रकरण.—६. औरंगजेब दक्षिणेंत आला त्या वेळेस देशाचा प्रकार काय होता तो.—७. औरंगजेब अहमदनगरास आला त्या वेळचें त्याचे संपत्तीचें स्वरूपकथन केले तें प्रकरण.—८. मोगलांचे लष्करानें काय आचरण केलें ते.—९. विजापूर मोगलांनीं घेतले तो प्रकार; त्यावर ते राज्य बुडून शहर ओस पडलें.—१०. पहिला झालेला सल्ला मोडून गोवळकोंडे औरंगजेबानें घेतलें, त्यावरून ते राज्य बुडालें.—११. हंबीरराव मराठा सेनापति शिरजीखानास जिंकून आपण मरण पावला तो प्रकार.—१२. कर्नाटकांत काय काय वर्तमान झाले तें.—१३. संभाजी केवळ अयोग्य असें समजून सुलतान महंमद अकबर निघून गेला.—१४. नंतर दक्षिणदेशाची दुर्दशा झाली ते प्रकरण.—१५. इंग्रेज लोकांनीं समुद्रांत उपद्रव केला तो प्रकार.—१६. संभाजी आपल्या वजीरासुद्धां औरंगजेबाचे कैदेत सांपडला.—१७. त्या दोघांचें मरण.

१. संभाजी, शिवाजी मेला असें कळल्यावर केवळ पराक्रमेंकरून वागूं लागला. त्यावरून लोक कल्पना करूं लागले कीं, आतां यानें आपले दुर्गुण टाकिले, आणि त्याप्रमाणें त्याची स्तुतिही होऊं लागली. परंतु तो रायगडीं पोंहचतांच त्याचें क्रूरपण लोकांत प्रसिद्ध झालें. तें असें; अण्णाजी दत्तो यास बिडी घालून बंदींत ठेविलें, आणि त्याची सारी दौलत घेतली; आणखी आपला सावत्र भाऊ राजाराम यालाही बंदींत ठेविलें, आणि त्याची आई सोयराबाई, तीस आपल्या समूर आणून नानाप्रकारें अमर्याद शब्द बोलून असें ठरविलें कीं, 'हिनें आपला नवरा विष घालून मारिला, त्यास आतां हिला हाल करून मारावें;' अशी आज्ञा केली, तेणेंकरून ती मरण पावली. मग जे तिजकडचे सरदार होते त्यांचीं डोकीं मारिलीं, आणि एक सरदार फारच तिच्या अगत्याचा होता त्याचा कडेलोट केला. अशा क्रूरपणानें तो लोकांच्या मनांतून उतरला, तेव्हां ते लोक 'याचा प्रारंभच अपशकु-

नाचा' असें ह्मणूं लागले. मग सन १६८० च्या आगष्ट महिन्यांत त्याला राज्याभिषेक झाला, त्यापासून मुलखांत लोकांसही अपशकुन दिसूं लागले.

२. संभाजीस राज्याभिषेक झाल्यावर प्रथम त्यानें जंजिऱ्याच्या सिद्दीशीं युद्ध केलें. तें युद्ध पूर्वीं शिवाजी असतांही निरंतर चालत होतें. मुंबईचे जवळ लहान लहान दोन बेटें आहेत. एकाचें नांव उंदेरी आणि एकाचें नांव खांदेरी. त्यांत उंदेरी बेटावर शिवाजीनें आपल्या मरणाचे पूर्वीं एक वर्ष किल्ला बांधिला होता, तो शिवाजीपासून घ्यावयास सिद्दी उद्युक्त झाला, परंतु तो अर्थ सिद्धीस गेला नाहीं. नंतर दुसऱ्या खांदेरी बेटावर सिद्दीनें किल्ला बांधिला, तो घ्यावयाचा उद्योग शिवाजीनें केला, तोही सिद्धीस गेला नाहीं. असे ते दोघे किल्लेदार लढत होते.

३. सन १६८१ त संभाजी पन्हाळ्यास जाऊन राहिला. तेथें त्यास असें वर्तमान समजलें कीं, औरंगजेबाचा पुत्र महंमद अकबर हा बंड करून बापाशीं लढणार होता. तें बापास कळलें तेव्हां तो पळून आपणाकडे आश्रय मागावयास आला असें पाहून आपला कोणी मोठा मानकरी त्याचे भेटीस पाठवून त्याची धोंडसें गांवीं राहावयाची सोय केली; परंतु आपण कांहीं कामानिमित्तें गेला नाहीं. इतक्यांत अण्णाजी दत्तो याच्या पक्षपाती लोकांनीं त्या महंमदाशीं राजाराम याच्या हिताविषयीं संभाजीच्या घाताची कांहीं मसलत केली. तें वर्तमान संभाजीस कळलें तेव्हां त्यानें महंमदास अपराधी जाणलें. इतक्यांत त्यानेंच संभाजीला कळविलें कीं, 'इकडे याप्रमाणें वर्तमान आहे.' तेव्हां संभाजी मोठ्या समारंभानें त्याचे भेटीस गेला. मग त्यानें अण्णाजी दत्तो व शिरके कुळांतील जे मुख्य सांपडले ते व परभू बाळाजी आवजी चिटणीस व त्याचा पुत्र व त्याचा दुसरा कोणीएक भाऊबंद, इतके हत्तीचे पायीं दिले. यानंतर शिरके कुळांतील जे कोणी मोठे मोठे राहिले, ते भयेंकरून पळाले, आणि कितीएक मोगलांच्या चाकरीस राहिले. त्याच्या अशा अन्यायकर्मांनीं सारे लोक त्यास कंटाळले. कां कीं, अण्णाजी दत्तो शिवाजीचे वेळेस बहुत उपयोगीं पडला, आणि तो जातीचा ब्राह्मण होता. असें असतां त्याचा जीव घेतला हें चांगलें केलें नाहीं. त्या वेळेस संभाजीचे जवळ हिंदुस्थानांतून आलेला एक कनोजा ब्राह्मण कलुषा नामें होता, तो गुप्तपणें संभाजीस मसलत देत असे, त्याप्रमाणें संभाजी वागे. त्यानें शिकविलें कीं, 'मोरोपंत पिंगळा पेशवा यास बंदीस घालावें. कां कीं, त्यानें अण्णाजी दत्तो याच्या मरणावरून तुमची फार निंदा केली, आणि आपणही कंटाळला आहे.' त्या समयीं रघुनाथ नारायण हणमंते हा आपलें संस्थान दुसऱ्यास संभाळावयास सांगून कर्नाट-

कांतून निघून संभाजीचे भेटीस रायगडीं आला. त्यानें आपल्या बरोबर कांहीं वसुलाचें द्रव्य आणिलें होतें ह्मणून संभाजी त्याच्या सन्मानास मोठें दरबार जमा करून त्यास भेटला. तो रघुनाथ नारायण मोठा धैर्यवान् होता, त्यानें त्याच समयीं अनीतीविषयीं संभाजीस निषेधिलें, आणि बोलिला कीं, 'जर तुह्मी पुरातन सेवकांचा असा घात कराल, तर लवकरच नाश पावाल.' तो रघुनाथ नारायण एवढ्या धैर्यानें बोलिला या गोष्टीचें आश्चर्य वाटेलच, कां कीं त्याचा भाऊ जनार्दनपंत संभाजीचे बंदींत होता तरी तो भ्याला नाहीं. परंतु विचारेंकरून पाहिलें असतां संभाजीस अशी शंका होती कीं, जर यास कांहीं उपद्रव केला तर कर्नाटक प्रांत हातचा जाईल. यास्तवच त्यानें जनार्दनपंत व मोरोपंत पिंगळे यांस सोडिलें, आणि रघुनाथ नारायणाचा सन्मान करून त्यास कर्नाटकांत जाऊं दिलें. तो जातांना वाटेनेंच मृत्यु पावला, तरी जनार्दनपंताला संभाजीनें त्याचे जागीं स्थापिलें. याशिवाय संभाजीनें त्या वेळेस कर्नाटकचा हरजी राजा, जो रघुनाथ नारायणानें आपल्या जागीं ठेविला होता तो तसाच रक्षिला. यावरून संभाजीचें आचरण कांहींसें बरें दिसूं लागलें, परंतु तें टिकलें नाहीं; त्या कलुषाच्या संगतीनें नष्ट झालें.

४. संभाजी आणि महंमद अकबर यांची मैत्री झाली त्या वेळेस लोक कल्पना करूं लागले कीं, हा औरंगजेबाचें राज्य घेऊन महंमदास स्थापील, परंतु त्यानें आपल्या नीचपणाप्रमाणें केवळ क्रोधवश होऊन गर्विष्ठपणानें मोठीं मोठीं कामें टाकून सिद्दीचा अतिद्वेष करावा हेंच मोठें कार्य असें मानून जंजिरा मात्र घ्यावयाविषयीं बहुत श्रम केले, परंतु तोही अर्थ सिद्धीस गेला नाहीं. त्यानंतर त्यानें लढाऊ गलबतें जमा करून सिद्दीच्या लढाऊ गलबतांशीं युद्धें केलीं. त्यांतही ठाण्याचे खाडीजवळ संभाजी पराभव पावला. तेव्हां तो क्रोधयुक्त होऊन तेथें इंग्रेज व पोर्तुगीज लोक होते, त्यांस बोलूं लागला कीं, 'तुह्मी माझा पक्ष स्वीकारीत नाहीं, आणि माझ्या शत्रूला आश्रय देतां, यास्तव तुह्मीही शत्रुच आहांत.' हें वर्तमान सन १६८२ त घडलें. नंतर पोर्तुगीज लोकांचे गांवांस तो उपद्रव देऊं लागला. आणि मुंबईच्या वांकणांत घारापुरी नामें एक बेट आहे तेथें मुंबईस उपद्रव करावयाकरितां किल्ला बांधूं लागला; परंतु त्यास असें वर्तमान समजलें कीं, औरंगजेब मोठ्या तयारीनें येतो आहे; तेव्हां तें काम तसेंच राहिलें.

५. संभाजीच्या कारकीर्दींत मोरोपंत पिंगळा बंदीस घातल्यावर मुख्य कारभारी कलुषा झाला. पुढें बंदांतून सुटल्यावर मोरोपंत लवकरच मेला. कलुषाशिवाय संभाजी दुसऱ्याचें ऐकत नसे; आणि त्याचे वगीवांचून कोणी समूर आला अ-

सतां त्यावर रागें भरून त्याचें पारिपत्य करी. संभाजी इतका त्या कलुषाच्या स्वाधीन झाला त्यावरून लोक ह्मणत कीं, 'यास कांहीं तरी पक्कें वशीकरण साधलें आहे.' त्या कलुषास लोक फार निंदीत असत; तो मनमिळाऊ आणि कवि असे. परंतु राज्यकारभारास अयोग्य होता. त्यास संभाजीनें प्रधानांमध्यें 'पंडितराव' असें पद दिलें. प्रधान असा दुष्ट आणि राजा या प्रकारचा घातकी, तेणेंकरून शिवाजीचे वेळेस जे बंदोबस्त होते ते सर्व मोडूं लागले. त्यांत प्रथमतः लष्करचा बंदोबस्त बिघडला. तो असा; जे लष्करचे चाकर शिपाई लोक होते, त्यांखेरीज लोकांतही ज्याच्या मनास येईल त्यानें स्वारी निघाली ह्मणजे बरोबर जावें. कोणास कांहीं लूट सांपडली असतां त्यानें ती संभाजीला कळवूंच नये, आणि लष्करामध्यें आपल्या बायकाही बरोबर न्याव्या, आणखी लोकांच्या बायका धरून नेऊन विकाव्या. स्वारी माघारी आली ह्मणजे लोकांस पैका द्यावयास मिळत नसे ह्मणून लूट करायाची तो आज्ञा देत असे.

६. संभाजी भलत्याच जागीं खर्च करी, त्यामुळें थोडक्याच दिवसांत खजीना संपला; तेव्हां त्या कलुषानें त्यास बुद्धि शिकविली कीं, 'स्वारी केल्यानें द्रव्य मिळत नाहीं, तर रयतेपासून वसूलच अधिक घ्यावा.' तेव्हां त्यानें तसेंच केलें; परंतु जमाबंदीचे वेळेस असें समजलें कीं, शिवाजीचे वेळेपेक्षां जितका चढ केला तितका तोटा आला. त्यावरून तो समजला कीं, यांत सुभेदार व पाटील व जमेदार इत्यादिकांचें कांहीं कृत्रिम आहे. यास्तव त्यांस दूर करून सर्व कामें मखत्यानें सांगितलीं. तेव्हां रयतेनें त्रासेंकरून गांव टाकिले. येणेंकरून संभाजीच्या राज्यांत नाशाचा प्रवेश झाला. याखेरीज त्याच वेळेस औरंगजेब दक्षिण घ्यावयाकरितां दिल्लीहून बऱ्हाणपूरपावेतों आला होता. तें वर्ष सन १६८३. त्या वेळेस गोवळकोंडेकरांचें व विजापूरकरांचें काय काय वर्तमान होतें तें समजलें पाहिजे. हैदराबादेंत अबू हुसेन बादशाह होता; त्याजवळ द्रव्य बहुत आणि सेना मोठी होती. त्याचा कारभारी फार शहाणा हिंदु ब्राह्मण मादण्णापंत नामें होता. तो त्या राज्यांत जितके हिंदूलोक होते त्यांस अत्यंत प्रिय वाटे, परंतु तेथच्या मुसलमानांस तो जातीचा ब्राह्मण आणि डोयजड ह्मणून फारच विषम वाटे. याखेरीज औरंगजेबाच्या वकिलांनीं तेथच्या कारभारी लोकांत वैमनस्यें पाडिलीं. तथापि अबू हुसेन त्या मादण्णापंताची योग्यता जाणून त्यावांचून दुसऱ्याचा विश्वास धरीत नव्हता. यापूर्वी गोवळकोंड्याचें राज्य ह्मटलें आहे तें हैदराबादचें असें समजावें. विजापुरास औरंगजेबाचा वकील होता, त्याचें नांव मलिक बेरखोरदार. त्यानें त्या दरबारचे कितीएक कारभारी व कितीएक सरदार लोक वश केले, त्यांमध्यें एक मुसलमान शिरजीखान नामें सरदार होता; तो

त्या सर्वांपेक्षां प्रतापी होता. त्याशीं पूर्वीं मसाउदखानाचें सेनेसंबंधें कांहीं वांकडें पडलें होतें. ह्मणून त्यानें एक सैय्यद मखदुम मानकरी यास मसाउदखानाचे जागीं स्थापावयाची योजना केली होती. तो मसाउदखान राज्यकारभार टाकून शिवाजी मेल्यावर एका वर्षानें विजापूर सोडून आंदोणीस जाऊन राहिला होता; तेव्हां तेथचा राज्यकारभार कोणीं चालविला तें कळत नाहीं; परंतु इतकें समजतें कीं, औरंगजेबाच्या वकिलानें विजापूरकर व मराठे लोक यांशीं स्नेह नसावा ह्मणून शिवाजीनें घेतलेला कृष्णेचे कांठचा मुलूख होता तो त्यांस माघारा घ्यावयास शिकविलें, त्यावरून त्यांनीं फौज पाठवून तो मुलूख घेतला, तेणेंकरून त्यांचे स्नेहांत तूट पडली. असें त्या वकिलाचें कृत्य शेवटास न जातें तर, हैदराबादचा कारभारी मादण्णापंत याचे बुद्धीस आलें होतें कीं, हे दोन्ही एकचित्त करून औरंगजेबाचें कांहीं चालूं देऊं नये; ती मसलत उपयोगास पडती, परंतु तें न घडलें. याखेरीज विजापुरचे राज्याच्या नाशाचें कारण आणीक एक झालें, तें असें; शिवाजी असतां त्या मसाउदखानानें कितीएक स्वार दूर केले, ते शिवाजीकडे जाऊन राहिले. तो निवर्तल्यावर ते संभाजीजवळ होते; त्याच वेळेस विजापुरचे मनसबदारही कितीएक संभाजीकडे राहिले होते. असेच मराठे मनसबदार जे निजामशाहींत होते त्यांचे कितीएक भाऊबंद संभाजीच्या लष्करांत चाकरीस राहिले होते. यावरून ते कितीएक लोक आपल्या वतनासाठीं निरंतर भांडत, आणि त्या वादाकरितां जो सबळ पक्ष असेल तिकडे मिळून वतन घ्यावयाचा अभिमान शेवटास न्यावा ह्मणून कितीएक आपला धर्मही टाकीत असत. औरंगजेब बऱ्हाणपुरास येऊन कितीएक महिने मुलखाच्या वसुलाचा बंदोबस्त करणें व हिंदूलोकांवर जिझिया[१] नामें कर बसविणें व दक्षिणेंत स्वारी घालणें याची तयारी करीत होता. प्रथम त्यानें सुलतान मुआझिम यास 'शाह आलम' असें मोठें पद देऊन संभाजीच्या मुलखांतील दक्षिणेकडचा मुलूख घ्यावयास पाठविलें; आणि त्याचे उत्तरेकडे खानदेशलगत्याचे किल्ले व मुलूख घ्यावयास सुलतान आझीम यास पाठविलें, आणि आपण बऱ्हाणपूर सोडून औरंगाबादेस आला. मग सुलतान मुआझिम यानें आंबेदरी घाटानें कोंकणपट्टींत जाऊन कल्याण परगण्यांतील रायगडपासून वेंगुर्लें व मालवणपर्यंत मुलूख लुटून जाळून टाकिला. सुलतान आझीम सालेरी किल्ला घ्यावयास गेला, त्याचे हातीं तो किल्ला दग्यानें सहज लागला; परंतु पुढें त्याचें कांहीं कार्य सिद्धीस गेलें नाहीं तोंच औरंगजेबानें त्यास माघारां बोलावून त्याचे जागीं शाहाबूदीनखान नामें दुसरा सरदार पाठविला. तो फार गर्वानें आला, परंतु जय न पावून, राम-

---

१. जिझिया कर म्हणजे, ज्याजवळ हजार रुपये त्यानें वर्षास साडेसहा रुपये द्यावे.

शेज किल्ल्याजवळ त्याचा फार नाश होऊन तो मागें हटला. इतक्यांत सुलतान मुआझिम आपण मुलूख ओस पडिल्यामुळें आणि संभाजी विशाळगडीं होता त्याच्या लोकांच्या उपद्रवामुळें उपाशीं मरूं लागला. तेव्हां औरंगजेबानें शाहाबूदीनखान यास घाटाच्या वाटा मोकळ्या करावयास पाठविलें, आणि सुरतेचा मुख्य जो अधिकारी होता त्यास आज्ञा केली कीं, 'गलबतांत दाणा भरून दंडाराजपुरी व वेंगुर्लें यांस पोंहचता करावा.' तें निकडीचें काम ह्मणून त्या सुरतवाल्यानें एकेक गलबत भरून पाठविलें. तें वर्तमान संभाजीच्या लढाऊ गलबतांस कळून यांनीं तीं गलबतें बहुतेक लुटलीं, त्यांतलीं कांहींशीं गलबतें जाऊन पोंहचलीं तितक्यानें साहित्य पुरेसें झालें नाहीं, ह्मणून सुलतान मुआझिम सैन्यासुद्धां आंबेघाट चढून जाऊन कृष्णेचे कांठीं वळवें गांव एथें पर्जन्यकाळीं राहिला. हें वर्तमान सन १६८४ त घडलें. जो शाहाबूदीनखान सुलतानाचे कुमकेस पाठविला, त्याची व संभाजीची गांठ पडली, तेव्हां त्या दोघांचें कांहींसें युद्ध होऊन शाहाबूदीन जय पावला. हें वर्तमान औरंगजेबास कळून तो मोठा लाभ नसतांही शाहाबूदीन त्याचे कृपेंतला ह्मणून व त्याजवळ अस्सल मोगल होते त्यांचें मन संतुष्ट करावें ह्मणून त्या शाहाबूदीनाचा मोठा सन्मान करून त्यास 'गाजीउद्दीन' असें नांव दिलें. त्यापुढें दक्षिणेंत जें 'निझामउल्मुल्क' नामें कुळ विख्यात झालें, त्याचा तो शाहाबूदीनखान मूळपुरुष.

७. मग पाऊसकाळ गेल्यानंतर औरंगजेब दक्षिणेंत मोठ्या समारंभानें चालूं लागला. तेव्हां त्यानें आपल्या राज्यांतल्या सर्व प्रांतांतील सैन्य बहुत जमा केलें होतें. त्यांत उत्तरेकडचे लोक यांचीं शरीरें मोठीं आणि अंगांतून चिलखतें चढविलेलीं, तीं जड लोखंडाचीं, व त्यांचे घोडेही मोठे उंच आणि पुष्ट होते. दक्षिणी लोक त्यांपुढें केवळ सुकुमार दिसत. तसेच पायदळामध्यें कितीएक चापांचे बंदूकवाले, व कितीएक तोड्यांचे बंदूकवाले व कितीएक तीरकमानवाले असत. त्याचा सरंजाम बहुत उत्तम होता, आणि लहान व मोठ्या अशा तोफा पुष्कळ होत्या; गोलंदाजांमध्यें फिरंगी होते; याखेरीज कितीएक ओझीं वहावयाचे व कितीएक लढाऊ असे हत्तीही बहुत होते. त्या औरंगजेबाचा दिल्लीमध्यें बेत चालत होता त्यांत किमपि अंतर न पडतां प्रवासांतही तसाच चालत होता. त्याचा शिकारखानाही बरोबर होता. त्याच्या डेऱ्याच्या सभोंवतीं लावावयाची कनाथ चोविसशें हात लांब होती. त्याच्या कचेरीच्या डेऱ्यांत व एकांतीं मसलत करावयाच्या डेऱ्यांत, त्याचें बसावयाचें रत्नजडित सुवर्णाचें अत्यंत सुंदर सिंहासन मांडलेलेंच असे. याखेरीज विषयोपभोगार्थ जनानखान्याचे कितीएक डेरे असत, आणि स्नानसंध्येंसारिखें त्या लोकांचें कांहीं निमाज वगैरे

नित्यकर्म आहे, त्या कामाचेही कितीएक डेरे वेगळे होते. तितक्या ठिकाणींही विलायती सखलादांच्या व मखमालेच्या चादरा व गर्दपोस वगैरे असत, व नानाप्रकारचीं जरीचीं मोठीं मोठीं उंच वस्त्रें पुष्कळ होतीं. त्यांत जावयाचे वाटेवर दोहीं बाजूंनीं तोफा ओळीनेंच उभ्या केलेल्या असत, त्यांमधून आंत जातांना पहिला डेरा नगारखान्याचा लागावा; त्याहून पुढें गेलें ह्मणजे खासगीच्या चौकीच्या लोकांची पहारा करावयाची जागा. त्या कामावर नित्य नवा उमराव जात असे. त्याचे भोजनसंबंधीं डेरे वेगळे असत, व मेवामिठाई खावयाचा व पाणी गार करून ठेवावयाचा व विडे खावयाचा या सर्व प्रकरणीं निरनिराळेच असत. याप्रमाणें त्याचा वाटेनें सरंजाम होता. हें ऐकून आश्चर्य वाटेल, परंतु असें समजावें कीं, असेच त्याचे लहान मोठे सर्व सरंजाम दुहेरी होते. तेणेंकरून त्याची स्वारी कधीं मुक्काम सोडून दुसरे मुक्कामीं गेली असतां कोणत्याही गोष्टीची त्यास न्यूनता नसे. स्वारी मुक्कामीं येऊन पोंचली ह्मणजे पन्नास तोफा सोडाव्या असा त्याचा नेम होता. याखेरीज तो आपल्या राजधानींत असतां त्याच्या ज्या ज्या रीती चालत होत्या त्या त्या मार्गानेंही सर्व तशाच चालत असत. त्यास अशी संपत्ति असून तो स्वयें सर्व विषयांचा उपभोग लौकिकार्थ गरिबाप्रमाणें करी, तेणेंकरून त्याची प्रजा त्यास फार मानीत असे. याप्रमाणें खटलें त्यानें प्रवासांतही बरोबर चालविलें, त्यावरून त्याचे सरदारही आपआपलें खटलें वाढविते झाले. त्या योगानें लष्कराचा पसारा भारी होऊन खर्च फार लागूं लागला, यास्तव थोडक्याच काळानें द्रव्याचा तोटा आला, आणि लष्कराची कोणतीही मसलत त्वरेनें होईनाशी झाली.

८. सुलतान मुआझिम वळव्यामध्यें राहिला असतां त्या गांवाचे जवळचा आसमंतात् जितका मुलूख त्याचे हातीं लागला तितका त्यानें घेतला. त्या दिवसापासून विजापूरकरांनीं दिलेल्या वतन वगैरेच्या सनदांत त्यानें आपलें नांव मात्र घातलें आणि पूर्वीच्या नेमाप्रमाणें तें सर्व चालविलें तें हा काळपर्यंत चालत आलें. त्या सुलतान मुआझिमाचे लष्करांत पर्जन्यकाळाचे शेवटीं कांहीं रोगेंकरून लोक बहुत मेले, तेणेंकरून लष्कर कमी झालें. असें असतांही बादशहाची अशी आज्ञा आली कीं, 'विजापूरकरांचा शिवाजीनें घेतलेला नैर्ऋत्य दिशेचा मुलूख संभाजीकडे आहे तो सर्व घ्यावा.' असें लिहिणें येतांच तो तेथून निघून गेला, आणि त्यानें गोकाक व धारवाड व हुबळी हीं तिन्हीं घेतलीं. आणखीही मुलूख घ्यावा, परंतु रोगामुळें माणसांचा तोटा पडला; आणि त्या घेतलेल्या मुलखांत जागोजाग रक्षणार्थ माणसें ठेवून त्यांस आपलेंच संरक्षण करावयाचें कठीण पडलें; यास्तव कंटाळून तो माघारा अहमदनगरास आला. हें वर्तमान सन १६८५ त घडलें. त्याच वर्षीं सं-

भाजीचा हंबीरराव कोंकणांत लष्करसहित होता. त्यास वर्तमान कळलें कीं, खानदेशांत कोणी रक्षक नाहीं. त्यावरून त्यानें लष्कराच्या लहान लहान टोळ्या करून उत्तरेकडे जाऊन ते सर्व लोक बऱ्हाणपुरावर एके जागीं मिळविले आणि तें शहर लुटलें; तेथें त्यास बहुत द्रव्य मिळालें. नंतर तो तेथून माघारा येतांना त्यानें बऱ्हाणपुरापासून नाशिकापर्यंत मुलूख लुटून जाळून टाकिला. तेव्हां औरंगाबादेहून खान जहान नामें सरदार आला तो त्याचे पाठीस लागला, परंतु त्याची व याची गांठ पडली नाहीं. त्यापुढें कांहीं एक महिने गेल्यानंतर औरंगजेब लष्करसुद्धां सोलापुरास गेला, आणि जुन्नरास जें लष्कर मोगलांचें होतें तें औरंगाबादेस पाठविलें, तेणेंकरून उत्तरेची वाट मोकळी सांपडली ह्मणून मराठे लोकांनीं मोठ्या त्वरेनें तापी व नर्मदा उतरून जाऊन भडोच लुटली. त्या वेळेसही तेथचें द्रव्य ते स्वस्थपणें आपल्या मुलखीं घेऊन गेले; आणि त्याबरोबर जो महंमद अकबर होता, त्याला बादशाहाचें पद देऊन 'हाच बादशाह; औरंगजेब बादशाह नव्हे,' असें लोकांत प्रसिद्ध केलें. बऱ्हाणपूर व भडोच हीं दोन्हीं औरंगजेबाच्या असावधतेमुळें लुटली गेलीं. कां कीं, तो दुसरीं राज्यें घ्यावयाचा उद्योग करीत असतां त्यानें आपल्या राज्याचा बंदोबस्त चांगला ठेविला नाहीं.

९. औरंगजेबाचे मनांत पूर्वींपासून फार दिवस होतें कीं, विजापूरकरांचें राज्य बुडवावें, यासाठीं त्यानें सन १६८६ च्या प्रारंभीं आपला पुत्र आझीमशाह याचे बरोबर सैन्य देऊन विजापुरावर पाठविला. त्याचे आदले वर्षी तेथें पर्जन्य कमी पडला, तेणेंकरून त्या मुलखीं पीक थोडें झालें होतें, तेंही त्यांनीं जमा करून किबाल्यांत नेलें, ह्मणून आझीमशाह याचे लष्करास अन्न मिळेनासें झालें. तेव्हां दशाह यानें सोलापुराहून पाठवावें, परंतु तें घडेना; कां कीं, तिकडेही तोटा पडला होता. याखेरीज विजापूरकरांचे लष्करी लोक आझीमशाहाच्या लष्करावर स्वाऱ्या घालीत, त्यामुळें त्या लष्कराचा फार नाश झाला. असें पाहून बादशाहानें अहमदनगरास गाजीउद्दीन सरदार होता, त्यास आज्ञा केली कीं, 'वीस हजार बैल गोण्या भरून त्यांबरोबर खुद्द तुह्मी सैन्यासुद्धां जाऊन विजापुरावर सुलतान आझीमास पोंहचत्या कराव्या.' अशी आज्ञा होतांच तो तेथून धान्य घेऊन निघाला. तें वर्तमान विजापूरकर यांस कळलें, तेव्हां त्यांनीं तो बेत सिद्धीस गेला असतां आपणास बाधक होईल असें जाणून त्यांवर सैन्य पाठविलें. त्या दोन्ही लष्करांची गांठ पडतांच मोठें युद्ध होऊन विजापूरकर पराभव पावले, तेणेंकरून आझीमशाह याजवरचें मोठें अरिष्ट टळलें. त्याची बायको जानी बेगम नामें होती, ती त्या लष्क-

---

१. तें सोलापूर पूर्वी सुलतान आझिमानें घेतलें होतें.

राबरोबर त्याकडे जात होती; ती त्या लढाईत हत्तीवर बसून मध्यें शिरून आपल्या लोकांस धीर देत असे; हा एक त्या युद्धांत मोठा चमत्कार झाला. यानंतर औरंगजेबही विजापुरास येऊन पोंचला. तें शहर मोठें विस्तीर्ण, यास्तव सर्व सैन्यानें त्याचा तट वेष्टिला. नंतर त्यानें तो कोट ढांसळावयाकरितां जागोजाग मोरचे लावून खिंडारें पाडिलीं, परंतु हल्ला केला नाहीं. कां कीं, त्यास असें पक्कें समजलें होतें कीं, 'या लोकांस अन्न मिळेनासें झालें ह्मणजे, थोडकेच दिवसांनीं कंटाळून आपल्या आपण किल्ला देतील.' शेवटीं त्याच वर्षाच्या आक्टोबर महिन्यांत त्यांनीं आपल्या संतोषानें किल्ला दिला. औरंगजेबानें सरजेखान नामें एक विजापूरकरांचा मोठा सरदार होता, त्याला मोठी मनसब देऊन 'रूस्तुमखान' असें त्याचें नवेंच नांव करून तो आपल्या चाकरीस ठेविला. त्याखेरीज त्याचे दुसरे जे कोणी मोठे मोठे सरदार होते तेही ठेविले. यानंतर असें तें राज्य बुडतांच तेथचे राहाणारे लोक लागलेच निघून गेले, आणि शहर ओस पडलें. त्या नगराचा तट चिरेबंदी आहे, तो अद्यापि नवा केल्यासारिखा दिसतो; आणखी त्यांत मोठे मोठे मनोरे व उंच उंच घुमट आहेत, ते फार दुरून दिसतात. तेथें जाणारांस तें शहर बाहेरून पाहून असें वाटतें कीं, एथें वस्ती मोठी दाट आहे; पण आंत जाऊन पाहिलें असतां जिकडे तिकडे कोस कोसपर्यंत ओसाडी आणि मोठमोठ्या हवेल्या मोडक्या, त्यांतून रानें वाढलेलीं दृष्टीस पडतात, तेणेंकरून चित्त उदास होतें. तेथें राहाणारे लोक केवळ गरीब, आणि ती वस्ती अगदीं थोडी; त्या शहराचा घेरा पंधरा कोसांचा; त्याच्या मध्यभागीं किल्ला आहे. त्याला दुहेरी तट आणि त्या सभोंवता खंदक आहे. त्या किल्ल्यांत मुख्य बादशाहाची राहावयाची जागा पुरातन बांधलेली अतिसुंदर आहे, ती आतां मोडलेली दिसते. शहराभोंवता एकेरी कोट, व त्याचे बाहेरून खंदक आहे.

१०. असा विजापुराचा नाश करून औरंगजेबानें गोवळकोंड्याच्या नाशाविषयीं उद्योग केला. त्यापूर्वीं नुक्ताच सुलतान मुआझिमानें त्याशीं सल्ला केला होता, तो न मानितां त्यानें अयोग्य केलें. तें असें; त्याचा वकील तेथें होता त्यास लिहिलें कीं, 'अबू हुसेनास कांहीं भयप्रदर्शन करून त्यापासून कांहीं द्रव्य व अलंकारादिक आह्मासाठीं घ्यावें.' त्यावरून त्यानें त्याप्रमाणें केलें. तेव्हां त्यानें भिऊन आपल्या बायकोच्या अंगावरच्या दागिन्यांसुद्धां जामदारखान्यांतले सर्व अलंकार

---

१. ते शहर बाजीरावाचें राज्य गेल्यापासून साताऱ्याच्या राजाचे स्वाधीन झाले. त्यापासून त्याने आपल्या मातबरीप्रमाणे तेथचा काही बंदोबस्त करून त्यातील उत्तम स्थळांची दागदुजी केली. त्यात महमद अदिलशाह याची कबर आहे, तिचा १३४ हात उच आणि ८१ हात रुंद घुमट आहे.

व द्रव्य आपणास बादशाहा प्रसन्न होईल अशा आशेनें दिलें. तथापि औरंगजेबानें तें सर्व घेऊन युद्धाची तयारी केली; आणि मुलखांत असें प्रसिद्ध केलें कीं, 'अबू हुसेन बादशाहाचे पदवीस केवळ अयोग्य. कारण त्यानें आपल्या जातीखेरीज ब्राह्मण मुख्य प्रधान केला, आणि आमचा धर्म न मानणारा असा जो संभाजी त्याशीं सख्य केलें, यास्तव आह्मी त्याशीं युद्ध करणार.' हें वर्तमान सन १६८७ त घडलें. त्या समयीं अबू हुसेनाजवळचे कितीएक लोक त्यास सोडून गेले, आणि कोणी इमानी चाकर होते ते मात्र थोडकेसे त्याजवळ राहिले. मग तो अबू हुसेन त्या राहिलेल्या लोकांसहवर्तमान गोवळकोंड्यांत राहून सात महिनेपर्यंत मोठ्या शौर्येंकरून लढला; शेवटीं तो किल्ला मोगलांनीं दगा करून घेतला, आणि त्या अबू हुसेनास धरून दौलताबादेच्या किल्ल्यामध्यें औरंगजेबानें बंदींत ठेविलें. तो मेल्यावर 'प्रौढप्रतापी; सदय, तानाशाह' असें त्याचें नांव पडलें. त्याचें मूळ काय तें आतां समजत नाहीं. परंतु असें वाटतें कीं, कोणीएक हुसेनाचा अत्यंत हितकर्ता ह्या नांवाचा त्याचा गुरु असावा. पूर्वीं औरंगजेब गोवळकोंड्यास घेरा घालूं लागला, ते समयीं विजापुरास त्यानें आपला एक फौजदार[1] ठेविला होता; आणि दुसरा फौजदार कासीमखान नामें कृष्णेचे दक्षिणेस पाठविला; आणि विजापूरकरांचा पहिला चाकर सरजेखान नामें होता, तो संभाजीला जिंकावयास नेमिला; दुसरा एक गाजीउद्दीन होता तो विजापुरचे आग्नेयी दिशेस योजिला. अशा प्रकारें विजापूर व गोवळकोंडें यांसंबंधें मुलूख आपल्या हातीं लागावा ह्मणून औरंगजेबानें यत्न केला. त्याच्या फौजदारांनीं काय काय केलें तें वर्तमान आधीं लिहून मराठे लोकांचें वर्तमान पुढें लिहिण्यांत येईल. मोगलांचा सरदार गाजीउद्दीन यास आंदोणी किल्ल्यांत विजापूरकरांचा पुरातन मुख्य कारभारी मसाउदखान होता, त्यानें युद्ध करून परिणाम नीट होणार नाहींसा जाणून तो किल्ला दिला, परंतु औरंगजेबाचे चाकरीस राहिला नाहीं. विजापूर व कुलबर्गा या दोहोंमध्यें सगर नामें किल्ला आहे, तेथें एक बारा हजार बेरडांचा नाईक पाळेगार होता. तो किल्ला मोठा बळकट असे, आणि त्याचे सभोंवतीं झाडी व दाट रान बहुत होतें; असें असतांही त्या नाइकानें मोगलांचें नांव ऐकतांच भिऊन किल्ला दिला. त्या औरंगजेबाची रीति अशी होती कीं, कोणीं आपल्या संतोषेंकरून संस्थान दिलें तर त्याचा मोठा सन्मान करावा. ह्मणून त्यानें मोठे मोठे लोक व मनसबदार हंसतील हें मनांत न आणितां त्यास मनसबदाराचे पदवीस चढविलें.

---

१. फौजदार ह्मणजे ज्यास लष्करांत चाकरी असून प्रांतांतील वसुलाची जमाबंदी त्याचे हातून होत असावी.

नंतर तो बेरड थोडकेच दिवसांनीं कांहीं आजार होऊन मृत्यु पावला. त्याचा पुत्र पेम नाईक, त्यास मोठमोठ्या माणसांत वागणें ठीक पडेना, यास्तव तो त्यांतून निघून वांकिणकेरा गांवीं राहून पाळेगारपणा करूं लागला. त्यापुढें विसां वर्षांनीं असें झालें कीं, एवढा मोठा औरंगजेब, परंतु त्यासही त्याच्या पारिपत्याकरितां स्वारी करावी लागली. ती त्याची शेवटची मोहीम. गोवळकोंडें घेतल्यानंतर बादशाहाचें लष्कर विजापुराकडे येऊन उतरलें. मग तेथून चहुंकडे राज्याच्या संपूर्ण बंदोबस्तास निरनिराळ्या स्वाऱ्या नेमिल्या, या योगेंकरून व पूर्वीं ज्या स्वाऱ्या पाठविल्या होत्या, त्यांमुळें गोवळकोंड्याचे पूर्वेचा मुलूख व राजमंद्री शहर व बंदर मछलीपट्टन व बंदर गंजम हीं त्याचे स्वाधीन झालीं, आणि खडापा व कुंजविराम व पुनामाळी यांचे कारभारी येऊन मिळाले. यांखेरीज विजापूर व गोवळकोंडें यांसंबंधी जो मुलूख कर्नाटकांत होता, तोही बादशाहाचे हातीं लागला. मोगल लोक यांनीं जेव्हां नवा प्रांत हस्तगत केला, तेव्हां ज्या प्रकारें त्यांनीं प्रजापालन केलें, तो प्रकार असा कीं, फौजदार यानें लष्कराचें काम संभाळावें, आणि शहरामध्यें चोरादिकांचा उपद्रव होऊं नये. त्यास सरकारचे वसुलापैकीं चौथाई देत असत. दुसरा 'खालसा दिवाण' नामें एक कारभारी होता, त्यानें सर्व जमाबंदीची चौकशी करावी. त्याकडे लष्करसंबंधी काम नव्हतें. औरंगजेब असा मुलूख घेत असतां संभाजीनें स्वतां कांहींच उद्योग केला नाहीं, त्यावरून त्या वेळचे लोक कल्पना करूं लागले कीं, 'कलुषाचे जादूगिरीमुळें तो उगाच राहिला;' परंतु असें नव्हे, तो संभाजी आपले दुष्ट स्वभावेंकरून आणि मद्यपानाच्या व्यसनेंकरून अप्रयोजक झाला होता; तो एखादे वेळेस सावध होई. त्या समयीं त्याच्या वडिलांचे वेळेचे शहाणे मनुष्य त्याचे चाकरीवांचूनही त्याजपाशींच राहिलेले होते, परंतु त्या कलुषाचे भयानें आणि याचे अव्यवस्थितपणेंकरून ते आपआपले ठिकाणीं उगीच राहिले.

११. जेव्हां औरंगजेबानें विजापूर घेतलें, तेव्हां तेथचे सर्व मराठे मनसबदार यांनीं त्यास पत्र लिहिलें कीं, 'आह्मी तुमचे चाकरीस राहावयास सिद्ध आहों.' तेव्हां औरंगजेबानें त्यांस आज्ञा केली कीं, 'संभाजीला जिंकावयास जो सरजेखान पाठविला आहे, त्यास वांईपाशीं जाऊन मिळावें.' सरजेखान आला तो वांईस पोंचला, परंतु ते लोक संकेताप्रमाणें आले नाहींत. तेव्हां संभाजीचा हंबीरराव सेनापति यानें त्यास जिंकिलें, परंतु त्याच युद्धांत तो मरण पावला. याप्रमाणें मराठ्यांचा जय झाल्यानंतर त्यांनीं स्वाऱ्या करून विजापुरसंबंधी कांहींएक मुलूख घेतला, आणि त्यांतील कांहीं स्वार औरंगजेब गोवळकोंड्यास घेरा घालीत होता तेथें जाऊन पों-

चले, परंतु युद्ध न करितां मागें फिरले. याखेरीज संभाजीनें मोरो त्रिमळ पिंगळे याचा भाऊ केसोपंत पिंगळे पेशवा मुख्य सरदार याच्या हाताखालीं संताजी घोरपडे देऊन कर्नाटकांत पाठविला. नंतर त्यानें, 'हरजीराजा महाडीक यास मिळून शाहाजीच्या जहागीरसंबंधी कर्नाटकांतील व्यंकोजी भोंसले याजकडे मुलूख आहे तो घ्यावा,' अशी आज्ञा केली होती ह्मणून, तें लष्कर जिंजीपर्यंत पोंचलें.

१२. तिकडे व्यंकोजी पूर्वींच समजला कीं, आपणास वडिलाची जहागीर संभाजी जिरूं देणार नाहीं, ह्मणून, तें लष्कर आलें नाहीं तोंच त्यानें ह्मैसूरचा चिकदेव नामें राजा यास तीन लक्ष रुपयांना बंगलोर शहर विकत देऊं केलें. तें वर्तमान जिंजीस पोंचलें तेव्हां ते लोक अशी इच्छा करूं लागले कीं, तो अर्थ सिद्धीस गेला नाहीं तोंच आपण जाऊन शहर घ्यावें. असेंच मोगल लोक इच्छीत होते. अशा समयीं केसोपंत व त्याचा पुतण्या निळोपंत या दोघांचा कांहीं कज्जा होऊन मराठे लोक लवकर पोंचले नाहींत. इतक्यांत मोगल जाऊन पोंचले, त्यांनीं तें शहर घेऊन त्या राजाला तीन लक्षांस विकलें. तेव्हां मराठे लोक तें बंगलोर हातीं लागत नाहींसें समजून ह्मैसूरप्रांतीं जाऊन तेथची खंडणी घेत कांहीं महिने राहिले. नंतर मोगलांनीं गोवळकोंडें घेतलें. असें त्यांचें प्राबल्य जाणून ते माघारें जिंजीस गेले. नंतर सन १६८८ त हरजीराजा यास कळलें कीं, मोगलांस मोठे मोठे जहागीरदार व मनसबदार मिळाले, त्यावरून तो भ्याला, आणि केसोपंताशीं त्यानें सख्य केलें. मग त्या दोघांनीं जाऊन कांहीं मुलूख घेतला, परंतु मोगल येतात, आणि आपल्या मंडळींत वैमनस्यें पडलीं आहेत, असें समजून तो घेतलेला मुलूख सोडून पालियार नदीचे कांठीं कितीएक महाडिकांचे किल्ले होते तेथें जाऊन राहिले. यानंतर त्याच वर्षीं कर्नाटकचा बहुतां दिवसांचा हुस्कोटा परगणा होता, तो ह्मैसूरच्या राजानें व्यंकोजीपासून घेतला. त्या वेळेस संभाजीचें लष्कर जवळच होतें, परंतु त्यानें व्यंकोजीला कुमक केली नाहीं; कां कीं, मराठे लोक भाऊबंदकीसंबंधी भांडत असले, ह्मणजे द्वेषास्तव ते आपला नाश किती जरी झाला तरी होऊं देतात, हा त्यांचा जातिस्वभाव आहे. अशा द्वेषामुळें कर्नाटकांत गेलेले मराठे लोक बळहीन होऊं लागले. इकडे देशामध्येंही ते लोक एकचित्त नसतां त्यांचें राज्य दुसऱ्या कांहीं कारणानें राहिलें, नाहीं तर तेव्हांच तें बुडून औरंगजेबाची मसलत सिद्धीस जाती, आणि मराठे लोक पूर्वींप्रमाणें अप्रसिद्ध झाले असते.

१३. संभाजीनें राज्यकारभारांत चित्त ठेविलें नव्हतें. तो विशाळगडास अथवा पन्हाळ्यावर किंवा संगमेश्वरीं एक बाग होती तेथें राहून काळक्रमण करी, आणि

त्याचा वजीर कलुषा राज्यकारभारापेक्षां संभाजीची मर्जी संभाळावयास फार जपत असे. आणखी जो याचा आश्रय करून राहिला होता, आणि ज्यानें समयविशेषीं यास कांहीं वर्तमान कळवून याचें मोठें हित केलें, तो महंमद अकबर, याच्या स्वभावास कंटाळून त्यानें याला सोडिलें; आणि राजापुराजवळ एका इंग्रेजाचे जहाजावर बसून पारसी लोकांचें एक इस्पहान नामें शहर आहे, तेथें जाऊन त्या बादशाहाचा आश्रय करून वीस वर्षें त्यापाशीं राहून सन १७०६ त तेथेंच मृत्यु पावला.

१४. शिवाजीच्या मरणापासून लष्कराचा बंदोबस्त बिघडून अव्यवस्था झाली. तो प्रकार उत्तरोत्तर वृद्धिंगत झाला, तेणेंकरून संभाजीचें राज्य बुडूं लागलें. तें संभाजीस हितकारक नव्हतें, परंतु मुलखांत बंडें उत्पन्न व्हावयास मोठें उपयोगीं झालें. कां कीं, ज्याजवळ भाला व घोडा असे, तो त्या मराठे लोकांत शिरून एकाच दिवसाचे लुटीनें द्रव्यवंत होई. याप्रमाणें जिकडेतिकडे बहुत दिवस युद्ध-प्रसंग पडल्यामुळें इतकी फौज जमा झाली कीं, मुलखाचा सर्व वसूल रोजमुऱ्यास पुरेना; यास्तव तिला रजा द्यावी लागली. तींत लोक बहुतकरून मराठे होते, ते शिवाजीच्या पराक्रमेंकरून व राज्यांत किल्ले पुष्कळ या योगेंकरून व आपले जातीचे मराठे नामांकित फार आणि त्यांस बुद्धि शिकविणोरे ब्राह्मण, यास्तव गर्वास चढले असत. आणखी एक वर्तमान असें होतें कीं, हिंदूच्या मनुष्यमात्रीं मोगल आपला कर बसविणार, ह्मणून मराठे मोगलांशीं वांकडे होते; ही गोष्ट सिद्ध करावयास औरंगजेबाला सामर्थ्य होतें; कां कीं, त्याजवळ द्रव्य बहुत व फौज मोठी आणि सर्व मुलखांतील वर्तमान त्यास विदित होत असे; आणि कोणासही पदास चढवावयाची शक्ति त्यास होती, परंतु स्वजातीचा व स्वधर्माचा अभिमानी, आणि गर्विष्ठ होता, ह्मणून त्याची ती शक्ति हितोपयोगी झाली नाहीं. त्यास बंडांच्या बळाचा सुमार सांपडला नव्हता. तीं बंडें आपण स्थापिलेल्या राजांचे हातूनच त्यानें मोडवावीं, तें न करितां बहुत दिवसांचीं संस्थानें बुडूं दिलीं, आणि त्यांचे जागीं दुसरे कोणी न स्थापितां गर्वेंकरून असें मानिलें कीं, आपणच सर्व संभाळूं; आणि त्यानें आपले जवळच्या कितीएक लोकांसही रजा दिली; तेव्हां ते तत्काळ जाऊन बंडाला मिळून त्याचे शत्रु झाले. याखेरीज कितीएक अमलांवर ब्राह्मण ठेवावयाचे, त्या जागीं त्यानें आपल्या जातीचे मुसलमान ठेविले; तेणेंकरून जी अव्यवस्था झाली, ती त्याला आटोपेना. जे त्याचे जातीचे आर्जवी होते ते त्याची कीर्ति वर्णीत, परंतु ब्राह्मण व मराठे लोकांतील जे श्रेष्ठ होते ते समजले कीं, आतां मोगल लवकरच बळहीन होईल. तेव्हां मोठे मोठे मानकरी डफळे, व घाटगे, व माने, व निंबा-ळकर, वगैरे सर्व मिळून आपल्या शिबंदींसहवर्तमान बंडास अनुसरले. ते समय-

विशेषीं मोगलांस अनुकूल किंवा प्रतिकूल होत असत. ते बंड करणारे सर्व लोक संभाजी व मानकरी यांचे पदरचे होते, यास्तव त्या वेळेस पेंढार बहुत नव्हतें. त्या वेळेस मोगलांच्या फौजदारांची शिबंदी जागोजाग होती ती फुटकळ लुटारूंचा उपाय चालूं देत नव्हती. जे फुटकळ लुटारू तेंच पेंढारी. ते समयीं असें झालें कीं, मराठे मानकरी लोकांनीं औरंगजेबाकडे वकील पाठवून त्यास असें समजाविलें कीं, 'आह्मी जन्मभर तुमचे सेवेविषयीं तत्पर असूं.' परंतु त्याच्या मुलखांत लोक पाठवून ते मुलूख लुटीत असत. तें कदाचित् प्रकट झालें असतां वकिलांकडून तेथच्या कोणा मोठ्या माणसास लांच देऊन छपवीत. बादशाहानें फौजदारांस आज्ञा केली होती कीं, 'मराठे मानकरी चाकरींत वागत असतां त्यांचा मान रक्षावा.' इकडे मानकरी फौजदारांशीं स्नेहाच्या गोष्टी सांगत आणि तिकडे वकील तर बादशाहाचे दरबारीं त्यांनीं केलेलीं कृत्यें छपवीत, तेणेंकरून त्यांचे मुलूख निरुपद्रव असत; आणि जेव्हां ते मोगलांच्या मुलखीं जाऊन लूट करीत, तेव्हां त्यांस समजे कीं, हे मराठे आहेत, परंतु कोणाकडचे तें समजत नसे. याशिवाय औरंगजेबानें दक्षिणेंत कितीएक अंमलदारांस फौजेच्या खर्चास मुलूख आपलें स्वामित्व ठेवून दिला होता, तेथचा वसूल पुरेसा येईनासा झाला, ह्मणून ते लोक लांच, लूट इत्यादि दुष्ट कर्मैं करून पैका जमा करूं लागले; तेणेंकरून देशाची दुर्दशा झाली. मोगलांच्या राज्यांत अशी रीति होती कीं, एखादी वतनी जहागीर रिकामी झाली, आणि तिचा अधिपति दुसरा केला, तर उपभोगार्थ सनदपत्र दिल्याचे पूर्वीं त्यापासून साडेसाहा वर्षांचें उत्पन्न अगोदर घ्यावें; त्यांत चौथाई प्रथम घेऊन बाकी ऐवज हप्तबंदीनें घेत जावा. याप्रमाणें सरकारांत द्यावें लागे. खेरीज दस्तुरी, दरबारखर्च वगैरेच्या निमित्तेंकरून कारभारी लोक पैका फार घेत होते. अशा अनीतीमुळें हा अनर्थ झाला कीं, निरंतर वतनास जप्ती इत्यादि उपद्रव होऊं लागले, तेणेंकरून लोक बेजार झाले. बादशाहा वृद्धदशेनें अशक्त झाला होता, त्याला पहिल्याप्रमाणें चौकशी राखवेना. त्यानें एखादी आज्ञा केली असतां लिहिणारांनीं त्या कामासही वर्ष वर्ष लावावें, अशी बंडाळी विजापूर व गोवळकोंडें घेतल्यापासून बारा वर्षेपर्यंत होती. नंतर तीं सर्व अनर्थांचीं कारणें वृद्धिंगत होऊन मोगलांचें राज्य नाश पावूं लागलें. जसें उत्तम प्रकारें बांधलेलें मोठें उंच घर प्राचीन असलें तरी बाहेरून चांगलें दिसतें, परंतु आंतून जीर्ण दशेस पावलें असतें. त्याला दागदुजी करून उपयोग नाहीं; कां कीं, तें आपल्या जीर्णतेनेंच, पुढें थोडक्याच दिवसांनीं पडावयाचें, असें तें राज्य झालें होतें. औरंगजेब विजापुरीं एक वर्ष लष्करसुद्धां राहिला होता; त्यानें ज्या फौजा तेथून चहूंकडे पाठविल्या होत्या, त्या जय पावल्या. त्यांत संभाजीच्या मुल-

खांत मात्र बळकट बळकट कितीएक किल्ले राहिले होते, तेही घ्यावयास औरंगजेब कांहीं सिद्धता करीत होता, ती अशी कीं, जेणेंकरून ते किल्ले निश्चयें हातीं लागावे. इतक्यांत त्याचे फौजेंत कांहीं मोठा रोग उत्पन्न होऊन फार लोक मेले, तेव्हां तो बेत राहून अकलूज नामें शहर निरेचे कांठीं आहे तेथें जाऊन राहिल्यावर तो रोग गेला. असें सन १६८९ त घडलें.

१५. त्याच सुमारें समुद्रांत इंग्रेज लोक उपद्रव करीत होते, ह्मणून औरंगजेबानें तिकडे मन लाविलें, आणि त्यांच्या व्यापाराचीं कितीएक स्थानें त्याच्या मुलखीं होतीं तीं जप्त केलीं, व जंजिऱ्याचा सिद्दी याकूतखान यास आज्ञा केली कीं, 'मुंबईतून इंग्रेजांस घालवून दे.' त्यानें जाऊन माजगांव व शींवचा किल्ला व माहीम घेतलें; आणि मुंबई किल्ला घ्यावयास नऊ दहा महिने झटला, परंतु कांहीं उपाय चालेना. शेवटीं इंग्रेज लोकांचें व औरंगजेबाचें कांहीं बोलणें होऊन तो निघून गेला.

१६. औरंगजेब अकलुजेस जाऊन राहिल्यावर बहुत वेळां मराठे लोकांचे उपद्रवाचें वर्तमान त्याला कळलें. त्यांत नाशिकाजवळ मोठा जमाव जमला होता, त्याच्या पारिपत्यास तिकडे फौज होती ती पुरेना, तेव्हां औरंगजेबानें त्या बंदोबस्ताकरितां आपला पुत्र आझिमशाह याजबरोबर फौज देऊन रवाना केला; आणि आसदखान वजिराचा पुत्र यातिकादखान याजबरोबर दुसरी फौज देऊन कोंकण घ्यावयास पाठविला, आणखी कोल्हापूर परगणा घ्यावयास अबू हुसेनाचा तकरीबखान नामें कोणी एक मोठा सरदार होता तो, त्यास तेथची फौजदारी द्यावयाचा करार करून, पाठविला. त्यापूर्वींच कोल्हापूरसंबंधी जो सोपा मुलूख तो मोगलांनीं घेतला होता; परंतु पन्हाळा आदिकरून अवघड जागीं मराठे लोक होते ते हस्तगत झाले नाहींत. तकरीबखान तेथें जाऊन तो सर्व ठिकाणांची बातमी घेत असतां असें त्याला समजलें कीं, संभाजी थोडकेसे लोक बरोबर घेऊन केवळ असावधपणें संगमेश्वरीं राहिला आहे. त्यावरून त्यानें त्यास धरून आणावें असा बेत केला. नंतर तो आपला पुत्र इखलासखान व मोठे मोठे अत्यंत विश्वासू असे थोडकेच स्वार व वाटाडे बरोबर घेऊन कोल्हापुरांतून मोठ्या धैर्येंकरून निघाला, तो संभाजीच्या लोकांस बातमी कळूं न देतां संगमेश्वराजवळ पोंचला. तेव्हां संभाजीच्या जासुदांनीं त्यास वर्तमान कळविलें कीं, 'मोगल जवळ आला.' ते समयीं तो मद्यपानेंकरून उन्मत्त झाला होता, यास्तव तो त्यांस ओरडून बोलिला कीं, 'मूर्खहो, अशी वेडेपणानें कां बडबड करितां ? मुसलमान काय येणार आहेत ? असें फिरून बोलिलां तर मी तुमचीं नाकें कापीन.' इतकें झाल्यावर थोडक्याच वेळांत तकरीबखानाचा पुत्र कांहीं

स्वारांसहित मोठ्या त्वरेनें बापाच्या पुढें घोडा पिटाळीत संभाजीच्या वाड्यांत जाऊन पोंचला; ते वेळेस जे लोक तेथें सांपडले ते मारून टाकिले. इतक्यांत मागून तकरीबखानही आला, तेव्हां उरलेले लोक बहुतेक पळाले, परंतु कलुषाजवळ कांहीं होते, ते संभाजीच्या रक्षणार्थ लढूं लागले; मग कलुषास तिराची जखम लागतांच तेही पळाले. ते समयीं संभाजी सावध होऊन आपला वेष बदलून तेथून निघावयास सिद्ध झाला, परंतु त्याच्या अंगावर मोठे उंच उंच अलंकार होते ते त्याला टाकवेनात, त्यामुळें हाच संभाजी असें समजून त्यास धरिलें. त्याबरोबर कलुषा आणि दुसरे चोवीस असामी धरले गेले. मग तकरीबखानानें त्यांस कोल्हापुरीं नेऊन औरंगजेबास कळविलें. नंतर तेथून आज्ञा झाली कीं, 'त्यांस बहुत बंदोबस्तानें हुजूर आणावें.' तेव्हां बादशाह अकलुजेहून निघून इंद्रायणी व भीमा यांच्या संगमाजवळ तुळापुरीं[१] जाऊन उतरला होता, तिकडे तकरीबखानानें त्यांस नेलें. ते लष्कराजवळ पोंचल्यावर सारे बंदिवानांस मुसक्या बांधून उंटांवर बसवून बरोबर वाद्यें वाजवीत लष्करांतून बादशाहाचे हुजूर नेलें. त्यांना पाहून औरंगजेबानें आज्ञा केली कीं, 'आतां कैदेंतच असूं द्यावें, मग विचार करून यांच्या अन्यायानुरूप पारिपत्य केलें जाईल.' नंतर ते तसेच कैदेंत ठेविले.

१७. त्यापुढें मोगलांत जे श्रेष्ठ मनुष्य होते त्यांनीं बादशाहास असें समजाविलें कीं, 'संभाजीचा जीव रक्षावा, तेणेंकरून त्याच्या राज्यांतले अवघड किल्ले सर्व आपल्या हातीं येतील.' ही मसलत औरंगजेबाच्याही मनास येऊन त्यानें संभाजीला निरोप पाठविला कीं, 'तूं मुसलमान हो ह्मणजे तुझा जीव वांचेल.' त्यावर त्यानें उत्तर दिलें कीं, 'बादशाहाला सांगा, जर तूं आपली कन्या देशील तर बाटेन. असे दुष्ट जे तुह्मी मुसलमान लोक त्या तुमच्या पैगंबरास धिक्कार असो.' मग तो आपलीं अन्यायकर्मे स्मरून पश्चात्ताप पावून जे जवळ बंदोबस्तास मोगल होते त्यांस नानाप्रकारें शिव्या देऊं लागला. त्या अशा कीं, ज्यायोगें त्यांतला एखादा क्रोधेंकरून मारीलच. तें उत्तर औरंगजेबास समजतांच त्याला बहुत राग येऊन त्यानें अशी आज्ञा केली कीं, 'त्याला लष्कराच्या बाजारांत नेऊन प्रथम त्याचे डोळे लोखंडाचे डागणीनें भाजावे, नंतर जीभ कापावी, मग डोकें मारावें.' अशी आज्ञा होण्याचें

---

१. तुळापुराचें पहिलें नांव 'नागरगांव' होतें. मग शाहाजीच्या मनांत आलें कीं, हत्तीचें वजन किती असतें तें पाहावें, ह्मणून तेथें नदीमध्यें नावेंत हत्ती घालून त्याच्या भारानें जितकें नावेच्या आंगाला पाणी लागलें तितकी खूण करून हत्ती काढून त्या खुणेबरोबर पाणी येई तोंपर्यंत दगड घालून त्या दगडांचें वजन केलें. ती हत्तीची तुळा झाली. त्या दिवसापासून त्या गांवाचें नांव 'तुळापुर' ठेविलें.

कारण केवळ बादशाहाचा रागच नव्हे, असें केलें असतां हिंदु लोकांत दहशत पडेल, असेंही त्याचे मनांत होतें. त्यावरून त्याला तुळापुरींच लष्कराच्या बाजारांत नेऊन आज्ञेप्रमाणें मारून टाकिलें. त्याचा वजीर कलुषा तोही त्याबरोबरच मारिला. हें वर्तमान सन १६८९ त घडलें. संभाजीची गोष्ट लिहिली आहे त्यावरून असें दिसतें कीं, त्यामध्यें कांहींसें शौर्य होतें, आणि चातुर्य नेमस्तच असेल. परंतु हे त्याचे गुण क्रूरपणानें आणि व्यसनेंकरून व्यर्थ गेले. असें वाटतें कीं, तो जर आणखी कांहीं काळ वांचता, तर आणखीही पापच करता. तो मेल्याचे



पूर्वींच तीन वर्षें त्याच्या जातीचे मराठे लोक त्याला कंटाळले होते; परंतु ज्या समयीं त्याच्या मरणाचा प्रकार समजला, ते समयीं तो शिवाजीचा पुत्र यास्तव सर्वांस वाईट वाटून क्रोध आला. औरंगजेब तर चिंतीत होता कीं, हिंदूंत दहशत पडावी; परंतु तें सिद्ध न होतां केवळ द्वेष मात्र वाढला.

---

## भाग अकरावा.

### ( इसवी सन १६८९ पासून सन १७०७ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. मराठ्यांनीं रायगडीं मसलत करून संभाजीचा पुत्र शिवाजी तो प्रौढ होईपर्यंत राजाचा सावत्रभाऊ राजाराम तो धनी केला.—२. मोगलांनीं रायगड घेतला, तेथें संभाजीची स्त्री येसूबाई व पुत्र शिवाजी हीं उभयतां सांपडली, तीं त्यांनीं औरंगजेबाकडे नेलीं.—३. राजाराम जिंजीस गेला तेथें त्यानें शिवाजीप्रमाणें अष्टप्रधानादि करून आपलें माहात्म्य वाढविलें.—४. मोगलांनीं जिंजीस घेरा घातला; तें काम कांहीं निमित्तानें राहिलें.—५. मराठे मोगलांच्या मुलखीं घांसदाणा घेऊं लागले, तन्निमित्त औरंगजेब ब्रह्मपुरी जाऊन राहिला.—६ इंग्रेज लोक व पोर्तुगीस लोक यांचें कांहीं वर्तमान.—७. संताजी व धनाजी हे उभयतां कर्ना-

१. शिवाजीची स्त्री सोयराबाई मेल्यापासून तिचा पुत्र राजाराम यापासून आपणास कांहीं विघ्न न व्हावें ह्मणून संभाजीनें त्याला रायगडीं बंदींत ठेविलें होतें. पुढें कांहीं दिवसांनीं त्याची स्त्री मृत्यु पावली, नंतर आणखी दोन करून दिल्या. पहिली ताराबाई, मोहत्यांची कन्या; दुसरी राजसबाई, कागलकर घाटगे यांची मुलगी. राजाराम बंदींत होता त्याच किल्ल्यावर संभाजीची स्त्री येसूबाई व पुत्र शिवाजी असत; त्या उभयतांशीं तो राजाराम पूर्वींपासूनच स्नेह करीत होता. पुढें संभाजी मेल्यावर मराठ्यांचे मुख्य मानकरी होते त्या सर्वांनीं मिळून येसूबाईच्या विद्यमानें रायगडीं मसलत ठरविली कीं, 'शिवाजी प्रौढ होई तोंपर्यंत, राजाराम धनी करावा.' ते समयीं मुलाचें वय साहा वर्षांचें होतें. त्याचेंच पुढें 'शाहू' असें नांव पडलें. त्या मसलतींत मानकरी होते त्यांचीं नांवें;—जनार्दनपंत हणमंते; प्रन्हाद निराजी, तो न्यायाधीशाचा पुत्र; रामचंद्रपंत बावडेकर; खंडो बल्लाळ चिटणीस; महादाजी नाईक पानसंबळ; संताजी घोरपडे; धनाजी जाधव; आणि खंडेराव दाभाडे. असें आहे कीं, संकटसमयीं थोर लोक एकत्र मिळून विचार करितात, त्यांत उत्तम बुद्धिमान् असतो तो सर्वांचीं चित्तें स्वाधीन करून घेतो, मग ते सर्व त्याचे आज्ञेप्रमाणें वागूं लागतात. तसेंच या आठांमध्यें प्रन्हाद निराजीची बुद्धि विशाळ होती. ती अशी कीं, तेथें नानाप्रकारचीं संकटें असतां, त्यानें स्वस्थचित्तेंकरून संपूर्ण बंदोबस्त केला. तीं संकटें अशीं कीं, जामदारखान्यांत द्रव्य नव्हतें, आणि कोठींतलें धान्यही सरलें होतें, व लष्कराचा बंदोबस्त नाहींसा झाला होता, आणखी शत्रूंचें प्राबल्य; याप्रमाणें अडचणी असून त्यानें प्रथम किल्ल्यांत शिबंदी ठेवून शिवाजीच्या रीतीप्रमाणें बंदोबस्त केला, आणि

कोठींत दाणा भरला. त्यानंतर असा नेम ठरला कीं, शत्रूंच्या बातमीदारास ठिकाणा न लागावा ह्मणून राजारामानें सर्वदा एके ठिकाणीं राहूं नये. रायगडापासून विशाळगडपर्यंत जे शिवाजीचे बांधलेले किल्ले आहेत, तेथें चाळून पाळून राहावें. अशी मसलत झाल्यावर येसूबाई पुत्रासुद्धां रायगडींच राहिली, आणि राजाराम कुटुंबसुद्धां विशाळगडास गेला. ते समयीं लष्कराच्या सरदारांस आज्ञा झाली कीं, 'काळानुरूप सावधपणानें वर्तावें, आणखी स्वार लोक यांनीं बहुतकरून राजाराम यापासून दूर राहूं नये.'

२. ते समयीं मोगलांचें लष्कर औरंगजेबानें कोंकण घ्यावयास पाठविलें होतें, त्यानें पर्जन्यकाळ गेल्यावर रायगडास येसूबाई व तिचा पुत्र शिवाजी आहेत अशी बातमी घेऊन किल्ल्यास घेरा घातला. तेव्हां त्याचे कुमकेस जंजिऱ्याचा सिद्दीही आला होता. त्यांनीं तेथें कितीएक महिने श्रम केले परंतु कांहीं उपाय चालेना. शेवटीं कोणीएक मराठा शिवाजीचे वेळेचा जुना चाकर होता; त्याला वांईच्या देशमुखीसंबंधानें कांहीं खटल्यानिमित्त राग येऊन त्यानें कितीएक निवडक मावळे लोक हाताखालीं घेऊन मोगलांशीं सख्य करून वांईच्या देशमुखीविषयीं करार करून घेऊन, त्यास भेद दिला. नंतर त्याचे मदतीनें तो किल्ला थोडकेच दिवसांनीं मोगलांचे हातीं लागला. असें सन १६९० त घडलें. तेव्हां तेथें संभाजीची स्त्री येसूबाई व पुत्र शिवाजी हीं उभयतां मोगल लोकांचे हातीं सांपडलीं, तीं त्यांनीं औरंगजेबाच्या लष्करांत नेलीं. त्यावरून औरंगजेबानें त्या सरदाराचा सन्मान केला आणि त्या संभाजीच्या पुत्राचे ठिकाणीं प्रीति ठेवून त्याचें 'शाहू' असें नांव चालविलें. येसूबाई व औरंगजेबाची कन्या बेगमसाहेब यांचा स्नेह झाला.

३. यानंतर मोगलांनीं मिरज व पन्हाळा घेतला; तेव्हां मराठे लोकांत असें ठरलें कीं, 'राजारामानें जिंजीस जावें.' त्यावरून राजाराम यानें प्रऱ्हाद निराजी व संताजी घोरपडे व खंडेराव दाभाडे व धनाजी जाधव व खंडो बल्लाळ व दुसरीं केवळ विश्वासू अशीं वीसएक माणसें बरोबर घेतलीं, आणि लिंगाईत वाण्याचे वेषानें निघाला. तो निर्विघ्नपणें तेथें जाऊन पोंहचावा असा त्यांनीं शहाणपणानें बंदोबस्त केला होता, तथापि औरंगजेबास तें कांहीं वर्तमान कळलें. ते समयीं त्याचा फौजदार कर्नाटकांत होता त्यास व दुसरे त्याचे सरदार जे तिकडे होते त्यांना त्यानें आज्ञा पाठविली कीं, 'राजाराम तुमचे मुलखीं गेला आहे त्यास धरून आणा.' त्यावरून ते शोधांत होते. इकडे बंगलोर शहराजवळ राजाराम उतरला, आणि तो आपले पाय माणसांकडून धुववीत होता, तों त्यांनीं तेथच्या सरदारांस बातमी कळविली.

इतक्यांत खंडो बल्लाळ समजला कीं, 'आतां आह्मांस मोगल येऊन धरतील.' ह्मणून ते समयींच राजारामाबरोबर संताजी घोरपडे व धनाजी जाधव देऊन तेथून तो पळविला, व आपण मंडळीसुद्धां तेथें स्वैंपाक करीत बसून विचार केला कीं, 'जर कोणी आपणांस धरून नेऊन विचारूं लागेल तर सर्वांचें उत्तर व्हावें कीं, आह्मांस कांहीं ठाऊक नाहीं.' असा निश्चय ठरतो तों मोगल आले, आणि त्यांस धरून मारझोड करून पुसूं लागले, परंतु ते सर्व एकचित्त, यास्तव त्यांस कांहीं ठिकाणा लागूं दिला नाहीं; तेव्हां त्यांनीं त्यांस सोडिलें. नंतर ते सर्व संकेताप्रमाणें जिंजींत एके जागीं जमले. राजाराम मुलूख सोडून गेल्याचे पूर्वीं प्रन्हाद निराजीचे मसलतीनें असा बंदोबस्त केला होता कीं, मोरो त्रिमळाचा पुत्र निळोपंत यास पेशवा करून रामचंद्रपंत बावडेकर यास 'हुकमतपन्हा' असें पद देऊन त्याजकडे विशाळगड व रांगणा व इतर जे मराठ्यांचे किल्ले व मुलूख यांच्या बंदोबस्ताचें काम सांगावें. सिधोजी गुजर व कान्होजी आंग्रे या दोघांस लढाऊ गलबतांचें काम सांगितलें, आणि एक ह्मातारा महादजी नाईक पानसंबळ नामें शिलेदार मराठे लोकांत मोठा विख्यात होता तो सेनापति केला; मग थोडकेच दिवसांनीं तो मरण पावला. नंतर पुढें संताजी घोरपडे यास तो अधिकार दिला. राजाराम जिंजीस पोंचल्यावर थोडकेच दिवसांत तो अल्पबळ असूनही त्यानें आपलें महत्त्व वाढवावें ह्मणून शिवाजीप्रमाणें आपल्याजवळ मोठे मोठे अष्टप्रधानादि असावे असें जाणून त्यानें नवे अष्टप्रधान केले. ते असे.—

| | |
|---|---|
| जनार्दनपंत हणमंते—अमात्य. | महादजी गदाधर—सुमंत. |
| संकाजी मल्हार—सचिव. | निराजी रावजी—न्यायाधीश. |
| रामचंद्र त्रिंबक पुंडे—मंत्री. | श्रीकराचार्य—पंडितराव. |

पेशवा व सेनापति हे पूर्वींच केलेले होते, ते व हे मिळून आठ झाले. त्यांत प्रन्हाद निराजी मोठा चतुर असे, आणि राजाच्या उपयोगीं बहुत पडला होता, यास्तव त्याला पेशवेपणाचें पद असावें, परंतु तें रिकामें नव्हतें ह्मणून 'प्रतिनिधि' असें नवेंच पद करून त्याला सर्व प्रधानांवरतीं स्थापिलें. संताजी घोरपडे सेनापति, यांस नवें 'हिंदुराव ममलकत् मदार' असें नांव ठेवून नगारा व जरीपटक्याचें निशाण दिलें. धनाजी जाधव यास 'जयसिंगराव' असें नवें नांव देऊन, तो आणि संताजी घोरपडे या दोघांस माघारें महाराष्ट्र मुलखीं फौज ठेवून मोगलांचा मुलूख लुटावयाकरितां पाठविलें. असा बंदोबस्त झाल्यावर त्या प्रधानांनीं जिंजीमध्यें राजाराम तक्ताधिपति करून ते आपआपल्या कामांत मोठ्या सावधपणानें वागूं लागले; आणि गुप्तरूपेंकरून आपल्या जातीचे मराठे मानकरी लोक यांस

सोन्याचीं कडीं व मोठे मोठे पोषाक वगैरे पाठवून त्यांस राजाराम तक्ताधिपति केला, हें आनंदाचें वर्तमान कळविते झाले. याखेरीज जो आपला मुलूख मोगलांनीं घेतला होता, त्यांतील व जो मोगलांचाच मुलूख होता त्यांतील कितीएक ठिकाणें जहागीर व इनामें करून त्यांच्या सनदाही कितीएक मानकरी यांस त्यांनीं पाठविल्या. तें देणें ते वेळेस लोकांचे उपयोगीं पडलें नाहीं, परंतु राजारामास उपयोग झाला. तो असा, ते लोक संतुष्ट होऊन आपणांस याप्रमाणेंच पुढें मिळेल या आशेनें त्यांचे वकील व लोक कितीएक जिंजीस गेले आले; असें होऊं लागलें तेणेंकरून तो महत्त्वास चढला.

४. हें वर्तमान औरंगजेबास कळून त्यानें झुलफिकारखान सरदार कर्नाटकांत अशा अभिप्रायानें पाठविला कीं, 'एक जिंजीशहर घेतलें ह्मणजे सारे मराठे एके जागीं सांपडतील;' परंतु ती त्याची कल्पना व्यर्थ गेली. कां कीं, ते समयीं विजापूरकरांचे व गोवळकोंडेकरांचे कितीएक मराठे लोकांच्या नांवानें नासिक व बेदर व भीर यांसंबंधी संपूर्ण मुलखीं एकसमयावच्छेदेंकरून उपद्रव करीत होते. याशिवाय जे स्वार शिवाजीचे पहिले चाकर होते तेही येऊन संताजी व धनाजी यांस मिळाले. औरंगजेबाचा सरदार झुलफिकारखान जिंजीस गेला, तो तें मोठें शहर पाहून समजला कीं, याच्या वेढ्यास आपलें इतकें लष्कर पुरणार नाहीं, ह्मणून त्यानें औरंगजेबास लिहिलें कीं, 'सैन्य आणखी पाहिजे.' तें येई तोंपर्यंत त्यानें जिंजीजवळ थोडकीशी फौज ठेवून दक्षिणेंत स्वाऱ्या घालून खंडणी घ्यावयास निघून तंजावर व त्रिचनापल्लीचे राजे यांपासून खंडणी घेतली.

५. याप्रमाणें कर्नाटकाचें वर्तमान असतां महाराष्ट्र देशांत रामचंद्रपंत किल्ल्याचा व मुलखाचा व वसुलाचा व शिबंदीचा बंदोबस्त उत्तमप्रकारें करीत होता; त्यानें मोगलांच्या लष्कराच्या कितीएक जागीं टोळ्या होत्या त्या खराब केल्या. नंतर जिंजीहून संताजी घोरपडे व धनाजी जाधव येऊन मिळाले. तेव्हां त्यानें विचार केला कीं, 'मोगलांचा फौजदार वांईस आहे तो धरून आणावा.' त्यावरून ते संतुष्ट होऊन तात्काळ तें काम त्या सरदारांनीं शेवटास नेलें. तें असें कीं, तो फौजदार व त्याचे सर्व लोकही छापा घालून धरून आणिले. नंतर रामचंद्रपंत व संताजी व धनाजी या तिघांनीं आपले कितीएक लोक मोगलांचे मुलखांत चौथ व सरदेशमुखी यांचा हिस्सा घ्यावयास पाठविले. ते त्याच्या आज्ञेप्रमाणें घेऊन आपणास घांसदाण्याच्या निमित्तेंकरून सरकारआज्ञेखेरीज स्वतंत्रपणें कांहीं घेऊं लागले. असे वागणारे जे त्यांत मुख्य तीन होते; पवार व थोरात व आटोळे. त्यांस राजाराम उंच वस्त्रें वगैरे कांहीं बक्षिसें काळानुरूप पाठवीत असे.

त्यानें पवाराचें 'विश्वासराव' असें नवें नांव ठेवून थोरातास 'दिनकरराव' असें नांव दिलें; आटोळे यांस 'समशेरबहादर' असें नांव दिलें. रामचंद्रपंतानें आपल्या लष्करांत धनगर लोकांवर बहुत प्रीति ठेविली होती. त्यांत कितीएक त्याच्या आश्रयेंकरूनच मोठ्या पदवीस चढले. त्याचा कारकून संकाजी नारायण नामें मोठा शहाणा होता. त्यानें त्या वर्षी सन १६९२ त मोगलांपासून राजगड घेतला, ह्मणून रामचंद्रपंतानें त्यास वांईपरगण्याची मामलत सांगितली. त्याच सुमारें परशुराम त्रिंबक यानें मोगल असावध पाहून त्यांपासून पन्हाळा किल्ला घेतला. ते समयीं संताजीही निरुद्योगी बसला नाहीं, त्यानें जाऊन मिरज घेतली. तेव्हां रामचंद्रपंत समजला कीं, 'याला तेथची देशमुखी द्यावयाजोगा धन्यानें आपणास अधिकार दिला आहे, आणि यांत स्वामीचें हित होईल;' ह्मणून तो अधिकार त्यास दिला. मग संताजी व धनाजी यांनीं आपली पूर्तता होई असें सैन्य जमा करून आपला धनी राजाराम यास हितावह व्हावयाकरितां गोदातीरीं मोगलांचा मुलूख होता तेथें उपद्रव करावयास गेले. तो मुलूख स्वस्थ होता, आणि तेथें दाणा स्वस्त असे, त्याप्रमाणें इतर मुलखीं कांहीं कारणामुळें मिळत नसे. ते तेथें जाऊन प्रगट होतांच औरंगजेबानें त्यांवर सैन्य पाठविलें, परंतु त्या लोकांनीं पहिल्याप्रमाणें न भितां युद्धास उभे राहून तीन वेळां मोगलांचा पराभव करून प्रतियुद्धांत त्यांचे मोठे मोठे सरदार धरिले, आणि त्यांपासून बहुत द्रव्य घेऊन सोडिले. त्यावरून औरंगजेब समजला कीं, हे पूर्वींचे अल्पबळ असून, होतां होतां मोठे प्रबळ झाले. त्या मराठे लोकांमध्यें संताजी मोठा योग्य सरदार असे, तो तारतम्य व व्यवस्था यांचा ज्ञाता होता, आणि कांहींसा रागीट होता. तसाच धनाजी जाधवही मोठा योग्य असून कांहींसा सोसक असे, यास्तव तो संताजीपेक्षां लहान योग्यतचा असतांही त्यावर लोक मोठी प्रीति करीत होते. असे मराठ्यांचे सरदार उत्तरेकडे उपद्रव करीत असतां औरंगजेब आतां काय करावें असा चिंताक्रांत होऊन लष्करसहित भीमातीरींच दुसरे जागीं जाऊन उतरला. मग त्यानें असा निश्चय केला कीं, 'अगोदर जिंजी घ्यावी.' तेव्हां कामबक्ष नामें आपला पुत्र याजबरोबर फौज देऊन त्यास आसदखान वजीर याचे आज्ञेप्रमाणें वागावयास सांगून त्या दोघांस जिंजीवर पाठविलें; त्यांनीं तेथें जाऊन शहरास वेढा घातला. असें सन १६९२ त घडलें. झुलफिकारखान, बादशाहानें जिंजीवर पहिल्यानें नेमला असतां त्यावर आपला पुत्र मुख्य करून पाठविला, तो त्यास अपमान वाटून त्याचें चित्त उदास झालें; आणि वजीर जो पाठविला तो त्याचा पक्षपाती होता; तो समजला कीं, ही एवढी अनीति बादशाहाची प्रिय जी बायको तिजकडून झाली. झुलफिकारखान उदासचित्त

झाला असें वर्तमान ऐकून राजाराम राजाच्या प्रधानांनीं मोठ्या हर्षानें यांतच आपला अर्थ साधून घ्यावा ह्मणून उद्योग केला. शेवटीं झुलफिकारखान व राजाराम यांचा आंतून गुप्तपणें तह ठरला कीं, 'कामबक्ष जी मसलत करूं लागेल ती युक्तीनें मोडावी; तें न साधलें तर त्यानें राजारामास ती बातमी कळवावी.' असें सन १६९४ त घडलें. त्याच वर्षीं औरंगजेब भीमेचा कांठ सोडून गलगल्यास गेला. त्या जाण्यांत मसलत अशी असेल कीं, आपण दक्षिणेंत शिरलों ह्मणजे मराठे लोक तिकडे येतील, परंतु तसें न झालें. घोरपडा सैन्यासहित उत्तरेसच होता. रामचंद्रपंत सेनेसुद्धां पूर्वेकडे सोलापुरपर्यंत मुलुख लुटीत राहिला. मग औरंगजेब ती कल्पना सिद्धीस गेली नाहीं ह्मणून पुनः भीमातीरीं ब्रह्मपुरीस जाऊन उतरला. तो तेथें लष्कराचे उपयोगीं पडतील अशीं कितीएक मोठीं मोठीं घरें बांधून कांहीं वर्षें राहिला. तेव्हां त्या औरंगजेबानें तेथूनच आपला सर्व राज्यकारभार चालविला होता.

६. त्यापुढें दोन वर्षेंपर्यंत महाराष्ट्र मुलखीं कांहीं विशेष वर्तमान झालें नाहीं. पोर्तुगीज लोकांवर औरंगजेबाचा राग होऊन त्यानें कोंकणांत मात्र त्यांचे कितीएक गांव लुटले. ते समयीं त्यांचे कितीएक लोक समुद्रतीरीं दमण व वसई या दोहों किल्ल्यांत राहून वांचले. त्याच वेळेस औरंगजेब समुद्रतीराच्या उपद्रवामुळें इंग्रेज लोकांसही क्रोधेंकरून मुंबईतून हांकून द्यावयास इच्छित होता. परंतु मुंबईचें स्थान घ्यावयास अतिशय अवघड, याकरितां औरंगजेबानें तो उद्योग केला नाहीं.

७. नंतर महाराष्ट्र मुलखांत संताजी घोरपडे यानें फार उपद्रव केला, आणि जे मोगल त्याचे पाठीस लागले होते, त्यांस समयविशेषीं जिंकून पुढें उपाय चालेना अशा समयीं पळून त्यानें आपल्या सामर्थ्याप्रमाणें त्यांचा नाश केला. शेवटीं वीस हजार स्वार बरोबर घेऊन औरंगजेबाचें थोरलें लष्कर पूर्वेकडे टाकून साताऱ्यावरून कर्नाटकांत शिरला. मग जिंजीजवळ गेला तेव्हां त्या लष्कराचा तिसरा वांटा धनाजी जाधवाबरोबर देऊन जिंजीसभोंवता ज्यानें घेरा घातला होता त्या लष्करावर छापा घालावयाकरितां जलद पुढें पाठविला. तो जातांच प्रथम जिंजीजवळचें एक मोगलांचें ठाणें त्यानें मारिलें. तेणेंकरून मोगल समजले कीं, 'मराठे जवळ आले.' त्या वेळेस त्या शहरांत जे राजारामाचे लोक होते तेही बाहेर निघून मोगलांस मारूं लागले. तेव्हां आसमंतात् त्यांचीं ठाणीं होतीं तीं एकत्र करून बंदोबस्त करावयास त्यांना अवकाश सांपडला नाहीं, त्या योगेंकरून त्यांचा फार नाश झाला. इतक्यांत संताजी घोरपडे जिंजीकडे हळुहळ येत होता तो खोबरेपाकपर्यंत पोंचला. तेथें अलिमर्दनखान नामें मोगलांचा फौजदार होता तो मोठें सैन्य जमा

करून त्याशीं लढला, परंतु त्याचा अगदीं मोड होऊन तो संताजीनें धरून नेऊन त्यापासून द्रव्य घेऊन सोडिला. मग जिंजीच्या सभोंवतीं दूरदूर जितकीं मोगलांचीं ठाणीं होतीं तितकीं, संताजी व धनाजी या दोघांनीं मिळून मारून मागें हटविलीं, तीं जिंजीजवळ गेलीं. तेव्हां कामबक्ष याचे जवळचे जे स्वार होते ते कांहीं वैमनस्यामुळें लढेनात, आणि त्यास बाहेरचें वर्तमान मराठे लोक कळूं देईनात. आणखी वदंता अशी उठविली कीं, 'औरंगजेब मेला.' त्यावरून त्या लोकांच्या मनांत भय आणि संशय एकदांच उत्पन्न झाला. त्या समयीं जिंजींतले मराठे लोकही त्यांवर स्वाऱ्या घालून मारूं लागले. तेव्हां जसे जिंजीसभोंवता वेढा घालून मराठे लोक मोगलांनीं पूर्वीं कोंडले होते, तसेच तेही मराठ्यांच्या वेढ्यांत सांपडले. यास्तव उदासचित्त होऊन त्यांनीं शहरासभोंवते मोरचे होते ते मोडून त्या तोफा लढाईच्या उपयोगी नाहींत तशा करून तहाचें बोलणें लाविलें. तेव्हां असें ठरलें कीं, 'मोगलास न अडवितां वांदेवाश गांवापावेतों जाऊं द्यावें, आणि तेथें औरंगजेबाचें लिहिणें येई तोंपर्यंत त्यांस त्याच जागीं राहूं द्यावें. तो तह औरंगजेबाच्या मनास आला नाहीं; त्यानें कामबक्ष नामें आपला पुत्र व आसदखान वजीर यांस माघारें बोलावून पुनः झुलफिकारखानास जिंजी घ्यावयाचें काम सांगितलें, आणि आपण भीमातीर सोडून लष्करासुद्धां विजापुरास गेला. ते समयीं संताजी घोरपडे कर्नाटकांत स्वाऱ्या घालून विजापुरसंबंधीं मुलूख उद्ध्वस्त करीत होता, त्याच्या शासनार्थ बादशाहानें विजापुरांतून मोठें सैन्य पाठविलें. त्याशिवाय त्या मुलखीं कासीमखान नामें मोगलांचा फौजदार होता, त्याला आज्ञा दिली कीं, 'तूं त्या सैन्यास कुमक कर.' त्यावरून तें लष्कर व तो फौजदार हे सर्व मिळून संताजीस शोधूं लागले असतां, तो त्या लष्करावर अकस्मात् येऊन पडला, आणि त्यानें बहुत लोक मारिले. त्यापुढें मोगल लोकांचे लष्करांत मोठे मोठे सरदार फार होते, त्यामुळें त्यांच्यानें एकचित्त वागणें होईना. हें मराठ्यांस समजतांच तें आपणास मोठें हितावह असें जाणून मराठे लोक त्या लष्करावर दिवसा छापा घालीत, आणि रात्रीं बाणांनीं भाजीत. असा त्यांचा उपद्रव त्या लोकांनीं तीन दिवस सोसला, नंतर, दुधारी नामें एक लहानसा किल्ला आहे, तेथें जाऊन त्याच्या आश्रयानें त्याचे आसमंतात् ते राहिले. मग थोडकेच दिवसांनीं त्यांस अन्नादिकांचा तोटा पडला, तेव्हां त्या किल्ल्यांत कांहीं धान्यादि होतें, तें एकदांच लुटलें जाईल, म्हणून त्या किल्लेकऱ्यांनीं दरवाजा बंद केला असतां, तेथच्या वाण्यांनीं भिंतीवरून चोरून फार महाग विकलें, तरी तें सरलें. त्या लष्कराचे कुमकेस औरंगजेबानें दुसरें लष्कर पाठविलें, तें त्यास जाऊन मि-

झालें नाहीं तोंच संताजीनें वाटेंतच त्याशीं लढाई करून जिंकिलें; तें वर्तमानही मोगलांस कळूं दिलें नाहीं. नंतर ते लोक अगदीं निराश होऊन मराठ्यांस शरण गेले. त्यांत कासीमखान प्रामाणिकपणें मोठ्या योग्यतेनें स्वामिसेवा केलेला होता, त्याला तें शरण जाणें फार वाईट वाटलें, ह्मणून तो विष खाऊन मेला. इतर जे मोठे मोठे सरदार होते त्यांपासून खंडणी घेऊन त्यांचें सारें लुटून घेऊन सोडिले. ते औरंगजेबाकडे गेले असतां, त्यांवर त्याची इतराजी होऊन त्यानें ते पदच्युत करून तेथून दूरदेशीं लहानशा अधिकारांवर योजिले.

८. इतक्यांत झुलफिकारखान जिंजीस जाऊन त्या शहरास वेढा घालावयाचें काम आळसत करीत होता, त्यावरून औरंगजेब समजला कीं, 'त्याचा राजारामाशीं कांहीं स्नेह असेल.' हें वर्तमान झुलफिकारखानास कळलें, तेव्हां त्यानें राजारामाला सांगितलें कीं, 'आतां मला या शहरास घेरा अवश्य घातला पाहिजे. त्यास तुह्मी पळा, मी तुह्मांला अनुकूळ आहें.' तेव्हां राजाराम आपले सोयरे शिरके बरोबर घेऊन विशाळगडीं गेला. ते समयीं झुलफिकारखान व राजाराम यांचा असा करार ठरला होता कीं, शहर घेतल्यावर राजारामाचीं मुलें व स्त्रिया कांहीं निमित्तेंकरून त्यानें शिरक्यांचे स्वाधीन करावीं. असें सन १६९७ त झालें. मग सन १६९८ चे जानेवारी महिन्यांत झुलफिकारखानानें जिंजीशहर भिंतीला शिड्या लावून घेतलें. त्यांत राजारामाचीं बायकामुलें व मोठे मोठे सरदार सांपडले; त्यांतील तीं मुलें आणि बायका तेथें कोणी शिरकेकुळाचे गृहस्थ होते त्यांचे स्वाधीन केलीं, तीं त्यांनीं राजारामाजवळ पोंचविलीं. आणखी जे उरलेले थोर सरदार मनुष्य त्यांतून कितीएक जन्मभर कैदेंत ठेविले, व कितीएक जिवें मारिले. कां कीं, आपणाविषयीं बादशाहाचे मनांत फितुराचा संशय आलेला गेला पाहिजे ह्मणून. जे मारिले त्यांत प्रऱ्हाद निराजीचा पुत्र नारो प्रऱ्हाद निराजी होता. तो प्रतिनिधि तर अगोदरच मरण पावला होता.

९. राजाराम जिंजीहून गेल्याचे अगोदर संताजी व धनाजी यांचें परस्पर वांकडें पडलें होतें, परंतु तें प्रकट झालें नाहीं. कां कीं, प्रऱ्हाद निराजी होता तावत्कालपर्यंत त्याच्या मसलतीनें राजाराम कोणाचाही पक्षपात करीत नसे. मग तो प्रतिनिधि मेल्यावर, जे संताजीचे शत्रु होते त्यांच्या बुद्धीस लागून राजारामानें धनाजीचा पक्ष धरिला. त्या वेळेस औरंगजेबानेंही मराठे लोकांत वैमनस्य पडलेलें ऐकून आपल्या वकिलांकडून त्या वैमनस्याची वृद्धि करविली. अशा निमित्तेंकरून संताजीच्या लष्करचे लोकही त्या संताजीवर प्रीति करीनात असे झाले. ते कोणेएके समयीं धनाजीच्या लोकांस मिळून संताजीला धरून कैद करावें अशी मसलत करूं

लागले. तें संताजीस कळलें तेव्हां तो आपले विश्वासू लोक थोडकेसे बरोबर घेऊन पळाला. ते वेळेस मराठ्यांच्या लष्कराचे दोन भाग झाले, त्यांतील एक भाग कर्नाटकांत झुलफिकारखानावर गेला, आणि दुसरा साताऱ्यास गेला. तेथें राजाराम विशाळगडाहून आला होता; त्याला रामचंद्रपंतानें मसलत सांगितली कीं, 'सातारा राजधानी करावी.' संताजी पळाला हें राजारामास समजलें, तेव्हां राजारामानें कांहीं लोक त्याचे पाठीस लाविले.

१०. अष्टप्रधानांतला अमात्य जनार्दनपंत हणमंते मेला, तेव्हां त्याची पदवी रामचंद्रपंतास देऊन त्याचा मुख्य कारभारी संकाजी नारायण गांडेकर होता त्याला 'सचिव'पद दिलें. पहिला सचिव, जेव्हां मोगलांनीं पहिल्यानें जिंजीस वेढा घातला, तेव्हांच आपला अधिकार सोडून काशीस गेला. जनार्दनपंत हणमंते पहिला अमात्य, त्याचा पुत्र तिमोजी हणमंते, तो जिंजीमध्यें मोगलांचे कैदेंत सांपडला होता, तथापि कांहीं चातुर्य करून युक्तीनें पळाला, तो राजारामास येऊन भेटला. त्याच्या बापाच्या अगत्यास्तव आणि हा मोठा चतुर होईल असें कल्पनेस आलें ह्मणून तो प्रतिनिधि केला.

११. मराठ्यांच्या लढाऊ गलबतांचा सरदार सिधोजी गुजर तो त्याच संधीस मरण पावला, तो जंजिऱ्याच्या सिद्दीशीं निरंतर लढत असे. त्याचा सोबती कान्होजी आंगऱ्या यानें सिद्दी व मोगल व हरकोणी लोक यांचीं कितीएक मोठीं जहाजें घेतलीं होतीं; आणखी मुंबईपासून मलबारलगत त्रावणकोरपर्यंत गांवें लुटून बहुत द्रव्य मिळविलें. तो बहुधा सुवर्णदुर्ग आणि विजयदुर्ग या दोहों ठिकाणीं राही; परंतु त्याचें शिवाजीचे वेळचें राहावयाचें ठिकाण कुलाबा. वाडीचे देशमुख सावंत ते समयविशेषीं मोगलांचा पक्ष स्वीकारीत, परंतु आंतून राजारामाकडचे असत. कारवाडचा देसाई, तो कोणाचा पक्ष न धरितां स्वतंत्रपणें आपण राजा असें ह्मणवीत होता.

१२. संताजी घोरपड्याचे पाठीस लोक लागले असतां तो फार दिवस कोणाच्या हातीं सांपडला नाहीं. तेव्हां बहुतेक लोक कंटाळून त्या यत्नाचा आळस करूं लागले; परंतु एक नागोजी माने नामें ह्मसवडचा देशमुख होता, तो आपल्याच द्वेषामुळें त्याची पाठ सोडीना. तेव्हां तो संताजी, कोणेएके दिवशीं पळतां पळतां फार श्रम पावून शत्रु दूर असेल अशी अटकळ करून एका ओढ्यामध्यें स्नानास उतरला. ते समयीं नागोजीनें तो असावध असतां, गांठून त्याचें डोकें कापून औरंगजेबाच्या लष्करांत नेऊन बादशाहाचे हुजूर ठेविलें. तेव्हां औरंगजेबानें त्याची प्रशंसा करून त्याचा सन्मान केला, आणि तो आपल्या चाकरीस ठे-

विला. संताजी अशा दुर्मरणानें मेल्यावर कितीएक जे त्याचे जुने चाकर पहिले त्याला सोडून राहिलेले होते ते पराक्रमाच्या योगानें क्रोधाविष्ट होऊन सर्व एकत्र मिळून त्याचे दोघे पुत्र राणोजी व पिराजी, यांस घेऊन संताजीच्या कुळाचा झेंडा लाविला, आणि स्वतंत्रपणेंच मोगलांच्या मुलखीं उपद्रव करूं लागले.

१३. सन १६९९ त राजाराम साताऱ्यांतून लष्करसुद्धां उत्तरेकडे जावयाकरितां निघाला. त्याला वाटेनेंच खानदेश व गंगथडी व वराड या मुलखांतून उपद्रव करीत राहिलेले जे मराठे सरदार लोक होते, ते सर्व येऊन मिळाले. त्यांचीं नांवें:— परसोजी भोंसले, हैबतराव निंबाळकर, नेमाजी शिंदे, आटोळे समशेरबहादर, वगैरे. ते सारे जमून शिवाजीच्या वेळेपेक्षां राजारामाचें लष्कर मोठें झालें. मग ते गंगथडींत शिरून चौथ व सरदेशमुखी यांच्या अधिकारसंबंधें वसूल घेऊं लागले. तेव्हां ज्या रयतेनें तें मान्य केलें त्यांशीं त्यांनीं द्वेष केला नाहीं; वरकड जे कोणी मानीनात ते मारून टाकिले. त्या वेळेस त्या वसुलाचा बंदोबस्त शिवाजीप्रमाणें ठेविला होता. तो असा; जेथें वसूल उगवला तेथें उगवून घेतला; जेथें हातास लागेना तेथचा करारनामा करून घेतला. याप्रमाणें नांदेड व वराड व खानदेश इतक्या जागीं केलें. तें काम थोडकेंसें राहिलें असतां राजाराम तेथून माघारा परतला. तो वाटेनें येतांना त्यानें बागलाण मुलखींची बाकी राहिलेली घ्यावयास खंडेराव दाभाडा ठेविला. खानदेशांतली बाकी घ्यावयास नेमाजी शिंदा, आणि वराडचे बाकीकरितां परसोजी भोंसला, आणि गंगथडीचे बाकीसाठीं हैबतराव निंबाळकर, असे ठेविले. त्यांत परसोजी भोंसल्याचें 'सेनासाहेब सुभा' असें नांव ठेविलें; आणि हैबतराव निंबाळकर याचें 'सरलष्कर' असें नांव ठेवून त्या दोघांस जरीपटक्याचीं निशाणें दिलीं. मग तेथून माघारा येत असतां वाटेनें जालना शहर लुटूं लागला होता, इतक्यांत झुलफिकारखान कर्नाटकांतून अकस्मात् येऊन त्यावर पडला, त्यानें शौर्येंकरून मराठे पिटून लाविले.

१४. राजारामाच्या लष्करावर झुलफिकारखान अकस्मात् येऊन पडण्याचें मूळ असें; धनाजी जाधव कर्नाटकांत शिरून उपद्रव करूं लागला असतां त्यावर औरंगजेबानें मोठा सरदार ज्यास मराठे लोक फार भीत होते असा झुलफिकारखान पाठविला. त्यानें कितीएक वेळां धनाजीचा पराभव केला. इतक्यांत खानदेशामध्यें राजारामानें बहुत उपद्रव केला, असें वर्तमान औरंगजेबास कळलें. तेव्हां त्यानें आपणाजवळ ब्रह्मपुरीं झुलफिकारखानाला बोलाविलें, आणि आपला नातू अजीमशाहाचा पुत्र व तो झुलफिकारखान याजबरोबर सैन्य देऊन मुलखांत मराठ्यांच्या स्वाऱ्या ज्या फिरत होत्या त्यांच्या बंदोबस्तास पाठविले; आणि आपण किल्ले घ्या-

वयाचें काम स्वीकारलें. अशीं दोन लष्करें दोहींकडे निघालीं. तेव्हां झुलफिकारखान जालन्यास जाऊन राजारामाशीं लढला, आणि औरंगजेबानें जाऊन वसंतगडास घेरा घातला. तेथें मोठे मोठे मोरचे लावून तीन दिवसांत किल्ला हस्तगत करून मोठ्या हर्षानें तेथून साताऱ्यास आला. त्या किल्ल्यावर जे मराठे होते त्यांची अटकळ अशी होती कीं, बादशाह आधीं पन्हाळा किल्ला घ्यावयास जाईल, ह्मणून तेथें अन्नाची मात्र दोन महिन्यांची बेगमी केली होती.

१५. ते समयीं औरंगजेबानें साताऱ्यास घेरा घातला, तो असा; उत्तरेचे अंगीं आपण उतरला, त्या जागीं आतां करंजें गांव आहे; अजीमशाह पश्चिमेस उतरला, तेथें एक लहानसा गांव आहे, त्याचें नांव तेव्हांपासून शाहपूर असें पडलें; दक्षिणेस सरजेखान उतरला होता; आणि पूर्वेस तरबियतखान सरदार उतरला. अशीं चहूं दिशांस चार ठाणीं बसवून त्यांच्यामधून कोणाचेंही जाणें येणें न व्हावें, ह्मणून दुसऱ्या लहान लहान टोळ्या मध्यें मध्यें जागोजाग बसविल्या. ते समयीं त्या किल्ल्यावर प्रयागजी नामें शिवाजीचे वेळेचा एक परभू असे. त्या किल्ल्याच्या डोंगराची उंची नेमस्तच आहे, परंतु वरून सभोंवता तीस तीस हात कडा तुटलेला एकसारखा काळा दगड आहे. त्यावर तट आहे, तो फारसा उंच नाहीं. त्या किल्ल्याचा एक ईशान्यदिशेचा कोंपरा लांबीस आणि उंचीस अंमळसा अधिक आहे; त्याचा आकार बुरजासारखा दिसतो; आणि सभोंवता तुटलेल्या कड्यापेक्षां त्या जागचा कडाही अधिक तुटलेला दिसतो; त्या टोंकावर बुरूज बांधला आहे. तें ठिकाण किल्ल्याच्या साऱ्या जाग्यांपेक्षां मोठें अवघड, असें असून तरबियतखानानें नेम केला कीं, हा कोंपरा सुरुंग लावून पाडून वाट करीन. अशी त्याची प्रतिज्ञा झाल्यावर, युद्धास आरंभ होऊन साडेचार महिने लोटले. तो प्रयागजी परभू असा पराक्रमी होता कीं, मोगलांस एक पाऊलभर जागा आटपायाला महाप्रयास पडे, ज्यापुढें उपाय चालेना. कदाचित् मोगल हल्ला करूं लागले तर तो आपले सारे लोक जमा करून मोठमोठाले दगड किल्ल्याचे भिंतीवरून खालीं टाकी, त्या दगडांनीं तोफांपेक्षां त्याचें काम अधिक होई. तो असा पराक्रमानें लढत असतांही आंतली बेगमी सरली, ह्मणून किल्ला द्यावयास सिद्ध झाला; परंतु तेथून जवळच परळी किल्ल्यावर परशुराम त्रिंबक होता, त्यानें अजीमशाहास कांहीं युक्तीनें वश करून त्या किल्ल्यावर अन्नादिक साहित्य पोंहचतें केलें. हें वर्तमान सन १७०० च्या अखेरीस घडलें. ते समयीं राजाराम सिंहगडीं दुखण्यांत पडला होता. तरबियतखान यानें नेम केल्याप्रमाणें साडेचार महिन्यांत त्या ईशान्येच्या कोंपऱ्याखालीं दोन सुरुंग तयार केले, तेणेंकरून मोगलांस असें वाटलें कीं, आतां निःसंशय कार्य सिद्धीस

जाईल. तो चमत्कार पाहावयास औरंगजेबही बसला होता, आणि त्या बेताप्रमाणें तो कोंपरा उडाला ह्मणजे त्वरित हल्ला करावयाकरितां लोक तयार करून डोंगराच्या एका बाजूस लपून बसविले होते. याशिवाय अशी कांहीं युक्ति केली होती कीं, त्या किल्ल्यावरचे लोक बहुतकरून औरंगजेबाची स्वारी पाहावयाकरितां त्या बुरजावर जमावे, त्याप्रमाणें तेही तसेच त्या ठिकाणीं जमले, त्यांत प्रयागजीही आला होता. ते समयीं मोगलांनीं त्यांतल्या एका धाकट्या सुरुंगाला आग लाविली, तेव्हां त्या दारूच्या जोरानें त्या जागीं डोंगरास तडा गेला, आणि त्या धक्यानें त्या आंगची वरली भिंत वरच आंतल्या आंगीं पडून तिजखालीं सांपडून वरचीं माणसें बहुत मेलीं, इतक्यांत ते हल्ला करून वर जावयास सिद्ध केलेले लोक कांहींसे जवळ गेले, तों दुसऱ्या मोठ्या सुरुंगास आग घातली; तो सुरुंग तयार करतांना कांहीं बेत चुकला होता; यास्तव त्याचा नेट वरचे आंगीं बुरजाकडे पोंचला नाहीं, आणि मोठा भयंकर शब्द होऊन बाहेरच्या आंगीं तो सुरुंग मोगलांकडे उडाला, तेणेंकरून मोगल दोन हजारांहून अधिक मेले गेले. पहिल्यानें सुरुंगानें वरची भिंत पडली. त्या वेळीं तो प्रयागजी तेथेंच देवीच्या देवळाजवळ त्या भिंतीखालीं सांपडला, तेव्हां त्याला तेथून खणून बाहेर काढिलें. त्याच्या आंगास कांहीं लागलें नव्हतें. आणि देवी जवळ होती, ह्मणून त्या सर्व मराठ्यांनीं तो उत्तम शकुन मानून निश्चय केला कीं, ‘आपणांस देवी अनुकूळ आहे, यास्तव मोगलांस किल्ला द्यावयाचा नाहीं.’ इतकें झाल्यावर अजीमशाह पुनः त्यांस धान्यादि पोंचतें होऊं देईनासा झाला. तेव्हां त्या अजीमशाहाचेच द्वारें किल्ला द्यावा असा मराठे लोकांचा विचार होऊन त्याच वर्षाच्या एप्रिल महिन्यांत त्यांनीं मोगलांस किल्ला दिला. तेव्हां औरंगजेब समजला कीं, ‘अजीमशाहाच्याच योगें किल्ला हस्तगत झाला;’ ह्मणून बहुत संतुष्ट होऊन त्याचा कांहीं मान केला, आणि किल्ल्याचें नांव ‘अजीमतारा’ असें ठेविलें. सातारा हस्तगत झाल्यावर औरंगजेबानें परळी किल्ल्यास घेरा घातला. तेथचे किल्लेकरी मोठ्या शौर्यानें दीड महिना लढून शेवटीं किल्ला रिकामा टाकून पळाले. ते समयीं पर्जन्यानें बहुत उपद्रव केला, तेव्हां मोगलांनीं तात्काळ तो डोंगरांचा मुलूख सोडिला, आणि ते माननदीच्या कांठीं कवासपुरामध्यें जाऊन राहिले.

१६. पूर्वीं लिहिलें कीं, राजाराम सिंहगडीं दुखण्यास पडला; त्या दुखण्याचें कारण असें कीं, जालन्याहून झुलफिकारखान त्याचे पाठीस लागला होता, त्यामुळें त्याला रात्रंदिवस पळावें लागलें, तेणेंकरून त्यास बहुत श्रम होऊन तो उरीं भरला होता, त्या विकारानें तेथेंच तो एका महिन्यानें मरण पावला. त्यानंतर एका महिन्यानें सातारा मोगलांचे स्वाधीन झाला.

१७. राजाराम कांहींसा शूर होता, त्यास मुलखी कारभाराचें चातुर्य नव्हतें, त्यानें प्रऱ्हाद निराजीच्या शहाणपणानें राज्य केलें, आणि संताजीचा नाश केला हा मात्र त्यापासून अधर्म घडला. एरवीं तो दयाळु आणि उदार होता. त्याच्या मरणाचें वर्तमान औरंगजेबाच्या लष्करांत कळलें तेव्हां त्या लोकांस असें वाटलें कीं, आतां मराठे सहज जिंकले जातील. ह्मणून ते मोठा आनंद पावले, परंतु त्या आनंदाप्रमाणें तें त्यांच्या उपयोगीं पडलें नाहीं. राजारामाचे दोन पुत्र होते, त्यांत वडील शिवाजी. तो राजाराम मेला ते समयीं दहा वर्षांचा होता. त्याची माता ताराबाई, ती मोहित्यांची कन्या. धाकटा संभाजी, तो त्या वेळेस तीन वर्षांचा. त्याची माता राजसबाई, ती घाटगे यांची कन्या. रामचंद्रपंत अमात्य, व संक्राजी नारायण व धनाजी जाधव यांच्या विचारानें ताराबाईनें आपला पुत्र गादीवर बसवून राजसबाई बंदींत ठेविली. तिमोजी हणमंते मोठा चतुर निघेल, ह्मणून राजारामानें तो प्रतिनिधि केला होता; परंतु तो तसा झाला नाहीं, ह्मणून ताराबाईनें तें पद परशुराम त्रिंबकास दिलें. त्यापुढें ताराबाई एकाच किल्ल्यांत निरंतर राहात नसे; असाच धनाजी जाधवही कधीं एके जागीं राहिला नाहीं, आणि चोहींकडे स्वार पाठवून मुलखांत स्वाऱ्या घालीत असे. याखेरीज निंबाळकर, व भोंसले, वगैरे मोठे सरदार सर्वत्र चौथ व सरदेशमुखी व फौजेस घांसदाणा अशीं निमित्तें करून खंडणी घेत होते. असा निरंतर उपद्रव होऊन दक्षिणेचा वसूल फार थोडा होऊं लागला, तो औरंगजेबाच्या लष्करास पुरेना, तेव्हां त्यानें कधीं कधीं फौजा पाठवून हिंदुस्थानांतून आपलें खासगीचें द्रव्य आणविलें, तेंही कितीएक वेळां मराठ्यांनीं छापा घालून नेलें. ते वेळेस मोगल लोक आपल्या पहिल्या चालीप्रमाणें लढत नव्हते.

१८. यापुढें औरंगजेब वार्धक्यामुळें राज्याचे उपयोगीं नाहींसा झाला. त्याचा पुत्र तोही राज्यकारभारास योग्य नव्हता, त्यामुळें बादशाह निवर्तल्यावर राज्य कोणे रीतीचें होईल तें कळेना, ह्मणून जे कोणी कारभारी होते ते पहिल्याप्रमाणें राज्यप्रकरणीं तत्पर असेनातसे झाले. अशानें त्यांची आंतून शक्ति कमी झाली, व मराठे लोक पराभव पावतां पावतां युद्धांत निपुण झाले. या निमित्तांनींही तें राज्य बुडूं लागलें होतें. त्या वेळेस जर मराठे लोक एकचित्त होऊन उत्तम प्रकारें प्रजासंरक्षणाचा विचार करते, तर सर्वत्र त्यांचीच सत्ता झाली असती, परंतु तें झालें नाहीं. ते लोक बहुधा लुटीच्या कामास मात्र एकत्र मिळून मसलत करीत; आणखी ज्यास वाटे कीं, मोगलांस मिळावें यांत आपलें हित आहे, तो तिकडचा पक्ष स्वीकारी; त्या योगेंकरून मात्र त्या लोकांचें कांहींसें महत्व राहिलें होतें. त्या

काळीं मराठ्यांत कोणीं स्वहितावांचून प्रजेचें किंवा स्वामीचें हित पाहिलेंच नाहीं. तो प्रकार असा; मोगलांचे पक्षाचे मराठे व ताराबाईचे पक्षाचे मराठे जात असतां, जर कधीं गांठ पडली, तर परस्पर मोठा सत्कार होऊन एकत्र त्यांचीं भोजनें होत. आणखी उठून जातां जातां थट्टेनें मुसलमान लोकांप्रमाणें 'अल्हम् दुलिल्ला' असें ह्मणत, आणि देवासही प्रार्थीत कीं, 'असा उपयोगी जो औरंगजेब बादशाह तो बहुत दिवस वांचो.'

१९. औरंगजेबानें बहुतेक मोठे मोठे किल्ले घेतल्यावर, तो कितीएक महिने जुन्नरास राहिला होता. मग पूर्वेस मराठ्यांनीं असा दंगा केला कीं, कर्नाटकपर्यंत उपद्रव होऊं लागला; ह्मणून त्याच्या निवारणार्थ तो लष्करसुद्धां तेथून निघून विजापुरीं गेला. ते समयीं त्याजबरोबर त्याचा आवडता कामबक्ष नामें पुत्र होता. त्याची इच्छा अशी होती कीं, 'आपण स्वतंत्रपणें विजापुरचें राज्य करावें.' या हेतूस्तव त्यानें औरंगजेबास मसलत दिली कीं, 'मराठे लोकांशीं सल्ला असावा.' मग धनाजी जाधवाच्या द्वारें तें सल्ल्याचें बोलणें लाविलें. त्या वेळेस दक्षिणेच्या सहा सुभ्यांतील वसुलापैकीं दहावा भाग चौथ व सरदेशमुखी यांसंबंधें मराठ्यांस औरंगजेब देणार होता, परंतु ते समयीं धनाजीजवळ मराठे लोक फार जमले असत, ते आपण प्रबळ असें जाणून बादशाहापाशीं त्याखेरीज आणखी कांहीं मागूं लागले; तेव्हां त्यानें जाणलें कीं, 'मराठ्यांची मसलत दगा करावयाची आहे,' ह्मणून पहिलें सल्ल्याचें बोलणें करावयास पाठविलेले जे वकील ते माघारे बोलावून नेले, मग तें सर्व काम तसेंच राहिलें. इकडे कर्नाटकांत लुटारू फार झाले. त्यांत वाकिणखेडाचा नाईक मोठा प्रबळ आणि त्याचा मराठे लोकांशीं अत्यंत स्नेह असे, यास्तव औरंगजेबानें विजापूर सोडून लष्करसुद्धां तिकडे स्वारी केली. ती जागा विशेष मजबूद नव्हती. तीस भुईकोट मात्र होता, तथापि त्या नाईकानें औरंगजेबाचा कांहीं उपाय चालूं दिला नाहीं. बाहेरून धनाजी जाधव मोगलांस चैन पडूं देईनासा झाला, तेव्हा औरंगजेब बादशाह यानें झुलफिकारखान वगैरे आपले मोठे मोठे सरदार बोलावून महाप्रयास मांडिला, ते समयीं तो नाईक किल्ला रिकामा टाकून पळाला.

२०. इतक्यांत मराठ्यांनीं देशामध्यें बहुत उपद्रव केला. तो असा; रामचंद्रपंतानें पन्हाळा किल्ला व पावनगड घेतला, आणि परशुराम त्रिंबक यानें वसंतगड

---

१. त्या वेळेस मोगल लोक आपल्यामध्यें कधीं घोडा पाणी प्यावयास नेला असतां तो पाणी न पिई तर थट्टेनें त्यास ह्मणत कीं, 'तूं पाणी कां पीत नाहींस? तुला धनाजी पाण्यांत दिसला कीं काय?' ते लोक इतकें धनाजीचें भय बाळगीत होते.

व सातारा घेतला. तेव्हां ताराबाई पन्हाळ्यावर आपणास राहावयाची जागा करून तेथें राहिली. तेव्हांपासून तिचें मन रामचंद्रपंताविषयीं सुप्रसन्न झालें. इतके किल्ले मराठ्यांनीं घेतले त्यांत सातारा किल्ला घेण्याचा पर्याय असा; पहिला मावळे लोकांची कारकुनी केलेला अण्णाजीपंत नामें एक ब्राह्मण होता, तो मोगलांनीं जिंजी घेतली तेव्हां तेथें बंदींत सांपडला असतां कांहीं युक्तीनें तेथून पळाला; त्याला वाटेनें मोगलांचे लोक साताऱ्याचे बदलीस जात होते ते भेटले, त्यांस त्यानें कांहीं गोष्टी सांगून व कांहीं गाणें गाऊन त्यांचीं मनें वश केलीं. तेणेंकरून त्यांनीं त्याला आपल्याबरोबर नेऊन त्यास राहायाला जागा साताऱ्यावर दिली, आणि तो तेथें राहिला. त्यानें मोठ्या युक्तीनें मावळे लोक वर घेऊन मग तेथचे सर्व मोगल मारून टाकिले. यापुढें सिंहगड व राजगड वगैरे कितीएक किल्ले मराठ्यांनीं मोगलांपासून घेतले, तो विस्तार विशेष लिहावा असा नाहीं. त्या समयीं औरंगजेब मरण पावला हें मात्र मोठें प्रकरण झालें.

२१. तो औरंगजेब फार वृद्ध झाला, आणि त्यापासून मराठ्यांच्या हातीं किल्ले लागले तेणेंकरून मराठे प्रबळ झाले. यास्तव बादशाह मनांत बहुत खिन्न होऊन सन १७०७ त माघारां अहमदनगरीं आला, आणि पूर्वीं वीस वर्षांचे पाठीमागें मोठ्या थाटानें ज्या जागीं उतरला होता त्याच जागीं डेरा दिला, परंतु ते समयीं तें माहात्म्य नव्हतें. तो तेथें त्या डेऱ्यामध्ये येतांच आपल्या जवळच्या लोकांशीं बोलिला कीं, 'या भूतळावर माझें जें हिंडणें होतें तें आज संपलें, याच जागीं माझा मृत्यु जगदीशानें नेमिला आहे.' मग पुढें थोडकेच दिवसांनीं सन १७०७ च्या फेब्रुवारी महिन्याचे २१ वे तारिखेस तो तेथेंच मृत्यु पावला. जर कोणी ह्मणेल कीं, औरंगजेबाचे गुण व स्वभाव कसे होते, तर त्यानें समजावें कीं, तो मोठा चतुर असून पापास भीत नसे. ज्याचें अर्थींच लक्ष्य होतें, ज्यानें परमार्थीं चित्त ठेविलेंच नाहीं, ज्यानें आपला लोभीपणा साधूच्या सोंगानें छपविला'. असा



औरंगजेब बादशाह.

१. औरंगजेब लष्करसुद्धां अहमदनगरी आला ते वेळी मराठ्यांनीं त्याला वाटेस गाठले, तेव्हां त्याचें व यांचे युद्ध झाले. ते समयी मोगलास युद्ध करिता करिता दम धरवेनासा झाला, तेव्हा ते लढतां लढताच तेथून पाय काढून अहमदनगरी गेले. तेव्हां मराठे असे प्रबळ झाले होते.

जो तो प्रथम राज्य करूं लागला तेव्हां त्याची राज्यकारभाराविषयीं दक्षता व त्याची विद्या व ज्ञान व परिपूर्ण संपत्ति असून त्याचें स्वयें निरिच्छासारिखें वागणें इत्यादि गुण पाहून त्या वेळचे लोक त्याला बहुत मानीत होते. पुढें त्यानें ती वर्तणूक टाकिली तरी त्याच्या पहिल्या आचरणाचें स्मरण लोकांस होतें त्यावरून त्याचा शेवटपर्यंत लोकांत मान राहिला. त्यानें शहाणपणेंकरून विजापूरकर व गोवळकोंडेकर या दोघांचे बळानें पृथ्वींतलीं बंडें मोडावीं तें न करितां तींच राज्यें बुडविलीं, तेणेंकरून बंडें प्रबळ झालीं. हा त्यापासून राजनीतीविषयीं मोठा प्रमाद घडला. औरंगजेब निवर्तला ते समयीं त्याचे पुत्र तिघे होते. एक सुलतान मुआझिम, एक अजीमशाह, एक कामबक्ष. त्यांतला सुलतान मुआझिम उत्तरेकडे काबुल मुलखीं अधिकार करित होता; अजीमशाह बाप मेल्याचे पूर्वीं त्याजवळ येऊन राहिला होता; आणि ते समयीं कामबक्ष, बादशाहानें विजापुरीं पाठविला होता. मग बादशाह मरण पावला त्या समयीं अजीमशाह जवळ होता, यास्तव बादशाहाचें तें सारें सैन्य त्याचे स्वाधीन झालें. झुलफिकारखान तर मुलखांत उपद्रव करणारे जे धनाजी वगैरे मराठे त्यांच्या पाठीस लागला असे. तो औरंगजेब मेल्याचें वर्तमान ऐकतांच तत्काळ त्यांस सोडून अजीमशाहास जाऊन मिळाला.

---

## भाग बारावा.

### ( इसवी सन १७०७ पासून सन १७२० पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. शाहूला शाहू असें नांव कोणे प्रकारें प्राप्त झालें तें प्रकरण.—२. तो शाहू दिल्लींतून सुटून आपल्या राज्यावर आला ते समयीं ताराबाईनें तो खोटा म्हटला म्हणून युद्ध झालें; अक्कलकोटच्या राजांची मूळपीठिका.—३. बाळाजी विश्वनाथ याचा उद्भव.—४. मोगल लोक व शाहू यांची वर्तणूक.—५. धनाजी जाधव याचा मृत्यु.—६. ताराबाईनें पन्हाळा किल्ला घेतला, आणि कोल्हापूर राजधानी करून तेथें राहिली; ताराबाईचा पुत्र शिवाजी याचा मृत्यु; संभाजी राजा होऊन ताराबाई बंदींत पडली.—७. चंद्रसेन जाधव आणि बाळाजी विश्वनाथ यांचा वाद होऊन जी जीं वर्तमानें झालीं तीं.—८. निझाम उल्मुल्क याची गोष्ट.—९. मोगल व मराठे यांचें युद्ध.—१०. मराठे लोक यांमध्यें फार अव्यवस्था झाली.—११. कान्होजी आंगऱ्यानें बहिरोपंत पेशव्याचा पराभव केला.—१२. नंतर बाळाजी विश्वनाथानें कान्होजीशी तह केला, तेणेंकरून मराठ्यांस हित होईल असें जाणून शाहूनें बाळाजीला पेशवाई दिली.—१३. मग तो पुरंदरचें आधिपत्य पावला.—१४. नंतर मराठ्यांची कांहीं व्यवस्था दिसूं लागली तो तपशील.—१५. शाहूचे स्वभावाचें निरूपण.—१६. फेरुकशेर बादशाहानें मराठे लोक आपणास अनुकूळ व्हावयाचा उद्योग केला तो पर्याय.—१७. त्यानें सैद हुसेन अल्लीखानाशीं कृत्रिम केलें तो विस्तार.—१८. शाहू व सैद हुसेन यांशीं तह होऊन सैद दिल्लीस गेला,

आणि फेरुकशेरास पदच्युत करून दुसरा बादशाह स्थापिला.—१९. बाळाजी विश्वनाथ चौथ व सरदेशमुखी व स्वराज्य यांच्या सनदा घेऊन साताऱ्यास आला.—२०. नंतर मराठे लोक स्वराज्यांतील वसूल जमा करूं लागले तो प्रकार.

१. पूर्वीं मोगलांनीं रायगड घेतला ते समयीं तेथें संभाजीचा पुत्र व स्त्री सांपडलीं, तीं त्यांनीं बादशाहाकडे नेलीं, असें मागें लिहिलें; तीं उभयतां औरंगजेबानें आपल्या कुटुंबाच्या माणसांत ठेविलीं. त्यांवर बादशाहाची कन्या बेगमसाहेब अत्यंत प्रीति करूं लागली, आणि त्या पुत्राला सारा वेळ आपणाजवळ बाळगीत असे. तेथें औरंगजेब येई तेव्हां त्या मुलास पाहून बहुत संतुष्ट होत्साता त्याच्या बापाचा चोरटेपणा मनांत आणून त्याला 'सावा'च्या नांवें 'शाहू' ह्मणून थट्टेनें हाका मारी. मग तो मोठा झाला तरी त्यानें आपलें तेंच नांव चालविलें. पुढें औरंगजेबानें त्या मुलाचीं दोन लग्नें केलीं. तो एक संबंध शिंदखेडच्या जाधवाचे कन्येशीं, दुसरा कण्हेरखेडचे पाटील शिंदे यांची कन्या तिशीं. मग बादशाहानें उभयतां जाधव व पाटील यांचा सन्मान करून त्यांस पदवीस चढविलें. शाहू यास अक्कलकोट व इंदापूर व नेवासें व सुपें हीं जहागीर करून दिलीं. याशिवाय आपल्या कमरेची एक तरवार व दुसऱ्या दोन तरवारा दिल्या; त्यांत एक शिवाजीजवळ भवानी नामें पहिली तरवार होती ती, व दुसरी अफझुलखानाची शिवाजीनें त्यास दग्यानें मारून घेतलेली; या दोन्ही रायगडीं सांपडलेल्या होत्या, अशा तीन झाल्या; त्या अद्यापि साताऱ्याच्या राजाजवळ आहेत. पुढें औरंगजेब बादशाह मरण पावल्यावर त्याचा पुत्र अजीमशाह, सुलतान मुआझिम नामा आपला भाऊ याशीं युद्ध करावयास जात होता, तेव्हां त्या अजीमशाहानें त्या शाहूला आपल्या बरोबर नर्मदेच्या उत्तरेस नेलें. मोगलांचें लष्कर देशांतून उठून गेलें तें ताराबाई व तिचे अष्टप्रधान यांस मोठें हितावह झालें. तें असें; पुण्याचा फौजदार लोदीखान यास धनाजी जाधवानें जिंकून त्यापासून चाकण किल्ला घेतला, आणि जे इतर मराठे सरदार होते ते मोगलांच्या मुलखीं उपद्रव करीतच होते. हें वर्तमान अजीमशाहास कळलें, तेव्हां त्यानें झुलफिकारखानाच्या मसलतीनें दंगा न व्हावा अशा बेतानें शाहूची आई व बायका यांस जामिनकीस ठेवून घेऊन शाहूस सोडिलें. त्या वेळेस त्यानें बादशाहाजवळ कबूल केलें कीं, 'जर मी राज्यपदवी पावलों तर तुमच्या आज्ञेंत वागेन.' त्यावरून अजीमशाहही बोलिला कीं, 'तूं जर तसा वागलास तर तुझ्या बापानें घेतलेला विजापुरचा मुलूख तो, व भीमा आणि गोदावरी या दोहोंमध्यें जितका मुलूख आहे त्यांतील कांहीं तुला देईन'. असा नेम ठरवून अजीमशाहानें शाहूला निरोप दिला.

२. तो शाहू तेथून मुक्त झाला, नंतर त्यानें दोन मराठे सरदार वराड व खा-

नदेश यांत अधिकारी होते त्यांस निरोप पाठविला कीं, 'मी तुह्मांकडे येतों, तुह्मी मला अनुकूळ व्हावें.' असें त्याचें सांगणें जातांच ते येऊन शाहूला भेटले, तेव्हां त्यानें ते वश करून घेतले. यानंतर हैबतराव निंबाळकर व नेमाजी शिंदा वगैरे कितीएक मराठे सरदार त्यास तसेच अनुकूळ झाले. मग शाहूनें ताराबाईला पत्र लिहिलें कीं, 'मी आपल्या जागीं येतों, माझें पद माझे स्वाधीन करावें.' तेव्हां ताराबाईच्या मनांत त्यास तें पद द्यावें असें नव्हतें, ह्मणून ती ह्मणे कीं, 'हा शाहू नव्हे, हा कोणी तोतया असेल;' आणि तिनें आपले अष्टप्रधान मिळवून त्यांपासून शपथ करविली कीं, 'आह्मी तुझ्या पुत्राचा पक्ष स्वीकारूं.' इकडे शाहूच्या मनांत अगोदर असें होतें कीं, ताराबाईनें हा शाहू नव्हे असें जें ठरविलें आहे तें लोकांच्या मनांतील जावयाकरितां कांहीं दिवस गोदावरीच्या कांठीं राहून आपण शाहू खरा असें लोकांस कळवावें; परंतु त्याजवळ पंधरा हजार फौज जमली, यास्तव तो युद्धासच निघाला. तिकडून ताराबाईकडचे प्रतिनिधि व धनाजी जाधव हेही सैन्य घेऊन निघाले. ते वेळेस रयतेचें चित्त ताराबाईकडेसच होतें, याकरितां शाहूचें लष्कर वाटेनें येत असतां कोणे एके गांवीं त्यावर तेथचे गांवकरी यांनीं तोफांचे बार केले, तेव्हां तो गांव त्यानें लढून घेतला. तें युद्ध होत असतां त्या गांवांतून कोणी एक बायको आपला मूल कडेवर घेऊन बाहेर निघाली, ती शाहूचे समूर जाऊन त्यापुढें मूल ठेवून बोलिली कीं, 'मीं हा आपला मूल तुमच्या सेवेस अर्पिला.' तो शाहूनें घेऊन त्या जागीं आपणास प्रथम जय प्राप्त झाला ह्मणून त्या मुलाचें नांव 'फत्तेसिंग' ठेविलें, आणि त्यास 'भोंसले'[१] असें आपलें उपनांव दिलें. नंतर तोच अक्कलकोटचा राजा केला. तो फत्तेशिंग अक्कलकोटकर भोंसले यांचा मूळपुरुष होय.

३. शाहूचें व ताराबाईचें लष्कर यांची एकत्र गांठ पडतांच शाहूचें व धनाजीचें कांहीं बोलणें होऊन असा निश्चय ठरला कीं, 'समयविशेषीं धनाजी शाहूचा पक्ष स्वीकारील.' मग त्या दोहों सैन्यांची पुण्याचे उत्तरेकडे पंधरा कोसांवर लढाई झाली. त्यांत प्रतिनिधि होता त्यानें पाहिलें कीं, धनाजी तत्पक्षीय झाला, तेव्हां तो आपले लोक एकीकडे निराळे जमवून साताऱ्याकडे पळाला. मग शाहू व धनाजी मिळून त्यांनीं चंदन व वंदन हे दोन्ही किल्ले घेतले. तेथें ताराबाईकडच्या कितीएका सरदारांचीं मुलेंमाणसें सांपडलीं तीं त्यानें बंदींत ठेविलीं. नंतर पुढें जाऊन सातारा किल्ला घेतला. तो असा; तेथें एक मुसलमान सरदार होता त्यानें युद्ध न करितां तेथचा अधिकारी ब्राह्मण असे, त्यास कैद करून किल्ला त्यास

१. त्या मुलाचें पहिलें उपनांव 'लोखंडे' होतें.

दिला. हें वर्तमान सन १७०८ त घडलें. तो शाहू साताऱ्यास पोंचतांच त्यानें आपली गादी स्वीकारिली, आणि आपणांस 'मराठ्यांचा राजा' ह्मणवूं लागला. आणखी त्यानें गदाधर प्रऱ्हादास प्रतिनिधि करून बहिरोपंत पिंगळा पेशवा केला. सेनापति धनाजी जाधव होताच, त्याला प्रांतांतील वसूल जमा करावयाचें काम सांगितलें. त्या वेळेस दंग्यामुळें मुलखांची लावणी नीट झाली नव्हती. ह्मणून जेथें सांपडे तेथें कांहीं घेत, भरवसूल उत्पन्न होईना. त्या कामावर धनाजीनें दोन कारकून ठेविले; एक आबाजी पुरंदऱ्या, सासवडचा कुळकर्णी; आणि दुसरा श्रीवर्धनचा कुळकर्णी, त्याचें नांव बाळाजी विश्वनाथ भट. तोच पुढें पेशवा झाला. तें श्रीवर्धन चौलप्रांतीं आहे.

४. इकडे मोगलांकडे काय काय वर्तमान झालें तें प्रकरण असें; सुलतान मुआझिम व अजीमशाह हे दोघे आग्र्याजवळ लढले, त्या युद्धांत सुलतान मुआझिम जय पावला, आणि अजीमशाह व त्याचे दोन पुत्र व कितीएक मोठे मोठे सरदार मरण पावले. कामबक्ष तर बादशाह मेल्यावर आपणास आपणच बादशाह ह्मणवूं लागला. तेव्हां मोगल व कितीएक मराठे लोकही त्यास अनुकूळ होते, परंतु त्याची वृत्ति ठीक नाहीं असें पाहून त्या लोकांनीं पुढें त्याचा पक्ष सोडिला. सुलतान मुआझिम तर जय पावला असतांही उत्संखळ न होतां मोठ्या धिमेपणानें दक्षिण जिंकावयास निघाला. तो आपला भाऊ कामबक्ष यास विजापुर व हैदराबाद या दोहों संस्थानांची बादशाही देणार होता, परंतु तो तें कांहीं ऐकेना, आणि युद्धास सिद्ध झाला तेव्हां सुलतानानें त्यावर झुलफिकारखान पाठविला. तो व कामबक्ष उभयतां हैदराबादेजवळ लढले. त्या युद्धांत कामबक्ष मेला. तो झुलफिकारखान आग्र्याजवळचे लढाईत अजीमशाह याच्या लष्करांत होता, त्यानें त्या वेळेस मोठें शौर्य केलें. शेवटीं अजीमशाहाचा अगदीं नाश झाला तेव्हां तो युद्ध टाकून निघून गेला. त्यावरून मग सुलतान मुआझिमानें त्याला बोलावून आणून सर्व दक्षिणेचा अधिकार त्यास दिला, आणि 'अमीर उल्उमरा' असें त्याचें नवें नांव ठेविलें. असा त्यास सुलतान प्रसन्न झाला ह्मणून तो सुलतान मुआझिमाकडचा झाला. तो झुलफिकारखान हैदराबादचे लढाईस गेला ते समयीं शाहूराजानें त्याचे कुमकेस फौज पाठविली. तोही शाहूचें इष्ट चिंतीत असे. त्यानें बादशाहास असें समजाविलें कीं, 'जर तुह्मी शाहूला अनुकूळ व्हाल तर तो आपल्या प्रजेमध्यें मान्य होईल, तेणेंकरून आपलें हितच घडेल.' त्यावरून बादशाह शाहूला दक्षिणेच्या सरदेशमुखीची सनद द्यावयास सिद्ध झाला. मराठे पहिले सरदेशमुखी बळेंच करीत होते, परंतु झुलफिकारखानाच्या बोलण्यावरून बादशाह शाहूला त्या

अधिकाराची सनद देत होता, तेव्हां ताराबाईच्या वकिलांनीं बादशाहाच्या वजिरास समजाविलें कीं, 'ताराबाईचा पुत्र मुख्य धनी.' यास्तव सुलतानानें ताराबाईचा पुत्र शिवाजी याचे नांवें सनद तयार मात्र केली, आणि असा नेम केला कीं, 'तूर्त सनद द्यावयाची नाहीं, उभयतां लढून जो मुख्य ठरेल त्यास देऊं.' त्याच वर्षी पर्जन्यकाळीं शाहूनें ताराबाईशीं युद्ध करावयास चंदन व वंदन एथें लष्कर तयार करून ठेविलें. मग दसरा झाल्यावर लढाईची सिद्धता केली तोंच प्रथम पन्हाळा व विशाळगड हे दोन्ही किल्ले शाहूच्या स्वाधीन झाले. मग तो रांगणा किल्ला घ्यावयास गेला; तेथें ताराबाई होती ती, शाहू जवळ आला असें समजून तेथून पळून मालवणास गेली. तिच्या पाठीमागें तेथचा किल्लेकरी रांगणा किल्ला देईना. ह्मणून युद्धाचा उद्योग मांडिला. तोही सिद्धीस जाईना. कां कीं, तो किल्लेकरी मोठा शूर होता, आणि पर्जन्यकाळही पुढें समीप आला होता, याकरितां शाहू तेथून निघून कोल्हापुरीं गेला. त्यावर पाऊसकाळ गेल्यानंतर पुनः तो उपक्रम निघाला होता, परंतु मोगलांच्या कांहीं सांगण्यावरून त्याला ताराबाईस जिंकणें आवश्यक पडलें नाहीं. त्या बोलण्याचा प्रकार असा; ज्या समयीं सुलतान मुआ-झिम माघारां हिंदुस्थानांत गेला व त्याजबरोबर झुलफिकारखानही जावयास निघाला, त्या समयीं त्यानें आपल्या अधिकारावर दाऊदखान पनी नामें दुसरा एक मुस-लमान ठेवून त्याला दक्षिणेचा सर्व अधिकार देऊन याखेरीज बऱ्हाणपूरचाही अधिकार दिला. आणि शाहूच्या पक्षाचे जे मराठे त्यांस सांगितलें कीं, 'तुह्मांस दाऊदखान प्रतिवर्षी वसुलापैकीं चतुर्थांश देत जाईल.' यावरून अर्थात् ताराबाईचें स्वामित्व नाहीं असें सिद्ध झालें ह्मणून शाहू समजला.

५. सन १७०९ च्या समाप्तीस शाहू कोल्हापूर सोडून माघारां साताऱ्यास आला. मग त्यानें आपणास दोन बायका केल्या; एक शिरके यांच्या कुळाची व दुसरी मोहित्यांची. त्याच्या पहिल्या दोघी स्त्रिया दिल्लींतच होत्या. मग पुढें थोडक्या दिवसांत त्यांतली एक शिंद्याची कन्या ती मेली. धनाजी जाधव यास फार दिवस बरें वाटेनासें होऊन तो कोल्हापुराहून माघारां साताऱ्यास येत होता तों वाटेनें वारणेचे कांठीं त्याच वेळेस मृत्यु पावला. त्याजबरोबर बाळाजी विश्वनाथ श्रीवर्धनकर होता, तो त्याच्या शरीरास बरें नाहींसें होतांच त्याचा सर्व अधिकार आपण संभाळूं लागला. तेव्हां धनाजीचा पुत्र चंद्रसेन जाधव व कितीएक त्याचे पदरचे ब्राह्मण ते त्याविषयीं द्वेष करूं लागले.

६. तो शाहू कोल्हापूर सोडून साताऱ्यास येतांच पन्हाळ्याच्या हवालदाराशीं व ताराबाईकडील मनुष्यांशीं कांहीं बोलणें झालें त्यावरून आणि पुढें सावंत

यांच्या साहाय्येंकरून ताराबाई मालवणाहून निघून पन्हाळ्यास आली. ती तेथें येऊन पोंचतांच त्या हवालदारानें किल्ला तिच्या स्वाधीन केला. मग ती माघारी मालवणास न जातां कोल्हापुरच आपलें संस्थान करून तेथें राहिली. ते समयीं रामचंद्रपंत व संक्राजी नारायण हे दोघे तिच्या पक्षाचे होते. त्यांत संक्राजी नारायण हा सचिव, त्याच्या मुलखांत शिवाजी प्रथम राज्य करूं लागला ह्मणून मराठे लोक यांस असें वाटे कीं, हें आपल्या राज्याच्या आरंभाचें मूळ ठिकाण होय. यास्तव शाहूलाही तो मुलूख घ्यावयाचें काम आधीं करावें लागलें. याकरितां त्यानें पुण्याहून लष्कर पाठवून पहिल्यानें राजगड घेतला. त्याशिवाय जे त्यांचे दुसरे किल्ले राहिले होते त्यांतून सामान फार भरलेलें होतें, आणि शिबंदीसही मावळे लोक बहुत असत, ह्मणून ते असाध्यसे समजून तें काम टाकिलें. असें असतां शाहूला कोणीं वर्तमान कळविलें कीं, 'सचिव पंतानें ताराबाईचा पक्ष स्वीकारीन ह्मणून शपथ वाहिली, तेणेंकरून सचिव पंतास मोठा पश्चात्ताप होऊन त्यानें संन्यास घेऊन जळसमाधि घेतली.' हें वर्तमान सन १७१२ च्या जानेवारी महिन्यांत घडलें. त्याच महिन्यांत ताराबाईचा पुत्र शिवाजी यास देवी येऊन तो मेला. तेव्हां रामचंद्रपंत यानें ताराबाईला राज्यकार्यांतून काढून राजसबाईचा पुत्र संभाजी यास शिवाजीचे जागीं स्थापून मोठ्या दक्षतेनें आपण कारभार करूं लागला. सचिव पंत मेला, हें शाहूस हर्षास्पद होऊन करवीरांतील ताराबाई वगैरे यांस विघ्न झालें. शाहूनें चतुरपणानें, आपला भलेपणा व धनीपणा लोकांत प्रकट व्हावा याकरितां ते वेळेस नारो शंकर नामें त्या सचिवाचा पुत्र दोन वर्षांचा असतां त्याच्या नांवें सचिवपणाचीं वस्त्रें पाठवून त्याच्या कारभाऱ्याचे हातून तें काम घेऊं लागला. त्याच्या अशा आचरणानें सचिव आज्ञेंत वागूं लागला, परंतु प्रतिनिधि वागेना. तो वश झाला पाहिजे ह्मणून शाहूनें उद्योग केला. तो असा; त्यानें अगोदर परशुराम त्रिंबक प्रतिनिधि याला कैदेंतून सोडिलें, नंतर आपला प्रतिनिधि गदाधर प्रन्हाद यास दूर करून त्याचे जागीं त्या परशुराम त्रिंबकास नेमीत असतां त्यानें त्या अधिकारीं आपला पुत्र योजिला. त्यानें विशाळगडीं जाऊन त्याचा सारा मुलूख त्याचे हातीं लागतांच ताराबाईचा पक्ष स्वीकारला. तेव्हां तिनें तो कोल्हापुरचा प्रतिनिधि केला. असें होतांच शाहू समजला कीं, हें कृत्रिम परशुराम त्रिंबकाचेंच असेल, याकरितां त्यास पुनः कैदेंत ठेवून जिवानिशीं मारावें असें शाहूच्या मनांत होतें, परंतु त्याजवळचे कारभारी यांनीं त्यास असें समजाविलें कीं, 'जर तुह्मी यास माराल तर लोकांचें मन तुह्मावरचें उतरेल; त्यास, जरी त्याचा

अन्याय असला तरी न मारावें हेंच योग्य.' तें शाहूच्या विचारास येऊन त्यास कैदेंत ठेविलें.

७. दिल्लीच्या दरबारांत कांहीं प्रकरणीं व्यत्यय आला ह्मणून दाऊदखानाला दक्षिणेचा अधिकार टाकून गुजराथेंत जावें लागलें. यास्तव मोगल व मराठे यांचा तह होऊन मोगल मराठ्यांस चौथ व सरदेशमुखी यासंबंधें जें देत होते त्यांतही कांहीं अंतर पडलें, ह्मणून शाहूनें चंद्रसेन जाधव सेनापति यास मोगलांच्या मुलखांतून चौथ व सरदेशमुखी व घासदाण्यासंबंधें ऐवज जमा करून आणावयाकरितां फौज देऊन पाठविलें. त्याबरोबर त्याच्या बापाचा कारकून बाळाजी विश्वनाथ देखरेख करावयास दिला. त्या दोघांचें वैमनस्य पूर्वीं धनाजीला समाधान नाहींसें झालें तेव्हांपासूनच पडलें होतें, मग या चौकशीच्या निमित्तेंकरून फारच द्वेष वाढला. नंतर कोणेएके दिवशीं बाळाजी विश्वनाथाचे स्वार हरणाचे. पाठीस लागले असतां त्यांशीं जाधवाच्या स्वारांचा कांहीं कलह उत्पन्न होऊन जो त्यांचा द्वेष गुप्त होता तो प्रगट झाला. तेव्हां बाळाजी विश्वनाथ आपला जीव रक्षावयाकरितां पळाला, तो सासवडांत सचिवाचा कारभारी होता त्याजवळ जाऊन त्याचें बहुत आर्जव करून पुरंदर किल्ल्यावर आपणास आश्रय मागूं लागला. त्यानें जाधवाच्या भयेंकरून त्यास किल्ल्यावर चढूं दिलें नाहीं. त्या वेळेस त्याचे पाठीस लागलेले जाधवाचे स्वारही त्याचे दृष्टीस पडले. तेव्हां तो बाळाजी विश्वनाथ व त्याचे दोघे पुत्र बाजीराव आणि चिमणाजी व थोडकेसे लोक त्याबरोबर होते ते समूरच्या खोऱ्यांत पांडवगड आहे त्या ठिकाणीं जावयाचा विचार करून कांहींसे तिकडे गेले, तेथेंही जाधवाचे लोक त्याचा शोध करीत होते ते त्यास उमगले. मग थोडके दिवस कोठें तरी दडून राहिले. त्यांत एक पिलाजी जाधव, एक धुमाळ नामा असे दोघे मराठे होते. त्यांनीं कबूल केलें कीं, 'आह्मी आपल्या भावाबंदांकडचे कांहीं शिपाई जमा करून आणून तुह्मांला पांडवगडास पोंहचवून देऊं, आणि प्रसंग पडल्यास या कार्याकरितां मरून जाऊं,' अशी शपथही दिली. नंतर त्यांनीं त्याप्रमाणें लोक मिळविले, आणि बाळाजी विश्वनाथास घोड्यावर नीट बसतां येत नव्हतें, असें असतांही त्यास घोड्यावर बसवून दोहीं बाजूंनीं माणसांकडून धरवून जाधवाच्या लोकांशीं वाटेनें लढत लढत त्याला पांडवगडीं पोंचविलें. तेथें किल्लेकरी होता त्यानें शाहूचे आज्ञेस्तव त्याचें संरक्षण केलें. तेव्हां चंद्रसेन जाधव यानें त्या किल्लेकऱ्यास फार निकड लाविली कीं, 'याला लवकर माझे स्वाधीन कर, नाहीं तर मी शाहूचा पक्ष टाकीन.' तेव्हां शाहूनें हैबतराव निंबाळकर सरलष्कर अहमदनगरीं होता त्याला साताऱ्यास बोलाविलें, आणि पांडवगडास लिहून पाठविलें

कीं, 'बाळाजी विश्वनाथाला जाधवाचे हातीं देऊं नये.' नंतर जाधवास कळलें कीं, हैबतराव फलटणास येऊन पोंचला; तेव्हां तो पांडवगड सोडून देउरास गेला. तेथें हैबतराव निंबाळकर आणि चंद्रसेन जाधव या उभयतांच्या लष्कराची गांठ पडून मोठें युद्ध झालें, त्यांत जाधव पराभव पावून कोल्हापुरास गेला. त्याजबरोबर सर्जेराव घाटगा होता, त्याचे वडिलांचे वेळेचें कांहीं वतन कागलप्रांतीं होतें त्याची सनद त्यास राजसबाईचा पुत्र संभाजी यानें त्या वेळेस दिली. त्यापुढें घाटगे व जाधव उभयतां मिळून चिन कुलिचखान नामें दक्षिणेचा नवा अधिकारी झाला होता, त्याचे भेटीस निघून गेले. त्यानें जाधवाचा सन्मान केला, आणि आपल्या चाकरीस राहावयास सांगितलें. तें त्यानें मान्य केलें ह्मणून त्याचे जवळच्या लोकांच्या पोषणार्थ वाळकी शहरसंबंधें मोठा मुलूख जहागीर करून दिला. याप्रमाणें सन १७१३ त घडलें.

८. ते वेळेस मोगलांत जें वर्तमान झालें, तें असें. सुलतान मुआझिम सन १७१२ त मेला तेव्हां त्या तक्ताच्या आधिपत्याविषयीं त्याचे पुत्र भांडूं लागले. त्यांत कोणासही तें प्राप्त न होतां तेथें दोघे सैद होते ते मोठे शूर असत. एकाचें नांव अबदुलखान; दुसऱ्याचें हुसेन अलीखान. त्यांनीं सुलतान मुआझिमाचा नातू (पुत्राचा पुत्र) फेरुकशेर होता तो तक्ताधिपति केला. त्याच कलहांत झुलफिकारखानाचें डोकें मारिलें. नंतर दक्षिणेचा अधिकारी दाऊदखान याची बदली होऊन त्या जागीं चिन कुलिचखान याची योजना झाली. त्यांत विशेष हाच की, तो चिन कुलिचखान दक्षिणेच्या अधिकारीं मोठा विख्यात झाला, तोच हैदराबादेचे तक्ताधिपतींचा मूळपुरुष. तो मोठ्या पदवीस चढला, तो असा; त्याचा बाप गाजीउद्दीन नामा; त्याचें पूर्वींचें नांव मीर कमरुद्दीन; तो तरुण होता तेव्हांच औरंगजेबानें 'चिन कुलिचखान' असें त्याचें नवें नांव ठेवून त्याला पांच हजार स्वारांची मनसब, आणि विजापुरची सुभेदारी दिली. पुढें औरंगजेब मेल्यावर फेरुकशेराच्या स्थापनाविषयीं त्या सैदांस कुलिचखानानें मदत केली. त्याचा आणि झुलफिकारखानाचा द्वेष होता, ह्मणून फेरुकशेर यानें हा आपला हितकर्ता असें जाणून त्याला झुलफिकारखानाचा अधिकार दिला. आणि त्याच्या नांवास 'निझाम उल्मुल्क' असें पद जोडिलें. यावरून असें दिसतें कीं, एकाचा द्वेष करणारे असे जे दोघे ते परस्परें एकमेकांचे मित्र होतात. याप्रमाणें गरीब व संपन्न यांची रीति सारिखीच आहे.

९. जाधव सेनापति व घाटगे हे उभयतां चिन कुलिचखानाकडे गेले. त्यांचे बरोबर रंभाजी निंबाळकर नामें तिसरा एक मराठा गेला होता, तो थोडक्या दि-

वसांत मोठा विख्यात होऊन 'राव रंभा' असें नांव पावला. दक्षिणेचा अधिकारी निझामउल्मुल्क औरंगाबादेस जाऊन पोंचला, त्यानें त्या समयीं शाहूचा हैबतराव निंबाळकर सरलष्कर याच्या उपद्रवाचे नाशासाठीं फौज पाठविली. तें वर्तमान ऐकून हैबतराव सरलष्कर गोदावरीचा कांठ सोडून भीमातीरीं गेला. त्याच्या मदतीस शाहूनें बाळाजी विश्वनाथ याजबरोबर सैन्य देऊन त्याच्या नांवास 'सेनाकर्ते' असें नवें पद जोडून पाठविला. तो हैबतराव सरलष्करास भेटतांच उभयतांचा विचार ठरला कीं, 'पुरंधर किल्ल्याजवळ जाऊन मोगलाच्या लष्कराची वाट पाहत राहावें.' नंतर त्याप्रमाणें केलें असतां पुरंधराजवळ युद्धप्रसंग होऊन मराठे आपला जय झाला असें ह्मणूं लागले, परंतु त्यांचें लष्कर तेथून मागें हटून साळप्याच्या घाटाजवळ गेलें. ते समयीं मोगलांच्या लष्करांत रंभाजी निंबाळकर मराठा व त्याचे लोक होते, त्यांनीं लढाई झाल्यावर पुणेंपरगणा घेतला. त्यावरून निझामउल्मुल्कानें त्यास पुण्याजवळच जहागीर दिली. यानंतर शाहूचा आणि मोगलांचा कांहीं तह होऊन मोगल माघारे औरंगाबादेस गेले.

१०. त्या वेळेस दक्षिणेच्या राज्याची फार अव्यवस्था झाली. ती अशी; कोणी सरदार शाहूकडचे, आणि कोणी संभाजीकडचे, असे दोन पक्ष होऊन आणखी जो कोणी बलाढ्य मराठा असे तोही स्वतंत्रपणेंच वागे. असा स्वसत्तेनें वागणारा एक दमाजी थोरात नामें सरदार रामचंद्रपंताचे पदरचा होता, तो पाटसजवळच्या हिंगणगांवची गढी नीट करून त्याच्या आसमंतात् वीस कोशांपर्यंत सत्ता करीत असे. त्याचा स्वभाव द्वाड होता. अद्यापि मराठे लोकांत त्याची कथा अशी आहे कीं, त्यानें कोणेएके समयीं बाळाजी विश्वनाथाशीं बेलभंडार करून अभयवचन दिलें असतां पुढें प्रसंगीं असें उत्तर केलें कीं, 'भंडार ह्मणजे हळद, ती आह्मी नित्य खात नाहीं? तसाच बेल ह्मणजे झाडाचीं पानें, तीं माझें काय करतील?' दुसरा एक स्वतंत्रपणा करणारा उदाजी चव्हाण नामें बत्तीस शिराळ्याच्या गढींत असे. त्यानें असा उपद्रव केला कीं, शाहूला त्याच्या नाशासाठीं शिराळें व कऱ्हाड यांची चौथाई द्यावी लागली. त्या दोघांखेरीज दुसरेही कितीएक लहान मोठे मराठे होते ते आपणांस संभाजीचे पक्षाचे ह्मणवीत. त्यांत कान्होजी आंग्रेही होता. त्याचे हातीं सावंताचे वाडीपासून मुंबईपर्यंत मुलूख असतांही तो कल्याण परगणा घ्यावयाचा उद्योग करीत होता. त्या संकटसमयीं बाळाजी विश्वनाथानें शाहूशीं मसलत केली कीं, 'या वेळेस मोठा पराक्रम केला पाहिजे, नाहीं तर राज्य बुडेल. त्यास आधीं दमाजी थोरात जिंकावा.' असा बेत होऊन तो सैन्य घेऊन निघाला. त्यास थोरातानें कांहीं तहाचें बोलणें करावयाचें ह्मणून बोलाविलें.

मग दग्यानें तो बाळाजी विश्वनाथ व त्याचे दोघे पुत्र एक बाजीराव व एक चिमणाजी व त्याचा मित्र आबाजी पुरंधरे इतके धरून बंदींत ठेविले. नंतर त्यांस सोडावयाकरितां बहुत द्रव्य मागूं लागला, आणि फार छळ केला, तो त्यांनीं सोशिला; तेव्हां शाहूनें त्यांच्या मुक्ततेसाठीं भूर्दंड भरल्याप्रमाणें द्रव्य देऊन त्यांची सुटका केली. उपरांत सचिवपंतास आज्ञा दिली कीं, 'तुह्मीं थोरातास जिंकावें.' त्यानें तेथें जाऊन युद्ध केलें, तेव्हां थोरातानें सचिव व त्याचा मुतालीक हे उभयतां धरून हिंगणगांवच्या किल्ल्यांत कैद केले. इकडे साताऱ्यास शाहूनें फौजेच्या दोन टोळ्या तयार केल्या, त्यांत एकीकडे बहिरोपंत पिंगळे पेशवा नेमिला; यानें कोंकणांत जाऊन कल्याण परगणा रक्षावा; दुसरा बाळाजी विश्वनाथ यानें शंभुमहादेवाच्या डोंगराकडे उपद्रव करणारा जो कृष्णराव खटावकर त्यावर जावें; असा हुकूम केला. तो ब्राह्मण असा धीट झाला होता कीं, जो शाहूच्या लष्करावर औंदापावेतों चालून आला. त्याचा बाळाजी विश्वनाथानें अगदीं पराभव केला असतां शाहूनें तो शरण आलासा पाहून त्याच्या अन्यायाची क्षमा केली, आणि खटाव गांव त्यास इनाम करून दिला; तो अद्यापि त्याचे वंशींचे पुरुष अनुभवितात. त्या लढाईंत बाळाजी विश्वनाथ जय पावला, त्याचें मुख्य कारण परशुराम त्रिंबकाचा दुसरा पुत्र श्रीपतराव यानें मोठें शौर्य केलें. तो ज्या वेळेस निघाला त्या वेळेस त्याच्या बापानें त्याला साताऱ्यांतच सांगितलें कीं, 'तुझ्या वडील भावानें दगा करून ताराबाईचा पक्ष स्वीकारला, तेणेंकरून हा एवढा अनर्थ झाला; त्यास जर तूं या वेळेस मोठें शौर्य करिशील, तरच माझी एथून सुटका होईल.' असें त्यास पित्याचें सांगणें होतें ह्मणून तो मनापासून लढला. त्यावरून शाहू प्रसन्न होऊन त्याच्या बापाला सोडून त्याची प्रतिनिधिपणाची पदवी पुनः त्यास दिली.

११. बहिरोपंत पिंगळे आंग्र्यावर गेला होता, त्याची व आंग्र्याची लढाई कोंकणांत झाली. त्या लढाईंत आंग्र्यानें तो बहिरोपंत धरून कैदेंत ठेविला, आणि शाहूचे किल्ले लोहगड व राजमाची हे दोन्ही घेतले. आणखी लोकांत वर्तमान उठविलें कीं, 'आतां सातारा घ्यावयास जाणार.' तेव्हां शाहूनें आपले सर्व लोक साताऱ्याजवळ जमा केले, त्यांचा मुख्य बाळाजी विश्वनाथ केला. तो आंग्र्याचा पराक्रम जाणत होता, ह्मणून युद्धापेक्षां तह करावा हेंच चांगलें असें समजून त्यानें आंग्र्याशीं तह केला. तो प्रकार असा; शाहूनें मोठे अवघड असे दहा[1] किल्ले आणि अंमळसे सवघड असे सोळा किल्ले व त्यासंबंधें गांवें दिलीं.

---

१. खांदेरी, कुलाबा, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग, जयगड, देवदुर्ग, कनकदुर्ग, फत्तेगड, उचितगड, आणि यशवंतदुर्ग.

याखेरीज त्यास लढाऊ गलबतांचें मुख्यत्वही दिलें. आणि त्याचें पूर्वीचें नांव 'सरखेल' असें होतें तें तसेंच स्थापिलें. आंग्र्यानें बहिरोपंत पेशवा सोडावा, आणि राजमाचीखेरीज जे शाहूचे किल्ले घेतले ते परत द्यावे, आणि शाहूचा पक्ष धरावा, संभाजीचा धरूं नये, असें ठरलें.

१२. याप्रमाणें शाहूचा व आंग्र्याचा तह होऊन शाहूचा मुलूख आंग्र्यानें माघारा दिला. त्यांत आंग्र्याबरोबर कांहीं मुलूख सिद्दीनें घेतला होता तोही शाहूकडे गेला, त्यावरून सिद्दी आंग्र्याशीं लढूं लागला; तेव्हां आंग्र्याचे कुमकेस बाळाजी विश्वनाथ गेला. मग ते सिद्दीच्या मुलखांत शिरले, तेव्हां तो लवकरच शरण आला. असें उत्कृष्ट कार्य करून बाळाजी विश्वनाथ माघारा शाहूकडे साताऱ्यास सन १७१४ त गेला. तेव्हां शाहूनें त्याचा मोठा मान करून त्याला पेशवाई दिली; आणि त्या बाळाजीचा मित्र आबाजी पुरंदरे तो त्याचा मुतालीक केला, आणखी रामचंद्रपंत भानू यास पेशवा याची फडणिशी दिली; पहिला पेशवा बहिरोपंत पिंगळे तो दूर केला.

१३. चंद्रसेन जाधव सेनापति यानें शाहूचा पक्ष टाकिल्यापासून तें पद मानाजी मोऱ्यास दिलें; परंतु तो तादृश नव्हता ह्मणून बाळाजी विश्वनाथ पेशवे व हैबतराव निंबाळकर हे उभयतां पुनः थोरातास जिंकावयाकरितां नेमिले. ते समयीं बाळाजी विश्वनाथास विचार पडला कीं, 'जर आह्मीं एथें युद्धप्रसंग केला, तर तो थोरात सचिवपंताला मारून टाकील,' हें एक भय, व सचिवाची मातुश्री येसूबाई इनें बाळाजीची फार प्रार्थना केली होती, यास्तव त्यानें थोराताशीं कांहीं युक्तीचें बोलणें करून आधीं सचिव सोडविला, नंतर युद्ध केलें. तेव्हां थोरातास तें लष्कर मोठें ह्मणून मैदानांत लढवेना, याकरितां तो किल्ल्यांत जाऊन लढूं लागला. मग ते तोफा लावून किल्ल्याचा तट पाडून आंत शिरले; आणि थोरातास कैद करून किल्ला पाडून अगदीं नाहींसा करिते झाले. येसूबाईनें आपला पुत्र सुखी आला असें पाहून बहुत उपकारी होऊन पुणेंपरगण्यांत जितके सचिवपंताचे हक्क होते तितके सारे बाळाजी विश्वनाथास दिले. ते वेळेस बाळाजीच्या कुटुंबाचीं माणसें सासवडांत होतीं. या देण्याखेरीज जो संकटसमयीं फार उपयोगीं पडणारा, अत्यंत सुदृढ, असा जो पुरंधर किल्ला तो समयविशेषीं मुलांमाणसांच्या संरक्षणासाठीं दिला. तो शाहूचे आज्ञेवांचून देववेना ह्मणून बाळाजीनेंही शाहूला हेंच निमित्त समजाविलें कीं, 'समयीं हा किल्ला आमच्या माणसांच्या रक्षणास उपयोगीं पडावा,' त्यावरून शाहूनें 'किल्ला पेशव्यास द्यावा' ह्मणून आज्ञा दिली.

---

१. रामचंद्रपंत भानू हा नाना फडणिसाचा मूळपुरुष होय.

तो शाहू इतका वश झाला, आणि पेशव्यास पुरंधर दिला, ही आपल्या वंशाच्या बंधाचे सांखळीची पहिली कडी त्यानें आपल्या हातें घडली.

१४. सन १७१५ त सरलष्कर, राजानें आपणास सेनापतित्व दिलें नाहीं ह्मणून राजाशीं कलह करून निघाला, तो गोदावरीतीरीं जाऊन राहिला; त्यावर पुनः त्यांचें सख्य झालें नाहीं. त्या वेळेस पुणेंपरगण्यांत मोगलांकडचा बाजी कदम नामें मुख्य अधिकारी होता, तो पेशव्यांनीं 'आह्मी रंभाजी निंबाळकरास उपद्रव करणार नाहीं' असें कबूल करून वश केला. नंतर त्या अधिकाऱ्यानें पेशव्यांचा पक्षपात धरिला, तेव्हां तो परगणा पेशव्यांच्या हातीं लागला. त्यापासून पेशवे उत्तम प्रकारें प्रजापालन करूं लागले, त्यांत चोरांचें पारिपत्य प्रथमतः केलें. बाळाजी विश्वनाथ पेशवा याचें बळ त्या दिवसापासून वाढलें, आणि कोणतेंही मोठें कार्य त्याचे मसलतीवांचून होईना असें झालें; व शाहू राज्यकारभारांत मनांतून कोणाशीं वक्र नसे, त्यावरून बाळाजी विश्वनाथही तसाच वागे. त्यानें शिवाजीचे कायदे मनांत उत्तम मानिले होते, परंतु संभाजीपासून अशी चाल पडली होती कीं, कोणी मोठ्या सरदारानें पराक्रमेंकरून एखादा मुलूख घेतला असतां तो त्यास द्यावा. त्याप्रमाणें निरुपाय होऊन हाही कोणास सनदा देई, पण अशानें राज्य बळहीन असतें. त्या वेळेचा प्रतिनिधि व अष्ट प्रधान यांचीं नांवें:—

प्रतिनिधि—परशुराम त्रिंबक.

| | |
|---|---|
| पेशवा—बाळाजी विश्वनाथ. | सेनापति—मानसिंग मोरे. |
| अमात्य—अंबाराव बाबूराव हणमंते. | सुमंत—आनंदराव. |
| सचिव—नारो शंकर. | न्यायाधीश—होनाजी अनंत. |
| मंत्री—नारो राम शेणवी. | पंडितराव—मुद्गलभट्ट उपाध्याय. |

त्याच वर्षी परसोजी भोंसले व हैबतराव निंबाळकर मेले, तेव्हां शाहूनें परसोजीच्या पुत्रास त्याचा मुलूख देऊन त्याचें 'सेनासाहेब सुभे' असें पद होतें तेंही दिलें. त्याप्रमाणें हैबतराव निंबाळकराच्या पुत्रास दिलें नाहीं. त्याचें पद व मुलूख दावलशी सोमवंशी यास दिला, यास्तव मनांत खिन्न होऊन त्यानें शाहूचा पक्ष टाकिला, आणि मोगलांचा सरदार चंद्रसेन जाधव याचा पक्ष धरिला. त्यापुढें तो हैदराबादेचा निझामउल्मुल्कापासून बारशी आदिकरून मुलूख जहागीर पावला.

१५. त्या वेळेस शाहू राज्यकारभार आपल्या कारभाऱ्यांकडे सोंपवून आपण स्वस्थपणें महालांत असे, किंवा शिकारीस हिंडे. तो बाळपणीं औरंगजेबाचे घरीं मोठ्या मिजासींत होता, त्यावरून जी संवय त्याला लागली ती त्याचे मोठेपणींही

जाईना, ह्मणून तो स्वसंतोषें वागण्यांत प्रीति ठेवी. त्याला शिवाजीप्रमाणें घाटमाथ्यावर किंवा कोंकणांत आंगेंच संचार करणें आवडत नसे, आणि त्याचे वकील व मानकरी लोक व कारभारी आपआपल्या कामासाठीं फार नम्रतेनें आर्जवी गोष्टी बोलत त्या तो सत्य मानून सर्व कामें त्यांचे हातून करवी. तो असें समजला नाहीं कीं, सर्व कामें दुसऱ्याचे हातीं दिलीं असतां तोच प्रबळ होऊन आपल्या महत्त्वाची हानि करील. याप्रमाणें वर्तमान असतांही मराठे लोक त्या वेळेस प्रबळ होऊं लागले. शाहू चातुर्याविषयीं तर मध्यम होता, परंतु मोठा धार्मिक असे, आणि ब्राह्मणांचें फार पालन करी; आणखी मोगल लोक त्या शाहूचा बहुत मान राखीत, तेणेंकरून मराठ्यांचें विशेष प्राबल्य झालें, आणि त्याची प्रजा त्यास बहुत मानूं लागली. शाहूच्या पूर्वीं शिवाजीपासून जितके तक्ताधिपति झाले तितके स्वतंत्रपणानें वागत, परंतु शाहू आपण हिंदूंचा तक्ताधिपति असून आपणास दिलीच्या बादशाहाचा आश्रित ह्मणवी.

१६. त्या समयीं मोगलांचा फेरुकशेर बादशाह यास ज्या दोघां सैदांच्या आश्रयानें पूर्वीं तक्त प्राप्त झालें, ते आपणास डोईजड होतील अशा शंकेनें त्याच्या मनांत आलें कीं, दोघे वेगळे करून बळहीन करावे. यास्तव त्यांत धाकटा जो सैद हुसेन अल्लीखान नामें होता, तो दक्षिणेचा अधिकारी करून रवाना केला, आणि पहिला दक्षिणेचा अधिकारी दाउदखान होता तो मोठा शहाणा, त्यानें मराठे लोकांशीं स्नेह ठेविला असे. तो आपण गुजराथेचा अधिकारी केला होता ह्मणून त्यास गुप्तपणें लिहिलें कीं, 'मीं एथून सैद पाठविला आहे, तर तुह्मीं दक्षिणेचें अधिष्ठान त्याचे हातीं लागूं देऊं नये, ह्मणजे सहा सुभे दक्षिण तुह्मास मिळेल.' त्यावरून दाउदखानानें कुमकेस मराठे सरदारांस बोलावून युद्धाची तयारी केली. तेव्हां मराठे सरदारांपैकीं नेमाजी शिंदा मात्र दाउदखानास मिळाला, त्याला बरोबर घेऊन तो सैदाशीं लढला. ते वेळेस शिंदा एकीकडे उभा राहिला, लढला नाहीं. कां कीं, त्याच्या मनांत जो सबळ पक्ष दिसेल तिकडे मिळावें असें होतें. नंतर युद्ध होऊन दाउदखान पडला, तेव्हां तो शिंदा सैदास भेटून त्याजवळ राहिला. हें वर्तमान सन १७१६ त घडलें. सैद हुसेन अल्ली यानें दक्षिण सुभा घेतल्यावर प्रथम खंडेराव दाभाडे याच्या पारिपत्यास फौज नेमिली. कारण कीं, त्यानें सुरतेपासून बऱ्हाणपुरपर्यंत वाटसरू लोकांस बहुत दिवस उपद्रव केला होता. तो असा कीं, त्यानें जागोजाग आपल्या लोकांच्या टोळ्या करून ठेविल्या असत, ते लोक कोणी वाटेनें जाई त्यापासून खंडणी घेऊन त्यास पुढें जाण्याचें दस्तक देत, तें न झाल्यास लुटीत. त्याच्या पारिपत्यास फौज पाठविलेली आठ हजार होती, ती

जवळ आली हें वर्तमान कळतांच दाभाड्याचे लोक त्यांचे तोंडावर जाऊन भ्याल्यासारिखा आकार दाखवून पळाले, आणि त्यांस अंगावर घेऊन त्यांचा बंदोबस्त विस्कळित झाला असें पाहून मागें उलटले, आणि एकाएकीं हल्ला करून त्यांचा असा पराभव केला कीं, त्या शिपायांचीं वस्त्रें देखील सोडून घेतलीं. त्यापुढेंही दाभाड्याची मोगलांशीं लढाई अहमदनगराजवळ झाली, तेथेंही तो जय पावून मग साताऱ्यास जाऊन शाहूला भेटला. तेव्हां शाहूनें त्याचा मोठा मान करून त्यास सेनापतित्व दिलें, व पहिला सेनापति मानाजी मोरे होता तो योग्य नव्हे ह्मणून दूर केला. फेरुकशेर, सैदाच्या अनिष्टाविषयीं दाउदखान मेल्यावर मराठ्यांसही गुप्तपणें लिहित असे. याप्रमाणें बादशाहाचें कृत्रिम आणि दाभाड्यांचा जय या दोहों कारणांनीं मराठे प्रबळ होऊन सरदेशमुखी बळेंच करूं लागले. पूर्वीं दाउदखानानें त्यांस चौथाई मात्र दिली होती.

१७. याप्रमाणें बादशाह कृत्रिमी आणि मराठे लोकांचा मोठा उपद्रव या दोहों अडचणींमुळें सैद हुसेनाच्या मनांत आलें कीं, शाहूशीं स्नेह करावा. त्या वेळेस त्याजवळ संक्राजी मल्हार नामें कारकून होता तो पहिला शिवाजीजवळ असे. त्याला राजारामाचे वेळेस सचिवपद प्राप्त झालें होतें, परंतु तो संकटसमयीं राजारामास जिंजींत सोडून आपण वाराणशीस गेला. त्यानंतर त्यास तेथें उगेंच राहावेना, ह्मणून सैद हुसेन दक्षिणेस येऊं लागला तेव्हां त्यास मिळून मातब्बर दक्षिणेस आला. त्याचे स्नेही साताऱ्यांत बहुत होते, यास्तव हुसेन अलीनें त्याला शाहूशीं तहाचें बोलणें करावयाकरितां पाठविलें. तेव्हां सहा सुभे दक्षिणेची चौथ व सरदेशमुखी, व हैदराबाद व विजापूर यांसंबंधें आणि कर्नाटक व ह्मैसूर व त्रिचनापल्ली व तंजावर यासंबंधें मुलूख व खानदेश खेरीज करून दक्षिणेंत शिवाजीनें जो मुलूख घेतला होता तो, इतक्यांची सनद शाहू मागूं लागला. याशिवाय गोंडवण व वराड यांतील मुलूख सेनासाहेब सुभे व कान्होजी भोंसले यांनीं घेतलेला, तोही मागितला, आणि 'आपलीं मुलेंमाणसें दिल्लींत होतीं तीं लवकर आह्माजवळ पोंहचतीं करावीं' असें सांगितलें; आणखी आपण कबूल केलें कीं, 'याप्रमाणें सारीं कामें झालीं असतां मोगलांस मुलूखसंबंधें वर्षास दहा लक्ष रुपये खंडणी देऊं, आणि सरदेशमुखीबाबद मुलखांत चोरीच्या उपद्रवाचा बंदोबस्त ठेवूं. कदाचित् चोरी झाली तर तें नुकसान भरून देऊं. याशिवाय सरदेशमुखीच्या उत्पन्नापैकीं शेंकडा ६५१ च्या मानेंकरून नजर देऊं. चौथेबाबद पंधरा हजार फौजेनिशीं बाद-

१. मोगल लोकांची रीति अशी होती कीं, कोणास अधिकार दिला ह्मणजे त्यापासून याप्रमाणें नजर घ्यावी.

शाहाची चाकरी करूं. याशिवाय कोल्हापूरकर संभाजी, राजारामाचा पुत्र, याचे लोक विजापूरसुभा व हैदराबाद या दोहों जागीं उपद्रव करिताहेत ते हांकून देऊं; हें न घडे तर तत्संबंधें जें नुकसान असेल तें भरून देऊं,' ह्मणून करार केला. हें सर्व शाहूचें बोलणें सैद हुसेन अलीखानानें प्रायः मान्य केलें. असें सन १७१७ त वर्तलें.

१८. असा तह झाल्यावर सैद हुसेन अलीखानाकडे शाहूनें मराठे स्वार दहा हजार पाठविले. त्यांजबरोबर सरदार संताजी व परसोजी भोंसले व उदाजी पंवार व विश्वासराव वगैरे होते. हा तह दिल्लीचा बादशाह फेरुकशेर यास कळल्यावर सैदाच्या द्वेषास्तव त्याला ठीक वाटलें नाहीं. त्यावरून सैदास समजलें कीं, 'बादशाह आपला पुर्तेपणें द्वेष करितो;' यास्तव त्यानें नेम केला कीं, 'हा बादशाह पदच्युत करीन.' मग शाहूला कुमक मागितली. शाहूनेंही तें आपणास मोठें हितावह असें समजून खंडेराव दाभाडे व बाळाजी विश्वनाथ हे दोघे सरदार बरोबर मोठी सेना देऊन त्याचे कुमकेस योजिले. ते निघतेसमयीं शाहूनें बाळाजी विश्वनाथास सांगितलें कीं, 'दौलताबाद व चांदा किल्ला हे कसेंही करून हस्तगत होतील असें करावे, व बहुत दिवस मराठे गुजराथ व माळवा या दोहों जागची खंडणी वर्षास कांहींएक प्रकारें घेत गेले, त्याचीही सनद मिळवावी.' सैद हुसेन मराठी फौज बरोबर घेऊन दिल्लीस चालिला. दिल्लींत फेरुकशेर बादशाह होता त्यास कृत्रिमाचें शहाणपण होतें, परंतु संकटसमयीं त्याची बुद्धि स्थिर नसे. यास्तव जेणेंकरून आपणास उपयोग होईल तें त्याला समजेना, आणि कोणाचा विश्वासही वाटेना, यास्तव त्यानें सारे हितकर्ते लोक दूर केले. मग दोघे सैद मिळून त्यांनीं बादशाहास धरून मारून टाकिलें. त्यानंतर सातां महिन्यांत दिल्लीमध्यें दोन बादशाह होऊन मृत्यु पावले. त्यानंतर सन १७१९ त रोषन इख्त्यार नामें सुलतान मुआझिमाचा नातू (पुत्राचा पुत्र) त्याचें महंमदशाह असें नवें नांव ठेवून दोघां सैदांनीं तो बादशाह केला; परंतु त्या दोघांवांचून कांहींएक कार्य होत नसे. ते उभयतां प्रायः दुसऱ्याचे बुद्धीनें चालत नसत. इतकें मात्र असे कीं, मोठे मोठे सरदार यांस आपलें अगत्य असावें हें त्यांचे मनांत होतें, याकरितां निझामउल्मुल्क मोठा नामांकित ह्मणून त्यास वश करावयाचा उद्योग केला, परंतु तो त्यांस मनापासून वश झाला नाहीं. याचें कारण असें कीं, तो दक्षिणेंत अधिकारी असतां बादशाहानें त्याच्या अधिकारावर सैद नेमिला आणि त्याला मुरादाबादेस पाठविलें. तो निझामउल्मुल्क मुरादाबादेस राहून त्या प्रांताचे कितीएक बंडावा करणारे जमिनदार यांचीं पारिपत्यें करून मोठ्या योग्यतेस चढला. मग फेरुकशेर यानें त्यास

दिल्लींत आपल्याजवळ बोलावून नेलें, तो तेथें कितीएक दिवस बेरोजगार होता. नंतर त्याला बादशाहानें माळवाप्रांतींची सुभेदारी देऊन तिकडे पाठविलें. तो मोठा शहाणा आणि धैर्यवान् असे, त्याला अधिक योग्यतेस चढावयाची आशा होती, परंतु त्याचे अटकळींत आलें कीं, थोडक्याच दिवसांनीं नवी मुद्रा होईल, ह्मणून तो तेथें कांहीं गडबड न करितां तो समय येण्याची वाट पहात उगाच राहिला होता.

१९. बाळाजी विश्वनाथ फौजेसहित, महंमदशाह बादशाह होई तोंपर्यंत, दिल्लींत राहिला. नंतर तेथून निघावयाची आज्ञा घेतली, आणि फौजेचा खर्च सैदापासून घेऊन निघाला. ते समयीं पूर्वीं तह केल्याप्रमाणें चौथ व सरदेशमुखी व स्वराज्य यांच्या सनदा घेतल्या; आणि वराडसंबंधी मुलूख व गुजराथ व माळवा यांच्या खंडणीच्या सनदांविषयीं आपला वकील तेथें ठेविला, परंतु त्यास त्या प्राप्त झाल्या असतील असें दिसत नाहीं. बाळाजी विश्वनाथ दिल्लीस गेला ते समयीं त्यानें आपला दिवाण आबाजी पुरंधरे मुतालिक[1] केला, तथापि त्या मुतालिकानें सर्व कारभार बाळाजी विश्वनाथाच्या नांवेंच चालविला. नंतर पेशवा दिल्लीहून सनदा घेऊन सातान्यास आल्यावर वसुलाच्या बंदोबस्ताविषयीं कांहीं कांहीं नवे कायदे करूं लागला. तो प्रकार ध्यानांत आणिला असतां असा अर्थ दिसतो कीं, जे लेखनविद्येंत निपुण ब्राह्मण असतील ते श्रेष्ठ व्हावे, आणि ती विद्या ज्यांस नाहीं असे शिपाईपणाचें काम करणारे शूद्रादिक त्यांनीं त्यांचे स्वाधीन होऊन वर्तावें, व समयविशेषीं हिंदूंनीं मोगलासही उलट गोष्ट सांगावी.

२०. त्या वसुलाच्या कायद्यांचा विस्तार असा; प्रथम दक्षिण सहा सुभ्यांची जी सरदेशमुखी[2] तें राजाचें वतन केलें. तेणेंकरून राजा बहुत संतुष्ट व्हावा, आणि दुसरेही मराठे राजे त्याचे वंशांत होतील ते प्रसन्न व्हावे ह्मणून असें केलें. कां कीं, मराठे लोक वतनाविषयीं अत्यंत लुब्ध, असें बाळाजी विश्वनाथास ठाऊक होतें. त्या समयीं उत्पन्न पूर्वींच्या ठरलेल्या नेमाची चौथाईही जमा व्हावयास अवघड पडे, परंतु मराठे लोक 'दरोबस्त जमेच्या ठरावाप्रमाणें आह्मांला आमची चौथाई द्यावी' असें बोलत, आणि जितका ऐवज देत तितका घेऊन 'बाकी ऐवज आमचा सरकाराकडे येणें राहिला' ह्मणून सांगत, तेणेंकरून मराठ्यांनीं मोगलांस समयविशेषीं आर्जवेंकरून किंवा बलात्कारेंकरून मागावें असा मार्ग नीट झाला. याप्रमाणें चतुर्थांश जाऊन बाकी तीन भाग राहिले त्यांपैकीं एक फौजदाराच्या हक्कास जाई.

---

१. मुतालिक ह्मणजे जो मोठा अधिकारी यानें आपल्या कामावर सरकारास बदल दिला तो. २. सरदेशमुखी ह्मणजे जो ऐन वसूल त्यापैकीं दहा रुपये शेंकड्यास देणें.

मग दोन भाग उरत ते कोणेएके ठिकाणच्या बादशाहाचे खजिन्याकडे जात; कांहीं-एक जागींच्या जहागीरदारांचे देण्यासच तो खर्चे. कां कीं, बादशाहानें त्यांस तो खर्चास लावून ठेविला असे. त्याच निमित्तेंकरून पेशवे व निझामउल्मुल्क यांचे राज्यांत जहागीरसंबंधें मुलूख जप्त करणें किंवा माघारां देणें याची रीति अशी पडली होती कीं, कोणीएक मुलखी जहागीरदारच ते सर्व घेई, कोणेएके जागीं बादशाहच घेई. पुढें काळेंकरून पेशव्यांचा मुलूख सरकार इंग्रेज बहादर यांनीं घेतला, तेव्हां कोणेएके गांवीं कुळकर्णी यांस बोलावून मागले लेख काढविले, त्यांत दोन भाग जहागीर असें लिहिलें होतें, परंतु ते द्यावे कोणास व त्यांचें निमित्त काय तें त्या लेखांत नव्हतें, ह्मणून कुळकर्णी यांस विचारिलें कीं, 'हे दोन भाग द्यावे कोणास? व देण्याचें निमित्त काय?' त्यावरून त्यांनीं उत्तर केलें कीं, 'आह्मांस हें कांहीं ठाऊक नाहीं, आमचे वडिलांनीं लिहिलें आहे इतकें मात्र जाणतों.' यावरून असें वाटतें कीं, जे दोन भाग राहिले ते सर्व कोणीएक ठिकाणीं पूर्वी जहागीरदारच घेत असेल. मग कांहीं निमित्तेंकरून बादशाह यानें तो मुलूख घेतला तरी तो लेख तसाच राहिला. जितका स्वराज्यांतील मुलूख, त्याच्या वसुलाची जी चौथ तिला 'राजाची बाबती' असें नवें नांव ठेवून, तो राजाचा हक्क ठरविला, आणि तीन हिसे राहिले त्यांस 'मोकासा' नांव ठेविलें; याशिवाय साहोत्रा[1] व नाडगौंडा[2] या नामें दोन हक्क राजाचे होते ते स्वराज्याचे दरोबस्त जमेवर असत. त्यांपैकीं साहोत्रा शाहूनें पंतसचिवास दिला, आणि नाडगौंडा दुसऱ्या कोणास दिला. त्या वेळेचे प्रधान व प्रतिनिधि यांचीं वेतनें राजा आपल्या खजिन्यांतून देई. याखेरीज त्यांस कांहीं गांव इनाम होते.

---

## भाग तेरावा.

### ( इसवी सन १७२० पासून सन १७२६ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. निझामउल्मुल्कानें सैदांचे आशेंत वागणें सोडून मनांत दक्षिण घ्यावयाचा निश्चय केला.—२. त्यानंतर तो सैदांच्या सरदारांशी युद्ध करून जय पावला.—३. सैद हुसेन अल्लीखान आपल्या बादशाहासहित निझामउल्मुल्काच्या पारिपत्यास दिल्लीहून निघाला, तो वाटेनें शत्रूच्या मारेकऱ्यांनीं मारिला.—४. दुसरा सैद अबदुलखान तो निझामउल्मुल्काशी युद्ध करीत असतां पराभव पावून त्याचे कैदेत सांपडला; त्यावरून दिल्लीमध्ये लोकांनीं बादशाहाचे प्रसन्नतेसाठी मोठा उत्साह केला.—५. परशुराम त्रिंबक व बाळाजी विश्वनाथ व खंडेराव दाभाडे यांच्या मरणामुळें मराठे दरबारांत काय काय वर्तलें तें.—६. बडोदेकर गाईकवाड यांचा मूळपुरुष दमाजी गाईकवाड याचे मरणाचा प्रकार.—७. निझामउल्मुल्क यास बादशा-

---

[1] साहोत्रा ह्मणजे शेंकडा सहा रुपये. [2] नाडगौंडा ह्मणजे शेंकडा तीन रुपये.

हानें वश करून आपली वजीरी दिली असतां तेथील दरबारी लोकांनीं त्याच्या नाशाचा उद्योग केला आणि गुजराथेचा अधिकारी हैदर कुलीखान याच्या नाशाविषयीं निझामउल्मुल्कास बादशाहानें गुप्तपणें आज्ञा केली; यावर तो निझामउल्मुल्काचे हातून पराभव पावला; मग बादशाहानें निझामउल्मुल्कास 'वकील-इ-मुतलक' नामें मोठी पदवी दिली ते.—८. बाळाजी विश्वनाथाचा पुत्र बाजीराव याचें वागणें व होळकर व शिंदे यांची उत्पत्ति; व उदाजी पंवाराची वर्तणूक.—९. बाजीराव, बाळाजी विश्वनाथाचा पुत्र, यानें काय काय मसलत केली ते; व त्याचा प्रतिपक्षी श्रीपतराव झाला ते प्रकरण.—१०. शकरखेडाजवळचे लढाईचा प्रकार.—११. सुरतेचा अधिकारी रुस्तुम अली तो पिलाजी गाईकवाडाचे फितुरानें मेला गेला.—१२. अहमदाबादचा अधिकारी हामेदखान तो कंठाजी व पिलाजी यांस चौथ देता झाला; तो ऐवज जमा करितेसमयीं त्या उभयतांचा कलह होऊन कंठाजीचा विभाग महीनदीचे वायव्येस ठरला, व आग्नेयीकडचा विभाग पिलाजीचा ठरला.—१३. अहमदाबादेस शाहाइबागेजवळ लढाई झाली ते.—१४. गुजराथचे व्यवस्थेचा प्रकार; व बाजीरावानें माळव्यामुलखी स्वारी घातली.

१. सन १७२० त दिल्लीमध्यें जे दोघे सैद, फेरुकशेराचे जागीं दुसरा बादशाह करून, आपण मुख्यत्वेंकरून राज्यकारभार करीत होते, त्यांवर मानकरी लोक व बादशाह यांची मनापासून प्रीति नव्हती. कां कीं, त्यांचा स्वतंत्रपणें वागण्याचा उद्योग होता. ते दुसऱ्याचें मन वश करण्याविषयीं तत्पर नव्हते, यास्तव मानकरी लोक व बादशाह हे त्यांचा बाह्यात्कारें मान करीत, परंतु रयत त्यांस मनापासून मानीत असे. तेव्हां माळव्याचा मुख्य अधिकारी निझामउलमुल्क यानें तें सर्व वर्तमान जाणून असा नेम केला कीं, 'आपण सैदांचे आधीन न राहतां स्वतंत्रपणें वागावें.' असा निश्चय करून त्यानें आपल्या नांवास 'आसिफजा' असें पद जोडून बरोबर बारा हजार सैन्य घेऊन नर्मदा उतरून आशीरगडचे किल्लेदारास कांहीं द्रव्य देऊन तो किल्ला घेतला. त्यानंतर बऱ्हाणपूर व खानदेश सुभा हीं त्याचे हातीं लागलीं; आणि शाहूचे कितीएक सरदार बिथरलेले होते ते, व कोल्हापूरकर संभाजी याजकडचेही कितीएक सरदार, त्या निझामउलमुल्कास मिळाले.

२. त्या समयीं दोघां सैदांचीं दोन लष्करें वेगळीं वेगळीं होतीं तीं थोडक्या अंतरानें असत. त्यांत एक लष्कर माळव्यालगत होतें, त्याचा मुख्य सरदार दिलावर अल्लीखान असे. दुसरें औरंगाबादेस होतें, त्याचा मुख्य सरदार आलम अल्लीखान. तीं दोन्हीं लष्करें एकत्र मिळालीं असतीं तर निझामउलमुल्कास भारी झालीं असतीं, परंतु तो दिलावर अल्लीखान अभिमानेंकरून औरंगाबादेच्या आलम अल्लीखानास न मिळतां एकटाच निझामउलमुल्कावर बऱ्हाणपुरीं चालून गेला, त्याचा युद्धांत

१. शाहूचे जे सरदार निझामास मिळाले त्यांत चंद्रसेन जाधव निंबाळकर, हैबतराव सरलष्कराचा पुत्र, व रावरंभा निंबाळकर हे दोघे मुख्य.

जय न होतां तो मृत्यु पावला. हें वर्तमान औरंगाबादेस कळलें ते समयीं आलम अलीखान आपलें लष्कर तयार करून बऱ्हाणपुरावर चालिला. त्याजबरोबर शाहूचें मराठी लष्कर[1], संक्राजी मल्हार, जो शाहूकडचा औरंगाबादेस वकील होता, त्यानें जमा करून पाठविलें. याखेरीज साताऱ्याहून खंडेराव दाभाड्यास बरोबर स्वार देऊन पाठविला. निझामउलमुलक यास मोगलांचें लष्कर येतेंसें कळतांच तो लष्करसुद्धां तेथून निघून याच्या लष्करावर चालून आला, तेव्हां त्या लष्कराचा युद्धप्रसंग वराडच्या पैनघाटसंबंधी बाळापुराजवळ झाला. त्यांत निझामउलमुलकानें कांहीं युक्ति करून त्याचें लष्कर अडचणीच्या जाग्यांत नेऊन मग उलटून मारून जिंकिलें. ते समयीं आलम अलीखानानें मोठें शौर्य केलें, परंतु त्याचे बहुतेक लोक पळाले, व कितीएक शत्रूंस मिळाले, व त्याचे कुमकेस आलेले परम विश्वासू मराठे लोक होते, ते त्या सभोंवते असून लढून मरून गेले, तेव्हां तो मृत्यु पावला. त्या लढाईंत मराठे उत्तम प्रकारें लढले, त्यांत कोणी मोठा सरदार मेला नाहीं; एक संक्राजी मल्हार मात्र फार जखमी होऊन केवळ मरणोन्मुख होत्साता शत्रूंच्या हातीं लागला.

३. हें वर्तमान दिल्लीस गेल्यावर दोघां सैदांस भय वाटलें, परंतु बादशाह अंतःकरणीं आनंद पावला. तेव्हां त्या सैदांचा बहुत विचार होऊन असें ठरलें कीं, 'सैद हुसेन अलीखान, धाकटा भाऊ, यानें बरोबर सेना घेऊन निझामउलमुल्काच्या पारिपत्यास बादशाहासहित निघावें. नंतर तो त्याप्रमाणें सिद्धता करून वडील भाऊ सैद अबदुलखान याच्या पायीं पडून धनी बादशाह यास घेऊन निघाला. तो कांहीं मजला चालून पुढें गेला, तेव्हां निझामउलमुलकाचे कोणी मित्र व त्याचे मुलखीं राहणारे मोठे मोठे लोक एकत्र मिळून त्यांनीं मसलत करून सैद हुसेनास मारेकरी घालून मारून टाकिलें. नंतर मसलत करणारांनीं तें सर्व लष्कर वश करून घेतलें, आणि त्यांतील लष्करी लोकांस असें समजाविलें कीं, 'बादशाह धनी यास प्रतिबंध करणारा जो चाकर तो मारावा हेंच उचित; कां कीं, स्वामीच्या स्वतंत्रपणास व्यत्यय नसावा. त्यास थोरला सैद अबदुलखान यासही मारिलें असतां बादशाह सुख पावेल.' अशी मसलत देऊन ते लोक त्या लष्करांत मिळून सैद अबदुलखानास मारावयाकरितां बादशाहाबरोबर दिल्लीस जाऊं लागले.

४. तेव्हां त्या सैदाजवळ बहुत दौलत होती, त्यास हें वर्तमान कळतांच त्यानें पुष्कळ खर्च करून थोडके दिवसांत मोठें सैन्य जमा केलें, आणि महंमदशाह बादशाह नव्हे असें करून तो सैद, ज्यांनीं धाकट्या सैदास मारिलें, त्यांच्या पारिपत्यासाठीं

---

१. त्या लष्करांत सेनासाहेब सुभे कान्होजी भोंसले व हैबतराव निबाळकर हे मोठे सरदार.

दिल्लीहून निघाला. त्याची व या लोकांची शाहापुराजवळ गांठ पडली, तेथें मोठ्या निकराचें युद्ध झालें. तें असें कीं, त्यांत जय कोणाचा होईल तो सुमार कळेना. शेवटीं अबदुलखानाच्या लष्कराचा पराभव झाला, आणि तो घायाळ होऊन शत्रूंच्या हातीं लागला. ते समयीं बादशाह निर्भय होत्साता परम हर्ष पावून त्यानें त्या मारेकरी मंडळांत एक महंमद अमीनखान नामें होता तो वजीर केला. आणखी दुसरेही त्या मंडळींतील कितीएक पदवीस चढविले. नंतर बादशाह मोठ्या उत्साहेंकरून आपल्या राजधानीस गेला, तेव्हां तेथच्या रयत लोकांनीं बादशाहाचे संतोषार्थ कितीएक दिवस मोठा उत्साह केला. तो असा कीं, ज्यामध्यें आनंदावांचून दुसरा शब्द कानीं पडेना. याशिवाय कितीएक मुलखींच्या मोठ्या मोठ्या लोकांनीं उत्साहपूर्वक 'आह्मी सेवेंत तत्पर आहों' अशा अर्थाचीं पत्रें बादशाहास पाठविलीं, त्यांत निझामउलमुल्काचेंही पत्र होतें, आणि शाहूचा वकीलही स्वामीचें कल्याण चिंतीत होता. त्यानंतर त्या सर्व लोकांच्या पत्रांनुरूप उत्तरें बादशाहाचे दरबारी लोक यांनीं महंमदशाह याचे नांवें लिहून पाठविलीं. ते समयीं तो नवा केलेला वजीर अकस्मात् मेला, त्याचा अधिकार बादशाहानें निझामउलमुल्कास दिला. त्यानें पूर्वीं बंड उत्पन्न केलें तें बादशाहाचे उपयोगीं पडलें. तो निझामउलमुल्क वजिरी प्राप्त झाली तरी आपल्या जहागिरीच्या बंदोबस्ताकरितां सन १७२२ पर्यंत दक्षिणेंत राहिला. त्या मारेकरी मंडळींत एक हैदर कुलीखान होता, त्यास गुजराथेचा अधिकार दिला. दुसरा सादतखान, याला आधीं आग्रें शहर दिलें, मग बंगाल्यासंबंधीं अयोध्याप्रांत दिला. त्या दोघांत सादतखान पुढें मोठा विख्यात झाला. तो अयोध्येच्या बादशाहांचा मूळ पुरुष. त्याची संतति अद्यापि आहे.

५. मोगलांकडचें वर्तमान असें असतां मराठ्यांचे मुख्य प्रधान परशुराम त्रिंबक व खंडेराव दाभाडे व बाळाजी विश्वनाथ हे मृत्यु पावले, त्यामुळें त्या दरबारचे व्यवस्थेंत कांहीं अंतर पडलें. तो प्रकार असा; प्रतिनिधीचा दुसरा पुत्र श्रीपतराव यास बापाचे जागीं स्थापिलें. बाळाजी विश्वनाथाचा वडील पुत्र बाजीराव यास ती पेशवेपणाची पदवी बाळाजीच्या पाठीमागें सातां महिन्यांनीं प्राप्त झाली. बाळाजी विश्वनाथ सन १७२० चे आक्टोबर महिन्यांत कारभाराचा शीण होऊन मरण पावला.

६. खंडेराव दाभाडे मेल्यावर त्याचा पुत्र त्रिंबकराव यास सन १७२१ चे मे महिन्यांत बापाचा अधिकार मिळाला. खंडेराव दाभाडे मेल्याचे अगोदर त्याचा सरदार दमाजी गाइकवाड होता, त्यानें मोठें शौर्य केलें ह्मणून खंडेराव

यानें शाहूस सांगितलें, यास्तव शाहूनें त्यास खंडेरावाच्या हाताखालीं दुसरा अधिकार देऊन 'समशेरबहादर' असें नांव दिलें. तो बडोद्याच्या गाईकवाडांचा मूळ पुरुष. अद्यापि त्याचे वंशज बडोद्याचे अधिकारी आहेत. तो दमाजी, खंडेराव दाभाडे मेला त्याच सुमारें, मृत्यु पावला. त्याचे जागीं त्याचा पुतण्या पिलाजी गाईकवाड बसविला.

७. सन १७२२ त निझामउल्मुल्क आपल्या जहागिरी मुलखाचा बंदोबस्त करून दिल्लीमध्यें वजिरीच्या अधिकारावर गेला. तो स्वभावेंकरून तिरसट होता, त्याला हास्यविनोदादिकांची प्रीति नसे; आणि बादशाह व त्याचे दरबारी लोक यांस विनोदादि प्रकार प्रिय होते, त्यामुळें तो त्यांस आवडेना. पुढें त्यानें ती बादशाहाची चाल मोडावयाचा उद्योग आरंभिला, तेव्हां ते दरबारी लोक व बादशाह यांचे मनांत आलें कीं, तो दूर करावा. यास्तव मसलत केली, तो प्रकार असा; त्या वेळेस हैदर कुलीखान गुजराथमध्यें अहमदाबादेस अधिकार करीत होता, त्यापासून कांहीं चूक झाली, यास्तव बादशाहाचे दरबारी लोकांनीं त्यास असें भय दाखविलें कीं, 'वजीर निझामउल्मुल्क तुझें पारिपत्य करील.' इकडे निझामउल्मुल्कास त्याच्या कांहीं चहाड्या सांगितल्या. या प्रकारें त्या उभयतांचें वांकडें पाडून ते लोक व बादशाह यांनीं निझामउल्मुल्कास आशा दाखविली कीं, 'तुला गुजराथेचा अधिकार देऊं.' त्यावरून तो फौज घेऊन हैदर कुलीखानाच्या पारिपत्यास निघाला. त्या युद्धास बहुत दिवस लागतील, किंवा त्यांत निझामउल्मुल्क मेला जाईल, अशी बादशाहाची व त्या मुत्सद्दी लोकांची अटकळ होती. ते वेळेस हैदर कुलीखानाजवळ फौज व सरंजाम चांगला होता, परंतु त्याचे कितीएक विश्वासू लोक निझामउल्मुल्कानें वश करून घेतले; तेव्हां तो वेड्याचें सोंग घेऊन दिल्लीस पळून गेला. हें वर्तमान निझामउल्मुल्कास समजून तो उज्जनीस राहिला; तेथें त्याचे भेटीस कितीएक गुजराथचे मोठे मोठे मानकरी लोक आले; ते समयीं त्यानें त्या मुलखाच्या बंदोबस्तास ज्यामध्यें धान्यादि उत्पन्न पुष्कळ असे, त्यांतीलच पांच परगणे आपणाकडे खासगत जहागीर करून ठेविले; त्यांत एक ढोलका, दुसरा भडोच, तिसरा जंबूसर, चवथा मकबुलाबाद, पांचवा बलसाड, याप्रमाणें केलें आणि अहमदाबादेस आपलें काम चालवायाकरितां आपला हस्तक पुतण्या ठेवून आपण सन १७२३ त माघारां दिल्लीस गेला. तेथें त्याच्या व बादशाह याच्या स्वभावास पडेना, ह्मणून तो तें वजिरीचें काम टाकून 'वकील इ-मुतलक' नामें दुसरा अधिकार स्वीकारून राहिला. तथापि त्याचे चित्तास तेथें राहणें आवडेनासें झालें ह्मणून पुढें थोडकेच दिवसांनीं कोणे एके समयीं शिका-

रीचें निमित्त करून दिल्लीबाहेर निघाला, आणि दक्षिणेंत आपले मुलखीं जाऊन राहिला. त्यानंतर तो आपणास बादशाहाचा चाकर ह्मणवी, परंतु तेव्हांपासून स्वतंत्रपणें वागूं लागला, व त्यापुढें पुनः दिल्लीस गेला नाहीं. ते समयीं नर्मदेचे उत्तरेकडचा जितका मुलूख पूर्वीं मोगलांनीं घेतला होता, तो सर्व निझामउल्मुल्काचे हातीं लागला.

८. असें हिंदुस्थानचें वर्तमान चालत असतां बाजीराव पेशवेपणा पावला. नंतर कांहीं अवकाशानें तो लष्कर घेऊन दक्षिणेंतून खानदेशीं जाऊन तेथचा मोकासेपणाचा वसूल घेऊं लागला. त्याचे मनांत होतें कीं, माळवा मुलूख आपले हस्तगत व्हावा, परंतु त्यास प्रतिवर्षीं साताऱ्यास एक वेळ जावें लागत होतें, त्या अडचणीमुळें तो त्याचा मनसोबा अकरा वर्षें शेवटास गेला नाहीं. त्यानें पूर्वीं सन १७२४ चे सुमारें कितीएक वेळां बऱ्हाणपुरचा सुभेदार व माळव्याहून आलेले मोगलांचे मोठे सरदार यांचा पराभव केला. त्यांतल्या एका लढाईमध्यें बाजीरावाचे दोघे सरदार पुढें सरून मोठ्या शौर्येंकरून लढले. ते कांहीं दिवसांनीं पुढें विख्यात झाले. त्यांत एक मल्हारजी होळकर, दुसरा राणोजी शिंदा. त्या वेळेस मल्हारजी होळकर शिलेदारी करीत होता. तो जातीचा धनगर असे. त्याचा बाप निरानदीचे कांठचा होळगांवचा चौगुला. राणोजी शिंदा याचे पूर्वज साताऱ्याजवळ कण्हेरखेडीं राहात होते. तो शिंदा पूर्वीं मोगलांची चाकरी विश्वासूपणें करून मोठ्या पदवीस चढला असतांही पुढें दरिद्रदशा प्राप्त झाली तेव्हां तो बाळाजी विश्वनाथाजवळ राहून बारगिरी करीत होता. त्यानंतर बाजीरावाजवळ त्याचा जोडा उचलावयाची चाकरी स्वीकारून राहिला. मग त्याची वर्तणूक चांगली पाहून त्यानें त्यास उत्तरोत्तर पदवीस चढविलें. त्याच सुमारें धारेचे पंवार योग्यतेस चढले. त्यांचा मूळ पुरुष उदाजी पंवार. विश्वासराव त्याचा बाप, तो रामचंद्रपंत अमात्यानें योग्यतेस चढविला होता. ती धार ह्मणजे माळव्यालगत पुरातन मोठा किल्ला आहे तो.

९. बाजीराव फार दिवस असें इच्छीत होता कीं, हिंदुस्थानांत जाऊन मोगल जिंकावे, परंतु त्यास अवसर सांपडला नाहीं. मग जेव्हां पिलाजी गाईकवाड गुजराथेंत स्वतंत्रपणें वागूं लागला, व उदाजी पंवार माळवा मुलूख आणि गुजराथप्रांत लुटूं लागला, व दिल्लीच्या दरबारांत बादशाहाशीं आणि निझामउल्मुल्काशीं बिघाड झाला, तेव्हां तो असें समजला कीं, हा समय आपल्या कार्यसाधनास योग्य आहे; परंतु त्यास कोणी बाहेरचा प्रतिपक्षी नसतां प्रतिनिधीच त्याविषयीं कांहींसा

---

१. शिंद्यांचीं कुळें दोन आहेत; एकाचें नांव 'कण्हेरखेडकर', 'व दुसऱ्याचे नांव 'रविराव.'

वक्रपणा करीत असे. बाजीराव शूर होता, आणि त्याचे बाळपणापासून बापानें त्यास राज्यकारभारांत शहाणा करून तो लहान असतां आपलेबरोबर दिल्लीस नेला; ते समयीं कांहीं मसलतसंबंधें बाळाजी विश्वनाथ व जयपूरकर राजा जयशिंग या उभयतांची गांठ पडली, त्या योगें बाजीरावाचा व जयशिंग याचा परिचय झाला होता. असा बाजीराव राज्यकारभार व मसलत व शौर्य या तीनही प्रकरणांत निपुण असे. तो जातीचा कोंकणस्थ ब्राह्मण, यास्तव गोड बोलणें हा त्याचा स्वभावसिद्ध गुण होता; आणि शिपाईपणांत तर मराठ्या सरदारांप्रमाणें प्रवीण असे; आणि अल्पायासानें साध्य जें कार्य तें टाकून मोठ्या आयासानें साध्य आणि ज्यांत लाभ मोठा असें जें कार्य त्यास झटावें, अशी त्याची बुद्धि होती. त्यानें एखादी मसलत केली तर ती शेवटास नेण्याविषयीं तो मोठा अभिमान बाळगी. त्यासारखा मसलत शेवटास नेणारा ब्राह्मणजातींत कोणी दुसरा झाला नाहीं. तो नित्य शाहूस ह्मणे कीं, 'मोगल अत्यंत आळशी आणि अशक्त झाले आहेत, त्यांस हिंदूंच्या मुलखांतून हाकून द्यावयाचा समय हाच आहे. हल्लीं मराठे लोक वेगळीं वेगळीं बंडें करितात ते सारे एकत्र होतील तर मोगलांस घालवून देतां येईल, आणि मराठे विख्यात होतील.' अशी तो मसलत देत असे, परंतु प्रतिनिधि राजास ह्मणे कीं, 'असें करणें तें केवळ वेडेपणाचें काम होय. शिवाजीनें कर्नाटकांतील घेतलेला जो मुलूख आपल्या हातचा गेला तो आधीं घेऊन मग या उद्योगास लागावें.' याप्रमाणें त्याचें बोलणें पडत असतां शाहूजवळ कोणेएके दिवशीं ते दोघे आपल्या प्रकारें बोलतांना बाजीरावानें शाहूच्या वडिलांचें शौर्य बहुत वर्णिलें, आणि बोलिला कीं, 'शिवाजीची बुद्धि प्रतिनिधीसारखी असती तर त्यानें कर्नाटक घेतल्याचे पूर्वीं त्याचे मनांत येतें कीं, आधीं विजापूर व गोवळकोंडें घ्यावें, मग हळूच युक्तीनें कर्नाटकांत प्रवेश करावा; परंतु तें न झालें. तो थोर बुद्धीचा, त्यानें एकदाच कर्नाटक सर केलें. त्यास, जसा पुरातन आणि मोठा विस्तारवंत वृक्ष असतो तो बुडाशीं तोडिला ह्मणजे त्याचा सर्व विस्तार पानाफुलांसहित हातीं लागतो तसें हें राज्य प्राप्त होईल; त्यास, जर मला आज्ञा द्याल तर कृष्णेपासून अटकनदीपर्यंत तुमचा झेंडा मी लावीन.' हें बोलणें ऐकून शाहू फार संतुष्ट होऊन लाभाच्या आशेनें युक्त होत्साता बोलिला कीं, 'तुमचे वडील मोठे कुलीन, आणि तुह्मीही त्यांचे योग्यच आहांत. त्या तुह्मांला अटकेच्या पलीकडेही किन्नरखंडापर्यंत झेंडा लावावयास माझी आज्ञा आहे.'

१०. इकडे मुसलमानांत निझामउल्मुल्क बाहेर गेल्यानें दिल्लीचे दरबारी लोक व बादशाह यांच्या मनांत घाताची शंका उत्पन्न होऊन त्यांनीं हैदराबादचा सुभेदार

मुबारिजखान यास लिहिलें कीं, 'तुह्मी फौज ठेवून निझामउल्मुल्कास त्याचे स्थानीं जाऊं देऊं नका. हें काम तुमचे हातून शेवटास गेलें तर तुह्मांस सहा सुभे दक्षिणेचा अधिकार मिळेल.' असें पत्र व त्या अधिकाराची सनद बरोबरच पाठविली. नंतर मुबारिजखानानें फौज तयार केली, तेव्हां निझामउल्मुल्कानें त्याशीं तह करावयाविषयीं फार उद्योग केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. शेवटीं सन १७२४ चे जुलै महिन्यांत शकरखेडाजवळ उभयतांची लढाई झाली, ते समयीं मुबारिजखानानें मोठें शौर्य केलें, परंतु त्याचा जय झाला नाहीं. तो लढतां लढतां मेला, आणि त्याचे दोघे पुत्र मेले व दोघे फार जखमी झाले. तो पडला तेव्हां निझामउल्मुल्कानें त्याचें शिर कापून दिल्लीस पाठविलें, आणि पत्र लिहिलें कीं, 'स्वामीच्या दैवयोगेंकरून आह्मीं हा बंडवाला मारिला.'

११. यानंतर निझामउल्मुल्क हैदराबादेस गेला, तेथें ख्वाजा आहद या नामें एक मुबारिजखानाचा पुत्र होता, त्याशीं सल्ला करून गोवळकोंडा व सर्व इतर किल्ले हस्तगत केले. हें वर्तमान ऐकून दिल्लीच्या बादशाहानें निझामउल्मुल्काचे दोहों जागचे अधिकार माघारे घेतले. एक गुजराथेचा व एक माळव्याचा. त्या दोन जागीं दोघे नवे अधिकारी पाठविले. गुजराथेस सरबुलंदखान व माळव्यास राजा गिरधर. ते जाऊन त्या स्थानीं पोहोंचले; त्यांत राजा गिरधर यास माळवा घ्यावयाचें अवघड पडलें नाहीं, कां कीं, तेथें फौज नव्हती. परंतु गुजराथेंत निझामउल्मुल्काचा पुतण्या हामेदखान होता, त्याला तें स्थान युद्धावांचून देववेना; आणि आपलें बळ कमी यास्तव तो ती अहमदाबाद राजधानी टाकून दोहदास गेला. तेथें कंठाजी कदम बांडे नामें एक शाहूचा सरदार होता त्यास गुजराथचे चौथाईची आशा दाखवून तो आपल्या कुमकेस घेतला, आणि माघारा उलटून अहमदाबादेजवळ येऊन सरबुलंदखानाचे लष्कराबरोबर लढून त्याचा पराभव केला; व शुजायतखान नामें अहमदाबादेंत सरबुलंदखानानें आपला हस्तक ठेविला होता तो मारून टाकिला. त्यानंतर त्या शुजायतखानाचा भाऊ सुरतेमध्यें फौजदारी करीत होता त्यानें, पिलाजी गाईकवाड ते समयीं सुरतेजवळ होता, त्याशीं सख्य करून निश्चय केला कीं, 'आपण उभयतां मिळून हामेदखानास मारूं.' त्या वेळेसच पिलाजी गाईकवाड यास निझामउल्मुल्काचें सांगणें आलें कीं, 'माझा पुतण्या हामेदखान याचें साहाय्य करावें. गाईकवाडानें तें ऐकून घेऊन मनांत विचार ठरविला कीं, आपणास जो सबळ पक्ष दिसेल तिकडे मिळूं. मग सुरतवाल्याबरोबर निघून महीनदीचे पलीकडे आरासगांवीं पोहोंचला. तेथें हामेदखानाच्या लष्कराची व त्याची गांठ पडली, ते समयीं सुरतवाल्याजवळ तोफा फार होत्या त्यामुळें

ह्मामेद्खानाचा पराभव होऊं लागला, ते समयीं पिलाजीनें त्यांस सांगितलें कीं, 'तुह्मी त्याचे पाठीस लागा, मी तोफा संभाळितों.' मग ते त्याचे पाठीस लागले. तेव्हां यानें तोफांचे गाडे उलटे फिरवून ह्मामेद्खानाचा पक्ष धरिला. तेव्हां त्या सुरतवाल्यावर दोन्हीं लष्करें पडलीं, तरी त्यानें मोठें शौर्य केलें, परंतु त्याचे लोक फार मेले आणि थोडकेसे राहिले त्यांसहवर्तमान पळावयास अवसर नाहीं असें पाहून तो आपणास तोडून घेऊन मेला.

१२. त्यापुढें सन १७२५ त कंठाजी व पिलाजी दोघे मिळून गुजराथची चौथाई घेऊं लागले, परंतु त्या दोघांत मुख्यत्वानें कोणीं वागावें याविषयीं निरंतर कलह असे. शेवटीं खंबायतचे जवळ दोघे लढले, त्या युद्धांत पिलाजी पराभव पावला. ते समयीं ह्मामेद्खानानें विचार केला कीं, एखादे वेळेस या दोघांतून कोणी तरी माझा पक्ष सोडील, ह्मास्तव त्यानें असा ठराव केला कीं, मही नदीचे आग्नेयी दिशेच्या विभागाची चौथाई पिलाजीनें घ्यावी, व वायव्य विभागाची कंठाजीनें घ्यावी. याप्रमाणें नेम झाल्यावर पिलाजी सुरतेकडे निघाला, आणि कंठाजी खानदेशामध्यें जहागिरीचे जागीं गेला.

१३. असें ह्मामेद्खानाचें प्राबल्य पाहून दिल्लीच्या बादशाहानें तें बंड मोडावयास सरबुलंद्खान यास बरोबर लष्कर देऊन पाठविलें. तो मोठा समर्थ होता; आणि ह्मामेद्खानानें आपल्या कुमकेस मराठे सरदार बोलाविले ते येऊन पोंहचले नव्हते, ह्मणून ह्मामेद्खान अहमदाबादेंत थोडकीशी फौज ठेवून आपण तें ठिकाण सोडून मागें हटला. तो कांहींसा दूर गेल्यावर त्याला वर्तमान कळलें कीं, मराठे मही नदी उतरून आलीकडे आले. मग ते व आपण मिळून पुनः माघारां उलटून अहमदाबादेवर आले. तो शहराजवळ शाहाइबागेंत जाऊन उतरला. त्याच दिवशीं सरबुलंद्खानाच्या लष्कराची बिनी उदालज गांवीं येऊन पोहोंचली. मग ते ह्मामेद्खान जवळ आहेसा समजून आपल्या भोंवता चर खणूं लागले; त्यावरून मराठे सरदार समजले कीं, 'ते आमच्या भयानें हें काम करितात.' नंतर ह्मामेद्खानानें मराठे सरदारांसहित एकाएकीं हल्ला करून त्या बिनीवाल्यांचा पराभव केला. त्या हल्ल्यांत याचे लोक व मराठे बहुत मेले, त्यावरून मराठे हल्ला करावयास त्याला पुनः अनुकूळ होईनातसे झाले. मग ह्मामेद्खान पेंढारी लोकांप्रमाणें वागूं लागला. त्याबरोबर कंठाजी व पिलाजीही पर्जन्यकाळपर्यंत लुटीत होते, मग पांढऱ्या कावळ्यांकडे गेले.

१४. याप्रमाणें गुजराथचें वर्तमान असतां व मोगल लोकांत कलह असतांना बाजीरावानें दोन वेळां माळव्यांत स्वाऱ्या घातल्या. तेथें राजा गिरधर होता त्यानें कांहीं अडचण केली ती न मानितां दोन्ही वेळां बहुत द्रव्य लुटून नेलें.

# भाग चौदावा.

**( इसवी सन १७२७ पासून सन १७३४ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )**

१. निझामउल्मुल्कानें आपलें बळ वाढवायाकरितां मराठे सरदार लोकांत कलह उत्पन्न व्हावा ह्मणून काय काय उद्योग केला तें प्रकरण.—२. त्यानें प्रतिनिधीच्या योगें शाहूशीं तह करून हैदराबादचे चौथाईची सोडचिठ्ठी घेतली.—३. तो तह पेशव्यांचे मनास आला नाहीं.—४. निझामउल्मुल्कानें शाहू आणि संभाजी या उभयतां बंधूंत वैमनस्य पाडावयाचा यत्न केला तो पेशव्यांनीं व्यर्थ पाडिला.—५. त्यावरून पेशवे व निझामउल्मुल्क यांचें युद्ध झालें.—६. नंतर निझामउल्मुल्क याचा बाजीराव पेशवे याच्या शहाणपणापुढें उपाय चालेना ह्मणून तो तहाचें बोलणें करूं लागला.—७. बाजीराव गुजराथची चौथ व सरदेशमुखी यांची सनद पावला.—८. कोल्हापुरचा राजा संभाजी व प्रतिनिधि या उभयतांचें युद्ध होऊन संभाजी पराभव पावला.—९. पेशवे बाजीराव व सेनापति दाभाडे या दोघांचें युद्ध झालें, त्यांत बाजीरावाचा जय होऊन दाभाडे मृत्यु पावला.—१०. निझामउल्मुल्काची वर्तणूक.—११. गुजराथ मुलखांत पिलाजी गाइकवाड व जोधपुरचा राजा आभीसिंग यांचा युद्धप्रसंग घडला.—१२. त्यापुढें आभीसिंगानें पिलाजीशीं तह करावयाचे निमित्तेंकरून मारेकरी पाठवून त्यास मारिलें.—१३. बुंदेलखंड मुलखीं राजा छत्रसाल यानें पेशव्यास कुमकेस घेऊन मोगलांस बुंदेलखंडांतून पार केलें, यास्तव त्यानें बाजीरावाला कांहीं मुलूख बक्षीस दिला.—१४. राजा जयसिंग यास माळव्याचें आधिपत्य प्राप्त झालें तें त्यानें बाजीरावास दिलें.

१. निझामउल्मुल्कास दिल्लीच्या बादशाहाचें भय तादृश नव्हतें, परंतु मराठे लोक प्रबळ होऊन मुलुखांतून मनस्वी वसूल घेऊं लागले, त्यामुळें त्याच्या मनांत भीति उत्पन्न झाली. तिच्या निवारणार्थ अंतःकरणांत विचार करूं लागला कीं, कोणे प्रकारें मराठे लोकांत वैमनस्यें पडतील, आणि आपल्या राज्याचा बंदोबस्त चांगला होईल. अशी योजना करीत असतां प्रथमतः त्याच्या कल्पनेस आलें कीं, हैदराबाद आपली राजधानी एथची चौथाई मराठे घेतात तिच्याबद्दल दुसरें कांहीं द्यावयास कबूल करून त्यांचें येथें चौथाईसंबंधें येणें जाणें आहे तें बंद करावें.

२. मग त्यानें प्रतिनिधीच्या द्वारें शाहूशीं बोलणें करून असें ठरविलें कीं, शाहूनें हैदराबादसंबंधें चौथ व सरदेशमुखी यांबद्दल कांहीं द्रव्य व इंदापुराजवळ कांहीं मुलूख जहागीर करून घ्यावा. याशिवाय त्यानें प्रतिनिधीलाही वराडमुलुखीं कांहीं जहागीर करून दिली.

३. तें वर्तमान ऐकून बाजीरावास मोठा राग आला. त्याचे मनांत होतें कीं, निझामउल्मुल्काच्या राज्यांत आपला प्रवेश आहे तो नाहींसा न व्हावा. तें प्रतिनिधीनें उलटें केलें, त्यामुळें त्याचें व प्रतिनिधीचें वैमनस्य पडलें.

४. तें वर्तमान निझामउल्मुल्काला कळतांच त्यानें मनांत विचार केला कीं,

आपणास या समयीं चंद्रसेन जाधव व रावरंभा निंबाळकर व दाभाडे व पिलाजी गाइकवाड हे सरदार अनुकूळ आहेत, व कोल्हापुरचा मुख्य संभाजी तोही वश आहे, त्यास शाहू व संभाजी यांमध्यें पुनः कलह उत्पन्न करावयास हा उत्तम समय प्राप्त झाला आहे. यास्तव त्यानें संभाजीला निमे वसूल मागावयास शिकवून तो कज्जा मोडावयाच्या मिषेंकरून तिऱ्हाईतपणें आपण मध्यें शिरून उभयतांस सांगितलें कीं, 'मला तुह्मी दोघे सारिखे, त्यास वसूल तूर्त मजकडे जप्त असूं द्या; मग मी तुमचा न्याय करीन.' याप्रमाणें बोलून त्यानें शाहूकडचे मोक़ासेदार व सरदेशमुखी जमा करणारे दूर केले.

५. असें निझामउलमुल्काचें कृत्रिम बाजीरावापुढें चालेना. त्यानें शाहूला समजाविलें कीं, 'हा पक्का ठक आहे, न्याय करणारा नव्हे. तुमच्या कलहांत आपला लाभ समजून आपणच हें काम उत्पन्न करून युक्तीनें आंत शिरला, आणि तुमचा मुलूख हाताखालीं घातला.' त्यावरून शाहूस बहुत राग येऊन त्याच्या मनांत आलें कीं, निझामाशीं युद्ध करावयास आपण अंगें जावें. यास्तव बाजीरावास बोलिला कीं, 'मी करितों या कामास अंतःकरणपूर्वक तुमचें अनुमोदन असावें.' त्यावर त्यानें उत्तर केलें कीं, 'आपण हिंदूंचे राजे, त्यास आपल्यासारख्यांनीं प्रसंग पडल्यास बादशाहाशीं लढावें हें योग्य आहे; या कामाविषयीं आज्ञा केल्यास मी सर्व बंदोबस्त करीन.' तेव्हां शाहूनें त्या युद्धाविषयीं त्यास मुख्यत्व दिलें. या प्रकरणावरून असें दिसतें कीं, बाजीरावाची मसलत हीच कीं, निमित्तमात्र राजा असून राज्यसुख आपणास असावें. हा तर ब्राह्मणजातीचा स्वभावच आहे कीं, आपण चाकर ह्मणवून मुख्यत्वें वर्तावें. यानंतर तिकडे निझामउलमुल्काची तयारी होत असतां बाजीराव त्याच्या अगोदर तयार झाला. मग निझामाच्या लष्कराची गांठ पडल्यावर बाजीरावानें त्याशीं थोडकीशी लढाई करून पळ काढला, आणि असें दाखविलें कीं, 'बऱ्हाणपूर लुटावयास जातों.' तो खानदेशांत शिरल्यानंतर आपले पाठीमागें निझामउलमुल्क जवळच आहेसा समजून कांहींसे लोक बऱ्हाणपुरच्या वाटेकडे त्याला ठकवावयास पाठविले; आणि आपण अतित्वरेनें मोठ्या सैन्यासहित गुजराथेंत शिरून तो मुलूख अगदीं लुटला आणि तेथचा अधिकारी सरबुलंदखान यास समजाविलें कीं, 'आह्मी निझामउलमुल्काचे मसलतीनेंच हें काम करितों.'

६. इकडे बऱ्हाणपुरच्या वाटेवर निझामउलमुल्क याचे दिवस, किमपि यत्नसिद्धि न होतां, व्यर्थ गेले. मग तो समजला कीं, 'आपणास मराठ्यांनीं ठकविलें' नंतर फिरून निश्चय केला कीं, 'आतां दक्षिणेंत जाऊन पुणें जाळून टाकावें.' तों अहमदनगरास येऊन पोंहचला नाहीं तों त्यास वर्तमान कळलें कीं, 'बाजीरावानें लष्कर-

सहित कांसारबारीच्या घाटानें येऊन मुलूख उद्वस्त केला. तेव्हां निझामउल्मुल्क माघारां फिरून गोदावरी उतरून पलीकडे गेला, तेथें बाजीरावानें त्याशीं हलकें हलकें लढाई करून त्यास आपल्या आंगावर घेऊन अशा जागीं नेलें कीं, ज्या स्थळीं अगदीं पाणी नाहीं; त्या ठिकाणावर त्याच्या लष्करास घेरा घालून त्याचे लोक जे धान्यतृणादि सामग्री आणावयास जाणारे त्यांस उपद्रव करूं लागला. मग निझामउल्मुल्काला तह करणें प्राप्त झालें. तो प्रकार असा; बाजीराव त्यास ह्मणूं लागला की, 'कोल्हापूरकर संभाजी आमचे हातीं द्यावा, व आमचे मराठे वसूल जमा करणारे यांस कोणतीही अडचण न पडावी, याकरितां त्या मुलखांतील किल्ले आमचे स्वाधीन असावे.' नंतर निझामानें संभाजी खेरीजकरून वरकड कबूल केलें. ते समयीं बाजीरावानें त्यास सांगितलें कीं, 'संभाजी आमच्या स्वाधीन असल्यास कांहीं चिंता नाहीं. कां कीं, तो आमच्या धन्याच्या मानानेंच असेल.' तेव्हां निझामानें कबूल केलें कीं, 'आह्मी त्यास पन्हाळ्यावर पोंहचवून देऊं. नंतर शाहू व संभाजी हे उभयतां एकचित्त होऊन कलह मिटावा.' हें वर्तमान सन १७२८ त घडलें. त्यापुढें बाजीराव व निझामउल्मुल्क एकमेकांस भेटले. तें त्या उभयतांचें प्रथम दर्शन.

७. गुजराथेचा सरबुलंदखान यानें दिल्लीच्या बादशाहास बहुत प्रकारें विनंति करून बोलणें लाविलें कीं, 'माझे मुलखाची हैराणगत झाली, यामुळें वसूल जमा होत नाहीं; त्यास स्वामींनीं द्रव्य देऊन या समयीं माझें रक्षण करावें.' परंतु बादशाहानें त्या मागण्याचें कांहीं उत्तर दिलें नाहीं; आणि बाजीरावाचा भाऊ चिमणाजी आपा यानें लष्करसहित पिटलादेस येऊन त्या शहराची खंडणी घेतली, व ढोलका परगणा लुटला; व आपल्या भावाचें सांगणें आणविलें कीं, 'आह्मांस गुजराथेची चौथ व सरदेशमुखी द्याल तर माझा भाऊ तुमच्या मुलखाचें संरक्षण करील.' त्यावरून सरबुलंदखानास तें कबूल करणें प्राप्त झालें. मग त्यानें सुरत खेरीज करून सर्व मुलखीं काळीचा वसूल व जकातीचा वसूल यांची चौथ व सरदेशमुखी दिली, आणि अहमदाबाद शहरसंबंधें कांहीं दिलें व कांहीं न दिलें. असें सन १७२९ त झालें. ते समयीं चौथाईचा नेम ऐनजमेच्या ठरावाप्रमाणें नव्हता. जे वर्षी जें उत्पन्न होई त्याची चौथाई देत असत. याबद्दल बाजीरावानें अडीच हजार स्वार ठेवून मुलुखाचा बंदोबस्त राखावा असें कबूल केलें.

८. मग बाजीराव, चिमणाजीच्या मदतीसाठीं उत्तरेकडे गेला; ते समयीं कोल्हापूरकर संभाजी याला बाहेर निघावयास संधि सांपडली. तो बरोबर लष्कर घेऊन आपल्या परिवारासहित वारणा नदीच्या उत्तरतीरीं उतरला, आणि मुलूख

लुटूं लागला. ते समयीं शाहूजवळ प्रतिनिधि पूर्वी निझामउल्मुल्काशीं मसलत केल्यामुळें आपल्या किमतींतून उतरलेला होता, त्यास असें वाटलें कीं, 'या समयीं आपण संभाजीचा पराभव केला तर आपली योग्यता कमी झालेली पुनः वाढेल.' यास्तव तो जाऊन संभाजीच्या छावणीवर पडला, आणि संभाजी व उदाजी यांस पन्हाळ्याकडे पिटून लाविलें, व त्यांचीं कुटुंबाचीं माणसें धरून आणिलीं. त्यांत ताराबाई व तिची सून राजसबाई ह्या सांपडल्या, त्या साताऱ्यावर नेऊन ठेविल्या. नंतर शाहू व संभाजी यांचा तह झाला, त्यांत त्यानें कितीएक मुलूख शाहूला दिले, व शाहूनेंही त्यास दिले. तो प्रकार असा; तुंगभद्रेजवळचें कोपाळशहर शाहूनें संभाजीस दिलें, त्याबद्दल आपणास कोंकणचा रत्नागिरी किल्ला घेतला; मग साळशीपासून आंकोलेंपर्यंत कोंकणपट्टी कोल्हापुराकडे लावून दिली, आणि संभाजीनें मिरज, तासगांव, आथणी व इतरही कृष्णेचे उत्तरेकडचे गांव व विजापुरच्या खालच्या कितीएक गढ्या शाहूस दिल्या. हें वर्तमान सन १७३० त घडलें.

९. नंतर सन १७३१ त असें झालें कीं, निझामउल्मुल्क पूर्वी बाजीरावास भेटला असतांही त्याला यानें नाश केल्याचें स्मरण होतें, यास्तव तो आपले आंग न दाखवितां दुसऱ्याकडून तो सूड उगवावयाविषयीं विचार करावयास लागला असतां त्यास त्रिंबकराव दाभाडे त्या कामाचे उपयोगींसा वाटला. त्याचें व बाजीरावाचें पहिलेंच वांकडें पडलें होतें. बाजीराव चौथाईची व सरदेशमुखीची सनद पावला त्या दिवसापासून दाभाडे फौज ठेवावयास लागला होता. त्यानें पस्तीस हजार फौज जमविली, आणि निझामउल्मुल्काच्या अनुकूलतेकरून पुढें कुमक मिळेल असें समजून तो दक्षिणेकडे निघावयास सिद्ध झाला. त्यानें लोकांत असें प्रसिद्ध केलें कीं, 'आमचा धनी मराठा याचें राज्य बाजीरावानें घेतलें तें स्वामीचें स्वामीस देववायास जातों; याविषयीं पिलाजी गाइकवाड व कंठाजी व रघूजी कदम बांडे व उदाजी व आनंदराव पंवार व चिमणाजी पंडित वगैरे कितीएक सरदार मला सहाय आहेत.' याप्रमाणें सेनापति दाभाडे यांकडील वर्तमान असतां बाजीरावानें लोकांस जाहीर केलें कीं, 'सेनापति निझामउल्मुल्कास मिळून मराठ्यांच्या राज्याचे दोन विभाग करूं इच्छितो, हें कर्म केवळ हिंदुधर्मास विरुद्ध आहे. त्यास, या समयीं माझेजवळ फौज आहे ती त्याच्या फौजेच्या निमेही

---

१. त्यापूर्वीं पिलाजी व पंवार यांचीं युद्धें होत होतीं, परंतु ते या कामाकरितां त्या समयीं एकचित्त झाले. २. चिमणाजी पंडित तो मोठा उत्पाती असे. त्यानें गुजराथेंत लुटालूट बहुत केली. त्यास चिमणाजी दामोदरही ह्मणत.

होईलशी नाहीं, तथापि त्याचे पारिपत्यास मी विलंब न करितां जाईन. इतकें करून बाजीराव पुण्याहून निघाला तो नर्मदा उतरून पलीकडे गेला, तेव्हां त्याची बिनी पुढें चालत होती तिजवर पिलाजीचा पुत्र दमाजी गाइकवाड यानें हल्ला करून त्या बिनीवाल्यांचा पराभव केला. तो त्यास प्रथम अपशकून झाला, तथापि तो न मानून त्यानें नेम केला कीं, 'इतःपर समूर उभें राहूनच लढावयाचें.' तेव्हां दाभाडे यांचे नवे नवे ठेविलेले लोक होते ते उभे राहीनात, ते पळाले; त्यांबरोबर कंठाजीही पळाला; तेव्हां खंडेरावाचे पुरातन चाकर होते ते मात्र त्याच्या पुत्राचे संरक्षणार्थ युद्ध करीत राहिले. तो त्रिंबकराव दाभाडे हत्तीवर बसला होता, त्यानें आपले लोक पळतात असें पाहून आपल्या हत्तीचे पाय सांखळ्यांनीं बांधिले, आणि आपण धैर्येंकरून त्याच जागीं युद्धास उभा राहिला. तेव्हां बाजीराव इकडे घोड्यावर बसला होता त्यानें आपल्या सामर्थ्याप्रमाणें बहुत यत्न केला, परंतु जय कोणाचा होईल हें फार वेळ समजेना. शेवटीं त्रिंबकराव दाभाडे तिरंदाजी करीत असतां त्याला दैवयोगेंकरून गोळी लागून तो मेला. तेव्हां त्याचे लोक पळाले, आणि बाजीराव याचा जय झाला. ती लढाई बडोदें व डभई या दोहोंमध्यें झाली. तींत दाभाडे यांच्या पक्षाचे जे पडले त्यांत एक जावजी दाभाडे, दुसरा मालोजी पंवार, तिसरा पिलाजी गाइकवाडाचा पुत्र, हे पडले, व खंडेराव दाभाडेही पडला; आणि उदाजी पंवार व चिमणाजी पंडित हे दोघे पाडाव होऊन कैदेंत सांपडले. आनंदराव पंवार व पिलाजी गाइकवाड वगैरे जखमी झाले, परंतु धरले गेले नाहींत. ते वेळेस बडोदें व डभई हीं दोन्हीं पिलाजीचे स्वाधीन होतीं तीं आपणास असावीं असें बाजीरावाचे चित्तांत आलें, परंतु ते समयीं कांहीं तह होऊन तो पर्जन्यकाळ गेल्यावर माघारां साताऱ्यास आला.

१०. निझामउल्मुल्कानें बाजीरावाच्या नाशाविषयीं असें कृत्रिम केलें तें सिद्धीस न जाऊन उलटी त्यासच नाशशंका प्राप्त झाली. ती अशी; त्याच्या कपटावरून बाजीरावाचे मनांत आलें कीं निझामाचें पारिपत्य करावें, परंतु सामोपायाविषयीं तो मोठा चतुर; त्यानें कांहीं युक्ति करून बाजीरावाचें चित्त मोगल जिंकावयास गुंतवून आपल्यावरचा तो राग दूर केला. मग त्या उभयतांचा तह झाला; त्यांत असें ठरलें कीं, निझामउल्मुल्कानें आपल्या मुलखीं निश्चिंतपणें राहावें, व बाजीराव यानें दक्षिणेंत मुख्य पेशवा होऊन वागावें.

११. दिल्लीमध्यें बादशाह यानें ऐकिलें कीं, सरबुलंदखानानें गुजराथची चौ-

---

१. खंडेराव दाभाडे सेनापति मेल्यावर त्याचा पुत्र यशवंतराव लहान म्हणून तो अधिकार त्याचे आईनें संभाळिला.

थाई व सरदेशमुखी मराठ्यांस दिली तेणेंकरून तो बहुत क्रुद्ध होऊन त्यानें जोधपुरचा राजा आभीसिंग यास त्याजबरोबर लष्कर देऊन गुजराथेंत पाठविलें, आणि सरबुलंदखानाला माघारें बोलाविलें. तो दिल्लीस पोंहोचल्यावर त्याचा अपमान केला. माळवे मुलुखीं राजा गिरधर होता, तो उदाजी पंवार व चिमणाजी पंडित यांशीं युद्ध करून मृत्यु पावला होता; परंतु त्याचा कोणी आप्त दया बहादूर नामें असे, त्यानें मराठ्यांशीं लढून बहुत वेळां त्यांस मागें हटविलें. शेवटीं सन १७३२ त बाजीरावाचा भाऊ चिमणाजी आपा व पिलाजी गाइकवाड व मल्हारराव होळकर यांबरोबर लढाई करून तो मृत्यु पावला. यानंतर बाजीराव नर्मदा उतरला आणि त्यानें माळव्याचें लष्कर आपल्या स्वाधीन करून घेतलें. मग आपला भाऊ व पिलाजी जाधव यांस आपल्या हितार्थ सातार्‍यास पाठविलें. त्यांसच कोंकणचा बंदोबस्त राखावयास सांगितलें.

१२. गुजराथेंत पेशवा गेल्यानंतर आभीसिंग राजाच्या फौजदारानें बडोदें किल्ला पूर्वीं मोगलांनीं गाइकवाडापासून घेतला होता तो घेतला, तथापि तेथचे प्रजेस त्यापेक्षां पिलाजीचें अगत्य असे. त्यानें कितीएक जागीं आपलीं ठाणीं बसविलीं होतीं, याकरितां त्यांशीं तह करावयाच्या निमित्तेंकरून त्यानें कितीएक माणसें पाठविलीं. त्यांनीं कितीएक वेळां त्यांशीं बोलणें केलें; मग एके दिवशीं त्यांचें बोलणें होऊन त्यांस निरोप झाल्यावर बाहेर निघाले आणि कांहीं वस्तु आंत राहिल्याचें मिष करून त्यांतील कोणीएक जण पुनः वाड्यांत जाऊन तो कांहीं गोष्ट पिलाजीचे कानांत सांगावयाचा आकार दाखवून त्याजवळ गेला आणि त्यानें अकस्मात् खंजीर काढून त्याच्या काळजांत खुपसला, तेणेंकरून तो मृत्यु पावला. त्या वेळेस तो मारेकरीही, तेथें कोणी पिलाजीचा मनुष्य होता, त्यानें मारिला; तेव्हां ते वरकड लोक पळाले. हें कृत्य तासरा परगण्यांतील डाकुरगांवीं झालें. आभीसिंगानें पिलाजीच्या मरणेंकरून आपणास जो लाभ चिंतिला होता तो त्यास प्राप्त झाला नाहीं. कां कीं, पिलाजीचा मित्र पाद्रागांवचा देसाई दिल्ला नामें होता, त्यानें त्या सर्व मुलखांत भिल्ल व कोळी उठविले. मग चांगला समय पाहून देसायानें पिलाजीचा भाऊ महादजी गाइकवाड यास निरोप पाठविला कीं, 'बडोदें घ्यावयास हा वेळ उत्तम आहे.' त्यावरून तो आला आणि बडोदें घेतलें. त्यापासून त्याचे वंशीय अद्यापि बडोद्यांत आहेत. त्या वेळेस पिलाजीचा वडील पुत्र होता तो सोनगडाहून मोठें लष्कर घेऊन आला आणि त्यानें बडोद्याच्या पूर्वेस जोधपुरापर्यंत स्वार्‍या घातल्या. तेव्हां आभीसिंगानें अहमदाबादेंत आपला कोणी विश्वासू ठेवून आपण आपल्या जोधपूर मुलखीं जाऊं लागला.

१३. माळव्याचा सुभेदार दया बहादूर मेल्यानंतर त्याचे जागीं दिल्लीच्या

बादशाहानें महंमदखान बंगष नामें एक नवा सुभेदार पाठविला, तो बुंदेलखंडीं जाऊन राजा छत्रसाल याच्या मुलखांत उपद्रव करूं लागला. तेव्हां त्या छत्रसालानें बाजीरावाकडे कुमक मागितली, ते समयीं पेशवा यानें त्याचे साहाय्यास जाऊन बंगषाला त्याच्या मुलखांतून पार केलें. त्यावरून तो राजा प्रसन्न होऊन त्यानें बाजीराव यास आपला पुत्र मानिलें, आणि त्यास एक किल्ला व झांशीजवळ कांहीं प्रांत असा दिला कीं, ज्याचें उत्पन्न वर्षास सवादोन लक्ष रुपये होत. पुढें कांहीं अवकाशानें तो राजा मेला, ते समयीं त्याचे पुत्र दोघे होते, त्यांच्याप्रमाणेंच बाजीरावाला त्यानें आपल्या राज्याचा तिसरा वांटा दिला.

१४. माळव्यामध्यें महंमदखान बंगष मेल्यावर माळवा व आग्रा या दोहों अधिकारांवर बादशाहानें राजा जयशिंग सन १७३४ त पाठविला. त्याचा व बाजीरावाचा पूर्वीपासून स्नेह होता, ह्मणून ती जागा त्यास मिळाल्यानें मराठे हर्ष पावले; परंतु तो बादशाहाचा हस्तक ह्मणून मराठ्यांचें बोलणें सारें स्वीकारीना. नंतर त्याच्या पुढचे वर्षीं बाजीरावाचें व त्याचें कांहीं बोलणें होऊन त्यानें माळव्याचें राज्य बाजीरावास दिलें, आणि बादशाहास समजावून तोही वश केला.

---

## भाग पंधरावा.

### ( इसवी सन १७३४ पासून सन १७४० पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. मराठे लोकांची वर्तणूक.—२. रघूजी भोंसल्यास 'सेनासाहेबसुभा' पदवी प्राप्त झाली.—३. वाडीचे सावंत व आंग्र्या व सिद्धी यांचें वर्तमान.—४. बाजीराव पेशवा माळव्या मुलखांतून माघारां आला तें वृत्त.—५. मल्हारराव होळकर यानें मुलखांत स्वाऱ्या घातल्या तें प्रकरण.—६. बाजीरावास खर्चाची अडचण पडली यास्तव त्यानें बादशाह याशीं तह करून माळव्या मुलखी कांहीं अधिकार मिळविला, त्याशिवाय त्यास दक्षिणेंतही सरदेशपांडेपणा मिळाला.—७. दिल्लीच्या बादशाहानें निझामउल्मुल्क आपणास वश व्हावा ह्मणून उद्योग केला तो विस्तार.—८. मोगल व बाजीराव या दोहीं पक्षीं युद्धाची सिद्धता झाली, तेव्हां निझामउल्मुल्कानें मोगलांचा पक्ष स्वीकारिला.—९. बाजीरावानें पराक्रमेंकरून दिल्लीच्या दरवाजापर्यंत प्रवेश केला तो प्रकार.—१०. आंग्र्याची हकीगत.—११. बाजीरावानें निझामउल्मुल्काच्या लष्करास भोपाळाजवळ घेरा घालून असा उपद्रव केला कीं, त्यास याशीं तह करावा लागला.—१२. पोर्तुगीज लोक व इंग्रेज लोक यांची वर्तणूक.—१३. पेशवे व रघूजी भोंसले यांचें युद्ध झालें तें.—१४. दिल्लीमध्यें फारसी मुलखाचा नादिरशाह नामा बादशाह आला, त्यामुळें मोगल लोक संकट पावले तें प्रकरण; मग थोडकेच दिवसांनीं त्यानें दिल्लीचें तक्त मोगलांस माघारें देऊन आपण आपले मुलखीं गेला.—१५. मराठ्यांनीं वसई किल्ल्यास घेरा घातला ती कथा.—१६. पेशव्यांनीं

दक्षिण घेतल्याचे पूर्वीं माळवा व बुंदेलखंड या दोहों मुलखीं काय काय बंदोबस्त केला तो प्रकार.—१७. पेशवा हिंदुस्थानांत संचार करूं लागला.—१८. मराठ्यांनीं संभाजी आंग्र्यावर कांहीं मसलत केली होती ती बाजीरावाच्या मरणामुळें सिद्धीस न गेली.—१९. हिंदुस्थान व दक्षिणदेश आदिकरून सर्व मुलखांच्या राज्यांचीं वर्तमानें.—२०. बाजीरावाच्या स्वभावाचें स्वरूपकथन; व त्याचे पुत्र बाळाजी बाजीराव व रघुनाथराव व जनार्दन बावा व समशेर बहादूर यांची गोष्ट.

१. एथपर्यंत मराठे लोक यांनीं गुजराथेंत कोणकोणत्या प्रकारें प्रवेश केला तें व माळव्यांत आपल्या आधिपत्याचा पाया घातला तें सांगितलें. आतां वराड व कोंकण यांमध्यें त्यांनीं कसकसा संचार केला तो प्रकार लिहून नंतर माळव्यांत उत्तरेकडे जीं मराठ्यांनीं मोठीं मोठीं कार्यें केलीं तीं लिहिलीं जातील.

२. पेशवा शाहूचे जवळ नसतां सेनासाहेबसुभे कान्होजी भोंसले यानें त्याची कांहींएक आज्ञा मानिली नाहीं, यास्तव शाहूनें त्यास साताऱ्यामध्यें कैद केलें, आणि त्याचा भाऊबंद रघूजी भोंसले यास ती पदवी दिली. त्या रघूजीनें पूर्वीं गोंडवणांत कोणे एका मुसलमानाजवळ कांहीं दिवस थोडक्या लोकांनिशीं चाकरी केली होती. तो अधिकार लहान ह्मणून तो पुरुष प्रसिद्धीस आला नाहीं; परंतु त्यास कांहीं काम सोंपविलें असतां तो तें काम चांगलें करीत असे; आणि तो शिकारीच्या कामाविषयीं मोठा धीट असे, यास्तव शाहू त्याला आपल्या बरोबर शिकारीस नेई. मग त्यावर त्याची फार प्रीति बसली, नंतर त्यानें आपल्या बायकोची बहीण शिरक्यांची कन्या त्यास देवविली, आणि वराडची सुभेदारी सांगितली. त्याबद्दल त्याकडून कबूल करविलें कीं, 'नेहेमीं पांच हजार स्वारांनिशीं चाकरी करावी, व वर्षास नऊ लक्ष रुपये सरकारपोत्यास पोहोंचवावे, याशिवाय कधीं पेशवा मोहिमेस निघेल ते समयीं त्याबरोबर दहा हजार स्वारांसहित जावें.' याप्रमाणें त्यानें कबूल केलें. त्या वेळेस त्याचा परममित्र श्रीपतराव प्रतिनिधि तो राजानें कोंकणांत पाठविला होता, तो जर त्या समयीं जवळ असता तर आपल्या स्नेहास्तव रघूजीला इतकें कबूल करूं न देता.

३. कान्होजी आंग्र्याचे दोघे पुत्र कोंकणांत असत, त्यांत वडील सखोजी तो कुलाब्यांत होता. धाकटा संभाजी तो सुवर्णदुर्गीं राहत असे. कान्होजी आंग्र्या जिवंत असतां मुंबईच्या इंग्रेजांनीं त्यास जिंकावयाचा मोठा उद्योग केला, परंतु सिद्धीस गेला नाहीं. मग कान्होजी[१] मेल्यानंतर त्याचा थोरला पुत्र सखोजी तोही मेला. त्यामागें धाकटा संभाजी यानें त्याचे सावत्र भाऊ तिघे होते त्यांतला वडील

---

१. कान्होजी आंग्र्या सन १७२८ त साताऱ्यामध्यें मृत्यु पावला.

आपल्यापाशीं ठेविला, आणि त्यापेक्षां धाकटे दोघे येसाजी व मानाजी ते कुलाब्यास पाठविले. त्यांत येसाजीला मुलखाचा बंदोबस्त सांगितला, आणि मानाजी किल्ल्याच्या व फौजेच्या बंदोबस्तास नेमिला. मग त्या उभयतांमध्यें कांहीं कलह उत्पन्न होऊन मानाजीनें कपटेंकरून पोर्तुगीज लोकांस किल्ल्यांत आणून येसाजीचे डोळे काढवून त्यास बंदींत ठेविलें. नंतर संभाजी मानाजीच्या पारिपत्यास गेला, तेव्हां त्यानें पेशव्याचा आश्रय केला, यास्तव संभाजीला माघारें जावें लागलें. पेशव्यानें मानाजीस कुमक केली, त्याबद्दल त्यानें त्यास कोथळा व राजमाची हे दोन किल्ले दिले. त्या वेळेस जंजिऱ्यामध्यें सिद्दीचा अंमल बसला होता, त्या सिद्दीस मोगलांनीं 'सिद्दी याकूत' असें नवें नांव दिलें होतें. त्याशीं व मराठ्यांशीं निरंतर युद्धप्रसंग होई, परंतु त्या याकुतानें कधींही औरंगजेबानें दिलेला आपला मुलूख मराठ्यांच्या हातीं लागूं दिला नाहीं; आणि तो कधीं कधीं शाहूच्या मुलखांतून स्वाऱ्या घालून खंडणी घेत असे. त्याला जिंकावयाविषयीं शाहू व त्याचे दरबारी लोक फार इच्छीत होते, परंतु त्यापुढें कांहीं बळ चालेना तेव्हां कांहीं कपटेंकरून जिंकावा अशी प्रतिनिधीनें मसलत केली. तो प्रकार असा; त्या सिद्दीजवळ त्याचा परम विश्वासू याकुबखान नामें मुसलमान असे, तो समुद्रांत चांचेपणा करून मोठा विख्यात झाला होता, त्याचे वडील व तो गुहागरचे पाटील, ते जातीचे कोळी. त्याचे लहानपणीं त्याला मुसलमानांनीं स्वारी घालून धरून नेलें, आणि आपला धर्म शिकविला. तो प्रतिनिधीनें वश केला, मग त्यास सांगितलें कीं, 'सिद्दीचें आधिपत्य नाहींसें झालें असतां यांतले कांहीं किल्ले आह्मांस देऊन बहुतेक राज्य तूंच संभाळावें.' ही मसलत सिद्धीस न्यावयाकरितां प्रतिनिधीस बरोबर लष्कर देऊन सन १७३२ मध्यें कोंकणांत पाठविलें. तेव्हां सिद्दीच्या मुलखांत गरीबगुरीब रयत लोकांस मात्र उपद्रव झाला; परंतु किल्ला त्याचे हातीं लागला नाहीं. त्या सिद्दीपुढें प्रतिनिधीचें बळ कांहींच चालेनासें झालें. तेव्हां तो तेथून चिपळोणास जाऊन उतरला, आणि गोवळकोट किल्ल्यामध्यें आपले लोक ठेविले; तेथेंही सिद्दीनें छापा घालून तो गोवळकोट घेतला. अशी त्यानें प्रतिनिधीची दुर्दशा केली. हें वर्तमान समजून शाहूनें त्याचे कुमकेस जाण्याविषयीं चिमणाजी आपास आज्ञा केली, परंतु तो ऐकेना; शेवटीं प्रतिनिधि रुष्ट होऊन माघारां साताऱ्यास आला.

४. त्याच सुमारें जंजिऱ्याचा सिद्दी मेला. त्याचे पुत्र पुष्कळ होत, त्यांत वडील सिद्दी अबदुलखान नामें होता. त्याचे धाकटे भाऊ सारे, एक सिद्दी रहिमान खेरीजकरून, मिळून त्यांनीं त्यास जिवें मारून टाकिलें. हें वर्तमान याकुबखानास कळ-

---

१. सिद्दी रहिमान त्या वेळेस जंजिऱ्यांत नव्हता.

त्यावर त्यानें सिद्दी रहिमानाचा पक्ष धरून शाहूला सन १७३५ त कुमक मागितली, त्यास शाहू अनुकूळ झाला. त्या वेळेस बाजीराव माळव्याहून येत होता. त्यास आज्ञा केली कीं, 'दंडाराजपुरीं जावें.' याशिवाय दुसरे जे रिकामे लष्करी लोक होते त्यांस सांगितलें कीं, 'तुम्हीं जाऊन बाजीरावास मिळावें.' तो बाजीराव कोंकणांत गेल्यावर सिद्दी रहिमान व याकुबखान हे त्यास मिळाले. मग तळें व घोसाळें हे दोन किल्ले घेतले. इतक्यामध्यें प्रतिनिधिही मागून येऊन पोंहोचला, त्यानें येतांच रायगड घेतला. कां कीं, तेथल्या किल्लेदारास याकुबखानानें अगोदरच किल्ला द्यावयास सांगितलें होतें. त्यानंतर ज्यांनीं अबदुलखान मारिला, त्यांतील एक भाऊ सिद्दी राहाण नामें येऊन बाजीरावाशीं लढला, व तो मेला गेला. नंतर पेशव्यानें जाऊन जंजिऱ्यास खुसकीवरून मोरचे लावून तोफांचा मार चालविला, ते समयीं मानाजी आंग्र्याही येऊन समुद्रांतून किल्ल्यास तोफा मारूं लागला. असें असतांही बाजीरावानें सुमार पाहिला कीं, हा किल्ला लवकर सर्वथा हातीं लागणार नाहीं, आणि आपण फार दिवस कोंकणांत राहिलों असतां मोठ्या मोठ्या मोहिमांचीं कामें राहतील. यास्तव त्यानें तेथचे सिद्दी सल्ला करावयास सिद्ध झालेले पाहून सल्ला केला. तो प्रकार असा; तेथें सिद्दी रहिमानाचें मुख्यत्व असावें, व त्यानें अकरा महालांचें उत्पन्न अर्धें द्यावें, व मराठ्यांस रायगड व तळें व घोसाळें व अवचितगड व बिरवाडी हे किल्ले असावे. बाजीराव तें युद्ध असें शेवटास नेऊन मोठा विख्यात होऊन साताऱ्यास गेला. तेथें शाहूनें त्या बाजीरावानें घेतलेल्या रायगड इत्यादि ठिकाणांची सुभेदारी त्यासच दिली.

५. माळव्याहून बाजीराव निघाल्यावर त्याचा सरदार मल्हारराव होळकर लष्करसहित तेथें होता तो आग्र्याचे पलीकडेही स्वाऱ्या घालून लुटीत गेला. ते समयीं दिल्लीचे बादशहाचा वजीर खान दौरान नामें होता, त्याच्या मनांत आलें कीं, सल्ला करून मल्हारराव यास मागें फिरवावें, परंतु तो हें समजला नाहीं कीं, बंडाचें पारिपत्य केल्यावांचून आधीं तह करणें ठीक नव्हे. मग त्याच्या मनांत विचार येऊन त्यानें आपला भाऊ बरोबर फौज देऊन मोठा भयंकर आकार दाखवून शत्रूस नर्मदेच्या पार करावयास पाठविला. तो निघाला ते समयीं दिल्लीच्या सर्व लोकांस हा जय पावेल असा भरंवसा होता, परंतु त्याचा तो खटाटोप व्यर्थ झाला. तें लष्कर सरोंजपर्यंत जाऊन मागें फिरलें, आणि दिल्लीच्या लोकांस दाखविलें कीं, 'आम्हीं मोठा पराक्रम केला.' इकडे मल्हारराव त्याबरोबर सहज हलकें हलकें लढावयास थोडकेसे लोक पाठवी. ते दिवसास त्याशीं कांहींसे लढत आणि पळत, मग रात्रीस जाऊन त्याच्या डेऱ्यावर बाण टाकीत. त्या मल्हाररावानें तर सैन्याच्या

मोठ्या समुदायासुद्धां उद्योग करून त्या मुलखाच्या वसुलाची जमा आपला धनी बाजीराव याजकडे पाठवावयाचें काम चालविलेंच होतें. माळवे मुलखीं व चंबळा नदीचे दक्षिणेस मोगलांचे हातीं कितीएक किल्ले होते, तथापि मुलखाचा बंदोबस्त त्यांच्यानें करवेना. मराठ्यांखेरीज रोहिले लोकही त्या मुलखीं स्वाऱ्या घालीत होते. याशिवाय गुजराथेंतही मल्हारराव एकाएकीं स्वाऱ्या घालून अहमदाबादेचे उत्तरेकडचे कितीएक गांव लुटून माघारां फिरला.

६. बाजीरावानें फौज फार ठेविली यास्तव, तो बहुत लोकांचा कर्जभरू झाला. मग ज्या सावकारांनीं पहिल्यानें पुष्कळ कर्ज दिलें होतें ते आणीक देईनातसे झाले; व त्याच्या लष्करी लोकांचा रोजमुरा थकला, तेणेंकरून ते लोक त्याच्या आज्ञेंत अंतर पाडूं लागले, असें सन १७३६ त घडलें.[1] नंतर त्यानें माळव्याची चौथ व सरदेशमुखी यांचा ऐवज जमा करून राजा जयसिंग याचे योगें बादशाहापासून माळवा मुलूख आपणास पृथक् मागितला. याखेरीज 'सरबुलंदखानानें गुजराथेची सरदेशमुखी देऊं केली होती तिची आज्ञा व्हावी' असें मागितलें. तेव्हां बादशाह व वजीर या उभयतांच्या मनांत आलें कीं, याप्रमाणें द्यावें; परंतु त्याचे सरदार दुराणी मोगल यांच्या मनास येईना, ह्मणून खान दौरानानें आपला वकील कांहीं बोलणें करावयास बाजीरावाकडे पाठविला, त्याचे हातीं चौथ व सरदेशमुखी यांची सनद गुप्त देऊन सांगितलें कीं, 'तसा समय पाहून त्यास ही सनद गुप्त द्यावी.' असें असतां खान दौरानाजवळ बाजीराव याचा वकील होता त्यास तें वर्तमान कळलें. त्यानें पेशव्यास ती बातमी पोहोंचविली. तें समजतांच बाजीरावानें मनांत आणिलें कीं, 'ते आपणास भितात, त्यास, आणखीही कांहीं मागावें.' हा तर ब्राह्मणजातीचा स्वभाव आहे कीं, कोणी प्रथम कांहीं द्यावयास सिद्ध झाला ह्मणजे आणीक आणीक मागत असावें. त्यावर बाजीराव त्यापाशीं फारच मागूं लागला. तो प्रकार असा; प्रथम संपूर्ण माळवा जहागीर द्यावा, व किल्ला मंडू व किल्ला धार व किल्ला रेसीन; व चंबळानदीचे दक्षिणेचा मुलूख याची जहागीर व फौजदारी द्यावी; व पन्नास लक्ष रुपये बादशाहानें आपल्या खजिन्यांतून द्यावे. याशिवाय दक्षिण सहा सुभ्यांची सरदेशपांडेपणाची सनद द्यावी, असें मागितलें.

७. त्यानंतर बादशाहानें त्यांतून सहा सुभे दक्षिणचें सरदेशपांडेपण[2] मात्र दिलें,

---

१. त्या वेळेस त्यानें आपल्या महापुरुषास पत्र लिहिलें कीं, 'हल्ली मी बहुतांचा देणेदार होऊन माझी कुतरओढ झाली, ही मला नरकयातनाशी वाटते; आणि सावकार व शिलेदार यांच्या पायां पडतां पडतां माझ्या कपाळाचें कातडें गेलें.' २. सरदेशपांडेपणाचा हक्क सरदेशमुखीसारिखाच आहे, परंतु त्यांत प्राप्ति शेंकडा पांच रुपये.

आणि त्याबाबद सहा लक्ष रुपये नजर घेतली. केवळ सहा सुम्यांचें देशपांडेपणच पेशव्यास मिळालें हें तरी निझामउल्मुल्काच्या द्वेषास्तव खान दौरान यानें देवविलें. कां कीं, सहा सुभे दक्षिणेंत निझामउल्मुल्काची सत्ता होती. मग निझामास फार वाईट वाटलें, ते समयीं त्याला बादशाह व मोगल यांनीं लिहिलें कीं, 'तूं दिल्लीस लवकर ये, न आलास तर मुसलमानांचें राज्य बुडेल.' तेव्हां निझामउल्मुल्कानें विचार केला कीं, 'आपणास बहुतां दिवसांचे सहाय जे मराठे लोक त्यांशीं लढावें असें झालें; असो, काय होईल तें होवो.' इतकें होऊन तो दिल्लीस गेला. तेथें अनेक प्रकारें त्याचें मन वश करावयाविषयीं बादशाहानें उद्योग केला. तो असा; त्याचा वडील पुत्र गाजीउद्दिन यास गुजराथचा व माळव्याचा अधिकार दिला; त्याशिवाय सर्व मांडलिकांनीं त्याच्या हाताखालीं वागावें, असें सांगितलें. याप्रमाणें होऊन निझामउल्मुल्काजवळ फौज चौतीस हजार जमली, त्याखेरीज तोफखानाही फार चांगला होता.

८. इकडे बाजीरावही आपली फौज जमा करून निघाला तो नर्मदेस जाऊन पोंहोचला. तोंपर्यंत त्याजवळ ऐशीं हजार फौज जमली. तरी त्यांत रघूजी भोंसला व दाभाडे व यशवंतराव व सेनापतीचा कोणी सरदार हे नव्हते. बाजीरावानें बादशाहापाशीं अमर्याद मागणें केलें, त्यावरून त्या दरबारीं असें ठरलें, कीं 'फार मोठें लष्कर तयार करून त्यास भय दाखवावें.' नंतर त्यांनीं दिल्लीच्या सभोंवतें पुष्कळ लष्कर जमा केलें. तें ऐकून बाजीरावानें आपल्या लष्कराचें जड जड सामान आपला मित्र जगतराजा नामा बुंदेलखंडचा राजा त्याजवळ ठेवून बरोबर हलकें सामान घेऊन तो आग्र्यापासून विसां कोशांवर दक्षिणदिशेस यमुनेचे कांठीं जाऊन उतरला. ते समयीं त्याचा सरदार मल्हारराव होळकर व दुसरेही मराठे सरदार यमुनेपलीकडे दुआब एथें उपद्रव करूं लागले; तेथें अकस्मात् मोगलांचें लष्कर येऊन त्यांस यमुनापार केलें; त्या वेळेस बाजीरावही ती जागा ठीक नाहींशी समजून तेथून निघून ईशानी दिशेस चालिला. तेव्हां ते मोगलांचे सरदार यांनीं बादशाहास लिहिलें कीं, आह्मीं सर्व मराठे चंबळानदीपार केले, व ते आपल्या मुलखीं गेले.' तेव्हां दिल्लीमध्यें लोकांस मोठा आनंद झाला, आणि खान दौरानाजवळ बाजीरावाचा वकील होता त्यास 'निघून जा' अशी आज्ञा झाली. त्यानें जाऊन तें वर्तमान बाजीरावास कळविलें, तेव्हां तो बोलिला कीं, 'पाहा आतां आमचे मराठे लोक दिल्लीच्या दरवाज्याजवळचीं घरें जाळितील.' तें ऐकून बादशाहास कळलें कीं, अद्यापि मराठे हिंदुस्थानांत आहेत.

९. मग तसाच निश्चय करून रोज वीस वीस कोश मजला करीत आडवाटेनें

एकाएकीं दिल्लीदरवाज्याजवळ लष्करसहित जाऊन डेरा दिला. तेव्हां कितीएक हत्ती व कितीएक उंट शहराबाहेर आले होते ते धरले, व कितीएक हिंदुलोकही दिल्लींतून बाहेर देवदर्शनास जात होते ते धरून लुटले; परंतु कोणाचीं घरें जाळिलीं नाहींत. कां कीं, असें केल्यास बादशाहाचा राग होऊन पुढें तह करावयास अवघड पडेल; आणि लूट जमा केल्यानें पळून जातां येणार नाहीं; यास्तव बाद्-शाहास पत्र पाठवून सल्याचा प्रकार दर्शविला. अशी त्याची सुशीलता पाहून दिल्लीचे कितीएक मानकरी लोक धैर्येंकरून आठ हजार लष्कर बरोबर घेऊन युद्धास निघाले; त्या युद्धांत मोगलांचा पराभव झाला. मराठ्यांचा इंद्राजी कदम नामें एक सरदार व थोडकेसे लोक पडले. याप्रमाणें बाजीरावाचा जय झाला तरी तो असें समजला कीं, मोगलांचे लोक चहूंकडून लवकर जमा होतील, यास्तव तो रात्रीसच निघून गेला. तो ग्वाल्हेरचे वाटेनें रेवारी व मंदावर यांकडून चालिला. त्याचे पाठीमागें मोगलांचे कोणी सरदार लागले नाहींत. मग त्यास कळलें कीं, या वेळेस आपण दक्षिणेंत अवश्य जावें. त्या वेळेस खान दौरानानें बाजीरावास सांगून पाठविलें कीं, 'माळव्याचा अधिकार व तेरा लक्ष रुपये कबूल आहेत.' तेव्हां पेशव्यानें त्याजवळ आपला वकील फिरून पाठविला. मग आपण साता-ऱ्यास जाऊन राजाची भेट घेतली, आणि तत्काळ तेथून निघून कोंकणांत गेला.

१०. तेथें सन १७३७ त कुलाबा घ्यावयाकरितां मानाजीला पोर्तुगीज लोक अनुकूळ होऊन कुलाबा त्याच्या हातीं लागला; परंतु त्यानें त्यांस द्यावयाकरितां जो मुलूख कबूल केला होता तो तो देईना, यास्तव पोर्तुगीज लोक संभाजी आं-ग्र्यास मिळून मानाजीपासून कुलाबा घ्यावयास सिद्ध झाले. त्यांच्या निवारणार्थ पेशवा गेला. त्यानें तें कार्य सिद्धीस नेऊन त्यांपासून सात हजार रुपये रोख व तीन हजार रुपयांचें सामान, तें कांहीं विलायती व कांहीं चिनाई, असें प्रतिवर्षी घ्यावें असा करार ठरविला.

११. सन १७३८ त बाजीराव नर्मदापार गेला, त्या वेळेस निझामउल्मुल्क सरों-जेस होता, त्यानें तेच समयीं शत्रूवर चालून जावें हें योग्य होतें, परंतु तसें न करितां तो चांगला जागा पाहून भोपाळाजवळ बाजीरावाची वाट पाहात राहिला. तेथें त्याच्या लष्कराला पुढचे आंगीं ओढा होता व पाठीमागें तळें होतें. याप्रमाणें आश्रय पाहून राहिल्यामुळेंच तो पराभव पावला असें दिसतें. कां कीं, मराठे लोक तेथें जाऊन पोंहोचतांच त्यांस वाटलें कीं, 'यानें बळकट स्थळ धरिलें, तस्मात् याच्या मनांत भय आहे.' त्यावरून त्यांनीं त्याच वेळेस हल्ला केला, तेव्हां निझामा-कडचे रजपूतलोक पांचशें पडले, व घोडे सातशें मेले. मराठ्यांकडील शंभर

पडले, व तीनशें जखमी झाले. ते समयीं बाजीराव तेथून जवळच दोन बाणांच्या टप्प्यावर उभा राहून संधि पाहात होता; ती अशी कीं, निझामउलमुल्क आपली जागा सोडून निघाला ह्मणजे त्यावर लष्करासुद्धां एकाएकीं पडून त्याचा अगदीं पराभव करावा. अशी आशा धरून त्यानें ती जागा सोडिली नाहीं. मग त्याच्या हातून इतकें मात्र झालें कीं, त्यानें आपल्या लष्कराच्या टोळ्या सभोंवत्या बसवून निझामाच्या लष्करास धान्य, तृण इत्यादि मिळेनासें केलें. असें निझामास संकट प्राप्त झालें तें वर्तमान दिल्लीस कळल्यावर त्याचे मुक्ततेविषयीं तेथें तयारी होऊं लागली, परंतु बाजीरावास विदित होतें कीं, तेथचा मुख्य कारभारी खान दौरान तो निझामाचा द्वेषी, यास्तव तेथून लवकर येणार नाहीं; कदाचित् हैदराबाद व औरंगाबाद यांतून कोणी मदतीस येतील, तर त्यांचे निवारणार्थ मात्र त्यानें रघूजी भोंसल्यास बहुत आर्जवेंकरून लिहिलें कीं, 'सोनगडीं सेनापति आहे त्याला माझे मदतीस लवकर पाठवावें.' असेंच शाहूनेंही बाजीरावाच्या साहाय्यार्थ आज्ञापत्र आपल्या हातचें भोंसल्यास पाठविलें, परंतु त्यानें ऐकिलें नाहीं. बाजीरावाचा भाऊ चिमणाजी आपा मात्र लोक जमा करून तापीच्या कांठीं राहिला होता, त्यास बाजीरावानें लिहिलें कीं, 'ह्या समयीं तुला फौज मिळेल तितकी जमा कर व दक्षिणेंत बोलावणीं पाठवून फत्तेशिंग भोंसले व शंभूसिंग जाधव व सरलष्कर यांस आण; बांडे व दाभाडे व गाइकवाड हे मजकडे येत नसल्यास तूं आपल्याजवळ ठेवून घे, आणि तापीवर ऐस. जर या वेळेस सर्व मराठे एकचित्त होऊन मला अनुकूळ झाले तर मुसलमान लोकांस दक्षिणेंतून हांकून द्यावयाची संधि हीच आहे.' निझामउलमुल्क अशा अडचणींत पडला तेव्हां ती जागा सोडून कांहींसा दूर गेला, परंतु त्याजवळ तोफखाना वगैरे बहुत सरंजाम होता त्यामुळें निघून जावयास ठीक पडेना, ह्मणून तो माघारां फिरून भोपाळ किल्ल्याचे कोटांत गेला; ती जागा पुरेशी नव्हती ह्मणून कांहीं लोक बाहेर राहिले. ते समयीं बाजीरावाजवळ तट पाडावयाजोग्या तोफा नव्हत्या, तथापि त्यानें बाण टाकून व बंदुकांचा भडिमार करून त्यास असें बेजार केलें कीं, आपण कोणत्या तरी प्रकारें निघून जावेंसें त्यांस झालें. तेव्हां त्यानें आपलें जड सामान भोपाळ व इसलामगड एथें ठेवून आपणाबरोबर कांहीं तोफा व उंटावरच्या जेजाला घेऊन तो बाहेर निघाला. ते वेळेस मराठ्यांनीं त्याचा तोफखाना हल्ला करून घ्यावयाचा उद्योग केला, परंतु तो सिद्धीस न जातां त्या तोफा व जेजाला यांच्या आश्रयेंकरून ते मोगल लोक रोज दोन कोस असे धिमे धिमे चालीनें जातां जातां दुराईसराई गांवापावेतों पोंहचले. तेथें मोगल व बाजीराव यांचा तह झाला. त्यांत असें ठरलें कीं, 'बाजीरावास चंबळा व नर्मदा या दोहों नद्यांमध्यें जो मुलूख आहे त्याचें आधिपत्य प्राप्त

व्हावयास बादशाहास अनुकूळ करावें, याशिवाय पन्नास लक्ष रुपयेही बाजीरावास देववावे.'

१२. यानंतर बाजीराव चंबळानदीचे दक्षिणेस मुलखाची खंडणी घेत राहिला; इतक्यांत वेंकटराव घोरपडे कोंकणामध्यें पोर्तुगीज लोक यांचें पारिपत्य करावयास कितीएक स्वार घेऊन गोंव्याकडे चालिला; दुसरा खंडोजी मानकर कोंकणचे उत्तरेस लष्करसुद्धां त्या लोकांचे किल्ले घ्यावयाय निघाला; त्यांशीं त्या पोर्तुगीज लोकांनीं फार शौर्येंकरून युद्ध केलें; परंतु मराठ्यांचे कितीएक मुख्य सरदार चिमणाजी आपा व होळकर व शिंदे वगैरे, सरंजाम घेऊन कोंकणांत गेले होते, त्यांशीं युद्ध करतां करतां पोर्तुगीज लोक बहुतेक मेले. ते समयीं प्रायः त्यांचे किल्ले मराठे लोक यांनीं घेतले. त्या वेळेस मुंबई शहर हें लहानसें गांव होतें. त्यांत इंग्रेज लोक असत. त्यांशीं व पोर्तुगीज लोकांशीं कांहीं वैमनस्य पडलें, यास्तव त्यांस गुप्तपणें मराठ्यांचा पक्ष होता. त्या वैमनस्याचें कारण असें; सन १६६१ त इंग्रेजांचा बादशाह यानें पोर्तुगाल मुलखाच्या बादशाहाचे कन्येशीं विवाह केला, तेव्हां त्यानें त्या जांवयास मुंबई व त्यासंबंधें मुलूख आंदणामध्यें दिला. त्यानंतर दुसरे वर्षीं पांचशें इंग्रेज लोक मुंबईस आले, आणि पोर्तुगीज लोकांपाशीं साष्टी मागूं लागले, तेव्हां ते ह्मणाले कीं, 'साष्टीशीं आणि मुंबईशीं संबंध नाहीं, हें बेटच निराळें आहे,' असें बोलून साष्टी देईनात. शेवटीं त्यांपासून मराठे साष्टी घेऊं लागले, तेव्हां इंग्रेज कांहींसा हर्ष पावले. कां कीं, ते असें समजले कीं, 'मराठ्यांपासून पुढें कधीं तरी हें स्थान आपणांस प्राप्त होईल, आणि हल्लीं यांचें पारिपत्यही होईल.'

१३. याप्रमाणें कोंकणांत पोर्तुगीज लोकांशीं आणि मराठ्यांशीं युद्ध होत असतां सेनासाहेबसुभा याच्या पुतण्यानें कोणाची आज्ञा न घेतां हिंदुस्थानांत अलाहाबादेपर्यंत स्वाऱ्या घालून मुलूख लुटला, तेणेंकरून बाजीरावास फार राग येऊन त्यानें त्याच्या पारिपत्यास आवजी कावळे नामें सरदार पाठविला, त्याला रघूजी भोंसल्यानें जिंकिलें. मग बाजीराव त्याचा सूड घ्यावयास निघाला.

१४. ते समयीं त्याला वर्तमान कळलें कीं, फारसी लोकांचा नादिरशाह नामा बादशाह दिल्लीस येऊन मोगलांचा पराभव करून दिल्ली शहरची खंडणी बादशाहाकडे मागूं लागला, व खान दौरान मृत्यु पावला. मग तेथून पुढें गेला तों दुसरें वर्तमान समजलें कीं, त्या नादिरशाहानें दिल्लीच्या बादशाहास कैद करून तेथचे राहणारे लोक आठ दहा हजार सुमारें मारिले, आणि शहर लुटलें. हें ऐकून बाजी-

रावास मोठा विचार पडला, आणि त्यास असें वाटूं लागलें कीं, 'हा जो कोण मोठा शत्रु उद्भवला आहे यापुढें, सेनासाहेबसुभ्याचा पुतण्या व रघूजी भोंसला यांचें पारिपत्य करावयास जाणें, हें केवळ कनिष्ठ कार्य; व पोर्तुगीज लोकांशीं युद्ध करणें तेंही अल्पकार्य; कदाचित् तो बादशाहास मारून आपणच गादीचा अधिकारी होईल.' त्यापुढें तिसरें वर्तमान आलें कीं, एक लक्ष फारसी जमा होऊन दक्षिणेस येत आहेत. तरी तो किमपि न भितां पुढें गेला. ते समयीं त्यानें आपला भाऊ चिमणाजी आपाही कोंकणांतून बोलावून बरोबर घेतला; आणि सर्व लोकांस विदित केलें कीं, 'जे कोणी हिंदु व मुसलमान असतील त्या सर्वांनीं येऊन माझें साहाय्य केलें असतां शत्रूस घालवून देतां येईल. मी तर आपले मराठे लोक या कार्याकरितां नर्मदानदीपासून चंबळानदीपर्यंत पसरणार.' अशी बाजीरावानें तयारी केली, तों होळकर व शिंदा हे दोघेही त्यास येऊन मिळाले. तेव्हां असें वर्तमान आलें कीं, तो नादिरशाह आपल्या संतोषानें दिल्लीचें तक्त बादशाहास माघारें देऊन लष्करसुद्धां निघून आपले मुलखीं गेला. ते समयीं त्यानें बाजीराव व शाहू व दुसरे जे कोणी हिंदूंचे मांडलिक संस्थानी होते त्यांस पत्रें पाठविलीं कीं, 'मीं हा बादशाह पुनः तक्ताधिपति केला, इतःपर हा मला बंधूसारिखा, यास्तव तुह्मीं सर्वांनीं याचे आज्ञेंत वागावें. जर कोणी याची आज्ञा मान्य न करील, तर पुनः मी माघारां येऊन त्याचें पारिपत्य करीन.'

१५. पोर्तुगीज लोकांचीं व मराठ्यांचीं कोंकणांत युद्धें झालीं त्यांत मराठ्यांनीं वसई किल्ला घेतला. त्या युद्धांत परस्परें लढण्याचे कसबाची पराकाष्ठा झाली, त्यानंतर तसा यत्न मराठ्यांनीं केलाच नाहीं. सन १७३९ च्या फेब्रुअरी महिन्याचे १७ वे तारखेस चिमणाजी आपाचा बिनीवाला संक्राजी नारायण यानें वसई किल्ल्यास खुशकीवरून घेरा घातला, व त्या किल्ल्यास ज्या आंगीं पाणी आहे तेथें मानाजी आंग्र्या येऊन त्यानें तो घेरा पुरा केला. तेव्हां तेथच्या किल्लेदारानें आर्जवेंकरून विनंति केली कीं, 'तुह्मीं जंजिऱ्याच्या सिद्दीशीं जसा करार केला तसाच आह्माशीं कराल तर किल्ला देतों,' परंतु चिमणाजीच्या मनास ती गोष्ट येईना; कां कीं, त्यास असें वाटलें कीं, असलें बळकट स्थळ यांचे हातीं असलें तर आह्मीं घेतलेला जो मुलूख आहे तो हे आमचे मागें माघारां घेतील, आणि पर्जन्यकाळाच्या पूर्वीं हें काम शेवटास न गेलें तर हा सर्व उद्योग व्यर्थ जाईल; याकरितां अनेक प्रकारें यत्न चालविला. तो असा; मैदानामध्यें जागोजाग मोर्चे बांधून एका मोर्च्याहून दुसऱ्या मोर्च्यास किल्लेकऱ्यांच्या तोफांचा मार चुकवून जावयाकरितां जमीन खणून मोठे मोठे चर पाडून वाटा केल्या; तेव्हां

किल्लेकऱ्यांनीं गरनाळांतून कुलपी गोळे व दगड वगैरे भरून त्या चरांच्या वाटेवर टाकून रोजरोज ते लोक बहुत मारिले; त्या किल्ल्यांत तोफा बहुत होत्या, परंतु मराठ्यांनीं फार तोफांचा भरणा आणून त्यांच्या तोफांचा उपाय चालेनासा केला. मग किल्याच्या तटाला भोंक पाडिलें, परंतु त्यांतून आंत शिरतां येईना; तेव्हां किल्ल्यांत जावयास पुरेशी वाट व्हावी ह्मणून त्या कोटाखालीं सुरुंग पाडूं लागले. तेव्हां किल्लेकऱ्यांनीं त्या सुरुंगाच्या सुमारें आंतून सुरुंग पाडून त्यांचा यत्न व्यर्थ केला. असें बहुत वेळां झालें; शेवटीं मराठ्यांनीं मसलत केली कीं, एकदाच पांच सुरुंग उडवून तटास मोठें खेंडार पाडावें, ह्मणजे मार्ग मोठा होईल. नंतर पांच सुरुंग तयार केले, त्यांत तीन जवळ आणि दोन दूर. त्या दोहोंतल्या एकाला पहिल्यानें आग घातली, तो चांगला उडाला नाहीं, मग जे सरसे सरसे तीन होते त्यांस एकदाच आग घातली, तेव्हां त्यांतील दोन उडाले, तेणेंकरून खेंडार मोठें पडलें. ते समयीं मराठे किल्ल्यांत शिरावयाकरितां जवळ गेले, तों तिसरा सुरुंग उडाला, त्यांत ते सांपडून फार मेले गेले; व राहिले ते किल्लेकऱ्यांनीं गरनाळांच्या गोळ्यांनीं व बंदुकांच्या मारानें फार हैराण केले, त्या वेळेस ते सर्व मराठे मार्गे हटले. तेव्हां किल्लेकऱ्यांनीं त्या खेंडारांतून चढून आंत जावयाचा उपाय चालूं नये असा बंदोबस्त केला. त्यानंतर पांचां सुरुंगांपैकीं एक राहिला होता त्याचें काम मल्हारराव होळकरानें पक्कें केलें होतें, त्यास आग घातली, तेव्हां तो चांगला उडाला, त्यानें अर्धा बुरुज कोसळला. ते समयीं मराठ्यांनीं मातक्यान् हल्ला केला, तेव्हां पोर्तुगीज लोकांनीं मातीच्या टोपल्या भिंतीसारख्या रचून तेथून तोफा लागू करून आपला जीव वांचविला, व मराठ्यांस जवळ येऊंच दिलें नाहीं. मग त्यांस खाण्यापिण्याचा तोटा पडून ते बहुत श्रमी झाले, व त्या युद्धास आरंभ होऊन तिसरा महिना भरला. अशा समयीं त्यांनीं मराठ्यांशीं तहाचें बोलणें लाविलें; त्यांत असें ठरलें कीं, आठां दिवसांस पोर्तुगीज लोक आपलीं मुलें माणसें काढून किल्ला रिकामा करून देतात. त्या किल्ल्याच्या युद्धामध्यें मराठ्यांचे लोक पांच हजारांवर मेले; पोर्तुगीज लोकांचे मेलेले व जखमी मिळून आठशें झाले. या युद्धाशिवाय कोंकणांत मराठे व पोर्तुगीज लोक यांचीं युद्धें झालीं त्यांत व ह्यांत मिळून मराठ्यांचें माणूस बाराचौदा हजार सुमारें मेलें.

१६. फारसी लोकांचा बादशाह यानें दिल्ली सोडल्यानंतर बाजीरावानें दिल्लीच्या बादशाहाचे प्रसन्नतेविषयीं मोठ्या गौरवाचें पत्र लिहिलें व शंभर मोहरा नजर पाठविल्या. नंतर बादशाहाकडून बाजीरावास बहुमानाचें उत्तर व वस्त्रालंकारादि उत्तम प्रकारचें प्राप्त झालें; परंतु निझामाच्या बोलण्याप्रमाणें माळव्याची

सनद मिळाली नाहीं, त्यावरून पेशवा यानें निझामास घातकी जाणून मनांत विचार केला कीं, सर्व दक्षिणेंत निझामाची सत्ताच नाहींशी करावी. त्या वेळेस निझाम आणि त्याचे बहुतेक लोक हिंदुस्थानांत होते, यास्तव त्या कार्यास ती संधि उत्तम होती; परंतु ते समयीं बाजीरावाचे मोठे मोठे सरदार लष्करांसहित कोंकणांतून आले नव्हते, ह्मणून बाजीराव माळव्याचा बंदोबस्त करीत राहिला, व त्या मुलखाचे पश्चिमेस चंबळेचे कांठीं कोटापासून अलाहाबादपर्यंत मुलखाचे अधिकारी रजपूत त्यांशीं स्नेह रक्षून होता. त्यांत विशेष इतका कीं, बुंदेलखंडाच्या राजानें समयीं बाजीरावाच्या मागें मोंगलांस बुंदेलखंड न देतां दोन महिनेपर्यंत बाजीरावाचे कुमकेची मार्गप्रतीक्षा करीत लढावें, तोंपावेतों कुमक न पोंहचल्यास तह करून मग कुमक मिळाल्यावर पुनः लढावें, याप्रमाणें ठरलें. असा उत्तरेचा बंदोबस्त करून त्याच वर्षाचे समाप्तीस बाजीरावानें दक्षिणेंत औरंगाबादेजवळ निझामउलमुल्काचा पुत्र नासिरजंगनामा दहा हजार सैन्यासहित होता, तेथें जाऊन त्यासभोंवता घेरा घातला; परंतु थोडक्याच दिवसांत त्या नासिरजंगाचे कुमकेस दुसरें एक मोठें सैन्य येऊन पोंहचलें, त्या योगें तो मराठ्यांच्या हातचा सुटून गोदावरीचे पलीकडे अहमदनगरचे वाटेनें मुलखांस उपद्रव देत चालिला. तो अहमदनगरीं जाऊन पोंहचला नाहीं तोंच बाजीरावाचे मदतीस चिमणाजी आपाचें मोठें लष्कर येऊन पोंहचलें. मग बाजीरावानें त्याशीं युद्ध करून त्यास पुढें जाऊं न देतां माघारां गोदावरीकडे परतविला. त्यावर कितीएक महिने त्या उभयतांचें युद्ध तसेंच होत असतां त्यांतील एकासही किमपि अर्थलाभ न होतां दोघांचा तह होऊन ठरलें कीं, 'इतःपर रयतेस कोणीं उपद्रव करूं नये, व मोंगलांनीं बाजीरावास नर्मदेचे कांठीं जहागीर द्यावी.'

१७. मग बाजीराव, मनोदयानुरूप अर्थ सिद्धीस गेला नाहीं ह्मणून फार खिन्न होऊन पुण्यास व सातान्यास न जातां एकाएकीं त्या लष्करासहित हिंदुस्थानांत जावयास निघाला.

१८. ते समयीं त्याचा पुत्र बाळाजी बाजीराव, ज्यास 'नानासाहेब' ह्मणत, तो कोंकणांत आंग्र्याशीं लढत होता, त्याचे कुमकेस चिमणाजी आपा गेला. तेथें ते त्या नानासाहेबाशीं रेवदंडा किल्ला घ्यावयाची मसलत करीत बसले होते, ते वेळेस वर्तमान आलें कीं, बाजीरावास नर्मदेचे कांठीं सन १७४० चे एप्रिल महिन्याचे २८ वे तारिखेस देवाज्ञा झाली. असें ऐकतांच संक्राजी नारायण बिनीवाला यास कोंकणची सुभेदारी दिली, आणि खंडोजी मानकर लष्कराचा मुखत्यार केला. मग चिमणाजी आपा व त्याचा पुतण्या नानासाहेब पेशवा हे उभयतां बाजीरावाचें उत्तरकार्य करून सातान्यास आले.

१९. बाजीरावाचें मरण तें मोठें प्रकरण, यास्तव त्या समयीं मराठ्यांची हकीकत काय काय होती ती समजायाविषयीं तेव्हांचे हिंदूंतील सर्व अधिकारी कसकसे वागत होते तें प्रथम लिहिलें पाहिजे. दिल्लीमध्यें ते वेळीं महंमदशाह नामें बादशाह होता, त्यास नादिरशाहानें बंदीस घालून त्या राजधानींतले कितीएक लोक मारिले व शहर लुटून द्रव्य नेलें; त्या शहराचे उत्तरेकडील काबूल व तट्टा व मुलतान हे मुलूख घेऊन त्यानें आपल्या मुलखाकडे लाविले होते; त्यावरून बादशाहाचें तेज कमी होऊन दिल्लीच्या जवळ दुसरीं कितीएक नवीं नवीं राज्यें होऊं लागलीं होतीं तीं प्रबळता पावतीलसें दिसूं लागलें. त्यांत एक रोहिला असे, त्याचा मूळपुरुष हिंदुस्थानचे अहीर जातीचा होता; जसा मराठ्यांमध्यें धनगर तसा त्यांत तो. त्याचे लहानपणीं कोणीएका आफगाणानें आपल्याजवळ, त्याचें 'अली महंमद रोहिला' असें नांव ठेवून, तो बाळगला होता; मग तो मोठा झाल्यावर आफगाणाच्या स्वारांची सरदारी करीत होता. त्यानंतर त्यानें कांहींएक मुलखाच्या उत्पन्नाचा चढ पत्करून मुलूख आपल्या हाताखालीं घातला, मग पैका द्यावयाच्या समयीं युद्धास सिद्ध झाला; त्याच्या पारिपत्याविषयीं वजिरानें आपला कोणी मुखत्यार पाठविला, त्याचा त्यानें पराभव केला. हें वर्तमान दिल्लीपासून पन्नास पंचावन्न कोसांवर दक्षिणेकडे झालें. दुसरा, शूद्रांमध्यें जाट नामें जातीचा कोणी एक सिंधुनदीच्या कांठचा राहाणारा, त्यानें येऊन आग्रा व जयपूर यांचें आधिपत्य औरंगजेबाचे समाप्तीस केलें. पुढें त्याचे मरणानंतर त्यानें त्याच गडबडींत आपलें आधिपत्य बळकट करून मग जेव्हां मराठे चंबळानदी उतरून पलीकडे गेले तेव्हां त्यांचा व आपला एक लाभ पाहून त्यांशीं स्नेह केला. दक्षिणेंत व कर्नाटकांत स्वराज्य व जहागीर सोडून बाकीचें निझामउल्मुल्क आणि मराठे निमेनिम वांटून घेत होते. बाजीराव मेल्यानंतर तो निझामउल्मुल्क कितीएक दिवस दिल्लींत होता, त्याचे नांवास बादशाहानें 'अमीर उल् उमरा' असें पद जोडिलें होतें. त्याला वर्तमान कळलें कीं, आपला पुत्र नासिरजंग दक्षिणेंत आहे तो माझी सत्ता नाहींशी करून आपण कारभार करणार, तें बंड मोडावयाकरितां निझाम दक्षिणेस निघाला, ते समयीं त्यानें बादशाहास विनंति केली कीं, 'मला जें पद दिलें तें माझा वडील पुत्र गाजीउद्दीन यास असावें.' कर्नाटकांत विजापूर व गोवळकोंडें एथें जे पहिले मुख्य अधिकारी होते त्यांची संतति पुष्कळ झाली होती, त्यांत स्वतंत्रपणें वागण्याची चाल पडली होती. इंग्रेज व फ्रेंचही या मुलखांत असत, परंतु ते आपला पराक्रम न जाणतां किंवा जाणत असूनही स्वार्थसाधनास युद्धादिकेंकरून झटत नसत. आर्जवानें अथवा लांच देऊन कार्य करून घेत. त्यांशीं कोणी वक्र झाला तर तात्काळ युद्धास सिद्ध होत. त्या वेळेस असें असतां पुढें

त्यांचा दैवयोग असा होता कीं, या मुलखीं सर्व मोठमोठ्या कामांत त्यांनीं प्रवीण व्हावें. पूर्वीं सन १७३९ त इंग्रेजांनीं आपल्या व्यापाराच्या साधनास चिमणाजी आपाच्या स्नेहानें पेशवा अनुकूळ करून घ्यावयास वसईमध्यें चिमणाजीशीं कांहीं तह केला होता. पोर्तुगीज लोक मराठे लोकांशीं बहुत वेळां युद्धें करून केवळ बळहीन झाले होते.

२०. बाजीराव रूपानें फार चांगला होता. त्याची बोलण्याची किंवा कोणतेंही कार्य करण्याची ढब शिपायाप्रमाणें दिसे, आणि तो लष्कराबरोबर असतां ऐश्वर्याच्या उपभोगासाठीं आपल्या सेवेंत बहुत माणसें बाळगीत नसे, जें त्याच्या शिपायास दुःख तें तो आंगें अनुभवीत असे. याविषयीं अशी कथा आहे कीं, पूर्वीं त्याची आणि निझामउलमुल्काची भेट झाली नव्हती तेव्हां निझाम यानें कोणाएका मोठ्या चितार्‍यास सांगितलें कीं, 'तूं जाऊन बाजीराव पेशवा यास पहा आणि तो तुझ्या दृष्टीस जें काम करतांना जसा पडेल तसें त्याचें चित्र काढून मला आणून दे.' मग त्या चितार्‍यानें तसें चित्र काढून आणिलें. तें असें होतें कीं, बाजीराव घोड्यावर बसून भाला आंगाशीं धरून जोंधळ्यांचीं कणसें हातावर चोळून खातखात चालिला आहे, व त्याच्या घोड्याचे पायबंध व मेखा तोबर्‍यांत भरून तोबरा घोड्यावर बांधून घेतलेला आहे. त्याच्या जातीचे ब्राह्मण ह्मणतात कीं, तो द्रव्यलोभी असे, आणि आपले कितीएक जातिधर्मही मानीत नसे, व तो शिपाईपणांत विशेष प्रीति ठेवून दुसरीं राज्यकारभाराचीं कामें तुच्छ मानी. हें त्या लोकांचें बोलणें सत्य जरी असलें तरी त्याकडे दोष नाहीं; कां कीं, त्यावर बहुत वेळां संकट पडलें होतें. तो राज्य मिळवण्याविषयीं लोभी खरा, परंतु मराठ्यांस एकचित्त वागविणें व निझामाचा मनसोबा समजून त्याचें निवारण करणें या कामांत तो दक्ष होता; यास्तव त्यानें आपल्या मराठे लोकांचें फार हित केलें. त्याचे मरणानंतर त्याचे जागीं बाळाजी बाजीराव नामें त्याचा वडील पुत्र स्थापिला; दुसरा रघुनाथराव, तो इंग्रेजांचीं कार्यें करून नामांकित झाला; तिसरा जनार्दनबावा, तो लहानपणींच मेला; चौथा यवनीचे ठायीं झाला, तो समशेर बहादूर.

---

## भाग सोळावा.

### ( इसवी सन १७४० पासून सन १७४९ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. कर्नाटकांत मराठ्यांचा प्रवेश.—२. रघूजी भोंसला यानें बाळाजी बाजीराव यास पेशवाई न मिळावी ह्मणून राजाजवळ उद्योग केला, तो शेवटास न गेला.—३. चिमणाजी आपा याचा

मृत्यु.—४.पेशवा राजापासून मोठ्या लाभाची सनद पावला.—५. भास्करपंत बंगाल्यांत शिरला.—६. दमाजी गाइकवाडानें माळव्यांत स्वाऱ्या घातल्या.—७. अलिवर्दीखानानें भास्करपंतास बंगाल्यांतून काढून दिल्यावर रघूजी भोंसला यानें स्वयें स्वारी केली.—८. तेव्हां दिल्लीच्या बादशाहानें पेशव्यास माळव्याचा अधिकार व इतर लाभाची आशा दाखविली, यास्तव त्यानें अलिवर्दीखानाचा पक्ष स्वीकारून रघूजीला तेथून घालविलें.—९. मग पेशवा बादशाहापासून माळव्याची सनद पावून साताऱ्यास आला.—१०. त्यापुढें रघूजी भोंसले आणि बाळाजी बाजीराव पेशवे यांची कांहीं समजूत पडली.—११. निझामउल्मुल्क याची कांहीं गोष्ट.—१२. रघूजीचा भास्करपंत व मोठे मोठे मानकरी मराठे सरदार पुनः बंगाल्यांत गेले, ते अलिबर्दीखानाच्या कपटानें घातेंकरून मारिले गेले.—१३. आफगाणांचा बादशाह अहमदशाह अबदाली याची गोष्ट; दिल्लीचे बादशाहाचा मृत्यु, आणि त्याच्या पुत्राचें स्थापन; निझामउल्मुल्काचा मृत्यु.—१४. नासिरजंग मोठें सैन्य घेऊन कर्नाटकास चालिला.—१५. राजा रामराजा कसा प्रकट झाला तें प्रकरण.—१६. त्यानंतर साताऱ्यास सकवारबाईची व ताराबाईची काय वर्तणूक झाली तें.—१७. बाळाजीनें सकवारबाई कोणे प्रकारें सती घालविली तो विस्तार.

१. रघूजी भोंसले व पेशवे यांमध्यें कलह उत्पन्न झाला तो फारसी लोकांचा नादिरशाहनामा बादशाह दिल्लीस आल्यामुळें कांहीं दिवस राहिला होता, पुढें त्या उभयतांची गांठ पडली तेव्हां तो कज्जा अगदीं मोडला. त्या समयीं त्या दोघांची काय मसलत झाली ती पुरतेपणें समजत नाहीं, परंतु असें वाटतें कीं, बाजीरावाच्या मनांत हिंदुस्थान घ्यावें, व कर्नाटक आणि बंगाला आपल्या सत्तेंत आणावा, अशीं मोठमोठीं कार्यें करावयाचीं होतीं; त्या मसलतींत त्यास घेतलें असेल. त्यानंतर कर्नाटकांत लष्करसुद्धां रघूजी भोंसला शिरला, त्याचें कारण तेंच दिसतें. त्या लष्करांत राजा व पेशवे व प्रतिनिधि व फत्तेशिंग भोंसले व इतर मराठे सरदार यांचे शिपाई होते, त्यांत संताजी घोरपड्याच्या वंशांतील मुरारराव घोरपडा असे; त्यानें राजाचा पक्ष ते समयीं नव्यानें स्वीकारला. पूर्वीं राजानें त्याच्या वडिलांस विटविलें होतें. तो यांस मिळाला, ते वेळेस आपलें सेनापतित्व मागूं लागला, तें न देतां तुंगभद्रेजवळ कांहीं परगणे देऊन तो वश केला. मग तें लष्कर पन्नास हजार जमून कर्नाटकांत गेलें, तें दामलचरीच्या घाटाजवळचे आडवे वाटेनें जाऊन एकाएकीं दोस्त[1] अली नबाब जेथें लष्करसहित होता तेथें प्रकट झालें. नंतर त्यांशीं युद्ध होऊन दोस्त अली मेला, आणि त्याचा दिवाण मीर

---

१. दोस्त अली सादत उल्लाखानाचा पुतण्या. पूर्वीं सन १७०६ त कर्नाटक पैनघाटमुलखीं दाउदखानानें आपल्या अधिकारावर सादतखान कारभारी यास ठेविलें, नंतर तो सादतखान मेल्यावर दोस्त अली दिल्लीचा बादशाह याचे व निझामउल्मुल्क याचे आज्ञेवांचून आपल्या चुलत्याची जागा पावला.

आसदनामा होता तो धरला गेला. त्यानंतर मराठे त्या मुलखीं जिकडेतिकडे पसरले आणि खंडणी घेऊं लागले, शेवटीं दोस्त अलीचा वडील पुत्र सफ्दर अली यानें द्रव्य देऊन मराठे तेथून निघावे असें केलें. ते समयीं सफ्दर अलीचें व भोंसल्याचें बोलणें झालें त्यांत करार ठरला कीं, त्रिचनापल्लीचा अधिकारी चंदासाहेब यास मराठ्यांनीं मातक्यान् येऊन जिंकावें. त्या चंदासाहेबाविषयीं सफ्दर अलीच्या मनांत पूर्वीपासून कांहीं शंका होती. त्यानंतर मराठे करारप्रमाणें सफ्दर अलीचा मुलूख सोडून माघारें महाराष्ट्रमुलखीं सवाशें कोस जाऊन शिवगंगेचे कांठीं उतरले; परंतु त्यांचा मनसोबा होता कीं, आपण येथें कांहीं दिवस राहून तो चंदासाहेब केव्हां तरी असावध आहे असा जाणून एकाएकीं जाऊन जिंकूं.

२. इतक्यांत रघूजी भोंसला तेथून निघून साताऱ्यास आला आणि बाळाजी बाजीराव यास 'पेशवे' पदवी न देऊं देतां बाबूजी नाईक बारामतीकर हा पेशवा करावा असा राजाजवळ उद्योग करूं लागला, आणि शाहूस समजाविलें कीं, 'बाबूजी नाईक पेशवाईकरितां द्रव्य पुष्कळ देईल.' परंतु त्यास प्रतिनिधि अनुकूळ नव्हता व चिमणाजी आपा आपल्या पुतण्याचें हित करणारा होता, ह्मणून इतका यत्न केला तो शेवटास न जाऊन सन १७४० च्या आगस्ट महिन्यांत शाहूनें बाजीरावाचे जागीं बाळाजी बाजीराव स्थापिला. बाबूजी नाईक बारामतीकर, आपल्या मनोदयानुरूप कार्य सिद्ध न झालें यास्तव, बाळाजीस बाजीरावाकडच्या कर्जाविषयीं फार तगादा करूं लागला, त्यामुळें त्यास बहुत संकट प्राप्त झालें; तेव्हां त्याचा दिवाण महादाजीपंत पुरंदऱ्या यानें त्या संकटापासून बाळाजीची मुक्तता केली, यास्तव तो त्याचा मोठा उपकार मानून त्याचे ठायीं अत्यंत प्रीति करूं लागला. रघूजी भोंसला यानें योजिलेलें कार्य सिद्धीस न गेलें ह्मणून तो बाबूजी नाईक बारामतीकर यास आपले बरोबर घेऊन त्रिचनापल्लीचे मोहिमेसंबंधें लाभ साधावयास पुनः कर्नाटकास चालिला. त्याबरोबर श्रीपतराव प्रतिनिधि व फत्तेशिंग भोंसले हेही गेले. तें लष्कर तंजावरास पोंहचलें तेव्हां त्या मुलखीं मराठे होते ते आपल्या मनांतील वैमनस्यें टाकून दक्षिणदेशींचे मराठे आपले भाऊबंद यांस मिळाले. त्यानंतर कर्नाटकीं काय काय युद्धें झालीं तें समजत नाहीं, परंतु इतकें

---

१. बाबूजी नाइकाशीं आणि बाजीरावाशीं कांहीं वैमनस्य पडलें होतें त्याचें कारण असें; बाबूजी नाईक मोठा द्रव्यवान् होता, त्यापासून बाजीरावानें कर्ज घेतलें तें माघारें द्यावयास मिळेना. २. त्या वेळेस दिसण्यामध्यें त्या प्रांताचा धनी शिवाजीचा भाऊ व्यंकोजी त्याचा नातू (पुत्राचा पुत्र) होता, परंतु मुख्यत्वें मुसलमान असे. तो व्यंकोजी याचा धाकटा पुत्र तुकाजी याच्या वेळेपासून तंजावरांत शिलेदारी करीत होता असें समजावें.

ठाऊक आहे कीं, सन १७४१ च्या मार्च महिन्यांत त्रिचनापल्ली मराठ्यांचे हातीं लागली. तेव्हां तेथचा धनी चंदासाहेब होता तो रघूजी भोंसल्यानें कैद करून सातार्‍यास पाठविला, आणि मुरारराव घोरपडे त्या किल्ल्याचा मुखत्यार करून ठेविला. त्याजवळचे शिबंदीस दरमहा खर्चास शाहूकडून पोंहचत असे, परंतु ते लोक पेशव्याचे होते. कर्नाटकचे खंडणीपैकीं प्रतिवर्षीं वीस हजार रुपये बाळाजी बाजीरावास देत जावे असें ठरलें; हा एक पेशव्यास त्या वर्षीं लाभ झाला.

३. त्याच वर्षाच्या पहिल्या महिन्यांत चिमणाजी आपा मृत्यु पावला. तो मराठे सरदारांत मोठा मान्य असे, कां कीं, त्यानें पोर्तुगीज लोकांचा पराभव करून आपल्या जातींत लौकिक मिळविला होता, परंतु एवढी त्याची योग्यता असेलच असें ह्मणतां येत नाहीं. त्यानें जाणिलें कीं, पायदळ व तोफा यांचा बंदोबस्त चांगला असल्यावांचून युद्धाचें साहित्य ठीक नाहीं. ती कल्पना बहुधा बरी दिसते, परंतु ती मराठ्यांस योग्य नव्हे; कां कीं, ते आंगधिटाईनें मारामारीविषयीं समर्थ होते. चिमणाजीचा पुत्र सदाशिव चिमणाजी भाऊ[१] यानेंही ती बापाची कल्पना उत्तम मानून पुढें विसां वर्षांनीं आपले मोठेपणीं त्याप्रमाणें सिद्धता करून पानपतचे लढाईत त्याच चुकीनें तो लष्करसहित नाश पावला असें दिसतें. चिमणाजी आपा मेल्याचे अगोदर खंडोजी मानकर यानें त्याचे आज्ञेवरून पोर्तुगीज लोकांचा रेवदंडा किल्ला राहिला होता तो घेतला, तेणेंकरून दमाण व गोवें यांमध्यें त्या लोकांची सत्ता किमपि राहिली नाहीं.

४. बाळाजी बाजीराव आपल्या चुलत्याच्या मरणानंतर एक वर्ष सुमारें मुलखाचा बंदोबस्त करीत सातारा व पुणें एथें राहिला होता. त्यानें शाहूस आपली गरिबाई दाखवून पोर्तुगीज लोकांपासून जिंकून घेतलेला मुलूख होता त्याची सनद मिळविली; व गुजराथ खेरीजकरून नर्मदेच्या उत्तरेकडच्या मुलखाची खंडणी जी घ्यावयाची ती व वसूल जमा करावयाचा तो त्याच्या हातून व्हावा असेंही शाहूनें केलें.

५. शाहूनें त्याच समयीं एवढें दिलें तेणेंकरून पेशव्याच्या प्रबळतेस फार उपयोग झाला, तो ध्यानांत यावयाकरितां आधीं बंगाल्यांतील वर्तमान कांहीं लिहिलें पाहिजे. तें असें; सन १७४० त बंगाल्याचा नबाब सुजाउद्दिनखाननामें होता, त्यानें बहार सुभ्यामध्यें कोणीएक आपला हस्तक अलिवर्दीखाननामें ठेविला. तो सुजाउद्दीन मेल्यावर त्याचा पुत्र तख्ताधिपति झाला, परंतु अलिवर्दीखान त्यास मानीना. पुढें त्या उभयतांचें युद्ध होऊन तख्ताधिपति मरण पावला, आणि अलिवर्दीखान यास तें आधिपत्य प्राप्त झालें. त्या वेळेस ओडिसा

---

१. सदाशिव चिमणाजीस 'भाऊसाहेब' ह्मणत.

सुभ्यामध्यें कोणीएक पहिल्या नबाबाचा हस्तक मुरशेद कुलीखान नामें असे, त्याचा दिवाण मीर हबीब नामें होता, त्याशीं अलिवर्दीखानानें युद्ध करून तो सुभ्याचे पार घालविला, तो ते वेळेस पळून जाऊन मग थोडकेच दिवसांनीं पुनः येऊन अलिवर्दीखानाजवळच चाकरीस राहिला. त्यापुढें बंगाल्यांत मराठे लोकांची सत्ता व्हावयास तो उपयोगीं पडला. त्याचा प्रकार असा; मुरशेद कुली, अलिवर्दीखानानें मुलखांतून पार केल्यावर मीर हबीबानें वराडांत रघूजी भोंसल्याचा हस्तक भास्करपंत होता त्यास मसलत दिली कीं, 'कटक सुभा लुटावा.' तेव्हां भास्करपंतानें आपला धनी कर्नाटकांत गेला त्याचे आज्ञेची वाट पाहिली, इतक्यांत अलिवर्दीखानानें लष्करसहित येऊन तो सुभा घेतला. तो मीर हबीब जाऊन त्यास मिळाला यावरून त्या वेळेस बंगाल्याच्या हद्दींत शिरणें राहिलें, परंतु भास्करपंताच्या मनांत ती इच्छा होऊन थोडक्या वेळानें तो लष्कर घेऊन कांहींएक निमित्तेंकरून पूर्वेकडे चालिला; तो निघून गेला तेव्हां पेशवा हिंदुस्थान आपल्या सत्तेंत आणावयाची वाट पाहात होता, तो त्याच समयास उत्तम मानून निघाला, आणि गरा व मंदेला किल्ला हस्तगत केला. तेव्हां पाऊसकाळ जवळ आला ह्मणून नर्मदेच्या कांठीं छावणी केली.

६. मग दसरा झाल्यावर अलाहाबादेस स्वारी घालावी अशी मसलत होती, इतक्यांत दमाजी गाइकवाड व बाबूराव सदाशिव माळव्यामध्यें पेशव्याचे मुलखीं लुटूं लागले, यास्तव पेशवा अलाहाबादेची मोहीम टाकून माळव्याकडे गेला. त्या समयीं पेशवा पूर्वेस न जातां माळव्यांत गेला, तें रघूजी भोंसल्याचें चातुर्य; कां कीं, पेशवा पूर्वेस न जावा आणि तो सर्व लाभ आपणच घ्यावा अशी त्याची मसलत होती. इकडे भास्करपंत बंगाल्याकडे जात असतां बहार परगणा यामध्यें स्वारी प्रथम घातली, त्या वेळेस अलिवर्दीखानाच्या पुतण्याचा पुत्र कटकप्रांतामध्यें कांहीं बंड करीत होता, तें बंड मोडावयास अलिवर्दीखान बहार एथून कांहीं सैन्य घेऊन कटकप्रांताकडे गेला. मग तें बंड मोडून तो मुर्शिदाबादेस जाणार होता, परंतु मराठे बहार एथें शिरल्याचें वर्तमान ऐकून त्यांच्या पारिपत्याकरितां त्वरेनें आला. ते समयीं मराठी लष्कर सुमारें दहाबारा हजार होतें, परंतु लोकांमध्यें पन्नास हजार लष्कर आलें अशी आवाई असे. अलिवर्दीखान यापाशीं तीनसाडेतीन हजार सुमारें स्वार व चार हजार सुमारें पायदळ असे, तरी त्यानें मराठ्यांवर चालून जावयाविषयीं विलंब केला नाहीं, परंतु त्याचा जय झाला नाहीं. त्याच्या लष्करासभोंवता मराठ्यांचा वेढा पडून त्याचें सर्व सामान लुटलें गेलें, तेणेंकरून ते लोक बहुत कष्ट पावले, आणि कितीएक मेले गेले, व

कितीएक पळाले. शेवटीं स्वार व पायदळ मिळून त्यापाशीं तीन हजार उरले, तेव्हां त्यानें विचार केला कीं, 'मराठ्यांचे हातीं लागावें, त्यापेक्षां युद्ध करून मरावें अथवा त्यांस मारून वाट धरावी यांत उत्तम आहे.' असा निश्चय करून मोठ्या निकरानें युद्ध करतां करतां खटव्यापर्यंत पोंहचला. त्या युद्धांत अलिवर्दीखानाच्या लष्करांत मीर हबीब होता तो पहिले दिवशींच युद्धाचे प्रारंभीं धरिला गेला. त्यानंतर त्यानें मराठ्यांचा पक्ष स्वीकारून अशीं उत्तम कामें केलीं कीं, भास्करपंत नामें त्या लोकांत मोठा सरदार होता त्याचा तो परम विश्वासू झाला. अलिवर्दीखान खटव्यास पोंहचला त्या समयींच मीर हबीब त्या पंतापासून कांहीं शिपाई मागून घेऊन मुर्शिदाबादेस चालिला. तेथें जाऊन त्याचा भाऊ कैदेंत होता त्यास सोडवून त्या शहरचा राहणारा जगत्शेट अलमचंद नामें मोठा सावकार होता त्याचें घर लुटून अडीचकोट रुपये काढून घेऊन भास्करपंतास जाऊन मिळाला, व त्यास द्रव्याचा लोभ दाखवून बंगाल्यांत राहून घेतलें.

७. तेव्हां त्याच्या मसलतीप्रमाणें भास्करपंतानें माघारें फिरून कांहीं युक्तीनें हुगळी शहर हस्तगत केलें. त्यापुढें खटव्यापासून मिदनापूरपर्यंत बहुतेक मुलूख त्यांचे हातीं लागला. त्या वेळेस हुगळीचे नदीस पाणी आलें, यास्तव नदी उतरून पार जाववेना, तेणेंकरून मुर्शिदाबाद परगण्यामध्यें प्रवेश झाला नाहीं. असें असतां दिल्लीहून बादशाहाचा कोणी कारभारी बंगाल्याची खंडणी मागावयास अलिवर्दीखानाकडे आला; तेव्हां त्यानें उत्तर केलें कीं, 'जोंपर्यंत मला मराठ्यांचा उपद्रव असेल तो काळपर्यंत खंडणी देणें अनुकूळ नाहीं; या वेळेस हेंच योग्य कीं, स्वामींनीं माझ्या मदतीस लष्कर पाठवून रक्षण व्हावें.' असें त्यास बोलून वराड प्रांतांतील रघूजी भोंसल्याचा मुलूख लुटावयाकरितां पेशव्यास सूचना केली, आणि त्या कामाकरितां कांहीं द्रव्य पाठविलें तें त्यांस न पोंहचतां अयोध्याप्रांताच्या नबाबानें मध्येंच तें लुटून नेलें. अलिवर्दीखान यानें पेशव्यास आणि बादशाहास कुमक मागितली, तथापि तो आपल्या कामांत अत्यंत सावधपणें राहिला. तो असा; आपले मुलखींचे शिपाई आज्ञेंत वागणारे असे सारे जमा करून पाऊसकाळ जातांच खटव्यामध्यें भास्करपंताच्या लष्करावर एकाएकीं जाऊन पडावयाची तयारी सर्व प्रकारें केली; आणि नदीचें पाणी उतरलें नसतांही हुगळीची नदी व आजीनदी यांमध्यें होड्यांचे पूल बांधून दोन्ही नद्या उतरून पलीकडे गेला, जातांना आजीनदीचा पूल कांहींसा तुटला, तेणेंकरून पंधराशें माणसें वाहून गेलीं; एवढें विघ्न झालें तरी त्यानें रात्रीसच भास्करपंताच्या लष्करावर अकस्मात् छापा घालून मराठ्यांस असें भयप्रदर्शन केलें कीं, ते लोक लढाई न करितां

पूर्वेकडे रानांत पळून गेले. त्यांचा कांहीं वेळ अलिवर्दीखानास ठिकाणा लागला नाहीं, मग तो तेथून माघारां गेल्यावर ते मराठे मिदनापूर परगण्यांत शिरले. मग अलिवर्दीखान आपल्या पाठीस लागला असें पाहून ते त्याशीं विशेष युद्ध न करितां आपल्या स्थानीं वराडांत माघारे गेले. ते ठिकाणीं पोंहचल्याचे पूर्वीच रघूजी भोंसला आपल्या लष्करासुद्धां कर्नाटकांतून येऊन वराडास पोंहचला होता. त्याचा दिवाण भास्करपंत, यानें बंगाल्यांत सत्ता केली ती दृढ करावी असा निश्चय करून तो ज्या वाटेनें पूर्वी बंगाल्यांत गेला होता त्याच वाटेनें भोंसलाही जाऊं लागला.

८. हें वर्तमान दिल्लीच्या बादशाहास कळलें, त्यानें नबाब सफ्दरजंग यास आज्ञा केली कीं, 'मराठ्यांस आपली मर्यादा सोडून बाहेर जाऊं देऊं नये.' याशिवाय त्या कामास पेशव्यानें अनुकूळ व्हावें याविषयीं बोलणें लाविलें, व तो वश व्हावा ह्मणून अलिवर्दीखानाकडील आझिमाबादेचा खंड वसूल व्हावयाचा होता त्यापैकीं चौथाई ऐवज घ्यावयाविषयीं बाळाजी बाजीराव यास पत्र पाठविलें. त्याखेरीज 'माळव्याची सनद देऊं' असें वचन दिलें. त्या आशेनें पेशवा माळवा मुलूख सोडून सन १७३४.त अलाहाबादेवरून मुर्शिदाबादेस पोंहचला. तो तेथें असतां त्यानें अलिवर्दीखानास, बादशाहानें आपणास देवविलेल्या पैक्याची निकड लाविली; कां कीं, त्यास ठाऊक होतें कीं, राजास जें कांहीं मागणें तें संकटसमयीं मागितलें असतां तो उदारपणें देतो; दुसरें, रघूजी भोंसला मोठ्या सैन्यासहित मुर्शिदाबादेवर युद्धास येणार हेंही त्यास कळलें होतें, तेव्हां अलिवर्दीखानानें 'हिशेब चुकवून देतों' असें कबूल केलें. ती बातमी रघूजीस कळली, तेव्हां रघूजी भोंसला मुर्शिदाबादेकडे यत होता तो डोंगराकडे पळून माघारां गेला. ते समयीं अलिवर्दीखान मोठ्या त्वरेनें त्याचे पाठीस लागला, त्यावरून बाळाजी बाजीरावानें कल्पना केली कीं, मराठे यांचें लष्कर बंगाली लोकांचे हातीं लागणार नाहीं, ह्मणून आपण लष्करसुद्धां निराळ्या वाटेनें बंगाल्याच्या लष्करापुढें जाऊन रघूजीच्या पाठीस लागला, नंतर त्यास गांठून त्याशीं युद्ध केलें, त्यांत रघूजी पराभव पावला.

९. त्यानंतर बाळाजी, आपणास बादशाहानें माळव्याचा अधिकार देऊं केला होता, ती सत्ता सुदृढ करावयास सन १७४० त गेला. तो माळव्यास जाऊन पोंहचला, तेव्हां महंमदशाह बादशाह यास बाळाजीला तो अधिकार द्यावयाचें मोठें अगत्य पडलें. कां कीं, बाळाजीनें त्याचे सेवेंत अंतर किमपि केलें नव्हतें, तथापि त्यास एवढा मुलूख दिल्यानें आपला मान हलका होईल ह्मणून अहमद

नामें आपला पुत्र तो त्या अधिकारीं नांवाचा मात्र मुख्यत्वें कल्पून माळव्याची सनद बाळाजीस दिली. त्यानंतर बाळाजी पेशवा साताऱ्यास येऊन त्यानें आपला, मर्यादेप्रमाणें राजास हिशेब दिला. ते वेळीं तर आपण राजाचा मुख्य सरदार अशा अर्थें समजाविलें, परंतु पुढेंही त्या राजाची तादृश सत्ता नाहींशी झाली तरी प्रतिवर्षीं स्वयें जाऊन त्याप्रमाणें हिशेब समजावीत असे.

१०. पेशव्यानें रघूजी भोंसल्याचा पराभव केला तेव्हां रघूजीनें पेशव्याकडे वकील पाठवून स्नेह करण्याचें बोलणें लाविलें कीं, 'तुह्मी राजनीतीप्रमाणें जी कांहीं वर्तणूक करितां ती माझ्या व सर्व मराठे लोक यांच्या हितास फार उपयोगी आहे असें मला आतां समजलें.' याप्रमाणें बोलण्यांत अंतःकरणाची निर्मळता दाखविली असतांही तो भोंसला पुण्यावर लष्करसहित येत होता. अशा समयीं प्रतिनिधि शरीरप्रकृतीनें असावध झाला असे, त्याचा मुतालीक यमाजी शिवदेव तो रघूजीस अनुकूळ न होतां दाभाड्यास अनुसरून पेशव्याशीं वांकडा झाला असे, आणि तो दाभाडाही पुण्यावर येणार होता. तेव्हां पेशवा हा सर्व प्रकार ध्यानांत आणून विचार करूं लागला कीं, 'रघूजीला या समयीं बंगाला द्यावा, किंवा सर्व मोठमोठे मानकरी मराठे सरदार लोक यांशीं लढावें,' असें मनन करून या दोहोंमध्यें रघूजीस बंगाला द्यावा हेंच बरें पडेल, याप्रमाणें निश्चय ठरून रघूजी आणि पेशवा यांचा तह राजा मध्यस्थ होऊन झाला. त्यांत 'पेशव्यानें आपला पूर्वींचा संपादिलेला जो मोकासा तो व आपण मिळविलेली जहागीर आणि वडिलांनीं संपादिलेल्या ज्या जहागिरी त्या व कोंकणचें आणि माळव्याचें आधिपत्य, याशिवाय अलाहाबाद व आग्रा व अजमीर यांची खंडणी आणि पाटणा प्रांतांतील तीन तालुके व अर्काट परगणा यांतील जमेपैकीं वीस हजार रुपये, याखेरीज रघूजीचे सत्तेंतील कितीएक गांवें, हें सर्व पेशव्यानें अनुभवावें' अशी राजानें सनद दिली. रघूजीस सनद दिली कीं, 'लखनौ व पाटणा व पैनबंगाला यांचा वसूल व खंडणी त्यानें घ्यावी, याखेरीज वराडापासून कटकपर्यंत खंडणी जमा करावयाचें काम रघूजी भोंसल्यानें करावें.' याप्रमाणें राजानें उभयतांस दोन सनदा दिल्या त्या वेळेस असें ठरलें कीं, दमाजी गाइकवाडानें माळव्यांतील खंडणी घेतल्याचा हिशेब पेशवा यास दाखवून तो ऐवज त्याचे हवालीं करावा. असेंच दाभाड्याकडेही राजाचें देणें पुष्कळ होतें, परंतु त्या वेळेस ती चौकशी झाली नाहीं.

११. मराठ्यांमध्यें असें वर्तमान असतां निझामउल्मुल्काच्या पुत्रानें बंड केलें तें मोडावयाकरितां तो निझाम दिल्लीहून निघून औरंगाबादेस गेला. तेथें युद्धप्रसंगेंकरून मोठ्या प्रयासानें पुत्र स्वाधीन करून घेतला. नंतर असें पाहिलें कीं,

कृष्णेचे दक्षिणेस मोगलांचे सत्तेंतील मुलखीं अव्यवस्था झाली, व कर्नाटकप्रांतांत अर्काटचा नबाब सफ्दर अली होता तो त्याचा मेहुणा मोर्तिजाखान यानें घातें-करून मारिला. हें सर्व ध्यानीं आणून असें समजला कीं, या समयीं आपलें आधिपत्य स्थापावयास संधि ठीक हीच आहे; ह्मणून सन १७४३ त हैदराबादेहून मोठें लष्कर जमा करून कर्नाटकांत चालिला. तो तेथें कितीएक मुलूख घेऊन एका वर्षानंतर त्यानें मराठे साताऱ्यास मोठी सेना जमा करिताहेत असें जाणिलें, तेव्हां त्याच्या मनांत कांहीं शंका उत्पन्न झाली. यास्तव तो तेथून माघारां फिरून हैदराबादेस जावयास निघाला, ते समयीं त्यानें आपला हस्तक अनवारउद्दीन कर्नाटक पैनघाटीं ठेविला, आणि आपला नातू हिदायत मोयदीनखान, त्यासच 'मुझफरजंग' ह्मणत, त्या नांवानें तो मोठा विख्यात होता, त्याला कर्नाटकचा उंच प्रदेश, ज्यास 'बालेघाट' ह्मणतात, तेथें स्थापून त्यास आंदोणी परगणा जहागीर देऊन त्याचें राहावयाचें मुख्य स्थान विजापूर केलें. मग तो हैदराबादेच्या वाटेनें जात असतां त्यास असें वाटलें कीं, आपल्याविषयीं मराठे यांची मसलत नाहीं, ह्मणून आपल्या राज्याचा बंदोबस्त करीत तेथेंच राहिला. तेव्हां निझामउलमुल्क आपली मर्यादा सोडून दूर आहे असें समजून मराठ्यांनीं त्या मुलखीं जाऊन कांहीं स्वार्थ साधावा, परंतु तें न झालें; कां कीं, रघूजी भोंसला यानें आपल्या सत्तेंत आणिलेला जो बंगाल्यासंबंधी मुलूख होता तो त्याचे हातून गेला असे, ह्मणून तो मातक्यान् हस्तगत करावयाविषयीं उद्युक्त झाला. पेशव्यास शंका उत्पन्न झाली कीं, 'आपण कबूल केल्याप्रमाणें रघूजीचें निवारण न झालें, यास्तव आप-णास बादशाहाचा शब्द लागेल,' याकरितां दक्षिणेंत कामें बहुत आहेत असें मिष करून तो उत्तरेस गेला नाहीं.

१२. रघूजी भोंसला वराडांत पाऊसकाळीं पोंहचला. मग पर्जन्यकाळ गेल्यावर त्यानें आपला प्रधान भास्करपंत व कितीएक नामांकित सरदार यांजबरोबर वीस हजार स्वार देऊन ते ओडिसा प्रांतांतून बंगालदेशांत पाठविले. तेथें अलिव-र्दीखानानें त्यांशीं युद्धाविषयीं आपल्या लष्कराची तयारी केली, परंतु कपटानें आपलें कार्य साधावयाकरितां त्यांस 'तुमचा आमचा तह,' असें समजावून भास्कर-पंत व त्याचे बरोबरचे मोठेमोठे सरदार वीस असामी मेजवानीस बोलावून त्यांवर मारेकरी घालून ते एकवीसही मारून टाकिले. तेणेंकरून मराठ्यांचें लष्कर युद्ध

---

१. अनवारउद्दीन याचें पहिले रहावयाचें ठिकाण, दाउदखानानें 'वायते' नामें यवन जातीचा नबाब याचे वेळेपासून झालेली अर्काटप्रांती पुरातन राजधानी होती, तीच त्याला राहावयास मुख्य जागा केली.

न करितां ज्या वाटेनें आलें त्या वाटेनें माघारें गेलें. तें जातांना त्यांतील कितीएक लोक वाटेच्या निराळे सांपडले, ते गांवकरी लोकांनीं त्रासास्तव मारिले. त्या समयीं मराठे यांचें कार्य सिद्धीस गेलें नाहीं, तथापि ते आपला समय पाहात बसले होते. मग पुढें थोडक्याच वेळानें त्यांस तसाच समय आढळला. तो असा; अलिवर्दीखानाच्या लष्करांत आफगाण लोक होते ते कांहींसा दंगा करूं लागले, त्यांच्या पारिपत्यास अलिवर्दीखान ओडिसाप्रांतीं बंदोबस्तास ठेविलेल्या शिपायांतील कांहीं लोक बरोबर घेऊन तेथें हिंदु अधिकारी ठेवून आपण त्यांवर गेला. हें वर्तमान रघूजीला जासुदांनीं कळवितांच त्यानें ओडिसाप्रांतीं स्वारी घालून कितीएक परगणे हस्तगत केले, आणि बाकीच्या मुलखाची खंडणी तीस कोट रुपये तो मागूं लागला. ते वेळेस अलिवर्दीखान यानें कांहीं युक्तीनें त्यास भुलवून पैका न देतां कितीएक दिवस घालविले. मग आफगाण लोक स्वाधीन झाल्यावर त्यास असें उलट उत्तर दिलें कीं, 'तेणेंकरून उभयतांत तह राहिला नाहीं.' मग दोघांच्या युद्धास आरंभ होऊन कितीएक वेळानें मराठे लोकांचा कांहींसा मोड होऊन तें युद्ध राहिलें; कां कीं, त्या वेळेस रघूजीस आपल्या मुलखीं जावें लागलें. त्याचें कारण असें कीं, गोंडवणांतील देवगडच्या तक्ताविषयीं तेथच्या राजाचे पुत्र भांडूं लागले, त्या समयीं तो राजा मेला होता, त्याचें नांव बख्तबुलंद. तो पूर्वीं औरंगजेबानें बाटविला होता; त्याच्या पुत्रांत एक वल्लीशाह नामें होता त्यानें आपले दोघे भाऊ कैद केले; आणि दुसरा एक चांदाचा राजा नीळकंठशाह होता तोही औरंगजेबानें बाटविलेला होता. त्यांस आपल्या स्नेहांत घेऊन मराठे यांस चौथ व सरदेशमुखी न द्यावी असें केलें. याप्रमाणें ते दोघे स्वतंत्रपणें वागूं इच्छीत असतां त्याचा शेवट असा झाला कीं, रघूजी भोंसला यानें उभयतांचा मुलूख घेतला. तेव्हां वल्लीशाहानें आपले दोघे भाऊ बंदींत ठेविले होते, त्यांतील एकास रतनपूर दिलें, आणि त्याच्या खर्चाप्रमाणें कांहीं पैका आपल्या खजिन्यांतून द्यावयाचा कबूल केला. असें सन १७४४ त झालें. अद्यापि त्याचे वंशज नागपुरांत आहेत, त्यांस अजून त्या देण्यापैकीं कांहीं मिळतें. दुसरा भाऊ अकबरशाह तो निझामाच्या आश्रयानें कांहीं वर्षें सुख पावून मेला.

१३. त्यापुढें सन १७४७ त आफगाण लोकांचा बादशाह अहमदशाह अबदाली तो प्रथम हिंदुस्थानांत स्वाऱ्या घालूं लागला. त्याला पूर्वीं नादिरशाहनामा फारसी लोकांचा बादशाह ह्याचा आश्रय असे, मग काळेंकरून तो आफगाण

---

१. ते आफगाण लोक यांचीं नांवें हिंदु लोकांमध्यें तीन प्रकारचीं प्रसिद्ध आहेत; एक दुराणी, एक अबदाली, एक गिल्जा.

लोकांचा बादशाह झाला. त्यानंतर त्यानें सन १७४८ त दिल्लीवर स्वारी केली, तेव्हां दिल्लीच्या बादशाहानें आपल्या अहमदनामक पुत्राबरोबर फौज देऊन त्यास काबूलपर्यंत मागें हटविलें, आणि अहमद माघारां दिल्लीस येई तोंपर्यंत त्या बादशाहाचा काळ झाला. नंतर तो अहमद येऊन त्याच वर्षाच्या एप्रिल महिन्याचे समाप्तीस तक्ताधिपति झाला. त्यानें निझामउल्मुल्कास वजिरीच्या अधिकाराविषयीं बहुत आग्रह केला, परंतु तो स्वीकारीना; कां कीं, त्याचें वय फार होतें, यास्तव तो ह्मणे कीं, 'मी फार वृद्ध झालों, आतां या कामास कसा योग्य होईन?' तेव्हां अहमदशाहानें ती पदवी सफ्दरजंगनामा अयोध्येचा नबाब यास दिली. त्यानंतर दीड महिन्यानें जून महिन्याचे १९ वे तारिखेस निझामउल्मुल्क बऱ्हाणपुरीं मृत्यु पावला. ते वेळेस त्याच्या वयाला १०४ वर्षें होतीं. त्यामागें त्याचे पुत्र सहा होते; त्यांत एकाचें नांव गाजीउद्दीन, दुसरा नासिरजंग, तिसरा सलाबतजंग, चवथा निझाम अली, पांचवा महंमद शरीफ, सहावा मीर मोगल. त्यांत पहिले दोघे एका आईचे. दुसरे चार, त्यांच्या आया निरनिराळ्या होत्या. निझामउल्मुल्क मरण पावला त्या वेळेस गाजीउद्दीन दिल्लीस होता ह्मणून दुसरा नासिरजंग तोच तक्ताधिपतिपणा करूं लागला.

१४. त्यानंतर दोन तीन महिन्यांनीं दिल्लीच्या बादशाहानें आपल्या हातचें मानपुरःसर पत्र नासिरजंगाला पाठविलें कीं, 'तुह्मीं भेटीस यावें.' तेव्हां नासिरजंग नर्मदेपावेतों पोंहचला, तों त्यास बादशाहाचें मनाईपत्र आलें, त्याचें कारण काय तें समजत नाहीं. तें पत्र त्याला पावलें असतांही तो नासिरजंग उदास झाला नाहीं. कां कीं, त्याचा पुतण्या मुझफरजंग यानें चंदासाहेबाचे साहाय्यानें व फ्रांसीस लोकांच्या आश्रयेंकरून दंगा आरंभिला होता, तें वर्तमान त्यास कळलें. त्यानंतर त्यास दुसरें वर्तमान कळलें कीं, निझामउल्मुल्कानें आपला हस्तक अनवारउद्दीन कर्नाटक पैनघाटीं ठेविला होता तो मृत्यु पावला. त्यानंतर नासिरजंगानें रघूजी भोंसल्यास पत्र लिहिलें कीं, 'या समयीं तुह्मी लष्कर पाठवून जर माझी मदत कराल, तर मी तुह्माला कांहीं मुलूख देईन.' याखेरीज जे कोणी मोगलांचे संबंधाचे लोक होते त्यांस लिहिलें कीं, 'मी तिकडे येतों, त्यास तुह्मी मला येऊन मिळावयास सिद्ध असा.' मग तो दक्षिणेस कर्नाटकाकडे चालिला, तेव्हां ते जाऊन मिळाले. त्यांत मुराराव घोरपडा असे, त्यास निझामउल्मुल्कानें गुतीची जहागीर दिली होती ह्मणून त्याला त्याकडे जाणें अवश्य पडलें. दुसरा म्हैसूरचा राजा व आणखी कितीएक नबाब होते व अनवारउद्दिनाचा दुसरा पुत्र महंमद अली तोही होता. हे सर्व लोक स्वतां आंगें किंवा लष्कर पाठवून त्याचें साहाय्य

करीत असत. महंमद अल्लीच्या स्नेहास्तव मद्रासचे इंग्रेज लोकही त्या नासीरजंगाचे उपयोगीं पडले.

१५. याप्रमाणें निझामाचें लष्कर कर्नाटकीं गेलें तेव्हां पेशव्यास आपलें कार्य साधन करावयाची संधि बरी होती, परंतु साताऱ्यांत कांहीं विशेष वर्तमान झाल्यामुळें त्याला अवकाश सांपडला नाहीं. तो प्रकार असा; शाहूराजा कितीएक वर्षें भ्रांतिष्ट झाला होता, मग त्याच्या शरीरीं समाधान नाहींसें होऊन ती भ्रांति गेली, ते समयीं त्याजवळ कोणी लोक होते त्यांनीं मसलत केली कीं, 'राजानें दत्तपुत्र घ्यावा.' त्यानें तर भ्रांत व्हावयाचे पूर्वीच आपला पुत्र मेला ते वेळेस सांगून ठेविलें होतें कीं, 'कोल्हापूरकर संभाजी यास जर संतति होऊं लागली तर मी त्यास आपल्या गादीचा अधिकारी करीन.' पुढें संभाजीला पुत्र झाला नाहीं, ह्मणून विचार ठरविला कीं, 'मालोजीचा बंधु व शाहाजीचा चुलता होता, त्याच्या वंशींचा कोणी घ्यावा.' मग त्याचा शोध बहुत केला, परंतु तो कोणास सांपडेना. त्यावर शाहूनें महादाजीपंत पुरंदरे व गोविंदराव चिटणीस यांस सांगितलें कीं, 'हल्लीं ताराबाई साताऱ्यास आहे; तिनें आपला नातू, दुसऱ्या शिवाजीचा पुत्र, तो सन १७१२ त आपले बापाचे मागें जन्मला, तो कुठें तरी लपवून ठेविला असेल, त्याचा शोध करून तो आणावा.' तेव्हां ताराबाईस विचारिलें. तिनें सांगितलें कीं, 'शिवाजी मेला तेव्हां त्याची स्त्री भवानीबाई गरोदर होती, तिला पुत्र झाला; मग शिवाजीचे पाठीमागें राजाराम राज्य करीत होता त्याला कळलें तर तो त्या पुत्रास मारून टाकील या भयास्तव मीं त्याला पन्हाळ्याहून काढून गुप्तपणें नेऊन तुळजापुरीं त्याचे मावशीचे स्वाधीन केला. तिनें तेथून बारसीस नेला, तेथेंही तो अप्रसिद्धपणेंच राहिला, तो अद्यापि तिकडे आहे.'

१६. हें वर्तमान शाहूची थोरली बायको शिरक्यांची कन्या सकवारबाई नामें होती तिला कळलें, तेव्हां ती फार रुष्ट झाली. कां कीं, तिची वासना अशी होती कीं, कोणी एखादा लहानसा मूल तक्ताचा अधिकारी निमित्तमात्र करून आपण सर्व कारभार चालवावा. तिनें ताराबाईची गोष्ट ऐकून तो बेत मोडण्यासाठीं मंडळीस पत्र लिहिलें कीं, 'हल्लीं ताराबाईचा नातू निघाला हा खोटा, त्यास तुह्मी त्याच्या निवारणास अनुकूल व्हाल तर मी तुमचें साहित्य होईल तितकें करीन. आतांच मला यमाजी शिवदेव व श्रीपतरावाचा बंधु जगजीवनराव प्रतिनिधि व दमाजी गाइकवाड हे अनुकूळ आहेत; याशिवाय घाटमाथा व कोंकणांत शिबंदी ठेवावयास कारभारी लोक पाठविले आहेत.' याप्रमाणें सकवारबाईनें बंदोबस्त केला, आणि आपला मनोरथ सिद्धीस जावयाकरितां त्याची प्रसिद्धि लोकांत न

व्हावी ह्मणून ती नित्य बोलत असे कीं, 'मी आपल्या धन्याचे बरोबर सती जाईन.' असें असतां बाळाजी बाजीराव पस्तीस हजार लष्कर बरोबर घेऊन साताऱ्यास आला. तो सकवारबाईचा मनसोबा जाणत असे, आणि ती त्यास मारेकरी घालून मारणार हेंही त्यास कळलें होतें, तथापि त्यानें तो द्वेष प्रसिद्ध केला नाहीं. कां कीं, ब्राह्मणांचें माहात्म्य फार वाढलें तें अधिक न व्हावें असें मराठ्यांच्या मनांत आहे अशी त्याच्या चित्तांत शंका होती. यास्तव तो विचार करी कीं, आपण सर्व सत्ता करावी किंवा ताराबाईचा पक्ष स्वीकारावा. मग तसेंच केलें. सकवारबाई तर सारा वेळ राजाजवळच असे, कदाचित् ती जवळ नसल्यास तिच्या पक्षाचे लोक कोणी तरी जवळ असत. तथापि बाळाजीनें राजाशीं एकांत करून त्यापासून सनद घेतली कीं, मराठ्यांच्या सर्व राज्याचा कारभार पेशव्यानें करावा आणि लौकिकांत राजाचा मान मात्र रक्षावा, व ताराबाईचा नातू अधिपति करून त्याचा व त्यास पुढें संतति होईल तिचा उत्तम रीतीनें सांभाळ करावा. याशिवाय त्या सनदेंत लेख होता कीं, कोल्हापुर संस्थान संभाजीचें तें पृथक् असावें.

१७. त्यानंतर लवकरच शाहूराजाचा काळ झाला, ते समयीं साताऱ्यांत बाळाजीच्या स्वारांची टोळी धांवत धांवत येऊन प्रतिनिधि व त्याचा मुतालिक या उभयतांच्या पायांत बिड्या घालून दोघांस दोहों किल्ल्यांवर दूर दूर ठेविलें. ते वेळेस पेशव्याची शिबंदी साताऱ्या किल्ल्यावर चढली आणि रामराजा, ताराबाईचा नातू, तो कोल्हापुराहून येत होता त्यास आणावयाकरितां कितीएक लोक सामोरे गेले. असें झालें तेव्हां सकवारबाई समजली कीं, 'मीं जें मनांत योजिलें तें लोकांत प्रसिद्ध झालें, आतां तें कांहींएक सिद्धीस जावयाचें नाहीं.' बाळाजीनें तर, तिनें पहिल्यानें ह्मटलें होतें कीं 'मी सती जाईन,' तेव्हांपासूनच मोठ्या मेहनतीनें तें लोकांत प्रसिद्ध केलें होतें. कां कीं, तिचें सती जाणें त्यास अत्यंत हितावह होतें. यास्तव तें अवश्य घडावें याकरितां त्यानें तो उद्योग केला. मग शाहू मेल्यावर बाळाजीनें सकवारबाईला कपटानें विनंतिपूर्वक आग्रहाचा निरोप पाठविला कीं, 'मी तुमचे आज्ञेंत वागणारा इमानी चाकर असतां तुह्मी कां सती जातां? आपण न जावें.' असें तिला सांगून पाठवून तिचे भाऊ कुंवारजी शिरके यांस बोलावून सांगितलें कीं, 'तुमची बहीण सती न गेली तर तुह्मी व तुमचे जातीचे मराठे यांचा मान राहणार नाहीं, त्यास तिनें तें अवश्य केलें पाहिजे; जर तुह्मी करवाल तर तुह्मांस कोंकणांत जहागीर देऊं.' अशा कृत्रिमेंकरून बाळाजी बाजीराव पेशवा यानें आपली मसलत सिद्धीस नेली. त्या सकवारबाईस अशा अडचणी उत्पन्न करून सती घालविलें, त्यापेक्षां जर तिजकडे कांहीं अन्याय आहे असें मिष करून तिचा

शिरच्छेद करविता तर लोकांत त्याच्या पराक्रमास एवढें दूषण न लागतें. ज्या शास्त्रजाणत्यांस हें यावत् वर्तमान ठाऊक आहे ते हा केवळ अधर्मसा जाणून हें कर्म अश्लाघ्य मानितात.

---

## भाग सतरावा.

### ( इसवी सन १७५० पासून सन १७५६ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. पेशव्यानें रघूजी भोंसला व इतर सरदार वश केले.—२. पुणें शहर मराठे लोक यांची राजधानी झाली.—३. बाळाजी पेशवा व सदाशिवराव भाऊ यांमध्यें कांहीं कलह उत्पन्न झाला; त्याचें कारण रामचंद्रबाबा शेणवी याचा उद्भव.—४. पेशव्यानें गाजीउद्दिन, निझामउल्मुल्काचा वडील पुत्र, त्याचा पक्ष अंगीकारला.—५. फ्रांसीस लोकांनीं मुझफरजंगाचा पक्ष धरून त्यास 'निझाम' पदवी दिली; नंतर मुझफरजंगाचा मृत्यु; व सलाबतजंगास 'निझाम' पदवीचा लाभ.—६. पेशवा गाजीउद्दिनाच्या कामासाठीं कृष्णेपर्यंत गेला, परंतु ताराबाई व गाइकवाड यांच्या कृत्रिमामुळें माघारा आला; आणि रामराजा मोठ्या अडचणीनें बंदींत पडला.—७. सलाबतजंग फ्रांसीस लोकांच्या आश्रयेंकरून गांवें लुटीत पुण्याकडे गेला.—८. रघूजी भोंसल्यानें काय काय संपादन केलें तें प्रकरण; व मीर हबीब याचा मृत्यु.—९. दिल्लीकडील कांहीं वर्तमान; व मराठे त्या कामांत शिरले तो विस्तार.—१० गाजीउद्दिन, शिंदे व होळकर यांच्या आश्रयेंकरून दिल्लीहून दक्षिणेस चालिला; तो आपली 'निझाम' पदवी पावेल असें सिद्ध झालें असतां आपण मृत्यु पावला.—११. सलाबतजंग 'निझाम' पदवी पावल्यावर त्यानें पेशव्यास काय काय दिलें तो प्रकार.—१२. पेशव्यानें कर्नाटकीं स्वारी केली.—१३. पेशव्यानें आपला भाऊ रघुनाथराव गुजराथेंत पाठविला; तो तें कार्य करून हिंदुस्थानांत गेला.—१४. रघूजी भोंसल्याचा मृत्यु; व त्याच्या चौघां पुत्रांची गोष्ट.—१५. पेशवा व ताराबाई यांची समजूत झाली ती कथा.—१६. दिल्लीकडचें कांहीं वर्तमान; दिल्लीचा अहमदशाह बादशाह याचे गाजीउद्दिनाच्या पुत्रानें डोळे काढून त्यास कैदेंत ठेविलें; आणि जहांदरशाह ह्मणून पूर्वींचा बादशाह त्याचा नातू तक्ताधिपति केला.—१७. बाळाजी बाजीराव पेशवा याच्या स्वभावाचें वर्णन.—१८. पेशव्यानें आंग्र्याचा मुलूख घ्यावयाविषयीं इंग्रेजांशीं कांहीं बोलणें करून तें काम झाल्याच्या पूर्वींच त्याला सावनूर घ्यावयाकरितां तिकडे जावयाचें अगत्य पडलें.—१९. इंग्रेजांचीं लढाऊ जहाजें जाऊन सुवर्णदुर्ग किल्ला घेतला; तो मराठ्यांस सोंपविला.—२०. मराठे यांनीं आंग्र्याचा मुलूख व किल्ले घेऊन विजयदुर्गास घेरा घातला असतां त्यांचे कुमकेस इंग्रेजांचीं जहाजें जाऊन त्यांनीं मराठे लोक आपल्या लोकांत न घेतां तो किल्ला घेतला.—२१. मराठे लोक जाऊन त्यांनीं सावनूर किल्ला घेतला; फ्रांसीस लोक यांस दक्षिणेंतून काढावयासाठीं पेशवा व सलाबतजंग यांनीं मसलत केली, ती बसीच्या युक्तीपुढें सिद्धीस गेली नाहीं.—२२. पुण्यामध्यें पेशवे आणि मुंबईचे इंग्रज यांची समजूत झाली तो प्रकार.

**१. शाहूच्या मृत्यूचे अगोदर पेशव्यानें राजाचे नांवेंकरून यशवंतराव दाभाडे**

व रघूजी भोंसले व इतर जहागीरदार सरदार यांस बोलावणें केलें; ते समयीं रघूजी भोंसले आणि जहागीरदार आले, परंतु दाभाडे व त्यांचा मुख्य सरदार दमाजी गाइकवाड हे आले नाहींत. या सर्वांस बोलावण्याचें कारण हेंच कीं, यांत आपणाविषयीं कोणाकोणाचीं मनें कसकशीं आहेत तें समजावें, व आपला जो कर्तव्यार्थ त्यास त्यांनीं अनुकूळ व्हावें. त्यांत रघूजी भोंसला तर आपली वृद्धदशा, व बाळाजीच्या प्रारब्धाची चढती, व आपणास प्रतिवर्षीं बंगाल्यांत स्वारी करावयाची आवड, व नासिरजंगाबरोबर आपला पुत्र दहा हजार फौज घेऊन कर्नाटकांत गेला त्या योगें आपल्या सामर्थ्याची न्यूनता, या सर्व प्रकारांनीं पेशव्यास प्रतिकूळ होणें ठीक नाहीं, असें समजून त्यास वश झाला. परंतु त्यानें एकदा रामराजा यास हा भोंसल्याचा वंशी नव्हे असें मानिलें होतें, मग ताराबाईचें व त्याचें एकताटीं भोजन झालेलें पाहून खरा असें मानूं लागला.

२. तेव्हां बाळाजी बाजीराव पेशवा यानें आपली मसलत सिद्धीस गेली तें व रघूजी भोंसला आपणास वश झाला तें प्रसिद्ध व्हावयाकरितां रघूजी सातान्यांत ठेविला, आणि आपण पुण्यास गेला. ते समयीं रघूजीस बोलिला कीं, 'तूं दुसरे सर्व जहागीरदार घेऊन पुण्यास ये, मग राजानें सांगितलेल्या यादीपैकीं राहिलेलीं सर्व कामें करूं.' नंतर तो त्याप्रमाणें सर्वांस जमा करून ते व आपण मिळून पुण्यास त्याजवळ गेले. त्या वेळेपासून पुणें मराठे लोक यांची मोठी राजधानी झाली. हें वर्तमान सन १७५० त झालें. या प्रकारें बाळाजी बाजीराव पेशवा आपल्या मनोदयानुरूप सर्व कार्यें झालीं त्याचे आनंदेंकरून पुढें ताराबाई कांहीं गडबड करील कीं न करील तें समजलाच नाहीं. ती सत्तर वर्षांची म्हातारी होती, तरी तिनें सुज्ञ आणि जातिवंत अशा स्त्रीचा अपमान करणारा जो तो निःसंशय धोका पावेल असें समजावून त्यास सावध केलें. तो प्रकार असा; सिंहगडीं तिच्या नवऱ्याचें थडें होतें त्याचें दर्शन घ्यावयाचें मिष करून ती तेथें गेली, आणि पंत सचिव यांस आपल्याकडे अनुकूळ करून घेऊन आपण स्वतः धनीपणा करावयाची मसलत योजिती झाली. तेव्हां बाळाजीनें तीस फार आग्रह करून पुण्यास बोलावून नेऊन 'तुम्हांला राज्यकारभारांतील बहुत कामें मिळतील' असें सांगून महाप्रयासें तिला वश केलें; आणि सांगितलें कीं, 'माझ्या मसलतीप्रमाणें रामराजाला वागवावें.' त्या समयीं वराड व गोंडवण व बंगाला यांची सनद बाळाजीनें रघूजी भोंसल्यास दिली, याखेरीज प्रतिनिधीची जहागीर वराडप्रांताशीं लागून होती तीही रघूजीस दिली, यशवंतराव दाभाडे यांस गुजराथेचा निमे भाग दिला. राणोजी शिंदे त्या वेळेस मृत्यु पावला होता, सबब त्याचा वडील पुत्र यास बापाचा अधिकार दिला. माळवा

मुलूख याची जमा दीडकोट रुपये वर्षास होत असे, त्यांतून साडेचौऱ्याहत्तर लक्ष होळकरास दिले, आणि साडेपांसष्ट लक्ष शिंद्यास दिले. बाकी दहा लक्ष उरले ते इतर जहागीरदार यांस वांटून दिले, त्यांत मुख्य आनंदराव पंवार. हे सर्व पेशव्यास अनुकूळ होते, त्यांपासून त्यास विपरीतभावाचें भय नसे. 'सरलष्कर' पदवी सोमवंशीचे कुळांत होती ती घेऊन निंबाजी नाईक निंबाळकर यास दिली. हा सर्व बंदोबस्त राजाचे नांवें झाला, परंतु लोकांत प्रसिद्ध होतें कीं, हें कर्तृत्व पेशव्याचें. जगजीवनराव प्रतिनिधि पेशव्यानें कैद केला होता तो सोडून त्याबरोबर यमाजी शिवदेवही सोडिला. तो सुटका पावल्यानंतर पंढरपुराजवळ सांगोळा किल्ला आहे तेथें जाऊन बंड उत्पन्न केलें, मग सदाशिव चिमणाजी भाऊनें जाऊन त्यास जिंकिलें. रामराजा सदाशिव चिमणाजीबरोबर सांगोळ्यास होता तेथें त्यानें असें पत्र दिलें कीं, 'सर्व राज्याचा कारभार पेशव्यानें करावा आणि आपणास साताऱ्याभोंवता थोडकासा मुलूख खासगीकडे असावा.' तें पेशव्यानें कबूल केलें, परंतु राजाच्या खासगीकडे किमपि न दिलें. तो विस्तार पुढें लिहिण्यांत येईल. त्या समयीं रामराजाबरोबर बंदोबस्ताकरितां पुष्कळ सैन्य देऊन साताऱ्यास पोंहचविला.

३. इकडे पुण्यांत पेशवा व त्याचा चुलतभाऊ सदाशिवराव या उभयतांमध्यें कांहीं कलह उत्पन्न होऊन त्या पेशव्यानें आपल्या हितार्थ सावधपणें जो जो नेम केला तो तो व्यर्थ होईलसा दिसूं लागला. त्या कलहाचें निमित्त असें; कोणीएक सांवतांचे वाडीप्रांतांत आरवली गांवचा कुळकर्णी रामचंद्रबाबा शेणवी, त्याचें पहिलें नांव रामचंद्र मल्हार होतें. तो आपल्या कुळकर्णीपणाच्या हिशेबांत कांहीं चूक पडली ह्मणून तेथून पळून साताऱ्यास आला, तोच कचेश्वरबाबा उतीकर यानें आपल्या चाकरीस ठेविला. तेव्हांपासून त्यानें बाळाजीच्या बापाचा आश्रय संपादिला होता. पुढें तो कारकुनी व शिपाईगिरी या दोहीं कामांत निपुण असा पाहून तो बाजीरावानें शिंद्याचा दिवाण केला. मग राणोजी शिंदा मेल्यावर त्याचा पुत्र जयापा शिंदा याचीही दिवाणगिरी आपण करावी ह्मणून त्यानें सदाशिवराव भाऊ यास कांहीं लांच दिला; परंतु त्या जयापाचें व त्याचें वैमनस्य असे, आणि मल्हारराव होळकर त्या रामचंद्रबाबास प्रतिकूळ ह्मणून बाळाजीनें त्यास दूर केलें. तेव्हां सदाशिवराव रामचंद्रबाबास आपला दिवाण करून त्याचे मसलतीनें आपल्या बापाची पदवी मागूं लागला. तें मागणें बाळाजी मान्य करीना. कां कीं, त्यावर महादाजीपंत पुरंदऱ्याचा मोठा उपकार होता. त्यास दूर करून ती जागा सदाशिव भाऊला द्यावी लागली. अशा हलक्या कारणानें पुढें द्वेष मोठा वाढला. मग सदाशिव भाऊ व होळकर आणि पेशवा व रामचंद्रबाबा

यांचीं परस्परें वैमनस्यें पडण्याचें कारण तेंच. त्यामुळें तात्काळ युद्धप्रसंग झाला असता, परंतु महादाजीपंत याच्या उत्तम आचरणानें राहिला. तो प्रकार असा; सांगोळा किल्ला घेतल्यानंतर सदाशिवरावानें त्या वैमनस्यासंबंधें कोल्हापुरकर संभाजी याचा पक्ष धरिला, त्यानें त्यास आपला पेशवा करून त्यास पारगड व कलानिधी व चंद्रगढी हे तीन किल्ले आणि वर्षास पांच हजार रुपये उत्पन्न होत अशी जहागीर दिली. तेव्हां महादाजीपंत पुरंदऱ्यानें आपला अधिकार सोडून जागा रिकामा केला, मग तो पेशव्यानें सदाशिव भाऊस दिला. नंतर तो कोल्हापुरकराची चाकरी सोडून पुण्यास येऊन बाळाजी बाजीरावाजवळ मुख्यत्वें कारभार करूं लागला.

४. शाहूचे मरणाचे पूर्वी नासिरजंग, निझामाचा दुसरा पुत्र, यानें बापाचा अधिकार चालविला होता, तो नासिरजंग कर्नाटकीं मोठें सैन्य घेऊन चालिला असें पूर्वी लिहिलें आहे, त्यामध्यें गाजीउद्दिन निझामाचा वडील पुत्र तो मल्हारराव होळकर याच्या द्वारें आपल्यास स्वतः 'निझाम' पदवी प्राप्त व्हावी ह्मणून पेशव्यास साहाय्य मागूं लागला. तेव्हां पेशव्यानें ती गोष्ट मानून त्याविषयीं दिल्लीच्या बाद-शाहास पत्र लिहिलें, आणि आपण सैन्य बरोबर घेऊन औरंगाबादेकडे गेला. तेव्हां ताराबाईची मर्जी राखावयासाठीं सिंहगड घेऊन त्याबद्दल तुंग व तिकोना हे दोन किल्ले पंत सचिव यास दिले, त्याखेरीज साताऱ्यांतून आपले लोक काढून जे तेथचे पुरातन गडकरी होते त्यांचे स्वाधीन सातारा किल्ला करून त्यांनीं तारा-बाईचे आज्ञेंत वागावेंसें केलें. त्या वेळेस रामराजा याला किल्ल्याचा खर्च खेरीज करून खर्चास पांसष्ट लक्ष रुपये वर्षास देऊं करून तो मोठ्या सन्मानानें सातारे शहरांत मोकळेपणें ठेविला होता.

५. त्याच समयीं नासिरजंग कर्नाटकांत गेला होता, त्याचा आश्रित रामदास नामें एक ब्राह्मण असे, त्याचे द्वारें फ्रांसीस लोकांचा डुप्ली नामें कोणीएक मुख-त्यार होता त्यानें त्या नासिरजंगाच्या लष्करांत दंगा उत्पन्न केला. त्या दंगा कर-णाऱ्यांत कोणीएक महंमदखान नामें पठाण खर्पाचा नबाब होता, त्यानें गोळी घालून नासिरजंगास मारून टाकिलें. त्यानंतर फ्रांसीस लोकांनीं, त्याचा भाऊ मुझफरजंग यानें त्या नासिरजंगाचे जागीं असावें, असें केलें; आणि त्यास बरोबर घेऊम हैदराबादेकडे चालिले, परंतु त्यानें तें पद बहुत दिवस अनुभवावेंसें न झालें. कां कीं, नासिरजंगास मारून जो अर्थ व्हावा तो झाला नाहीं, ह्मणून ते पठाण लोक पुनः कांहीं बंड करूं लागले, त्यांच्या पारिपत्याकरितां मुझफरजंग युद्ध करूं लागला, त्यांत तो जय पावला, परंतु त्या कामांतच मेला गेला. त्यानंतर त्याचा भाऊ सलाबतजंग यास त्याची जागा मिळाली. असें सन १७५१ त झालें.

६. त्यानंतर तो सलाबतजंग फ्रांसीस लोकांसहित हैदराबादेकडे जाऊं लागला, तेव्हां तो पेशव्यानें कृष्णेचे कांठीं गांठला. ते समयीं युद्धप्रसंग व्हावाच, परंतु त्याच वेळेस साताऱ्याहून असें कांहीं वर्तमान आलें कीं, जेणेंकरून बाळाजी बाजीराव युद्ध न करितां सलाबतजंग यानें जो तह केला त्यासच मान्य होऊन मोठ्या त्वरेनें साताऱ्यास निघाला. तें वर्तमान असें; पेशवा औरंगाबादेस चालिला तेव्हां ताराबाईनें असें केलें कीं, रामराजा याचें मन स्वतंत्रपणें वागावयाचें आहे किंवा नाहीं हा शोध केला, त्यांत असें दिसूं लागलें कीं, तो केवळ अयोग्य. मग तिनें त्यास समजाविलें कीं, 'मीं हें सहज विचारिलें;' आणि त्याच समयीं दमाजी गाइकवाड यास पत्र लिहिलें कीं, 'सांप्रत तुह्मांस कोणी एथें प्रतिपक्षी नाहीं, त्यास तुह्मी लवकर येऊन राजा व मराठे यांचें राज्य ब्राह्मणांच्या हातचें सोडवावें.' ही गोष्ट दमाजीनें मान्य केली, आणि साताऱ्यास चालिला. तो जवळ आलासा समजून ताराबाईनें राजास शहरांतून आपणाजवळ साताऱ्या किल्ल्यावर बोलावून नेलें, आणि त्याची भेट होतांच त्यास अत्यंत निर्भर्त्सना करून बोलिली कीं, 'अरे, तूं शिवाजीचा वंशज नव्हेस; मीं आपला मूल गोंधळ्याचे घरीं लपवून ठेविला होता, त्यानें तो ठेवून आपला पुत्र दिला असेल. त्या तुला चौकशी न करितां मी एवढ्या पदावर बसवून आतां मोठा पश्चात्ताप पावलें कीं, जो गोंधळ्याचा पोर तो शिवाजीचा वंशज मीं केला. त्या पापाचें प्रायश्चित्त मला कृष्णेचे कांठीं जाऊन केलें पाहिजे.' असें भाषण करून मग त्याला बंदींत ठेवून किल्ल्याच्या हवालदारास आज्ञा केली कीं, 'जे लोक याजबरोबर आले आहेत त्यांवर बंदुकांचा मार करून घालवून द्या, आणि शहरांत कोंकणस्थ ब्राह्मणाचे जे पक्षपाती असतील त्यांच्या घरांवर तोफांचा मार चालेसा बेत करून ठेवा.' हें वर्तमान त्रिंबकपंत, ज्यास 'नाना पुरंदरे' ह्मणत, तो व गोविंदराव चिटणीस यांस, व इतर जे पेशव्याचे पक्षाचे सरदार साताऱ्यास होते त्यांस कळलें, परंतु ते समजले कीं, 'ही ह्मातारी वेडी झाली', ह्मणून तें प्रकरण त्यांनीं तुच्छ मानिलें. मग जेव्हां असें वर्तमान आलें कीं, 'दमाजी गाइकवाड फौजेसहित साताऱ्यास येतो,' तेव्हां ते आपले सारे लोक जमा करून कृष्णेचे कांठी आरळें गांव आहे तेथें जाऊन उतरले. ती सेना वीस हजार मिळाली; मग दमाजी गाइकवाड पंधरा हजार फौज घेऊन सालप्याच्या घाटानें आरळ्याजवळ आला, तेव्हां त्या उभयतां लष्करांची गांठ पडतांच पेशव्याचे लोक त्यांवर जाऊन पडले, परंतु तें पडणें हिमतीनें न झालें, आणि कांहींसें युद्ध करून ते लोक मागें हटून निंबास गेले. दुसरे दिवशीं गाइकवाडाचे लोकांनीं त्यांवर पडून त्यांचा अगदीं मोड केल्यानंतर दमाजी साताऱ्यास जाऊन

ताराबाईस भेटला, तेव्हां ताराबाईनें साताऱ्याजवळचे कितीएक किल्ले हस्तगत केले. तिला प्रतिनिधि अनुकूळ होता हें वर्तमान ऐकून पेशव्याला मोठ्या त्वरेनें साताऱ्यास यावें लागलें. तो येऊन पोंहचल्याचे पूर्वींच नाना पुरंदऱ्यानें गाइकवाडाचे फौजेशीं लढून त्यास साताऱ्याहून जोरखोऱ्यापर्यंत घालविलें होतें. मग त्या दमाजी गाइकवाडानें असें पाहिलें कीं, फौजेसहित पेशवा जवळ आला, आणि प्रतिनिधीनें बोलिल्याप्रमाणें साहाय्य न केलें; यास्तव त्यानें पेशव्याशीं तहाचें बोलणें लाविलें, तेव्हां तें पेशव्यानें मान्य केलेंसें दाखवून त्या बोलण्याच्या कामानिमित्त दमाजीनें आपल्याजवळ उतरावयास यांवें असें केलें. नंतर तो त्याप्रमाणें त्याच्याजवळ उतरल्यावर मग पेशवा तो आपले हातीं पुरता सांपडला असें समजून त्याजवळ गुजराथेबाबद जो पैका यावयाचा होता तो व गुजराथसंबंधी कितीएक मुलूख मागूं लागला; ते समयीं त्यानें उत्तर केलें कीं, 'या कामास मी आंगचा धनी नव्हे.' त्यानंतर पेशव्यानें गाइकवाडाचीं व दाभाड्याचीं मुलेंमाणसें तळेगांवीं होतीं तीं आज्ञा पाठवून कैद केलीं, आणि तेथून काढून लोहगड किल्ल्यास पाठविलीं. मग दमाजी गाइकवाड याच्या लष्करावर छापा घालून दमाजी कैद करून पुण्यास पाठविला. त्यानंतर पेशवा, आपणास ताराबाई वश होऊन सातारा किल्ला हस्तगत व्हावा म्हणून, उद्योग करूं लागला, परंतु ती ऐकेना; आणि सर्व मराठेलोकही मानीत कीं, 'स्वतां कारभार संभाळावा हा अधिकार ताराबाईचाच; या शंकेस्तव पेशव्यानें बलात्कारेंकरून तिला बाहेर काढिलें नाहीं.' असें संकट पेशव्यास प्राप्त झालें, तथापि राजास प्रथमच कैद केलें होतें त्याचा दोष त्याजकडे न आला, हा एक त्यास लाभच झाला. जसें मोठा अपराधी चोरादिक यास कैदेंत ठेवावें, तसेंच रामराजा यास ताराबाईनें प्रतिबंधांत ठेविलें. त्याच्या पायांत बिडी मात्र घातली नव्हती.

७. त्यानंतर बाळाजी गाजीउद्दिनाशीं कबुलात केल्याप्रमाणें औरंगाबादेस जावयास निघाला; तो पुढें ज्या ज्या जागीं सलाबतजंगाची सत्ता होती त्या त्या जागची खंडणी घेत चालिला. त्या समयीं फ्रांसीसांचा मोठा सावध सरदार बसीनामा होता, त्याजवळ फ्रेंच मुलखीं राहणारे गोरे लोक शिपाई पांचशें होते, त्याशिवाय हिंदु शिपाई पलटणी लोकही पांच हजार असत;त्याचें सलाबतजंग यास बळ असे,यास्तव तो त्याचे मसलतीनें वागे. त्यावरून बाळाजी आपले मुलखीं उपद्रव करितो ह्मणून तो आपला मुलख न रक्षितां मराठ्यांचे मुलखांत जाऊन दंगा करूं लागला, त्यांणीं ताराबाई व कोल्हापूरकर संभाजी यांनीं आपला पक्ष स्वीकारावासें केलें. हें वर्तमान समजून बाळाजीस कांहीं आश्चर्य वाटलें, मग तो येऊन आपले चाळीस हजार स्वार जमा करून मोग-

लांचे लष्करावर जाऊन आपल्या रीतीप्रमाणें समूर न लढतां त्यांसभोंवता घेरा घालून नानाप्रकारें उपद्रव देऊं लागला, परंतु त्या मोगलांस फ्रांसीसांचें लष्कर व तोफा यांचें बळ चांगलें होतें, त्या योगें ते तो उपद्रव न गणितां वाटेनें गांव जाळीत पुण्याकडे चालिले. शेवटीं मराठे यांनीं मोठ्या निकरानें त्यांवर हल्ला केला, त्या समयीं मोगलांच्या लष्कराचा नाश बहुत झाला, परंतु फ्रांसीसांच्या तोफांचे आश्रयेंकरून ते वांचले. त्या लढाईत कोन्हेर त्रिंबक एकबोटे नामें मराठ्यांचा एक सरदार होता त्यानें असा पराक्रम केला कीं, त्या दिवसापासून तो 'फांकडे' असें नांव पावला. त्याच्या घोड्याचे पायांत रुप्याचें कडें असे. याप्रमाणें मराठे जय पावले तरी मोगलांचें लष्कर भीमेचे कांठीं कोरेगांवापर्यंत पोंहचलें. तेथें सलाबतजंग याशीं पेशवा तहाचें बोलणें करूं लागला, परंतु सलाबतजंगाच्या मुलखींचें कांहीं वर्तमान आल्यामुळें पुरता तह न होतां तो मराठ्यांचा उपद्रव सोशीत माघारां जुन्नराकडे गेला. नंतर बसीच्या मसलतीनें तो, पेशव्यानें तहाचें बोलणें लाविलें होतें तें मान्य करून, लष्करासहित हैदराबादेस चालिला. हें वर्तमान सन १७५२ त घडलें.

८. याप्रमाणें हिंदूंच्या मुलखाचे पश्चिमेस वर्तमान असतां पूर्वेकडे रघूजीनें आपला पुत्र कर्नाटकीं गेला होता तो माघारां आल्यावर त्यास बंगाल्यांत स्वारी करावयास आणि मीर हबीब याचे साहाय्यास पाठविलें. त्या समयीं अलिवर्दीखान निरुपाय होऊन त्यानें कटकप्रांतांतील मुलूख उत्तरेकडे बालासोरपर्यंत मीर हबीबाचे स्वाधीन केला, परंतु लौकिकांत आपल्या मानाच्या संरक्षणार्थ असें दाखविलें कीं, मीर हबीब आपला हस्तक आहे. असें सन १७५१ त झालें. तो मीर हबीब एवढ्या योग्यतेस चढला, परंतु तीच योग्यता त्याच्या नाशास कारण झाली. तो प्रकार असा; रघूजीचा पुत्र जानोजी याशीं व त्याशीं परस्परें स्पर्धा उत्पन्न होऊन जानोजीनें त्यावर कांहीं पैका खाल्याचें निमित्त ठेवून त्या मीर हबीबास कैदेंत ठेविलें. तेव्हां त्यास तो प्रतिबंध सोसेना ह्मणून त्याजवळ जितके लोक होते तितक्यांसहित तो त्या चौकीदारांवर पडून मृत्यु पावला. अलिवर्दीखानानें रघूजीस कटकप्रांतांतील मुलूख दिला ते वेळेस बंगाला व बहार यांच्या चौथाईबद्दल बारा लक्ष रुपये घेतले. या थोडक्या घेण्याचें कारण असें; पेशवा व सलाबतजंग युद्ध करूं लागले त्यांत आपला अर्थ साधावा असें मनांत आणून बंगाल्यांत शिरून त्यानें गाविलगड व नरनाला व माणिकदुर्ग हे तीन किल्ले घेतले. त्यानंतर मोगलांचें लष्कर पुण्याकडे चालिलें, असें वर्तमान ऐकून पैनगंगा व गोदावरी या दोहों नद्यांमधल्या मुलखाची खंडणी घेऊन मोगलांचीं ठाणीं उठवून जागोजागीं आपलीं ठाणीं बसविलीं.

९. आतां आधीं दिल्लीकडे काय काय वर्तमान झालें तो प्रकार ध्यानांत आला पाहिजे. अहमदशाह तेथचा तक्ताधिपति झाल्यावर आफगाण लोकांचा बादशाह पुनः दिल्लीस येऊं लागला, त्यास मध्येंच लाहोरच्या अधिकाऱ्यानें आपल्या मुलखाची खंडणी देऊन तो मागें फिरविला. त्या समयीं दिल्लीमध्यें सफदरजंग नामें वजीर होता त्याच्या मनांत आलें कीं, रोहिले लोक मोठ्या योग्यतेस चढून फार उन्मत्त झाले, आणि त्यांमध्यें तक्ताच्या आधिपत्याविषयीं तिघे भाऊ भांडतात, तस्मात् हा समय त्यांना जिंकावयास उत्तम आहे. असें समजून तो लष्करसहित तिकडे जाऊन त्यानें तो मुलूख घेतला, आणि तेथें कोणीएक आपला हस्तक नवलराय नामें कायथ जातीचा ठेवून माघारां दिल्लीस गेला. मग रोहिल्यांनीं मिळून त्या कायथाला मारून टाकिलें, तेव्हां तो वजीर दुसऱ्यानें त्यांवर गेला, परंतु जय न पावला. अशा अवस्थेंत त्यानें मल्हारराव होळकर व जयापा शिंदे व जाटांचा राजा सुरजमल्ल नामें होता तो, या इतक्यांस साहाय्य करून घेऊन मातक्यान् रोहिले जिंकून तो मुलूख घेतला, आणि त्या साहाय्याबद्दल होळकर व शिंदे यांस त्याच मुलखाचा बहुतेक भाग दिला. असें कार्य झालें ते समयीं आफगाणांचा बादशाह दिल्लीकडे पुनः आला, आणि लाहोर व मुलतान हे मुलूख घेतले. ते वेळेस दिल्लीच्या बादशाहानें आपला वजीर सफदरजंग जवळ नव्हता यास्तव त्यास 'लवकर यावें' ह्मणून बोलाविलें, परंतु त्याचें येणें होई तोंपर्यंत दम न धरितां शत्रूस लाहोर व मुलतान मुलूख दिला. मग तो वजीर आल्यावर बादशाहास समजलें कीं, आफगाणांचा बादशाह काढून द्यावयाकरितां वजिरानें मराठ्यांस बहुत देणगी देण्याची आशा दाखवून अनुकूळ केलें होतें. त्यांनीं त्या वजिराच्या कामासाठीं रोहिल्यांपासून पन्नास लक्ष रुपयांच्या कबुलातीचें पत्र घेतलें, आणि त्यांचा मुलूख सोडिला. नंतर जेव्हां समजलें कीं, आपण केलेला प्रयत्न व्यर्थ गेला, तेव्हां तो सफदरजंग अशा अडचणींत पडला कीं, मराठ्यांना बक्षीस काय द्यावें; व त्यांस काम कोणतें सांगावें; इतक्यांत पेशव्यांकडून सलाबतजंगाला जिंकावयाकरितां आपल्या साहाय्यासाठीं शिंदे व होळकर यांस बोलावणें आलें. तेव्हां सफदरजंगानें पेशवे व गाजीउद्दिन यांच्या तहामध्यें गाजीउद्दिनास 'निझाम' पदवी द्यावयाची कबूल केली होती तें स्मरून त्या मराठ्यांबरोबरच गाजीउद्दिनास पाठविलें, आणि त्यांस असें सांगितलें कीं, 'तुह्मीं गाजीउद्दिनाच्या कार्याविषयीं पेशव्याचें साहाय्य करावें.'

१०. इकडे औरंगाबादेंत सलाबतजंग होता त्यानें असें पाहिलें कीं, आपला भाऊ गाजीउद्दिन बलाढ्य झाला, आणि त्यास बऱ्हाणपुरचा मोगलही अनुकूळ आहे, ह्मणून त्या सलाबतजंगानें पेशव्याशीं तहाचें बोलणें लाविलें. त्यापूर्वीं पेश-

ज्यानें गाजीउद्दिनाशीं बोली केली होती कीं, 'तुमची पदवी तुह्मांस देवविली असतां वराडाचे पश्चिमेस तापीपासून गोदावरीपर्यंत मुलूख तुह्मीं आह्मांला द्यावा.' त्यावरून त्या सर्वांस आपआपलीं योजिलेलीं कार्यें सिद्धीस जातीलसा भरंवसा होता, परंतु काळ अनुकूळ नव्हता; यास्तव गाजीउद्दिन त्या शहरांत निझामअल्लीच्या मातुश्रीकडे भोजनास गेला असतां तिनें त्याला विष घातलें, तेणेंकरून तो त्याच रात्रीस मरण पावला.

११. यानंतर सलाबतजंग, मराठ्यांस गाजीउद्दिनानें द्यावयाचें कबूल केलें होतें तें न द्यावें, अशी इच्छा करूं लागला. परंतु त्यांच्या सामर्थ्यापुढें निरुपाय होऊन कबूल करिता झाला कीं, 'रघूजी भोंसल्यानें पैनगंगेच्या आलीकडचें आपलें ठाणें उठविलें ह्मणजे माझ्या भावानें करार केल्याप्रमाणें मी पेशव्यांस देईन.' मग तें रघूजी यानें मान्य केलें, नंतर सलाबतजंग निर्भयपणें 'निझाम' पदवी अनुभवूं लागला, आणि होळकर व शिंदे लष्करसुद्धां हिंदुस्थानांत गेले, नंतर पेशवा पुण्यास आला. याप्रमाणें सन १७५२ त घडलें.

१२. पेशवा गाजीउद्दिनाच्या कामाकरितां औरंगाबादेस गेला असतां ताराबाईनें मराठे व रामोशी मिळून पांचसहा हजार लोक ठेवून वांई व सातारा हे दोनही परगणे आपल्या सत्तेंत आणिले. मग पेशवा पुण्यास आला तेव्हां त्यानें असा निश्चय केला कीं, 'कर्नाटकीं स्वारी घालावी,' परंतु त्यास ताराबाईचा बंदोबस्त आधीं करावा हें उत्तम वाटलें. नंतर त्यानें साताऱ्यास मोठी फौज पाठविली, आणि तेथच्या शिबंदीस बाहेरून अन्न न पोंहचेसें करून किल्ला घ्यावा असें केलें. त्या समयीं त्या किल्ल्याचा हवालदार आनंदराव जाधव नामें होता, त्यानें असें पाहिलें कीं, आतां युद्ध करून परिणाम ठीक नाहीं, विचार करिता झाला कीं, 'राजा काढून ताराबाईच्या हद्दीबाहेर न्यावा.' हें वर्तमान तिला कळलें तेव्हां तिनें तेथच्या शिपायांस आज्ञा देऊन त्या हवालदाराचा शिरच्छेद केला. यानंतर पेशवा ताराबाईकडील बंदोबस्ताचें काम तसेंच ठेवून कर्नाटकांत गेला. तो तेथें पहिल्यापेक्षां स्वस्थपणें खंडणी घेऊन श्रीरंगपट्टनाचाही खंड घेता झाला, आणि किल्ला हुळी ओनोर तो त्यानें युद्धेंकरून हस्तगत केला.

१३. मग सन १७५४ त पर्जन्यकाळच्या सुमारें पेशवा पुण्यास आला. पुढें पाऊसकाळ गेल्यावर तो गुजराथ घ्यावयास उद्युक्त झाला, तेव्हां त्यानें आपला भाऊ रघुनाथराव बरोबर सेना देऊन गुजराथेंत पाठविला. ते वेळेस दमाजी गाइकवाड पुण्यामध्यें बंदींत होता, तो सोडवून आपल्या कामांत घ्यावा असा निश्चय करून पेशव्यानें त्याशीं तहाचें बोलणें लाविलें. त्यांत असा नेम ठरला कीं, गाइ-

कवाडानें पहिल्या ठरविलेल्या खंडणीबाबद पंधरा लक्ष रुपये पेशव्यास द्यावे, आणि आपला गुजराथेंतील मुलूखही निमे द्यावा; त्याखेरीज दुसरा कांहीं मुलूख घेतला असतां त्यासंबंधें जो लाभ होईल तोही अर्धा द्यावा; याशिवाय जे समयीं स्वारीचें काम पडेल ते समयीं दहा हजार फौज चाकरीस पाठवावी; यावेगळे, दाभाडे सेनापति यांचे मुतालिकीबाबद, पांच लक्ष रुपये द्यावे, आणि जितका मुलूख गुजराथेंत आपल्या भागाचा आहे त्याबद्दल पंचवीस हजार रुपये द्यावे; याशिवाय गुजराथेंत पेशव्याचे भागीं पेशव्यास ठाणीं बसावयाविषयीं सहाय व्हावें, आणि सातान्याच्या राजाला प्रतिवर्षीं कांहीं खर्चास द्यावें, असें कबूल करून दमाजी मुक्तता पावला. मग त्यानें गुजराथेंत जाऊन नवें लष्कर ठेविलें. पुढें पेशव्याचा भाऊ रघुनाथराव तिकडे गेला तेव्हां तो त्यास मिळाला. मग ते दोघे स्वस्थचित्तें मुलखाची खंडणी घेत चालिले. ते अहमदाबादेस पोंहचले तेव्हां तेथचे किल्लेकरी त्यांशीं युद्ध करूं लागले. तेथें मोठी लढाई होऊन शेवटीं त्या मोगलांनीं किल्ला पेशव्यास दिला, तथापि त्या किल्ल्यांत जवानमर्द नामें त्या मोगलांचा मुख्य होता त्याच्या शौर्येंकरून त्यास अहमदाबादेचे उत्तरेकडे कितीएक मुलूख मिळाला, त्यांत पाटन व वडनगर व राधनपूर व दुसरेही कांहीं परगणे होते; परंतु पुढें दहा वर्षांनीं दमाजीनें त्यांतील बहुतेक परगणे माघारे घेतले. त्या युद्धांत पेशव्याकडचा नारो[1] शंकर होता, त्याचे स्वाधीन बहुत आरब असत, तो त्या वेळेस आपल्या शौर्येंकरून मोठी योग्यता पावला. याप्रमाणें सन १७५५ त गुजराथची राजधानी अहमदाबाद मराठ्यांचे हातीं पुर्तेपणें लागली. तेथें पेशव्यानें श्रीपतराव नामें आपला हस्तक ठेविला, आणि असा नेम ठरला कीं, तो सर्व वसूल पेशवा व गाइकवाड या उभयतांनीं समसमान वांटून घ्यावा, आणि त्या किल्ल्याच्या एका दरवाजावर मात्र गाइकवाडाचे शिपाई ठेवून वरकड सर्व जागीं पेशव्याचे लोक ठेवावे. असा बंदोबस्त झाल्यानंतर रघुनाथराव व दमाजी बडोद्यास जाऊन एकमेकांचा मोठा सत्कार करून मग ते दोघे परस्परें वियोग पावले. तो प्रकार असा; रघुनाथराव आपल्याबरोबर दत्ताजी शिंदे यास घेऊन हिंदुस्थानांत गेला, आणि दमाजी बडोद्यासच राहिला. पेशवा हिंदुस्थानांत गेल्यावर मल्हारराव होळकराचा पुत्र खंडेराव होळकर त्यास मिळाला, मग ते दोघे मिळून अजमीरप्रांतांत पसरले, आणि तेथें लुटालूट करून चौथ व सरदेशमुखी घेते झाले, आणि शत्रु व मित्र समान मानून जेथजेथें सांपडे तेथतेथची खंडणी घेत चालिले; तेव्हां जाट लोक यांसही खंडणी द्यावी लागली, परंतु ते युद्धावांचून देईनात.

---

१. नारो शंकरानें त्यापूर्वी खानदेशांत मालेगांवचा किल्ला बांधिला होता.

त्यांचा किल्ला कुंभेर नामें होता, तेथचे लढाईत खंडेराव होळकर मृत्यु पावला. नंतर सन १७५६ त रघुनाथराव पुण्यास आला.

१४. असें पश्चिमेकडे वर्तमान होत असतां पूर्वेकडे सन १७५३ त रघूजी भोंसले कैलासवासी झाला. त्याचे चौघे पुत्र होते; एकाचें नांव जानोजी, एक साबाजी, एक मुधाजी, आणि एक बिंबाजी. त्यांत दोघे वडील जानोजी व साबाजी ते धाकट्या बायकोचे मूल; आणि दुसरे जे मुधाजी व बिंबाजी लहान होते ते थोरल्या बायकोचे. रघूजीनें आपल्या मरणाचे वेळेस त्या चौघां पुत्रांस आपलेजवळ जमा करून चौघांस दौलत व मुलूख वांटून देऊन त्यांत वडील जानोजी तो मुख्य करून त्यास 'सेनासाहेबसुभा' पदवी पेशव्यानें द्यावी असें केलें; आणि उपदेश केला कीं, 'तुह्मां चौघांत कलह नसावा, आणि आपल्या मराठ्यांचे जातींत कोणी भांडूं लागले तर तो कज्जा तुटेसा उद्योग तुह्मीं करावा, व सर्वांनीं एकचित्त असून राज्य करावें हेंच श्रेयस्कर होईल, त्यांत विभाग न व्हावे.' असें त्यानें सांगितलें होतें, परंतु सर्व जनांस विदित आहे कीं, जसे अनुभवानें प्राणी सावध होतात तसे केवळ उपदेशानें सावध होत नाहींत. याचें उदाहरण हेंच कीं, रघूजीच्या मरणानंतर एकाच महिन्यानें जानोजीस कलहामुळें असें अगत्य पडलें कीं, मुधाजीला बलात्कारेंकरून आपल्या आज्ञेंत वागवावें लागलें.

१५. यानंतर जानोजी पुण्याकडे आपली 'सेनासाहेबसुभा' पदवी संपादन करावयास निघाला. तो जवळ आला असें वर्तमान साताऱ्यामध्यें ताराबाईला कळतांच तिनें पेशव्याचें अभयपत्र घेऊन रामराजा यास किल्ल्यांत बाबूराव जाधव याचे स्वाधीन ठेवून आपण निघून पुण्यास आली. तिजबरोबर जानोजीचा भाऊ बिंबाजी भोंसले होता त्यानें तिचा पक्ष स्वीकारिला असे, आणि तिचें माहेर मोहिते कुळ त्यांतील कोणा सोयऱ्याधायऱ्याच्या कन्येशीं विवाह केला. ती ताराबाई पुण्यास येऊन पोंहचली तेव्हां पेशव्यानें तिचा असा सन्मान केला कीं, त्यानें जें जें समजाविलें तें तें तिनें संतोषेंकरून मान्य केलें. परंतु प्रथम तिनें जेजुरीच्या खंडोबाजवळ पेशव्यास नेऊन 'कृत्रिम करणार नाहीं' अशी शपथ करविली; ते समयीं पेशव्यानेंही ताराबाईकडून कबूल करविलें कीं, 'बाबूराव जाधव यास दूर करावें.' त्या पेशव्यानें ताराबाईला पक्कें जाणलें कीं, ही विपरीत करणारी आहे, त्या तिच्या स्वभावापासून त्यानें आपला अर्थ साधिला. तो असा; त्याचे मनांत होतें कीं, रामराजा बंदींतून सुटूं नये, यास्तव तो पेशवा ताराबाईजवळ त्या रामराजाच्या मुक्ततेविषयीं वारंवार विनंति करीत असे, ती तिनें कधींही अंगीकारिली नाहीं. जानोजी भोंसला यानें सरकारांत राजाच्या खर्चाकडे नऊ लक्ष रुपये प्रति-

वर्षी द्यावे, व ज्या समयीं आज्ञा होईल त्या समयीं दहा हजार फौज चाकरीस पाठवावी, असें कबूल करून आपली 'सेनासाहेबसुभा' पदवी मिळवून आपण माघारां वराडांत गेला; त्याचा भाऊ बिंबाजी तोही त्याचे बरोबरच होता. तो जानोजी माघारां जातांना मोगल व मराठे यांच्या मुलखांतून गांवोगांव घांसदाणा घेत चालिला, तेणेंकरून सलाबतजंग त्यावर रुष्ट झाला, त्यावरून जानोजी त्याचा मुलूख लुटूं लागला. तेव्हां सलाबतजंगानें आपला एक सरदार बरोबर थोडकीशी फौज देऊन मराठ्यांवर पाठविला, त्याशीं व जानोजीशीं युद्ध होऊन जानोजी भोंसले पराभव पावला. तो मागें हटून नागपुरापर्यंत गेला आणि त्याचा दिवाण कैदेंत सांपडला. त्या जानोजीनें जी लूट पहिली जमा केली होती ती नागपुराकडे जातांना त्यास बहुतेक माघारी द्यावी लागली. नंतर तो जानोजी भोंसले नागपुरीं आश्रय पावला.

१६. इकडे दिल्लीमध्यें कारभारी लोकांत वैमनस्यें पडल्यामुळें मराठ्यांस मध्यस्थपणें त्यांत शिरावयाची संधि सांपडली. गाजीउद्दिन मृत्यु पावल्यावर त्याचा पुत्र मीर शाहबूदिन यानें आपणाविषयीं वजिरास मोह उत्पन्न व्हावयासाठीं आपल्या बापाच्या शोकेंकरून अत्यंत व्याकुळपणा दाखविला, तेणेंकरून त्या वजिरास त्याची दया आली, त्यायोगें तो आपले बापाचें 'गाजीउद्दिन' नामें पद आणि त्याचा अधिकार 'अमीर उल् उमरा' हें पावला. नंतर तो आपला मोठा उपकारकर्ता असा जो वजीर त्याच्या नाशाविषयीं उद्युक्त झाला, आणि त्याची वजीरीही आपल्या आतेचा भर्ता यास देवविली. तेव्हां तो पहिला वजीर व बादशाह यांशीं युद्ध होऊं लागलें, तें सहा महिनेपर्यंत दिल्लीच्या आसमंताद्भागीं होत होतें. शेवटीं त्या वजिरास कंटाळा येऊन तो वजीर तें युद्ध टाकून आपलें पहिलें ठिकाण लखनौ एथें जाऊन राहिला. मीर शाहाबूदिन बळेंच त्या युद्धांत शिरला होता; त्यानें आपल्या कुमकेस मल्हारराव होळकर व जयापा शिंदे यांस बोलाविलें, परंतु ते आल्याचे पूर्वींच तो वजीर युद्ध सोडून गेला. मग ते होळकर व शिंदे आल्यावर त्यांना बरोबर घेऊन तो वजिराचा पक्षपाती सुरजमल्ल याच्या पारिपत्यास गेला. तेव्हां सुरजमल्ल आपल्या किल्ल्यांत शिरून युद्ध करूं लागला, ते वेळेस शाहाबूदिनानें बादशाहाजवळ तोफांविषयीं विनंती केली, ते समयीं बादशाहास त्या नव्या वजिराचें सांगणें पडलें कीं, 'हा शाहाबूदिन सर्व सामर्थ्य आपणासच असावें असें इच्छितो, अशा पुरुषास अनुकूळ होणें ठीक नव्हे.' त्यावरून बादशाह यानें तोफा न दिल्या, आणि तेच समयीं त्या सुरजमल्लानें बादशाहास शरण गेल्यासारिखें विनंतिपत्र पाठविलें, तेणेंकरून तो बादशाह, शाहाबूदिन व मराठे यांच्या निवारणार्थ, फौजेसहित निघाला. हें वर्त-

मान मल्हारराव होळकरास कळतांच त्यानें शाहाबूदिन व जयापा शिंदे हे केवळ अल्पबळसे मानून त्यांस न विचारितां तो एकाएकीं बादशाहाच्या सैन्यावर जाऊन पडला. ते समयीं बादशाह सावध नव्हता, आणि तो तर बाण टाकूं लागला, तेव्हां ते लोक भयभीत होत्साते पळूं लागले. ते वेळेस होळकराला त्या लष्कराची लूट सांपडली. नंतर तो होळकर दिल्लीस गेला, ते समयीं शाहाबूदिनानें बादशाहापासून आपणास वजिरी मिळवून आपल्या आतेचा भर्ता जो होता तो पदच्युत केला. त्यानंतर त्यानें तो अहमदशाहही पदभ्रष्ट करून त्याचे जागीं पूर्वींचा जहांदरशाह याचा नातू, त्याचें 'दुसरा अलमगीर' असें नांव ठेवून सन १७५४ त मे महि-न्याचे अखेरीस तक्ताधिपति केला. तेच समयीं त्या पहिल्या अहमदशाह बाद-शाहाचे डोळे काढून त्यास बंदींत ठेविलें. त्याच संधींत पहिला वजीर सफदरजंग मरण पावला. त्याचा पुत्र सुजा उद्वला तो आपल्या बापाचे जागीं अयोध्याप्रां-ताचा अधिकारी झाला.

१७. पेशवा स्वभावेंकरून धिमा असे, आणि दुसऱ्यास कामें संपवून आपण स्वस्थ असावें यांत त्याची आवड होती. त्यानें आपला भाऊ रघुनाथराव यास लष्कराचें काम सांगितलें, आणि सदाशिव चिमणाजी आपला चुलतभाऊ तो मुल-खाच्या बंदोबस्तास नेमिला. त्यानें, रामचंद्रबाबा शेणवी यानें ठरविलेल्या प्रकारें, मुलखाचा बंदोबस्त राखिला. मग तो रामचंद्रबाबा मेल्यावरही सदाशिव चिम-णाजीनें, त्या शेणव्यानें स्थापिलेले जे मार्ग होते ते राखून, दुसरेही कांहीं उत्तम प्रकारचे नवे नवे नेम केले, तेणेंकरून प्रजा बहुत दिवसपर्यंत लुटालूट किंवा दुसरा कांहीं उपद्रव न होतां सुख पावली.

१८. तो पेशवा कर्नाटकांतून आल्यावर एक वर्षपर्यंत पुण्यांत होता, तेव्हां त्यानें आंग्र्याचा मुलूख घ्यावयाविषयीं इंग्रेजांशीं कुमकेसाठीं कांहीं बोलणें लाविलें होतें. मग सन १७५५ त पर्जन्यकाळ गेल्यावर तो पेशवा आपलें जें कोंकणांत लष्कर होतें तें वाढवून आंग्र्यावर जावयास तयार झाला. इतक्यांत कर्नाटकांत कांहीं बंड उत्पन्न झालें तें मोडावयास त्याला आधीं तिकडे जावें लागलें. त्या बंडाचें मूळ असें; सलाबतजंगाजवळ हिंदू पलटणें होतीं त्यांस त्यानें हैदराबादेंत निरोप दिला, नंतर त्यांचा मुख्य सरदार मुजफरखान नामें होता त्यानें ते लोक आणून पेशव्याचे चाकरीस ठेविले. मग तो सरदार कर्नाटकांत गेल्यावर कांहीं रुसव्यामुळें त्यानें पेशव्याचा पक्ष सोडून सावनूरच्या नबाबाची चाकरी धरिली; ते समयीं पेशव्यानें त्या नबाबास तो आपला सरदार मागितला, त्याला गुटीचे व सोंडूरचे घोरपडे मराठे लोक यांचें साहाय्य असे, तेणेंकरून तो धीटपणें सरदा-

रास पेशव्याचे स्वाधीन करीना. त्यासाठीं पेशवा यानें आपलें मोठें लष्कर जमा करून जानोजी भोंसल्याचे दहा हजार स्वार बोलावून आणून कृष्णेपलीकडे जाऊन बागलकोट घेतला. तेथून पुढें सावनुरास जावयाकरितां हैदराबादेस वकील पाठवून त्यास, 'तुह्मांला व आह्मांला या सावनूरसंबंधें धक्का समान बसेल,' असें समजावून त्या तक्ताधिपतीचीही कुमक घेतली. मग ती व आपली सेना एकत्र करून पुढें जाऊन सावनुरास घेरा घातला.

१९. इकडे कोंकणचे आंग्रेप्रकरणीं पेशव्यांनीं इंग्रेजांशीं कांहीं बोलणें लाविलें होतें. तो प्रकार असा; तुळाजी आंग्र्या, आपला सावत्रभाऊ संभाजी आंग्र्या मरण पावल्यानंतर त्याचा मुलूख बाणकोट व सांवतांची वाडी यांमध्यें होता तो, आपण वहिवाटीत असे, आणि समुद्रांत स्वतंत्रतेनें चांचेपणाही करीत असे. तो अनर्थ शमवावयाकरितां सन १७५५ त बाळाजी बाजीराव पेशवा व इंग्रेज या दोघांमध्यें असें ठरलें कीं, पेशव्यांचीं सारीं लढाऊ गलबतें इंग्रेजांनीं आपल्याकडे घेऊन तीं व आपलीं, एक चवेचाळिसां तोफांचें व एक सोळा तोफांचें व दोन गरनाळांचीं अशीं सर्व घेऊन जाऊन आंग्र्याचे समुद्रकांठचे किल्ले घ्यावे. असा बेत झाल्यावर मार्च महिन्याचे २२ वे तारिखेस त्या कामाविषयीं इंग्रेजांचीं जहाजें निघालीं, परंतु पेशव्यांच्या गलबतांस कांहीं निमित्तेंकरून यावयास उशीर लागला, त्यायोगें आंग्र्याचीं लढाऊ गलबतें सुवर्णदुर्गाजवळ होतीं तीं इंग्रेजांच्या हातीं न लागलीं; त्यांना तीं पळवावयास अवसर सांपडला. मग इंग्रेजांचा मुख्य सरदार कमोदोर जेम्स् नामें होता तो जयगडपर्यंत त्यांचे पाठीस लागला, परंतु त्यास त्यांतून कांहीं न सांपडतां तो माघारां आला. नंतर एप्रिलचे २ रे तारिखेस त्यानें सुवर्णदुर्ग घ्यावयाचा उद्योग आरंभिला. तो प्रकार असा; किल्ल्याच्या तटाजवळ त्यानें आपलीं जहाजें नेऊन नांगरलीं, नंतर चवथे दिवशीं जंजिरा, सुवर्णदुर्ग व त्याजवळचे खुसकीवरील किल्ले ते त्याच्या स्वाधीन झाले. पेशव्याचीं गलबतें मागून आलीं तीं त्या किल्ल्यांतील तोफांचे माऱ्याखालीं पोंहचलींच नाहींत. त्या जहाजांवरील शिबंदीचा मुख्य नारोपंत नामें होता, त्यानें कितीएक वेळां मोठ्या शौर्येंकरून खुसकीवर युद्धें केलीं होतीं, परंतु तो समुद्रांत युद्ध करावयाविषयीं केवळ भित्रा असे. ते समयीं पर्जन्यकाळामुळें विजयदुर्ग घ्यावयास अवसर होईना, तेव्हां इंग्रेजांनीं सुवर्णदुर्ग किल्ला पेशव्यांकडील कोंकणचा सरसुभेदार याच्या स्वाधीन करून आपण आपलीं जहाजें घेऊन माघारें मुंबईस आले. या कामाच्या बोलण्यामध्यें असें ठरलें होतें कीं, बाणकोट किल्ला व त्या बाणकोटच्या खाडीचे कांठचीं पांच गांवें पेशव्यांनीं इंग्रेजांस द्यावीं; तीं पर्जन्यकाळ गेल्यानंतर त्यांनीं त्यांचे स्वाधीन केलीं

२०. मग दुसरे वर्षीं विलायतेहून बादशाहाचीं कितीएक मोठीं मोठीं जहाजें मुंबईस आलीं, तीं व दुसरीं मुंबईसंबंधी लढाऊ जहाजें मिळून चौदा जहाजें विजयदुर्ग घ्यावयास रवाना झालीं, त्यांवर आठशें विलायती गोरे लोक, व एक हजार हिंदू पलटणी लोक चढले होते. तीं जहाजें विजयदुर्गासमूर जात तोंपर्यंत मराठ्यांनीं आंग्र्याचे दुसरे कोंकणचे किल्ले होते ते घेतले आणि विजयदुर्गासही घेरा घालून इंग्रेजांकडील कुमकेची वाट पाहात राहिले. इतक्यांत तीं गलबतें जवळ येतांच त्या किल्ल्यांत तुळाजी आंग्र्या होता तो मराठ्यांच्या लष्करांत जाऊन इंग्रेजांखेरीज मराठ्यांशीं मात्र तहाचें बोलणें करूं लागला. त्या तहास पेशव्याचे लोक अनुकूळ होऊन त्या किल्ल्यांत बहुत द्रव्य होतें तो सर्व लाभ आपणच घ्यावयाविषयीं इंग्रेजांचें अनुमत न घेतां त्यांस युक्तीनें माघारें लावावयास उद्युक्त झाले. हें सर्व वर्तमान इंग्रेजांचा सरदार यास कळलें. त्यानें तत्काळ समुद्रांतून किल्लेकऱ्यांशीं युद्ध आरंभिलें, आणि आपले शिपाई लोक कांठीं उतरून पेशव्यांचें लष्कर व किल्ला या दोहोंमध्यें आपलें ठाणें बसवून किल्ला खुसकीवरून व समुद्रांतून आपणच वेढिला. मग त्या किल्ल्यावर जें बहुत द्रव्य होतें त्यांत आपली कांहीं वांटणी असावी या बेतानें मराठ्यांकडील रामाजीपंत नामें तेथें कोणी मुख्य होता त्यानें आपले थोडके तरी लोक किल्ल्यांत जावे ह्मणून फार उद्योग केला. त्यांत इंग्रेजांचा कोणी चौकीपाहऱ्याचा बंदोबस्त राखणारा सरदार होता त्यास 'युक्तीनें आमचे कांहीं लोक आंत जाऊं दिले असतां तुह्मांस मुंबईहून ऐशीं हजार रुपयांची हुंडी देववूं' असें गुप्त सांगितलें. असा लांच देत असतां तो ऐकेना. इतकें होऊन शेवटीं तो किल्ला इंग्रेजांचे स्वाधीन झाला, त्यांत मराठ्यांचें माणूस कोणीही गेलें नाहीं. त्यावरून इंग्रेजांच्या सरदारांनीं, तेथें द्रव्य दहा लक्ष रुपये होतें त्यापैकीं, मराठ्यांस किमपि न देतां आपणांत वांटून घेतलें. असें झाल्यावर मुंबईचा मुख्य इंग्रेज होता त्यानें विजयदुर्ग किल्ला फार सुदृढसा जाणून तो आपणाकडे घ्यावा, आणि मराठे यांस बाणकोट द्यावा असें केलें. या कृत्रिमाविषयीं पेशव्यानें इंग्रेजांचा मुख्य बादशाह याजवळ आणि मद्रासचा मुख्य इंग्रेजांचा कारभारी साहेब होता त्याजपाशीं फिर्याद केली, त्यावरून दोहींकडचें लिहिणें मुंबईच्या मुख्यास आलें, तेव्हां त्यानें मराठेही तहामध्यें जो नेम ठरला त्याप्रमाणें वागले नाहींत असें समजून त्या वेळेस तें प्रकरण तसेंच राहविलें.

२१. कर्नाटकांत सलाबतजंगाचें लष्कर व मराठे लोक मिळून त्यांनीं सावनूर किल्ला कौशल्येंकरून घेतला, आणि दुसराही त्याचा मुलूख घेऊन त्या नबाबाशीं त्यांनीं स्नेह केला. तेव्हां ज्या निमित्तें इतका कलह झाला तो मुझफरखान पुनः

सलाबतजंगाचे चाकरीस राहिला. असा सलाबतजंगाशीं आणि पेशव्याशीं स्नेह पडला त्याचें कारण हेंच दिसतें कीं, फ्रांसीस लोक मोठ्या योग्यतेस आले, तेव्हां ते सर्व कांहीं आपल्या सत्तेंत घेतील अशा शंकेनें त्यांस काढून द्यावेंसें त्यांच्या मनांत होतें. त्यावरून तें सावनुरचें संस्थान त्यांचे हातीं येतांच फ्रांसीसांचा मुख्य बसी नामें साहेब[१] होता त्याला सलाबतजंगानें सांगितलें कीं, 'आतां आह्मांस तुमचें प्रयोजन नाहीं; तुह्मीं, आमचे हद्दीबाहेर जेथें आह्मीं तुह्मांस मुलूख दिला आहे तिकडे जावें.' असा निरोप झाला त्या वेळेस बसीजवळ त्याच्या जातीचे फ्रांसीस घोडेस्वार दोनशें व पायदळ सहाशें, याशिवाय पांच हजार पलटणी हिंदूलोक होते, व पोक्त सरंजामाच्या त्याच्या सेनेप्रमाणें त्यास पुरेतशा तोफा होत्या. असें त्याचें सामर्थ्य असतां तो बसी समजला कीं, 'हे मला काढून द्यावयास मिळाले आहेत, आणि जर मीं या वेळेस यांची आज्ञा न मानावी, तर मुझफरखान यांजकडे आहे, त्याचें व आपले हिंदू पलटनाचे लोक यांचें इष्टत्व आहे, यास्तव निःशंक युद्ध होणार नाहीं. त्यास हेंच उत्तम कीं, आपल्या मर्यादेंत जावें, आणि हैदराबादेस जाऊन तेथें आपला बंदोबस्त चांगला करावा, आणि आपल्या मुख्य ठिकाणची कुमक आणावी, नंतर मागें उलटावें.' असें मनांत आणून तो तें सांगणें अवश्य मानून मोठ्या त्वरेनें जाऊन हैदराबादेस पोंहचला. तेथें चांगली बंदोबस्ताची जागा पाहून आपण त्या आपल्या लोकांसहित त्यांत राहून युद्धाची तयारी करूं लागला, आणि तेथें सलाबतजंगाकडचे मुख्य सरदार रामचंद्र जाधव व जानोजी निंबाळकर होते ते त्यानें वश केले; इतक्यांत मछलीपट्टणाहून त्याची कुमकही येऊन पोंहचली. त्यानंतर त्याचा असा बंदोबस्त झालेला जाणून सलाबतजंग त्यास दूर करावयाची मसलत टाकून त्याशीं स्नेह रक्षिता झाला. मग तो बसी सलाबतजंगाजवळच्या कारभाऱ्यांत पहिल्यापेक्षां मान्यता पावून मुझफरखानाला सलाबतजंगाचे चाकरींतून काढिलें. मग त्या मुझफरखानानें पुण्यास जाऊन पेशव्यास बहुत आर्जवून कबूल केलें कीं, 'इतःपर कृत्रिम न करितां इमानीपणें मी चाकरी करीन.' त्यावरून तो पेशव्यानें आपणापाशीं रक्षिला, परंतु सदाशिव चिमणाजी याच्या मनास ती गोष्ट आली नाहीं.

२२. पेशवा कर्नाटकांतून जुलैचे २० वे तारिखेस पुण्यांत आला, नंतर त्यानें मुंबईचा अधिकारी बूरचेर साहेब होता त्याला बहुत स्नेहयुक्त पत्र लिहून त्यांत असें समजाविलें कीं, 'आह्मी पुण्यास आलों, आतां पूर्वींचे कामापैकीं कांहीं

१. सन १७५० त बसीला लष्करखर्चास दक्षिणेचे पूर्वेकडे समुद्राचे कांठीं राजमंद्री शहर व शिकेकोळ व एल्लोर इतका मुलूख सलाबतजंग यानें दिला होता.

बंदोबस्त राहिला आहे तो आपला कोणी साहेब एथें आला ह्मणजे त्याचे विद्यमानें केला जाईल. त्यावरून बैफील्ड नामें व स्पेन्सर नामें दोघे साहेब मुंबईहून गेले, ते पुण्यांत पेशवा व रघुनाथराव व सदाशिव चिमणाजी यांस भेटले. मग आक्टोबरचे १२ वे तारिखेस असा निश्चय ठरला कीं, 'इंग्रेजांनीं विजयदुर्ग पेशव्यास द्यावा, आणि पेशव्यांनीं इंग्रेजांस बाणकोट व त्याजवळचे खाडीच्या कांठचे दहा गांव द्यावे; याखेरीज आमचें कांहीं मागणें सरकार कंपनीबहादुरांकडे राहिलें नाहीं असें लिहून द्यावें.' याप्रमाणें तीं सर्व कामें उलगडून ते दोघे साहेब माघारें मुंबईस आले.

---

## भाग अठरावा.

### ( इसवी सन १७५६ पासून सन १७६० पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. रघुनाथराव लष्करासुद्धां हिंदुस्थानांत स्वारीस गेला, व पेशवा कर्नाटकांत जाऊन श्रीरंगपट्टणचा खंड घेता झाला.—२. खडापाजवळचे लढाईचा प्रकार.—३. ह्मैसूरचा सरदार हैदर अली याचा उत्कर्ष, व हैदराबादचे दरबारीं कांहीं अभ्यंतरीं कृत्रिम झालें तें, व त्याचा शेवट. ४. इंग्रेज लोकांनीं सुरत घेतली तें प्रकरण.—५. पुनः मराठे यांणीं कर्नाटकांत संचार केला तो प्रकार, व हैदराबादचें कांहीं विशेष वर्तमान.—६. सदाशिवरावाच्या स्वभावाचें वर्णन.—७. त्या सदाशिवरावास मारेकरी घातला असतां तो वांचला ते प्रकरण.—८. सदाशिवराव सेनेचें मुख्यत्व पावून रघुनाथराव कारभार करूं लागला, व अहमदनगर मराठ्यांनीं कृत्रिमेंकरून घेतलें तो प्रकार, व दक्षिणेंत मराठे व मोगल यांशीं युद्ध होऊन मराठ्यांस काय लाभ झाला तो प्रकार.

१. सन १७५६ चा पर्जन्यकाळ गेल्यावर पेशव्यानें आपला भाऊ रघुनाथराव याजबरोबर फौज देऊन त्याची दिवाणगिरी सखाराम बापूला सांगून त्यास हिंदुस्थानांत पाठविलें, आणि आपण मोठें सैन्य जमा करून कर्नाटकाकडे चालिला. तो सन १७५७ त अकस्मात् श्रीरंगपट्टणचे किल्ल्याजवळ प्रगट होऊन 'आमचा बाकी खंड येणें राहिला आहे' असें निमित्त करून तेथच्या अधिकाऱ्याजवळ अमर्याद पैका मागूं लागला. तो तिकडे जात असतां खर्पाचा नबाब खेरीज करून कृष्णेच्या दक्षिणकांठचे जे नबाब होते ते त्याला सर्व अनुकूळ झाले, आणि घोरपडाही सहा हजार स्वारांनिशीं येऊन त्यास मिळाला. नंदजीराज नामें ह्मैसूरच्या राजाचा दिवाण तो बळेंच श्रीरंगपट्टणाचा अधिकार आपण चालवीत होता, त्यानें तें पेशव्याचें मागणें पहिल्यानें मान्य केलें नाहीं, परंतु तोफांच्या मारापुढें निरुपाय होऊन आर्जवानें त्याशीं बोलून तें देणें फार हलकें ठरवून त्यापैकीं तत्काळ नगद पांच लक्ष रुपये दिले, बाकीचा ऐवज जमा होई तोंपर्यंत त्यांनीं कांहीं मुलूख बहिवाटावा असें केलें. त्यानंतर पेशव्याच्या मनांत आलें कीं, पूर्वीं मराठ्यांच्या

स्वाधीन जितका कर्नाटकचा मुलूख होता तितका आपल्या सत्तेंत आणावा; मग त्यानें सेरा परगणा घेतला, आणि पाऊसकाळ पुढें समीप आला ह्मणून बहुतेक लष्कर बरोबर घेऊन माघारां पुण्यास येऊं लागला. तेव्हां बाकी फौज बळवंतराव मेहेंदळ्याचे स्वाधीन करून हुस्कोटा व बंगलोर व बाळापूर व कोल्हार इतके परगणे घ्यावयासाठीं तेथें ठेविली. त्यानंतर खर्पाच्या नबाबापासून बळवंतरावानें हुस्कोटा घेतला, आणि अर्काटच्या नबाबापाशीं चौथ व सरदेशमुखी याबद्दल बहुत वादप्रतिवाद करून दोन लक्ष रुपये नगद व अडीच लक्ष मुलुखांतून वसूल करून घ्यावे असा ठराव ठरविला. त्या अर्काटच्या नबाबास मद्रासचे इंग्रेज लोक अनुकूळ होते, त्यांनीं त्यास खंडणी न पडावी ह्मणून बळवंतराव यास सांगितलें कीं, 'तुह्मांला फ्रांसीसांच्या[1] मुलखीं स्वारी करावयास हा उत्तम समय आहे.' असें त्या इंग्रेजांचें सांगणें बळवंतरावानें न मानिल्यामुळें त्यानें जो ठराव केला होता तो पैका त्या नबाबास द्यावा लागला.

२. यानंतर खडापापाशीं खर्पाचा व कर्नोळचा या दोहों नबाबांनीं मिळून त्या मेहेंदळ्याशीं युद्धप्रसंग केला, परंतु ते जय न पावतां खर्पाचा नबाब मृत्यु पावला, आणि मराठ्यांनीं त्याची राजधानी लुटली, तथापि तत्पक्षीय जे लोक होते त्यांनीं युद्ध करून तो मुलूख मराठ्यांचे हातीं लागूं दिला नाहीं.

३. इतक्यांत ह्मैसूरचे दरबारीं हैदर अल्ली, जो पुढें मोठ्या योग्यतेस येणारा, त्याचे मसलतीनें त्या लोकांनीं पूर्वीच्या खंडणीपैकीं कांहीं नगद पैका देऊन बाकी ऐवजास मुलूख लावून दिला होता तो माघारां घेतला. त्यावरून पुण्यामध्यें पेशव्यानें सैन्य तयार करून गोपाळ हरीस त्याबरोबर देऊन तें मेहेंदळ्याचे कुमकेस पाठविलें, परंतु औरंगाबादेंत मुख्य प्रधान शाह नवाजखान होता त्यानें कांहीं मसलत करून बादशाहास कैदेंत ठेवून त्याचे जागीं त्याचा भाऊ स्थापावा व त्याचें साहाय्य करणारे फ्रांसीस लोक दक्षिणेंतून काढून द्यावे अशी योजना केली. त्या मसलतीस पेशवे मुळापासून अनुकूळ असतील ह्मणून गोपाळ हरी श्रीरंगपट्टणास हैदर अल्लीवर जात होता, तो माघारां फिरवून औरंगाबादेकडे पाठविला. नंतर त्या नवाजखानानें योजिलेलें कृत्रिम शेवटास न जातां तो फ्रांसीस लोकांचे हातूनच मेला गेला. त्याचे जागीं बादशाहाचा भाऊ सलाबतजंग प्रधान केला. दुसरा भाऊ निझाम अल्ली तो पळून गेला, आणि फ्रांसीस लोक यांचें बळ वाढलें. इतक्यांत ते फ्रांसीस यांचा कोणी नवा मुखत्यार आला त्यानें इंग्रेजांचें युद्ध संभाळावयास त्या फ्रांसीसांस बोलाविलें, तेव्हां तो बसी फौजेसहित स्वसंतोषें दौलता-

---

१. फ्रांसीस व इंग्रेज यांचें त्या समयीं युद्ध लागलें होतें.

बाद किल्ला सोडून दक्षिणेंतून निघाला. ते समयीं त्याशीं स्पर्धा करणार हिंदू व इतर कोणी होते त्यांस मोठा चमत्कार व आनंद वाटला; आणि सलाबतजंग यास त्यांपासून उपयोग होई, तो त्याचा गेल्यामुळें तो फार श्रमी झाला.

४. ते वेळेस मराठे लोक पुण्यास चालिले असें औरंगाबादेकडचें वर्तमान असतां मुंबईच्या इंग्रेजांनीं सुरत घ्यावयाची मसलत करून त्याप्रमाणें तयारी केली. त्या वेळेस पेशवा औरंगाबादेच्या कामांत गुंतल्यामुळें त्याला त्या इंग्रेजांचें निवारण करावयास अवकाश सांपडला नाहीं, परंतु त्यानें चातुर्येंकरून तें काम सिद्धीस जाऊं न दिलें. तो प्रकार असा; कल्याणचा सुभेदार शंकराजीपंत यास आज्ञा केली कीं, 'हल्लीं आह्माला रिकामपणा नाहीं, आह्मी या कामांतून मोकळे होऊं तोंपर्यंत तुह्मीं इंग्रेजांस भुलथापी देऊन तसेंच राखावें.' त्यावर त्यानें विनंति केली कीं, 'तें चालावयाचें नाहीं, कां कीं, ते लोक आपला अर्थ शेवटास नेतील.' त्यावरून बाळाजी बाजीरावानें आपलें लष्कर कितीएक मजला पश्चिमेकडे चालविलें, आणि पुण्यामध्यें इंग्रेजांचा वकील कोणी हिंदू होता त्याकडून इंग्रेजांस असें कळविलें कीं, पेशवा लष्करासुद्धां मुंबईवर येतो. त्या वेळेस इंग्रेजांनीं दक्षिणी कारभार किमपि न जाणल्यामुळें तें वर्तमान खरें मानून मुंबईच्या बंदोबस्तास लढाऊ गलबतें सिद्ध करून व कांहीं सुरतेस होतीं तींही आणवून मोठ्या तयारीनें पेशव्याची मार्गप्रतीक्षा करीत तेथेंच राहिले. अशा कारणानें त्या वेळेस तें काम न झालें, परंतु पुढें थोडकेसे महिने गेल्यावर त्यांनीं सुरत घेतली. त्या कामांत इंग्रेजांचे शिपाई व सरदार बहुत मेले गेले. याप्रमाणें सन १७५९ च्या मार्च महिन्याचे ४ थे तारिखेस इंग्रेजांचे हातीं सुरत लागली.

५. पेशवा माघारां पुण्यास आल्यावर पर्जन्यकाळ गेल्यानंतर ह्मैसुरकरानें खंडणीपैकीं ऐवजास लावून दिलेला मुलूख त्यानें माघारां घेतला होता तो घ्यावयाकरितां गोपाळ हरीस पाठविलें. त्यानें तें कार्य करून बंगलोरास घेरा घातला. ते समयीं ह्मैसूरच्या लष्कराचा मुख्य हैदर अल्ली झाला होता, त्यानें पहिल्या कराराप्रमाणें सोळा लक्ष रुपयांचें सोनें तोलून दिलें आणि सोळा लक्षांच्या हुंडीचिठ्या दिल्या. तेव्हां बाकी वसुलाविषयीं वहिवाटीस लावून दिलेला मुलूख सोडून मराठ्यांनीं त्याशीं सल्ला केला. यानंतर गोपाळ हरी तेथून निघाला तो मद्रासेस गेला, तेथें इंग्रेज होते त्यांसभोंवता वेढा घालून फ्रांसीस त्यांशीं युद्ध करीत होते. त्या दोघांपासून खंडणी घ्यावयाचा तो उद्योग करूं लागला, परंतु त्या उभयतांनीं त्याचा धिक्कार करून त्यास लावून दिलें. तो सूड उगवावयाकरितां फ्रांसीसांचे स्वाधीन त्रिपतीचें देवस्थान होतें तें त्यानें घेतलें. तेथचे यात्रेंत पैका बहुत वसूल

होत असे तो जमा करणार होता, परंतु त्याला पुण्याहून माघारें बोलावणें गेलें तेव्हां तेथें थोडकेसे लोक ठेवून तो तेथून निघाला. नंतर अर्काटच्या नबाबानें ते लोक तेथून काढून दिले. फ्रांसीस लोक दक्षिणेंतून गेल्यावर सलाबतजंगाचा भाऊ निजाम अल्ली पदवीस चढूं लागला. त्यास पेशवा अनुकूल होता. याशिवाय निझामउल्मुल्काशीं आणि फ्रांसीसांशीं पहिलाच द्वेष असे, त्या निझामाचा पुत्र ह्मणून इंग्रेज लोकही त्याची कृपा संपादन करावयास इच्छीत होते. नंतर त्या निझाम अल्लीला समजलें कीं, सलाबतजंग हैदराबाद सोडून इंग्रेज व फ्रांसीस हे दोघे लढतात तिकडे आपण फ्रांसीसाचे कुमकेस चालिला, तेव्हां तो निझाम अल्ली आधीं औरंगाबाद घेऊन पुढें हैदराबादेस जाऊं लागला, तेव्हां सलाबतजंग माघारां आपल्या ठिकाणीं आला. नंतर निझाम अल्लीस प्रधानकी प्राप्त झाली, आणि सलाबतजंग आपलें पहिलें ठिकाण आंदोणी एथें गेला.

६. पुण्यामध्यें मुख्यत्वें कारभार सदाशिवराव भाऊ करीत होता, त्याचा कारभारी रामचंद्रबाबा शेणवी तो पूर्वीं चार पांच वर्षें मेला होता. त्याचें द्रव्य पुष्कळ होतें तें त्यानें भाऊजवळ दिलें असे. त्यांतला तिसरा वांटा भाऊनें धर्मकृत्यास लाविला, आणि उरले जे दोन वांटे त्यांतून एक रामचंद्रबाबाच्या पुत्रास दिला आणि एक आपण घेतला. सदाशिवराव मोठा लोभी आणि उतावळा होता, परंतु सावध व चतुर असे, व स्वभावेंकरून अहंकारी आणि कांहींसा निर्दय असे, तथापि तो सुबुद्धीचा आणि स्वकीयांविषयीं सुशील होता. तो लोकांपासून पैका खाऊन कामें करी हा एक त्यास मोठा दोष होता. कां कीं, सरकारचा जो चाकर त्यानें चांगलेंही काम करून मध्यें कांहीं खाऊं नये; परंतु मराठ्यांमध्यें कारभाऱ्यानें चांगल्या कामांत पैका खाल्ला असतां तो दोष मानीत नाहींत, ही चाल सर्वथा अनुचित होय. असें आहे कीं, जो उत्तम कामें करून द्रव्य खाईल तो समयविशेषीं लोभेंकरून वाईट कामही करील.

७. रघुनाथराव हिंदुस्थानांतून आल्यावर तो व सदाशिवराव यांमध्यें युद्धाचें साहित्य व सैन्याचा खर्च यासंबंधें कांहीं भांडण लागलें. कां कीं, तो सरकारखजिन्यास कांहीं द्रव्य न आणितां कर्ज घेऊन माघारां आला. त्या कलहांत रघुनाथराव कोपेंकरून बोलिला कीं, 'एवढें चातुर्य तुह्मांमध्यें असेल तर दुसरे स्वारीस तुह्मीच जा.' त्या दिवसापासून तो कलह वाढतां वाढतां त्या कुळांतही दोन फळ्या होऊन त्या गोष्टी लोकांत प्रसिद्धीस येऊं लागल्या. शेवटीं ज्यास पेशवा चाकरीस ठेवीत होता ते समयीं 'हा माणूस योग्य नव्हे' असें सदाशिवरावानें ह्मटलें होतें, तो मुझफरखान याचा कोणी शिपाई, संगमावर सदाशिवराव भाऊ आपल्या

कचेरीच्या डेऱ्यांत बसला होता तेथें हळूच त्याच्याजवळ जाऊन, एकाएकीं खंजीर काढून त्यास मारूं लागला. तों त्याचा कोणी माणूस जवळ होता त्यानें हात धरून पलीकडे सारला, त्यायोगें त्या सदाशिवरावाचें शरीर वांचलें, कांहींसें पाठीस मात्र तें शस्त्र लागलें. तेव्हां तो मारेकरी धरून त्यास मारहाण करून पुसतांच तो कबूल झाला कीं, 'मला मुझफरखानानें सांगितलें.' त्यावरून मुझफरखानास आणून विचारिलें, ते समयीं तो किमपि नाकबूल न जातां 'हें मीं केलें' असें ह्मणाला. मग तो मारेकरी व तो मुझफरखान या दोघांस तेथून बाहेर काढून ठार मारिलें. ते वेळेस कोणीएक परभू त्या मुझफरखानाचा चाकर होता त्याजकडेही या प्रकरणीं कांहीं अन्याय लागू झाला, त्यावरून त्याला किल्ल्यावर टाकिलें, त्यापुढें त्याचें कांहीं वर्तमान प्रसिद्धीस आलें नाहीं. यांत कांहीं आश्चर्य नाहीं, कां कीं, मराठे लोक यांची पूर्वापार चाल अशीच आहे कीं, जो सरकारचा अपराधी तो एकदा किल्ल्यावर टाकिला ह्मणजे पुनः त्याचें कांहीं वर्तमान दुसऱ्यास कळत नाहीं.

८. मग पेशव्याचे दरबारीं असा नेम ठरला कीं, रघुनाथरावानें पुण्यांत राहून मुलखी कामें करावीं, आणि सदाशिवरावानें स्वारीस जावें. नंतर सदाशिवराव लष्करसहित उत्तरेकडे जावयास सिद्ध झाला. ते समयीं असें वर्तमान आलें कीं, पूर्वी सदाशिवरावानें कपटेंकरून अहमदनगर घ्यावयाची मसलत केली होती त्याप्रमाणें मोगलाच्या किल्लेदारानें लांच खाऊन तो जागा सदाशिवरावाच्या कारकुनाचे स्वाधीन केला. हें वर्तमान सलाबतजंग व निझाम अल्ली यांस कळलें, तेव्हां ते फार क्रुद्ध होऊन पेशव्याशीं युद्ध करावें असें मनावर घेते झाले, परंतु ते समयीं त्यांजपाशीं युद्धाजोगा बंदोबस्त नीट नव्हता; तथापि तें नगर निझामशाही बादशाहींतली पुरातन राजधानी, आणि महाप्रयासेंकरून आपल्या हातास आलेली, ती व्यर्थ गेली हा मोठा अपमान जाणून निश्चय केला कीं, 'याच समयीं विलंब न करितां युद्धास जावें.' ते वेळेस जे लोक मिळाले ते लागलेच पुढें रवाना केले; त्यांजबरोबर मोठ्या मोठ्या तोफाही चालत्या केल्या. ते लोक बेदरावरून धारूरास जाऊन पोंहचल्यावर मागून सलाबतजंग व निझाम अल्ली हे दोघे सात हजार फौज बरोबर घेऊन जात होते, ते समयीं सदाशिवराव यानें भीमातीरीं जाऊन बहादूरगड घेतला होता, इतक्यांत त्यास हे दोघे भाऊ थोडकें सैन्य बरोबर घेऊन जाताहेत असें वर्तमान कळलें, तेव्हां त्यानें त्यांस मधूनच धरून न्यावयाकरितां आपली एक फौजेची टोळी पाठविली. ते वेळेस त्या दोघां भावांनीं मोठी त्वरा करून आपल्या थोरल्या फौजेंत जाऊन मिळावें तें न करितां ते उदगीर येथें ठाणें धरून राहिले. तेथें सदाशिवरा-

वाचे बिनीवाले पुढें येऊन पोंहचले, त्यांशीं त्या दोघां भावांनीं लढाई करून आपली दारू व गोळी उगीच खरचली. ते बिनीवाले तर मागून सदाशिवराव येऊन पोंहचावा ह्मणून कालक्रमणार्थ हलकें हलकें युद्ध करीत होते. मग सदाशिवराव येऊन पोंहचला, त्याजबरोबर चाळीस हजार स्वार होते, व ईब्राहिमखान नामें गार्दी पलटणी लोकांचा सरदार होता, त्याजवळ कवाईत शिकविलेले लोक पांच हजार होते, त्यांस 'गार्दी' ह्मणत, तोही येऊन पोंहचला. त्या समयीं ते दोघे भाऊ समजले कीं, 'आह्मी ठाणें धरून राहिलों हें ठीक झालें नाहीं.' मग निझाम अल्ली तह करावयास सिद्ध झाला. परंतु सदाशिवराव ऐकेना. तेव्हां त्या दोघां भावांनीं मोठ्या निकरानें इब्राहिमाच्या पलटणीवर हल्ला केला, आणि त्याचीं अकरा निशाणें घेतलीं. ते समयीं ते पलटणी लोक फार नाश पावले, आणि बहुतेक मेले. तथापि त्या जयाचें फळ त्यांनीं फार वेळ न भोगिलें; कां कीं, इतकें होत आहे तों मराठ्यांची मोठी एक टोळी येऊन तिनें त्यांचे मोगल सुमारें तीन हजार मारिले. असें झाल्यावर निझाम अल्लीनें आपलें अधिकाराचें मोर्तब सदाशिवरावाकडे पाठविलें. त्यांत अर्थ असा कीं, 'आतां तुमच्या चित्तास येईल तें करावें.' तेव्हां सदाशिवरावानें तह केला; तो असा कीं, दौलताबाद व शिवनेरी व अशीरगड व विजापूर इतकें मराठ्यांकडे असावें; याशिवाय मराठ्यांनीं अहमदनगर जें घेतलें त्याविषयीं मोगलांनीं वाद करूंच नये, याखेरीज विजापूर परगण्यांतील हिसा व बेदरचा कांहीं भाग व औरंगाबाद शहरावांचून तो प्रांत, हरसोळ व सीताराशिवाय इतकें मराठ्यांच्या स्वाधीन असावें. याप्रमाणें तह होऊन जितका मुलूख मराठ्यांचे स्वाधीन झाला तितक्याचें उत्पन्न वर्षास बासष्ट लक्ष रुपये होत असे. त्यांतून एकेचाळीस लक्ष रुपयांचा मुलूख पेशव्यानें आपल्या लष्करी सरदारांस जहागीर करून देऊन त्याबद्दल फौजेसुद्धां चाकरी करावी असें कबूल करून घेतलें. त्यांची अशी चाल होती कीं, आपणांस मुलूख मिळाला असतां त्यांतील कांहीं विभाग आपल्या सरदारांस असावा. यांत अर्थ इतका कीं, तो सरदार आपली चाकरी संभाळून मुलखाचा बंदोबस्त चांगला ठेवील आणि सावध असेल. याप्रमाणें तह झाल्यावर दक्षिणेंत मुसलमानांचा विभाग होता तो त्यांच्या मुलखापासून बहुत दूर आणि त्यासभोंवता मराठ्यांचा मुलूख, त्यावरून असें दिसूं लागलें कीं, तो विभाग कांहीं उशीर न

---

१. इब्राहिमखान फ्रांसीसांचे हाताखालीं शिकलेला आणि मुझफरखान याचा तो नातलग होता; तो पूर्वीं सलाबतजंग व निझाम अल्ली यांचें वांकडें पडलें त्या समयीं निझाम अल्लीजवळ होता, मग ते दोघे एक झाल्यावर निझाम अल्लीनें त्यास निरोप दिला. त्या समयीं त्या इब्राहिमखानाला सदाशिवरावानें आपल्या चाकरीस ठेविलें.

लागतां मराठ्यांचे हातीं जाईल. आणि तो सारा मुलूख एकत्र झाल्यानें पूर्वी शेंकडो वर्षे दुसऱ्याचे आज्ञेंत वागलेले जे ब्राह्मण लोक ते स्वतंत्रपणें वागतील, असाही अर्थ दिसूं लागला. असें मराठ्यांचें प्राबल्य झाल्यानें प्रजेस सुख किंवा स्वस्थता झाली नाहीं. कां कीं जेथें जेथें त्यांची सत्ता होई तेथें तेथें लूट व जुलूम व नाश हीं तीनही व्हावयाचींच. ते लोक धर्मेंकरून प्रजापालन करावयाचा अर्थ मनास आणीतच नसत. अशा अनर्थांत रयतेस सुख कोठून? परंतु जे लोक लष्कराशीं संबंध न ठेवितां शेतें करून आपल्या नीतीनें वागतात, ते जें मिळेल तें खाऊन सुखी असतात, आणि ते आपापल्यांत एकमेकांविषयीं प्रीतियुक्त असून परस्परें विश्वास ठेवितात. ते लोक आपल्याखेरीज दुसऱ्याशीं व्यवहार करूं लागले असतां दुसरे लोक त्यांच्या रीतीसारिखे न चालिले तर ते त्यांस दूषण ठेवीत नाहींत. बाळाजी बाजीराव आपल्या भावाच्या उद्योगेंकरून इच्छेसारिखा जय पावला असतां हिंदुस्थानांतून पराजयसूचक कांहीं वर्तमान आलें, तें पुढचे भागीं विदित होईल.

---

## भाग एकुणिसावा.

### ( इसवी सन १७६० पासून सन १७६१ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. आफगाणांचा बादशाह अहमदशाह अबदाली याणें हिंदुस्थानांत येऊन दिल्ली शहर व मथुरा शहर लुटलें.—२. रघुनाथराव याणें मुलतान व लाहोर पेशव्याचे सत्तेंत आणिलें तें प्रकरण.—३. राणोजी शिंदा याच्या पुत्राचें कांहीं वर्तमान.—४. दिल्लीचा बादशाह अलमगीर यास शाहाबूदिन वजीर यार्णे मारून टाकिलें.—५. अबदाली बादशाह याणें मुलतान व लाहोर यांतून मराठ्यांस घालविलें, आणि आपण दिल्लीकडे चालिला.—६. त्याणें मराठे सरदार यांचा पराभव केला, त्यावरून सदाशिवराव त्याच्या पारिपत्यास दक्षिणेहून निघाला.—७. तो पुढें जात असतां त्यास कितीएक सरदार येऊन मिळाले, त्या योगें त्याचें सैन्य फार वाढलें.—८. मग त्यानें तिकडे जाऊन दिल्ली हस्तगत केली, आणि नवा बादशाह स्थापिला.—९. पानपताजवळची लढाई.—१०. त्यांत मराठ्यांचा बहुत नाश झाला.—११. आफगाण लोकांच्या क्रूरतेचें निरूपण.—१२. बाळाजी बाजीराव पेशवा याचा मृत्यु.—१३. त्याच्या स्वभावाचें कथन.

१. सन १७५४ त दिल्लीमध्यें शाहाबूदीन यानें कृत्रिमेंकरून दुसरा अलमगीर नामें नवा तक्ताधिपति केला. त्यास दिल्लींत ठेवून त्याचा पुत्र अली गोहर नामें होता त्यास बरोबर घेऊन तो मुलतान व लाहोर यांजकडे गेला. त्याच्या मनांत होतें कीं, आफगाणांचा बादशाह अहमदशाह अबदाली यानें हे दोन्ही प्रांत आमचे घेतले आहेत ते माघारे घ्यावे. ते अबदालीनें घेतले ते समयीं तेथें दिल्लीच्या बादशाहाचा ठेवणाईत मीर मनू नामें होता त्यानें तर ते दोन्ही प्रांत पहिल्यानें रक्षिले; मग त्याचा उपाय चालेनासा झाला, तेव्हां तो त्या अहमदशाह अबदालीचीच

चाकरी स्वीकारून त्याकडून ते प्रांत आपणाकडेसच घेऊन त्याच ठिकाणीं राहिला. पुढें तो मेल्यावर त्याचा पुत्र लहान होता ह्मणून अबदालीनें ते प्रांत मीर मनूचे स्त्रीचे स्वाधीन ठेविले. मग तिचें स्वामित्व झाल्यावर त्या प्रांतांची फार अव्यवस्था होऊन तेथचे रयत लोक निर्धन झाले. तेव्हां त्यांतील कितीएक लोक ते प्रांत टाकून दूर जाऊन शीख लोकांच्या मंडळींत मिळाले. त्या समयीं त्या बाईला तिचाच कोणीएक सरदार यानें कैद करून तिनें आपणास निमें राज्य द्यावें असा करार करून घेऊन सोडलें, आणि त्याप्रमाणें केलें. हें वर्तमान शाहाबूदिनाला समजलें तेव्हां तो तें राज्य घ्यावयास हा उत्तम समय आहे असें जाणून त्या प्रांताकडे चालिला. तो तेथें जाऊन पोंचतांच त्यानें तेथें एक फितुरी माणूस याची मैत्री केली. अबदालीची स्वारी त्या मुलखीं प्रथम होण्याचें कारण तोच मनुष्य. त्याचें नांव आदीना बेग. त्याशीं स्नेह करून ती मीर मनूची स्त्री धरून दिल्लीस पाठविली, आणि तो आदीना बेग तेथचा सुभेदार केला. हें वर्तमान त्या अहमदशाह अबदालीला कळतांच तो फार क्रुद्ध होऊन मोठें सैन्य बरोबर घेऊन निघाला, तो अटक नदी उतरून निर्भयपणें दिल्लीस पोंहचला. तेथील मुख्य वजीर मीर शाहाबूदीन यानें आपली गरीबाई दाखवून त्याचें बहुत आर्जव केलें ह्मणून त्या अहमदशाहानें क्षमा केली, परंतु त्यानें तें शहर लुटून फार नाश केला आणि मथुरा शहरचीही तीच दशा केली. पुढें आग्रा शहर याचीही तीच वाट झाली असती, परंतु त्या आफगाणांच्या लष्करांत असा रोग उत्पन्न झाला कीं, त्या अबदालीला तें वारें बदलावयाकरितां आपल्या काबुल प्रांतीं जावें लागलें. ते समयीं त्या अहमदशाह अबदाली बादशाहानें आपला पुत्र तिमूरशाह तोच, मुलतान व लाहोर यांसुद्धां पंजाब मुलखाच्या अधिकारावर, आपला हस्तक करून पाठविला; आणि दिल्लीमध्यें कोणी मोठ्या योग्यतेस आलेला रोहिला नजीबउद्दवला नामें होता त्यास 'अमीर उलूउमरा' पद देऊन मीर बक्षीची जागा दिली. तें शाहाबूदिनाचे मनास ठीक वाटलें नाहीं. याजकरितां अबदाली गेल्यावर त्यास पदच्युत करून तें पद आपला कोणी इष्ट यास द्यावें अशी इच्छा शाहाबूदिनानें धरिली, परंतु अलमगीर बादशाह त्यास अनुकूळ होता, आणि दिल्ली शहर त्या दोघांचे स्वाधीन असे; ह्मणून शाहाबूदिनानें आपला अर्थ शेवटास न्यावयासाठीं असा निश्चय केला कीं, आधीं दिल्ली शहर आपण घ्यावें. इतकें होतें तों रघुनाथराव सन १७५६ चे समाप्तीस माळव्यांत गेला होता, त्याशीं त्यानें कांहीं बोलणें लावून त्यास आणून दिल्ली घेतली, आणि अलमगीर बादशाहही आपल्या स्वाधीन ठेविला. मग तो अबदालीचा ठेवणाईत नजीबउद्दवला यास होळकर याच्या आश्रयानें जीवसंरक्षणाकरितां पळून जावें लागलें.

२. यानंतर रघुनाथराव कितीएक दिवस दिल्लीजवळ डेरे देऊन राहिला होता, तों लाहोरीं आदीना बेगानें आज्ञेंत कांहीं अंतर केल्यामुळें तें लाहोर ठिकाण सोडून तो तेथून जवळच्याच डोंगरीं जाऊन राहिला, तेथें राहून ज्यांस पहिलें योगाभ्यासावांचून दुसरें कांहीं ठाऊक नव्हतें असे जे शीख लोक त्यांस युद्धकर्मांत कुशळ करून मग आपणास धरावयाकरितां आले जे अबदालीचे लोक त्यांस मागें हटवून रघुनाथराव यास निरोप पाठविला कीं, 'या समयीं तूं माझें साहाय्य कर, आणि हा सारा मुलूख घे.' त्यावरून तो संतोषानें तात्काळ तिकडे गेला. मग अबदालीचे जे मुख्य होते ते सर्व जिंकून मोठा जयवंत होत्साता लाहोरांत शिरला. असें सन १७५८ त झालें. त्या काळीं रघुनाथराव त्या आदीना बेगास मुलतान व लाहोर यांचा सरसुभेदार करून त्याच्या मदतीस कितीएक मराठे लोक ठेवून आपण तेथून निघून पुण्यास आला. त्यानें हिंदुस्थान सोडिल्याचे पूर्वीं दिल्लीजवळ जनकोजी नामें जयापा शिंद्याचा पुत्र याजपाशीं कांहीं लष्कर समयविशेषीं लाहोरच्या लोकांस कुमक करावयास व रजपुतांपासून खंडणी घ्यावयास ठेविलें. माळव्याच्या बंदोबस्तास मल्हारराव होळकर व दत्ताजी शिंदे यांस ठेविलें. तो रघुनाथराव सर्वत्र जय पावला. त्यानें आपणास व मराठ्यांस मोठी योग्यता संपादिली. परंतु त्याजवळ ऐवज किमपि नव्हता, ऐशीं लाख रुपये कर्ज होतें त्यावरून त्याशीं आणि सदाशिवरावाशीं भांडण लागलें.

३. यानंतर जोधपुरचा राजा आभीसिंग मेला, तेव्हां त्याचे दोघे पुत्र रामसिंग व बेजीसिंग, तक्तासाठीं भांडूं लागले, तेव्हां रामसिंगानें पेशवा सहाय केला. त्यानें राणोजी[1] शिंदा, जो पूर्वीं बाजीरावाचे वेळेस मोठा विख्यात झाला होता, त्याचा पुत्र जयापा शिंदा त्यास आज्ञा केली कीं, 'रामसिंगास मदत करून त्यांचा कलह तोडावा.' मग त्या जयापा शिंद्याच्या आश्रयानें तो रामसिंग असें करिता झाला कीं, नागोर किल्ल्यांत आपला भाऊ असतां त्या किल्ल्यास घेरा घातला. ते समयीं त्या बेजीसिंगानें, त्याचा बाप आभीसिंग यानें पिलाजी गाइकवाड जसा घातानें मारिला तसाच आपला भाऊ रामसिंग मारेकरी घालून मारविला. त्यावर जयापाचें लष्कर मागें हटलें, परंतु पुढें रघुनाथरावानें अजमीर घेऊन जोधपुरची खंडणी ठरविली. रघुनाथरावानें हिंदुस्थान सोडिलें ते समयीं तेथें दत्ताजी व महादाजी शिंदे ठेविले, त्यांस शाहाबूदिनानें रोहिले जिंकावयास योजिलें. त्यांना

---

१. राणोजी शिंदा शाहू महाराज मेल्यावर पुढें थोडक्या अवकाशानें मेला; त्याचे तीन पुत्र; एक जयापा, एक दत्ताजी, एक जोतीबा; हे तिघे आणि दोघे दासीपुत्र, एक तुकोजी, व एक महादाजी. तुकोजी तो असतांच मेला होता.

प्रथम नजीबउद्दवला जिंकावा लागला. तो आपणावर एवढें मोठें सैन्य आलेंसें पाहून आपल्या रोहिल्यांसहित गंगेच्या कांठीं ठाणें धरून राहिला आणि त्यानें अयोध्येचा नबाब सुजा उद्दवला यास आपल्या कुमकेस बोलाविलें. त्याचें व रोहिले यांचें पूर्वीपासून वैमनस्य होतें, परंतु मराठ्यांचें प्राबल्य त्या उभयतांस सारखेंच बाधक असें समजून त्यानें त्यास साहाय्य मागितलें. तो त्यास सहाय होऊन समीप आल्यावर, दत्ताजी शिंद्यानें, बुंदेलखंडाचा सुभेदार पेशव्यांचा ठेवणाईत गोविंदपंत बुंदेला, यास सांगितलें कीं, 'रोहिल्यांचे मुलखीं जाऊन त्या मुलखाचा अगदीं नाश करावा.' त्यावरून तो त्या मुलखीं जाऊन तत्काळ त्यानें गंगेच्या पूर्वेकडचे त्यांचे मुलूख लुटले; व दुआबनामें एक त्यांचा मुलूख होता तोही लुटून उद्ध्वस्त केला. ते वेळेस तेथच्या मुख्याला तेथून जाऊन कमाऊं नामें डोंगर आहे त्याचा आश्रय करावा लागला; परंतु त्या समयीं सुजा उद्दवला यानें गोविंदपंताचें लष्कर जवळ नेटलें असें पाहून आपल्या लष्कराची गोसांवी लोकांची मोठी टोळी पाठवून त्याचा अगदीं मोड केला, आणि त्यास गंगेचे पार घालविलें. त्या वेळेस दत्ताजीला असें वर्तमान समजलें कीं, अहमदशाह अबदाली मोठें सैन्य घेऊन मुलतान व लाहोर माघारें घ्यावयास येतो, त्यावरून त्यानें त्या रोहिल्यांशीं तह केला आणि आपण लाहोरचे मराठे यांची मदत करावयास निघाला.

४. असें रोहिले व मराठे व अयोध्येचा नबाब यांचें वर्तमान असतां दिल्लीमध्यें शाहाबूदीन यानें अलमगीर बादशाह, व आपला सोयरा इंतिझाम उद्दवला, व हल्लीं दिल्लीवर येतो आहे जो अहमदशाह अबदाली तो, हे तिघे एकमत आहेत असें लोकांस विदित करून तो बादशाह व आपला सोयरा या दोघांस मारून टाकिलें आणि त्या बादशाहाचे जागीं औरंगजेबाच्या कनिष्ठ पुत्राचा पुत्र, याचें 'शाहजहान' असें नांव ठेवून तो तक्ताधिपति केला. एवढें दुष्कर्म करून मग मराठे व अबदाली यांच्या युद्धांत कोण जय पावेल तें पाहावयाकरितां जाटांचा राजा सुरजमल्ल यास तो शरण गेला आणि त्याच्या आश्रयानें राहिला.

५. तिकडे लाहोरामध्यें रघुनाथरावाचे मराठे लोक होते त्यांस होळकर व दत्ताजी शिंदा यांची कुमक येऊन पोंहचल्याचे अगोदरच त्या अहमदशाह अबदालीनें त्यांचा पराभव करून हटविलें, आणि आपल्या लष्कराची बिनी त्यांचे पाठीस लाविली होती. मग दत्ताजी शिंदे व मल्हारराव होळकर आपल्या मराठ्यांच्या कुमकेस येऊन पोंचले, आणि तेथें सुमार पाहूं लागले तों आपली दोघांची फौज तीस हजार, आणि ते अबदालीचे बिनीवाले पाठीस लागून आले त्यांचा मोठा जमाव असें समजून मागें हटले. ते यमुनेच्या पश्चिम कांठीं चालतांना त्यांचें लक्ष

आपल्या समूरच्या बिनीवाल्यांकडेसच असतां दिल्लीजवळ अहमदशाह अबदाली यानें यमुना उतरून एकाएकीं दत्ताजी शिंद्याच्या लष्करावर पडून त्या सैन्याचे दोन हिसे मारून टाकिले, बाकी एक हिसा उरला तो पळून गेला. त्या युद्धांत दत्ताजी शिंदा व त्याचा भाऊ जोतीबा हे दोघे मारले गेले. असें ऐकतांच होळकर आपल्या सेनेसहित लवकर लवकर मागें हटूं लागला तो यमुनेच्या पूर्वेकडे शिकंदरा शहर आहे तेथें पोंहचल्यावर तें स्थळ निर्भय असें समजून राहिला. तथापि त्या ठिकाणींही आफगाणांची एक टोळी आपलें मोठें सैन्य सोडून त्याचे पाठीस लागत फार लांबून आली ती एकाएकीं त्यावर पडली, आणि त्याचा बहुत नाश केला.

६. मागल्या भागीं लिहिलें कीं, पेशव्यास पराजयसूचक कांहीं वर्तमान समजलें तें पुढचे भागीं लिहिलें जाईल. तो प्रकार हा; हें वर्तमान, पेशवा हैदराबादसंबंधें मोठा लाभ मिळवून संतोषेंकरून सदाशिवरावासहवर्तमान मांजरा नदीच्या तीरीं डेरा देऊन राहिला होता, तेथें त्यास समजलें. तेव्हां सदाशिवराव नुकता जय पावला होता, त्यामुळें तो अत्यंत आनंदानें आणि गर्वानें युक्त होत्साता बोलिला कीं, 'मी व विश्वासराव यांस या समयीं हिंदुस्थानांत नेमलें असतां आह्मी गेलेलें यश पुनः मिळवून आफगाण लोकांस अटकेचे पार घालवून देऊं.' असें ह्मणतांच पेशव्यानें त्यास आज्ञा दिली, तेव्हां सैन्य तयार होऊं लागलें. ते समयीं लोकांस असें वाटलें कीं, हे मोठा जय मिळवितील, परंतु ते असें न समजले कीं, हा एवढा मोठा लढाऊ होऊन चालिला, पण यास युद्धाचें कौशल्य किमपि नाहीं; अनायासें जो जय प्राप्त झाला तितक्यानेंच तो गर्वास चढला. त्या सदाशिवरावास एकाएकीं मोठी पदवी प्राप्त होऊन यश आलें. जर लहान कार्येंकरून त्याचा पराजय झाला असता तर तो पुढें सावधपणानें वागता. तस्मात् एकाएकीं मोठ्या पदास चढला जो मनुष्य त्याचें जें अज्ञान तें त्याची सेना व राज्य यांस परम अपायकारक झाल्यावांचून नष्ट होत नाहीं.

७. सदाशिवराव व विश्वासराव यांजबरोबर हिंदुस्थानांत सरदार व फौज गेली तो प्रकार असा; निवडक घोडेस्वार मराठे वीस हजार, व कवाईत शिकविलेले पायदळ गार्दी लोक इब्राहिमखान गार्दी याचे व तोफखान्याचे मिळून दहा हजार, यांखेरीज ते चंबळा नदीचे कांठीं पोंहचले नाहींत तों बाळाजी बाजीरावाचे आज्ञेनें मल्हारराव होळकर व जनकोजी शिंदा व दमाजी गाइकवाड व यशवंतराव पंवार व आपाजीराव आटोळे व अंताजी माणकेश्वर व गोविंदपंत बुंदेले वगैरे सरदार आपआपली सेना घेऊन त्यांस मिळाले; याशिवाय बहुतेक रजपूत राजांनीं

आपआपल्या स्वारांची एक एक टोळी पाठविली; यांखेरीज पेंढारी पुष्कळ होते. सदाशिवरावाबरोबरचे जे सरदार होते त्यांत बळवंतराव गणपत मेहेंदळे व समशेरबहादर व नारो शंकर व विठ्ठल शिवदेव विंचुरकर व त्रिंबक सदाशिव पुरंधरे व कितीएक मराठे कुळांतील मोठे मोठे मानकरी लोक होते; आणि होळकराच्या स्नेहास्तव जाटांचा राजा सुरजमल्ल तो तीस हजार सैन्यासहित येऊन मिळाला. ते समयीं सदाशिव भाऊच्या लष्कराचा सरंजाम असा थाटाचा केला होता कीं, जसा पूर्वीं औरंगजेबानें केला त्याप्रमाणें कांहींसा असे. त्यापूर्वीं मराठे तसा सरंजाम कधीं घेत नव्हते, कामापुरता मात्र घेत.

८. तें लष्कर पुढें चालतें झालें असतां युद्धाविषयीं परम कुशल असा सुरजमल्ल यानें जाणलें कीं, भाऊचे स्वाधीन मोठमोठ्या तोफा व पायदळ बहुत आणि बुणगेंही पुष्कळ यामुळें स्वारांस त्याबरोबर राहावें लागेल, आणि युद्धांत त्यांस अडचण पडेल, ह्मणून त्यानें अशी मसलत केली कीं, मोठ्या मोठ्या तोफा व बुणगें एखाद्या किल्ल्याच्या आश्रयानें ठेवावें आणि आपले व भाऊचे स्वार मिळून पुढें जाऊन त्या अबदालीच्या लष्कराचे आसमंतात् उपद्रव करून त्याच्या धान्यादि साहित्याचा नाश करावा, तेणेंकरून तो आपल्या आपणच मागें हटेल. या मसलतीस होळकरही मिळाला होता, परंतु सदाशिवरावाचा स्नेही रामचंद्रबाबा शेणवी त्याचें व होळकर यांचें वैमनस्य होतें ह्मणून त्या होळकराची सदाशिवरावावर प्रीति नव्हती, यास्तव त्या होळकराची मसलत सदाशिवरावास आवडेना, आणि जाटांचें व होळकरांचें इष्टत्व होतें त्यावरून त्या सुरजमल्लाविषयींही भाऊच्या मनांतून कांहींशी अप्रीति झाली. आणखी त्यानें कवाईत शिकविलेले पलटणी लोक फ्रांसीस लोकांस बहुत उपयोगीं पडलेले पाहिले होते, या सर्व कारणांनीं हट्टास पेटून होळकर आणि जाट यांची अत्यंत हितावह अशी जी मसलत ती न घेतां तो स्वबुद्धीनें वागूं लागला. मग त्यानें त्या लष्करासहित पुढें जाऊन प्रथम तोफांचे मोर्चे लावून दिल्ली घेतली. नंतर पुढें जावें परंतु यमुनेला पाणी बहुत आलें होतें तेणेंकरून पलीकडे जावयाची सोय नाहींशी झाली, ह्मणून तेथेंच डेरा देऊन राहिला. त्या वेळेस त्याच्या मनांत आलें कीं, विश्वासराव यास दिल्लीचा बादशाह करून सुजा उद्दवला यास त्याची वजिरी द्यावी, परंतु त्या समयीं तें काम कांहीं निमित्तेंकरून राहिलें. यानंतर त्या भाऊसाहेबाचें लष्कर बेसुमार व बुणगेंही पुष्कळ यामुळें थोडक्याच दिवसांनीं दिल्लीच्या आसमंतात् धान्यादिकांचा तोटा पडूं लागला आणि भाऊपाशीं द्रव्याचा तोटा पडेल असा सुमार झाला. त्यानें आपल्याबरोबर दक्षिणेंतून येतेसमयीं दोन कोटी रुपये आणिले होते; याशिवाय होळकर व शिंदे व·

गोविंदपंत व रजपूत यांजवळ तीन कोटी रुपये होते; तथापि भाऊस वाटलें कीं, खर्चास तोटा पडेल, याकरितां त्याच्या मनांत आलें कीं, बादशाह याचा दिवाणखाना सोन्यारुप्यानें मढविलेला आहे तो मोडून द्रव्य करावें. त्यावरून होळकर व सुरजमल्ल यांस फार वाईट वाटून त्यांनीं आग्रहानें विनंति केली कीं, 'हें आचरण केवळ अयोग्य आणि नाशकारक होय.' असें बहुतप्रकारें सांगितलें तरी तो ऐकेना. मग त्यानें ती सर्व शोभा नष्ट करून सोनें रुपें जवाहीर काढून घेतलें तरी त्यास फार लाभ न झाला, सारे सत्रा लक्ष रुपये उत्पन्न झाले. त्या भाऊच्या अशा दुष्ट आचरणानें तो सुरजमल्ल आपलें लष्कर घेऊन तेथून निघून चालिला. त्यानंतर त्या लष्करचे रजपूत लोक यांचे मोगलांच्या लष्करांत कोणी स्नेही होते तेही त्यांच्या बोलण्यावरून तें लष्कर सोडून निघून गेले. इतक्यांत अहमदशाह अबदाली लष्करसुद्धां गंगेचे कांठीं येऊन अनूप शहरासमूर डेरे देऊन उतरला. तो तेथें असतां त्यानें सुजा उद्दवला आपणाकडे करून घेतला.

९. मग पर्जन्यकाळ कांहींसा शांत झाल्यावर त्या सदाशिवरावानें शाह अलम नामें दिल्लीचा बादशाह तो ते समयीं तेथें नसतां त्याचा पुत्र मिर्झा जवानबख्त यास तख्ताधिपति करून सुजा[1] उद्दवला त्याचा वजीर असें लोकांस विदित केलें. त्यानंतर नारो शंकरास दिल्लीच्या किल्ल्यांत ठेवून आपण लष्करासहित कुंजपुरा नामें कोणीएक कोट आहे तिकडे गेला. त्यामध्यें पुष्कळ शिपाई लोक व सामान यथास्थित होतें, त्यास तोफा लावून तो कोट पाडून तें स्थान घेतलें. इतक्यांत अहमदशाह त्या ठिकाणच्या लोकांची कुमक करावी, ह्मणून फार उत्सुक झाला, परंतु यमुनेस उतार अगदीं नव्हता ह्मणून निरुपाय झाला, तथापि तो लष्करासहित यमुनेच्या कांठाजवळ जाऊन राहिला. तेथें तह करावयाचें निमित्त करून त्यानें भाऊला बहुत भुलथापा दिल्या. नंतर दिल्लीपासून दहा कोसांवर एक यमुनेंत उतार शोधून काढिला, आणि आपलें लष्कर बहुतेक यमुनेच्या पार उतरून लाविलें. त्या समयीं कोणीं तें वर्तमान भाऊस कळविलें, परंतु त्याचें लष्कर बहुतेक उतरून येई तोंपर्यंत तें भाऊ सत्य मानीना. शेवटीं सन १७६० च्या आक्टोबर महिन्याचे २५ वे तारिखेस ते सर्व मुसलमान लोक यमुनेच्या आलीकडे आले. मग दुसरे दिवशीं प्रातःकाळीं त्या दोहीं लष्करांच्या बिनीवाल्यांचा मोठा युद्धप्रसंग झाला. त्यांत दोघेही आपआपला जय झाला असें ह्मणत होते, परंतु ते दोन्ही पक्ष समा-

---

१. सुजा उद्दवला ते वेळेस अहमदशाह अबदाली याचा पक्षपाती झाला असतांहि तो त्या युद्धांत पहिल्यापासून तहाचें द्वार झाला होता, ह्मणून त्याची प्रीति संपादन करावयासाठीं सदाशिवराव उद्योग करीत असे.

नच असत. ते समयीं मराठ्यांच्या लष्करांत मसलत झाली कीं, 'उद्यां मुसलमान लोकांवर एकाएकीं हल्ला करावा,' परंतु होळकर ह्मणे कीं, 'हें ठीक नव्हे; प्रथम त्यांस अनेक प्रकारें उपद्रव करून त्यांस धान्यादिकांचा तोटा पाडावा.' या मसलतीस तात्काळ इब्राहिमखान गार्दी अमान्य होऊन बोलला कीं, 'ही तुमची मसलत माझें पायदळ व तोफा शत्रूचे हातीं शीघ्र सांपडावयास कारण होईल अशीच आहे. यास्तव जो कोणी या मसलतीस मान्य होईल त्यावर मी तोफांचा भडिमार करीन.' असें त्या इब्राहिमखानाचें बोलणें होतांच तो व होळकर यांचें वितुष्ट मोठें पडलें; तें महाप्रयासानें मिटविलें. तोंपर्यंत मराठ्यांचें लष्कर मागें हटत हटत पानपताप-र्यंत गेलें. तेथें इब्राहिमखानाचे मसलतीनें सदाशिवराव भाऊ यानें आपल्या लष्क-रासभोंवता खंदक पाडिला. तो खोल आठ हात आणि रुंद तेहतीस हात याप्रमाणें केला. ते वेळेस अहमदशाह अबदालीही त्या लष्कराच्या जवळ येऊन उतरला. त्यानें आपल्या लष्करासभोंवतीं मोठीं मोठीं झाडें पाडून आंत शत्रूचा प्रवेश न होई अशी अडचण केली. ते समयीं मुसलमानांचें सैन्य एकेचाळीस हजार आठशें स्वार व पायदळ अडतीस हजार इतकें निवडक सैन्य होतें. याखेरीज स्वतंत्र शिपाई लोक जे त्याच्या पक्षाचे तेही त्या निवडकांखालोखाल होते; त्याशिवाय तोफा सत्तर होत्या. मराठ्यांकडे पंचावन्न हजार स्वार व पंधरा हजार पायदळ आणि दोनशें तोफा; याखे-रीज पेंढारी व बुणगें मिळून दोन लक्ष सुमारें असतील. याप्रमाणें दोन्ही लष्करें बंदोबस्तानें ठाणें धरून राहिल्यानंतर गोविंदपंत बुंदेला यास मोगलांच्या धान्यादि साहित्याचा नाश करावयाकरितां सदाशिवरावानें पाठविलें. तो तेथें जाऊन एका आंबराईत आपण हजार लोकांसहित गुप्त राहून बाकीच्या लोकांकडून तें धान्यादि साहित्य लुटावयाचें काम बहुत युक्तीनें करवीत असतां कोणीएक अहमदशाह अब-दालीचा सरदार येऊन एकाएकीं त्यावर पडून उभयतांची मोठी तोडातोडी होऊन त्यानें गोविंदपंताचें डोकें तोडून अहमदशाह अबदालीकडे पाठविलें, मराठ्यांचा ते वेळेस इतकाच नाश झाला असें नाहीं. त्या गोविंदपंताच्या मरणानंतर कितीएक स्वार दर असामी एकेक रुपयांची थैली घेऊन दिल्लीहून आपल्या मराठ्यांच्या लष्करांत येत होते. ते रात्रीस वाट चुकून आफगाण लोकांच्या लष्करांत गेले. ते त्या लोकांमध्यें शिरतांच त्यांनीं त्यांस मारून तें द्रव्य घेतलें. प्रथम गोविंदपंत बुंदेला मारला गेला त्यापूर्वी मराठे व मुसलमान यांचा तह होईलसा दिसत होता; कां कीं, त्या दोन्ही लष्करचे सरदार येऊन एकमेकांस भेटत होते. मग तो मेल्यानं-तर युद्धाखेरीज उभय पक्षीं दुसरा उपाय नाहींसा झाला. मग तें युद्ध सन १७६० च्या नव्हेंबर महिन्याचे २९ वे तारिखेस सुरू झालें. तो प्रकार असा; मराठे लोक

पंधरा हजार सुमारें मोठ्या धैर्येंकरून अबदालीच्या लष्कराचे डावे बाजूस जेथें अहमदशाह अबदालीचा वजीर ठाणें धरून राहिला होता, त्यावर पडून आपल्या मोठ्या मारापुढें त्यास उभें राहवेनासें केलें. त्यांत त्या अबदालीचे लोक आफगाण दोन हजारांवर मेले गेले. त्यानंतर त्या वजिरास कुमक चहूंकडून आली, ते समयीं मराठ्यांस मागें हटावें लागलें. ते वेळेस त्यांचेही सुमारें हजार लोक मेले गेले. त्या लढाईत मुख्यत्वें होळकर होता. त्या दिवसापासून रोजरोज शिपाई व सरदार यांत ज्यांच्या मनास येईल ते इकडून व तिकडून कोणी बाहेर येऊन लढत, असें नित्यशः डिसेंबराचे २३ वे तारिखेपर्यंत होत गेलें. मग एके दिवशीं त्या अबदालीचा वजीर शाहवलीखान तो आपल्याबरोबर स्वारांची टोळी घेऊन तेथून निघून जवळ एक मशीद होती, तेथें जात असतां त्यास पाहून सदाशिवराव व बळवंतराव मेहेंदळे व विश्वासराव, होळकर वगैरे लष्करसहित कितीएक सरदार यांनीं त्यावर जाऊन पडावयास त्यासभोंवता घेरा घातला; तें पाहून त्याचे कुमकेस अबदालीकडचे लोक व नजीब उद्दवला व दुसरेही कितीएक सरदार येऊन त्यांवर जाऊन पडले, तेव्हां त्या उभयतांचें युद्ध मोठ्या निकराचें झालें. त्यांत नजीब उद्दवला त्या समयीं आपल्या लोकांपेक्षां फार पुढें होऊन लढत होता, तेव्हां बळवंतराव मेहेंदळा त्यावर मोठ्या त्वरेनें जाऊन पडला, ते समयीं त्याजवळचे तीन हजार रोहिले मारिले गेले, आणि तोही मराठ्यांचे हातीं लागतां लागतां इकडे गोळी लागून तो मेहेंदळा मृत्यु पावला. तेव्हां सदाशिवरावास ती मोठी हानि वाटली, त्यायोगें तो फार कष्टी होऊन युद्ध न करितां तें प्रेत माघारें छावणीस नेलें; तेव्हां नजीब उद्दवला यास मागें सरावयाची संधि सांपडली; ते वेळेस युद्ध तसेंच राहिलें. नंतर नित्य नित्य उभयपक्षीं टोळ्यांटोळ्यांचीं युद्धें होत, असें असतां रोहिले लोक व सुजा उद्दवला हे सर्व मिळून एकदांच उठून मोठें युद्ध व्हावें ह्मणून बादशहाजवळ फार आग्रह करीत होते; परंतु तो बादशाह फार शहाणा आणि सावध होता, त्यानें आपल्या लष्करांत धान्य पुरें नाहीं, तथापि मराठ्यांपेक्षां अधिक आहे, असें असून आपले लोक युद्धाविषयीं अधीर आणि मराठे तर फारच उतावळे असें समजून त्याविषयीं दिरंग लाविला. त्याची कल्पना ठीक होती, कीं, मराठे यांजकडील धान्यादि साहित्य अगदीं खर्चून ते पुढें उपाशीं मरणार आहेत. असें असतां कोणेएके रात्रीं त्यांच्या लष्करांतील बुणग्याची टोळी आपल्या बायकांमुलांस अन्न नाहीं याकरितां धैर्येंकरून खंदकांतून पलीकडे उतरली, नंतर पुढें जाऊन ते लोक धान्याचा शोध करीत असतां आफगाण लोकांनीं येऊन त्यांस भोंवता वेढा घालून ते सर्व मारून टाकिले. त्यावर

सर्व मराठे लोक आपापल्या सरदारांस बोलूं लागले कीं, 'आतां आह्मीं एथें उपाशी मरावें हें ठीक नाहीं, आह्मांस या युद्धांत मरूं द्या.' असें त्यांचें बोलणें ऐकून सरदारांनीं भाऊला सांगितलें, तेव्हां त्यानेंही तें मान्य केलें, आणि सांगितलें कीं, 'उद्यां लढाई करावी.' अशी आज्ञा देऊन ते दिवशीं रात्रीस सरकारकोठींत जितका धान्यसंग्रह होता तितका सर्वत्रांस वांटून दिला; कां कीं, इतके दिवस धान्याचा तोटा होता, आतां आज रात्रीं सर्वांनीं स्वस्थ भोजन करून युद्धास सिद्ध व्हावें. मग दुसरे दिवशीं उजेडावयाचे पूर्वीं दोन घटका रात्रीस सन १७६१ च्या जानेवारी महिन्याचे ६ वे तारिखेस सर्व लष्कर सिद्ध होऊन आपले छावणीपासून डावे बाजून निघालें. तें असें; पुढें तोफा व जेजाला व उंटावरचे जंबुरे व बाणदार असें चालतें करून त्याबरोबरच इब्राहिमखान गार्दी व त्याचीं पलटणें, त्यामागून दमाजी गाइकवाडाचे स्वार चालविले, त्यामागून वरकड जे मराठे सरदार त्यांचे स्वार; अशा बंदोबस्तानें ते अबदालीच्या लष्करावर जातेवेळेस मराठे असे दिसत होते कीं, ते लोक केवळ मरणाचाच निश्चय करून जाताहेत. आपण जय पावूं ही गोष्ट त्यांच्या मनांत आहे असें त्यांचें चिन्ह दिसत नव्हतें; कां कीं, त्यांचीं पागोटीं पदर सुटलेलीं, आणि तोंडास व हातास हळद लाविलेली असे ते होते. ते त्यांवर चालून जात असतां तिकडे अबदालीच्या लष्करांत वर्तमान कळलें, ते समयीं बादशाहानें तो शोध घ्यावयास घोड्यावर बसून आपला तळ सोडून अर्धा कोस पुढें जाऊन पाहिलें तंव त्याच्या मनांत आलें कीं, मराठी लष्कर फार बंदोबस्तानें जसें तळ सोडून निघालें तसेंच उभें एथें आहे, असें दिसतें. त्यांत तोफा मात्र पुढें समूर केल्या होत्या, आणि जनकोजी शिंदा तो लष्करचे उजवे बाजूवर होता, आणि इब्राहिम गार्दी तो डावे बाजूवर होता. मग इकडे अबदालीचें लष्कर तयार झालें त्याचा बंदोबस्त असा; त्यांनींही तोफा समूर लाविल्या, आणि त्याच्या लष्कराचे उजवे बाजूस अहमदखान बंगष व रोहिले व कितीएक मोठे मोठे सरदार होते; मध्यभागीं शाह वलीखान वजीर, व आफगाण लोक; व डावे बाजूस सुजाउद्दवला व नजीबउद्दवला. या सर्वांचे डावे बाजूस एक आफगाणांची निवडक टोळी होती, तिचा सरदार शाह पसंदखान नामें होता. या प्रकारें उभयपक्षीं लष्करांचा बंदोबस्त असतां प्रथम परस्परें दोहींकडून तोफा चालू झाल्या, इतक्यांत तीं दोन्हीं लष्करें एकमेकांवर चालून येऊं लागलीं. ते उभयपक्षींचे लोक तोफा टाकून पुढें सरले असतां मराठ्यांनीं एकाएकीं मोठा 'हर हर महादेव' असा शब्द केला, ज्यांची ध्वनि आकाशांत भरली. तेव्हां इब्राहिमखान गार्दी दमाजी गाइकवाडासहित आपल्या समूरच्या रोहिल्यांवर धैर्यानें चालून गेला, ते वेळेस तो

आपल्या डाव्या बाजूनें शत्रूचे लोक येतात, असें पाहून त्यांकडे दोन पलटणें यांचा रोंख दाखवून आपण पुढें सरला; तो रोहिल्यांवर पडून त्यानें आठ हजार रोहिले मारून टाकिले; परंतु त्याचेही अर्धे अधिक लोक मारिले गेले; आणि त्या इब्राहिमखानासही जखमा लागल्या, परंतु जय मिळाला. मध्यभागीं सदाशिवराव होता त्यानें आपल्या समूर मुसलमानांच्या लष्कराचे मध्यभागीं शाह वलीखान होता, त्यावर सैन्यासहवर्तमान मोठ्या वेगानें चाल केली. ते समयीं त्या शाह वलीखानाचे जवळ दहा हजार स्वार होते, त्यांनीं त्या सदाशिवरावावर चालून जावें, तें न करितां ते आपल्या ठिकाणींच उभे राहिले, तेणेंकरून ते स्वार व त्यांतील पायदळ यांचा अगदीं मोड करून मराठे त्यांतून पार गेले. त्यांत मराठ्यांचेही स्वार दोहीं लष्करी लोकांचे धक्काधक्कीनें कितीएक पडले. ते समयीं स्वकीय किंवा परकीय असें त्या उभयपक्षीं लोकांस समजेना, आणि जी धूळ उडाली तेणेंकरून त्या गर्दींत कांहीं दिसेना असें झालें. तेव्हां मराठे व मुसलमान हातघाई करून संपूर्ण एकत्र होऊन आपआपल्यांसच मारूं लागले. ते समयीं कोणी कोणास वळखीना असें झालें. तेव्हां त्यांतील खूण इतकीच कीं, मराठ्यांकडील ‘हर हर महादेव’ आणि मुसलमानांकडील ‘दीन दीन’ असा शब्द होई, तेणेंकरून मात्र वळखून मारीत, पण कोणाचें तोंड कोणास दिसेना. शेवटीं त्या गर्दींत आफगाण लोक कांहींसे मागें हटूं लागले, तें पाहून शाह वलीखान आंगांत चिलखत चढविलेला होता तसाच घोड्यावरून उडी टाकून मोठी आरोळी देऊन बोलिला कीं, ‘हे मित्रहो, तुह्मी पळतां कोठें? तुमचा मुलूख एथून जवळ आहे कीं काय?’ असें बोलून ते लोक आपले बरोबर घेऊन ते समयीं त्यानें आपल्या जिवाचें संरक्षण केलें. याप्रमाणें मुसलमान लोकांचे लष्करच्या मध्यभागची व उजवे बाजूची अवस्था झाली, परंतु त्याची डावी बाजू हालली नव्हती. त्यांतील सरदार शाह पसंदखान यानें चालून जातेवेळेस असें पाहिलें कीं, कदाचित् मोड झाल्यास पाठीमागें यावें लागेल, याकरितां त्यानें जागोजागीं चर खणून मातीच्या वर्वड्या करून भिंतींसारिखे आश्रय जागोजाग करून ठेविले होते. असें असतां बादशाहास लष्करची खबर दोन प्रहरीं कळली तेव्हां त्यानें आपल्या खासगीच्या शिपायांतून निवडक लोक होते त्यांस लष्करचे छावणीचे जागीं पाठवून त्यांस सांगितलें कीं, ‘जे कोणी पळून जाऊन छावणीचे जागीं उभे असतील त्यांस हांकून युद्धास पाठवावें.’ असें सांगून उजवे बाजूचे लोकांचे कुमकेस कितीएक लोक पाठविले, आणि शाह वलीखानास निरोप पाठविला कीं, ‘दहा हजार स्वारांची एकेक टोळी करून मोठ्या वेगानें मराठ्यांचे लष्करच्या मध्यभागावर हल्ला करावा.’

अशी आज्ञा झाली ते समयीं त्यानें तसेंच केलें, आणि त्याचे बरोबर शाह पसंद-खान व नजीबउद्दवला यांनींही हल्ला केला. तो वेग मराठ्यांनीं बहुत वेळ सोसून आफगाण लोकांस कितीएक वेळां मागें हटविलें. शेवटीं हातघाईचे वेळेस ते आफगाण लोक शरीरानें पुष्ट आणि बळकट त्यांपुढें मराठ्यांचा उपाय चालेना, तथापि त्या दिवशीं मल्हारराव होळकर खेरीजकरून मराठे सरदार आप-आपल्या सामर्थ्यानुरूप लढले. आणि मल्हारराव आपल्या शक्तीप्रमाणें न लढला ह्मणून कोणाकोणाच्या मनांत आहे कीं, हा होळकर कांहीं कृत्रिमी आहे.

१०. यानंतर अडीच प्रहर दिवसाचे सुमारें विश्वासराव यास जबर जखम लागली, तें पाहून सदाशिवराव भाऊनें आपल्या हत्तीवरून खालीं उतरून होळ-करास निरोप पाठविला कीं, 'मीं तुह्मांस पहिलें जें सांगितलें होतें तें आतां करावें.' याप्रमाणें सांगून पाठविल्यावर मग तो भाऊसाहेब आपल्या घोड्यावर बसून युद्धाच्या गर्दींत शिरला, तो पाहतां पाहतां लोकांस दिसेनासा झाला. इकडे त्याचा निरोप होळकरास पोंहचला तेव्हां तो रणभूमि सोडून निघाला; त्याजबरोबर दमाजी गाइकवाडही निघाला; ते वेळेस मराठे लोक युद्ध करावयाचें टाकून आपल्या जिवाच्या रक्षणासाठीं पळूं लागले. तेव्हां हजारों शिपाई तरवारीनें तोडले गेले व कितीएक छावणीकडे पळाले. त्यांस गर्दीमुळें त्या ठिकाणांत जावयाची वाट सांपडेना, तेव्हां त्या खंदकांत एकमेकांवर पडून दडपून मेले गेले. त्या ठिकाणा-पासून जवळच पानपत नामें गांव होतें, तेथें त्या मराठी लष्करच्या बायका व मुलें व कितीएक बुणग्यांतील लोक व कितीएक शिपाई एकदांच शिरले, त्या योगें त्या सगळ्या गांवभर दाटी झाली. नंतर दिवस मावळला तेव्हां आफगाण लोक येऊन त्या पानपतासभोंवता घेरा घालून रात्रभर तेथें राहिले. मग प्रातःकाळ झाल्यानंतर सर्व लोक बाहेर काढून त्यांस आफगाणांनीं आपल्या ठिकाणीं नेऊन त्यांतील बायका व मुलें वांटून घेतलीं, आणि पुरुषांच्या दावणी करून त्यांच्या मस्तकांचे ढीग आपल्या डेऱ्यापुढें घातले.

११. अशा निर्दयपणाच्या आचरणानें त्या लोकांची या पृथ्वींत निरंतर निंदा राहिली, व त्या योगें मनुष्यजातीसही बट्टा लागला. कां कीं, असे निर्दय प्राणी मनुष्यांत उत्पन्न होतात इतकें कळलें. नंतर त्या लढाईत विश्वासरावाचें प्रेत सांपडलें, तें अहमदशाह अबदाली यानें पहावयास आपले जवळ आणविलें; ते समयीं त्यास पहावयाकरितां आफगाण लोक मोठा शब्द करीत येऊन बहुत जमले. ते वेळेस त्या लोकांची फार दाटी झाली, त्यांत असा शब्द उठला कीं, 'आमच्या धर्माहून वेगळे जे लोक त्यांच्या बादशाहाचें हें प्रेत, यास्तव आह्मी याला वाळवून

यामध्यें गवत भरून आपल्या काबुलप्रांतीं घेऊन जाऊं.' असें नानाप्रकारें बोलत असतां रोहिले लोक व सुजाउद्दवला यांनीं बादशाहाजवळ अर्ज करून तें प्रेत हिंदूंचे स्वाधीन करविलें, मग तें हिंदूंनीं जाळून टाकिलें. त्या समयीं सुजाउद्दवला यानें जनकोजी शिंदा व इब्राहिमखान गार्दी हे दोघे जखमी होऊन बादशाहाचे कैदेंत सांपडले होते त्यांचाही प्राण वांचवावयाविषयीं अर्ज करावयासाठीं उद्योग केला, परंतु सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां त्या लोकांनीं असें केलें कीं, इब्राहिमखान गार्दी हा असत्यधर्मी लोक यांचा पक्ष स्वीकारून सत्यधर्मी लोकांशीं लढला, हें त्याचें मोठें दुष्कर्म जाणून त्याचा शिरच्छेद केला; शिंदा आणि नजीबउद्दवला या उभयतांचा फार द्वेष होता, यास्तव तोही मारिला गेला. मग त्या रणभूमीच्या एके बाजूस एक शिर कापलेलें धड सांपडलें, तें सदाशिवरावाच्या आकृतीप्रमाणेंच दिसत होतें, त्या समयीं हेंच भाऊचें शरीर असेल असें ह्मणूं लागले; याशिवाय त्या भाऊचें विशेष कांहीं वर्तमान नाहीं. दुसरें, यशवंतराव पंवार लढाईत पडला, परंतु समशेर बहादूर त्या रणभूमींतून जखमी होऊन जिवाच्या भयास्तव पळत असतां त्यास कोणी गांवकरी यांनीं मारिलें. मग विठ्ठल शिवदेव विंचुरकर व दमाजी गायकवाड व नारो शंकर व आणखी कितीएक शिपाई सरदार दिल्लींतून माघारे आपले मुलखीं स्वस्थपणें आले. त्या मराठी लष्करचे जे लोक परत आले त्यांचा सुमार असा आहे कीं, जितके गेले तितक्यांचा चतुर्थांश माघारें आले. याप्रमाणेंच बुणग्याचा प्रकार झाला. यावरून असें वाटतें कीं, त्या भाऊसाहेबाचे लढाईसंबंधें सुमारें दोन लक्ष मराठे लोक मेले गेले. त्यांतून कितीएक लोक पळून सुरजमल्लाकडे गेले, त्यांस त्यानें आपल्या मुलखीं कृपा करून रक्षिलें; ती त्याची कीर्ति अद्यापि मराठे लोकांत आहे.

१२. असा वृत्तांत हिंदुस्थानांत झाला, तें वर्तमान पेशव्यास कांहींसें कळलें, तेव्हां तो आपले खासगीचें सैन्य व दहा हजार सैन्यासहित जानोजी भोंसले यास बरोबर घेऊन हिंदुस्थानांत जावयाकरितां निघाला. तो त्या वर्षाच्या जानेवारीचे मध्यभागीं नर्मदा उतरत होता, तेव्हां त्याच्या लोकांस कोणीएक सावकार याचा जासूद औरंगाबादेस जात होता तो भेटला. त्यानें मराठ्यांच्या पराभवाचें वर्तमान सांगितल्यावरून त्याला पेशव्याजवळ नेलें. तेव्हां पेशवा यानें त्याजवळचे कागद उघडून पाहिले, त्यांत संकेतानें लिहिलें होतें कीं, 'दोन मोतीं गळून गेलीं, आणि सत्तावीस मोहरा सांडून गेल्या, आणि रुपये व खुर्दा किती हरवला त्याची संख्या लागत नाहीं.' यावरून सदाशिवराव व विश्वासराव आदिकरून मंडळीची दशा काय झाली ती पेशवा समजला. त्यानंतर थोडक्याच अवकाशानें त्यास त्या

लढाईतून आलेले लोक भेटले, त्यांत बाबूरावाचा पुतण्या बाळाजी जनार्दन तो प्रथम भेटला, पुढें तोच 'नाना फडनवीस' या नांवानें लोकांत प्रसिद्ध झाला. मग पेशवा त्या अनर्थाचा प्रकार पुरतेपणें समजून घेऊन हळू हळू माघारां पुण्यास येऊं लागला. मग त्या दुःखेंकरून त्याचे बुद्धीस कांहीं अंतर पडलें, आणि त्या दिवसापासून त्याच्या शरीरास दिवसानदिवस असमाधान होत चालिलें. मग त्याच वर्षाच्या जून महिन्याचे अखेरीस तो पर्वतीच्या देवळांत मरण पावला; तें देऊळ त्यानेंच बांधिलें होतें. तो सदाशिवराव भाऊचा अनर्थ सर्व मराठे लोकांस दुःखशोकादिक होण्याचें कारण झाला; मग पेशवाहि मरण पावला, त्या योगें अधिकच अवघड पडलें.



बाळाजी बाजीराव पेशवे.

१३. तो बाळाजी बाजीराव फार योग्यतेस चढला, परंतु केवळ आपल्या सामर्थ्यानें योग्य झाला असें नाहीं; त्याचे अगोदरचे पुरुषांचें कृत्य त्याचे वेळेस शेवटास गेलें. तो राजनीति इत्यादि कामांत निपुण होता, असें त्यास त्याचे लोक ह्मणत, परंतु ही त्यांची चूक होय, कारण बहुधा कुटिल वर्तनास ते लोक बुद्धि असें मानीत; पण असें नव्हे, सत्यतेनें जें वागणें तीच बुद्धि. बाळाजी बाजीरावाचे वेळेस प्रजेला काय काय सुख होतें, तो शोध केला असतां असें दिसतें कीं, मक्त्याच्या मामलतींची चाल मोडली, व कोणी लुटारू आला असतां गांवकरी यांनींच मारावा, असें शिकविलें; तेणेंकरून प्रजा सुख पावली असेल. मग पेशव्यानें प्रांतांत जागोजाग सुभेदार व मामलतदार ठेवून त्यांचे चवकशीवर सरसुभेदारही केले; आणि वसूल जमा करणारांची पाहाणी व्हावी असाही त्यानें बेत ठेविला होता. याशिवाय जो हिशेब देईना त्याचें पारिपत्य करून हिशेब घेत असत. पुण्यांत बाळकृष्णशास्त्री गाडगीळ ह्मणून मोठा कुलीन गृहस्थ होता तो न्यायाधीश केला, त्या योगें शहरचे लोक फार सुख पावले. या सर्व उत्तम रीतींचें मूळ रामचंद्रबाबा शेणवी. तो मेल्यानंतर सदाशिवरावानेंही तसेंच चालविलें. त्या राज्यांत ब्राह्मणांचीं कुळें बहुतेक योग्यतेस आलीं, आणि त्या राज्यांत प्रजाही सुख पावून लोक नानासाहेब पेशवा धन्य प्रभु असें ह्मणूं लागले. ती कीर्ति अद्यापि त्या लोकांत आहे.

# भाग विसावा.

## ( इसवी सन १७६१ पासून सन १७६६ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. माधवराव बल्लाळ पेशवा झाला तें प्रकरण.—२. ताराबाईचा मृत्यु.—३. निझाम अल्ली मराठी लोकांत वैमनस्यें पडलीं अशी संधी पाहून त्यांस जिंकावयाकरितां निघाला.—४. टोंक्याच्या देवस्थानांचा भंग निझाम अल्लीनें केला तें प्रकरण.—५. तो निझाम अल्ली पुण्याजवळ येऊन त्याशीं व पेशव्याशीं तह झाला.—६. रघुनाथराव व माधवराव पेशवे यांचा बिघाड झाल्यामुळें रघुनाथराव औरंगाबादेस गेला, तेथें त्यास मोगलांची कुमक मिळून तो माघारां पुण्यावर येत असतां माधवराव पेशवा आपल्या सुज्ञपणानें त्याच्या स्वाधीन झाला.—७. रघुनाथराव मुख्यत्व पावला असतां त्याच्या अनुचित आचरणेंकरून मोठमोठ्या लोकांचीं मनें विटलीं, तेणेंकरून ते कितीएक जाऊन मोगलास मिळाले.—८. त्यावर मोगल ब्राह्मणाचें राज्य बुडवावयास उद्युक्त झाला.—९. मोगलानें पुण्यास येऊन तें शहर लुटून तेथच्या कितीएक घरांचा खंड घेऊन कितीएक घरें जाळिलीं.—१०. शेवटीं रघुनाथराव चांगला समय पाहून मोगलाच्या लष्कराचा अगदीं पराभव करिता झाला.—११. नंतर औरंगाबादेस पेशवे आणि मोगल यांचा तह झाला.—१२. हैदर अल्लीचा उत्कर्ष.—१३. माधवराव फार युक्तीनें त्या हैदराचा पराभव करिता झाला.—१४. पेशवा व निझाम अल्ली मिळून जानोजी भोंसला याशीं युद्ध करून दिलेला मुलूख त्यापासून बहुतेक माघारां घेते झाले.

१. सन १७६१ च्या सप्तेंबर महिन्याचे अखेरीस रघुनाथराव यानें आपला पुतण्या बाळाजी बाजीरावाचा दुसरा पुत्र माधवराव यास बरोबर घेऊन सातार्‍यास जाऊन राजापासून त्या मुलाचे नांवें पेशवाई संपादिली; ते समयीं त्या माधवरावाच्या वयास सत्रावें वर्ष होतें.

२. त्या पुढें तीन महिन्यांनीं ताराबाई मृत्यु पावली; ते वेळेस तिचें वय शायशीं वर्षांचें होतें. तिनें रामराजा कैदेंत ठेवला, तो त्या दिवसापासून तसाच होता. ती ताराबाई मरणपर्यंत बाळाजी बाजीराव पेशवा व सदाशिवराव भाऊ यांचा द्वेष करीत होती. ती मरणसमयीं बोलली कीं, 'हे दोघे दुर्दशा होऊन मेले, तेणेंकरून माझे मनोरथ पूर्ण झाले.'

३. बाळाजी बाजीराव मेला, हें वर्तमान सलाबतजंग व निझाम अल्ली यांस बेदर मुकामीं कळलें; तेव्हां निझाम अल्ली तो आपणास दिवाण ह्मणवी, आणि सलाबतजंग यास नांवाचा मात्र धनी असें करून आपण सर्व राज्यसुखाचा अनुभव घेत होता. तेव्हां तो समजला कीं, 'मराठ्यांनीं आपला मुलूख घेतला आहे, तो या समयीं सोडवावयाविषयीं सुलभ पडेल;' ह्मणून त्यानें कांहींएक निमित्त करून औरंगाबादेच्या आसमंतात् मोठी फौज जमा केली. ही त्याची कल्पना खरीच होती, कां कीं, त्यापूर्वीं चाळीस वर्षें त्यास अशी संधी सांपडली नाहीं. तो

प्रकार असा; पानपतचे लढाईंत मराठे पराभव पावले, त्यामुळें ब्राह्मण व मराठे मोठे मोठे सरदार एकमेकांत परस्परें त्या नाशाचें कारण कल्पून भांडूं लागले, त्या योगें आपआपणांत फार वैमनस्यें पडलीं; आणि रघुनाथराव तो आपला पुतण्या माधवराव पेशवा याचें वय लहान ह्मणून राज्यकारभार आपण चालवीत असे. त्या वेळेस त्यापाशीं सैन्य त्या निझाम अल्लीच्या निवारणास पुरे असें नव्हतें. हें वर्तमान त्यास कळतें तर तो मोठा लाभ पावता, परंतु तें त्याला पुरतेपणें समजलें नव्हतें.

४. याशिवाय त्यानें दक्षिणेंत येऊन प्रथम टोंक्यामध्यें हिंदूंचीं देवस्थानें होतीं तीं फोडलीं, तेव्हां त्याचे मुसलमान लोक व तो असें समजला कीं, 'हें आह्मीं केलेलें कर्म ईश्वरास संतोषकारक झालें.' परंतु तेणेंकरूनच त्या निझाम अल्लीचा नाश झाला. कां कीं, त्याचे लष्करांत रामचंद्र जाधव वगैरे हिंदू सरदार जे त्याचे चाकरीस होते, ते रुष्ट होऊन बहुतेक त्यापासून निघून गेले; आणि पेशव्याकडे जाऊन राहिले. त्यांनीं मीर मोगल नामें निझामउल्मुल्काचा कनिष्ठ पुत्र होता तोही बरोबर नेला.

५. त्यानंतर निझाम अल्लीचें लष्कर पुण्यावर येऊं लागलें; त्याचें निवारण करण्याविषयीं दिवसानदिवस मराठ्यांचा उद्योग वृद्धिंगत होत गेला. शेवटीं तो पुण्याजवळ एका मजलेवर आला, तेव्हां त्याचें पहिलें मानस होतें कीं, मराठ्यांपासून आपला सर्व मुलूख सोडवावा, तें टाकून इतकें मात्र केलें कीं, बेदर व औरंगाबाद यांपासून सत्तावीस लाख रुपये मराठे घेत होते ते त्यांनीं घ्यावे. त्यावर निझाम अल्ली बेदराकडे मागें गेला, तो तेथें जाऊन त्यानें आपला भाऊ सलाबतजंग तो सन १७६२ च्या जुलई महिन्यांत कैद करून त्यापुढें पंधरा महिन्यांनीं जिवें मारून टाकिला. अशी जी त्यानें बंधुहत्या केली ती व्यर्थ केली असें दिसतें; कां कीं, सलाबतजंग केवळ गरीब होता, त्याच्या हातून किमपि नाश झाला नसता.

६. ते मुसलमान लोक पुण्यापासून दूर गेल्यावर सदाशिव चिमणाजी भाऊ याचा मामा त्रिंबकराव तो दक्षिणेंतील वसूल जमा करून माघारां पुण्यास आला; नंतर माधवराव पेशवा आपला चुलता रघुनाथराव यास ह्मणूं लागला कीं, 'तुह्मीच सर्व कारभार करितां, यांत कांहीं माझा भाग असावा; तेव्हां त्या उभयतांचा वाद पडला.' मग तो रघुनाथराव व सखाराम बापू वगैरे जे मुख्य कारभारी होते, त्यांस पेशवा श्रेष्ठ मानीत असे, यावरून ते आपल्या मनांत समजले कीं, 'आपणावांचून कारभार चालणार नाहीं,' ह्मणून ते सारे क्रुद्ध होऊन कारभार सोडून आपले घरीं स्वस्थ बसले; आणि दुसरें समजले कीं, 'आह्मावांचून कामांत अडचण पडूं लागली ह्मणजे हा आपणच

आमचें आर्जव करूं लागेल.' परंतु माधवरावानें त्यांचें आर्जव न करितां त्रिंबकराव मामास तात्काळ जवळ बोलावून आणून दिवाणगिरीचें काम त्यास सांगितलें, तेव्हां त्यानें गोपाळराव गोविंद पटवर्धन मिरजकर याचें साहाय्य घेऊन कबूल केलें. तें सर्व समजून रघुनाथराव व सखाराम बापू यांच्या मनांत त्या मामाविषयीं हेवा व द्वेष उत्पन्न झाला. त्यावरून रघुनाथराव पुणें सोडून नाशिकास गेला. मग तो तेथून पुढें औरंगाबादेस जाऊन त्या शहरचा मुख्य अधिकारी मुरादखान होता, त्यानें त्याचा मोठा सन्मान करून त्यास मोगलांची कांहीं फौज दिली; त्यानंतर त्याला मराठेही पुष्कळ जाऊन मिळाले. त्यावर तो पुण्यास येऊं लागला, तेव्हां त्याच्या लष्कराची आणि माधवराव पेशव्यांच्या लष्कराची गांठ पुणें व अहमदनगर यांचे मध्यभागीं पडली, ते समयीं पेशव्याचें लष्कर रघुनाथरावाच्या लष्करापेक्षां फार कमी असें समजून ते लोक त्यांशीं युद्धास उभे राहिले नाहींत. त्या वेळेस त्या रघुनाथरावाचे कुमकेस निझाम अल्लीही येत होता, आणि वराडांतून जानोजी भोंसलाही सेनेसहित पुण्याकडे येऊं लागला होता, परंतु तो कोणाचा पक्ष स्वीकारील तें समजलें नाहीं. हें सर्व जाणून माधवराव यानें परम दक्षतेनें व शहाणपणेंकरून मनांत निश्चय केला कीं, या समयीं आपण काकाचे स्वाधीन व्हावें. मग आपल्या बरोबरच्या लोकांस सांगितलें कीं, 'तुह्मी आपआपले प्राणसंरक्षणास पाहिजे तिकडे जावें.' नंतर आपण जाऊन काकास भेटून त्याच्या समूर उभा राहून बोलिला कीं, 'आपल्या राज्यांत विभाग व कलह नसावा, याकरितां मी तुमचे स्वाधीन झालों.' तेव्हां रघुनाथरावानें त्यास बंदींत ठेविलें, परंतु त्याचा असा मान रक्षिला कीं, तो बंदींत असतांही त्याची जेवढी प्रतिष्ठा होती, तेवढी पुढें रघुनाथराव मोठी योग्यता मिळवून निरंकुशपणें मोठे पदवीस चढला तरी त्यास मिळाली नाहीं. यानंतर मोगलांनीं कुमक केली, यास्तव रघुनाथरावानें कबूल केलें होतें कीं, 'दौलताबाद व शिवनेरी व आशीरगड व अहमदनगर व एकावन्न लक्ष रुपये प्रतिवर्षीं उत्पन्न होत असा मुलूख देईन.' त्याप्रमाणें त्यांस द्यावयाची तात्काळ आज्ञा दिली; परंतु तें त्यांचे स्वाधीन झालें नाहीं तों मध्येंच कांहीं निमित्त उत्पन्न झालें, तो प्रकार पुढें लिहिण्यांत येईल. ते वेळेस तर मोगलास दौलताबाद मात्र दिली. मग निझाम अल्ली पारगांवीं येऊन रघुनाथराव यास मिळाला, तेव्हां त्याला समजलें कीं, हे चुलते पुतणे एक झाले, त्यावरून त्यानें असें दर्शविलें कीं, 'हें तुमचें ऐक्य पाहून मी संतुष्ट झालों.'

---

१. रघुनाथरावाच्या मनांतील द्वेष वाढावयाचें कारण आनंदीबाई, ती रघुनाथराव याची स्त्री. माधवरावाच्या मनांतील द्वेष वाढावयास कारण गोपिकाबाई, ती त्याची मातुश्री, तिचा तो माधवराव पुत्र.

७. याप्रमाणें रघुनाथरावाची सत्ता झाल्यावर त्यानें सखाराम बापू व नीळकंठ महादेव पुरंदरे हे दोघे आपले मुख्य कारभारी केले. त्या वेळेस जगजीवनराव प्रतिनिधीचा पुतण्या श्रीनिवासराव तो प्रतिनिधि असतां त्यास दूर करून रघुनाथरावानें आपला पुत्र भास्करराव तो फार लहान बाळक होता त्यास प्रतिनिधि करून नारो शंकर हा त्याचा मुतालीक केला; आणि कान्होजी मोहिते यांस 'सरलष्कर' पदवी दिली. पेशव्याचे फडणवीस बाळाजी विश्वनाथापासून भानूच्या कुळांतले झाले, त्यांतील मोरोबा बाबूराव भानू यापासून ती फडनविशी घेऊन चिंतो विठ्ठल यास दिली. याप्रमाणें रघुनाथरावानें प्रतिनिधि आदिकरून नवे केले, तेणेंकरून तो थोरांच्या मनांतून उतरला. असें असतांही आपला पूर्वीचा सूड उगवावयासाठीं गोपाळराव पटवर्धन याचा किल्ला मिरज लढून घेता झाला, त्या योगें मोठमोठ्या लोकांचें मन फारच विटलें. मग गोपाळराव पटवर्धन व जे त्या रघुनाथरावापासून दुःख पावलेले सरदार ते निझाम अल्लीचा वजीर विठ्ठल[1] सुंदर याच्या बोलण्यावरून निझाम अल्लीस जाऊन मिळाले. त्यांत रामचंद्र जाधवही होता, तो धनाजीचा नातू; त्यास रघुनाथरावानें सेनापतित्व दिलें असतांही गुजराथेच्या आधिपत्याविषयीं त्याला इच्छा होती, त्याप्रमाणें तें न मिळालें ह्मणून तो तिकडे गेला. मग त्या मुरादखानानें केलेला पारगांवचा तह मोडून मराठे लोक व मुसलमान लोक पुनः सन १७६३ त युद्धाचा प्रसंग करिते झाले.

८. ही एवढी घटना होईलशी त्या रघुनाथरावाची अटकळ झाली नाहीं, ह्मणून त्यानें युद्धाची तयारी केली नव्हती. त्या वेळेस माधवराव बंदींत असतांही त्यानें आपल्या शक्तीप्रमाणें काकाची कुमक केली; आणि मल्हारराव होळकर व दमाजी गाइकवाड हे दोघे रघुनाथरावाकडेस होते; असें असतांही तें लष्कर मुसलमानांच्या समूर लढावयाजोगें नव्हतें. ह्मणून त्या लोकांच्या समूर युद्धास गेल्यासारिखें भासवून मग एकीकडे जाऊन मोगलांचें लष्कर आपल्या पाठीमागें टाकून औरंगाबादेस जाऊन त्या शहराचे तटास शिडी लावून आंत शिरावयाचा उद्योग केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. नंतर तो निझाम अल्ली पाठीस लागला असा पाहून वराडप्रांतीं जाऊन जानोजी भोंसल्याचा मुलूक लुटतां लुटतां मलकापुराची खंडणी साठ हजार रुपये घेतली. त्यानंतर मोगलांच्या प्रांतीं जाऊन फार नाश केला. ते समयीं तो निझाम अल्ली त्या रघुनाथरावाचे पाठीस लागून

---

१. विठ्ठल सुंदर यजुर्वेदी ब्राह्मण होता, त्यास निझामानें आपला भाऊ बंदींत घातला ते समयीं दिवाणगिरी दिली. पुढें मुरादखानाच्या योगें मराठे व मुसलमान यांचा तह झाला, तेव्हांपासून तो विठ्ठल सुंदर त्या मुरादखानाच्या हेव्यास्तव पुनः नवें युद्ध उत्पन्न करायास उद्युक्त झाला होता.

बहुत वेळ झाल्यावर समजला कीं, हा आपल्या हातीं लागत नाहीं; तेव्हां तो सूड उगवावयास त्यानें निश्चय केला कीं, पुण्यास जाऊन तें शहर अगदीं लुटून जाळून टाकावें. हें वर्तमान रघुनाथरावास कळलें ते समयीं त्यानेंही तो सूड घ्यावयासाठीं हैदराबाद जाळावयाची मसलत केली, आणि तो तिकडे चालिला.

९. पुण्यांतील लोकांस वर्तमान कळलें कीं, मोगल पुणें शहर जाळावयास येतो, तेव्हां तेथचे बहुतेक लोक आपलीं घरें टाकून आपल्या सामर्थ्याप्रमाणें संसारखटलीं घेऊन डोंगरी किल्ल्यांतून व कोंकणांत जाऊन राहिले. मग निझाम अल्ली येऊन पुण्याजवळ उतरला; नंतर ज्या ज्या घरांची खंडणी त्यास न मिळाली तीं तीं घरें कांहीं मोडलीं व कांहीं जाळिलीं. मग पुरंदराकडे जाऊन भीमानदीपर्यंत मुलूख उद्ध्वस्त केला. त्यानंतर पाऊसकाळ जवळ आल्यामुळें तो बेदरास जाणार होता, परंतु जानोजी भोंसल्याचे मसलतीनें औरंगाबादेस जावयास नेम ठरला.

१०. इकडे रघुनाथराव हैदराबादेस गेला, तेव्हां त्या शहरासभोंवता तट होता; त्याजमुळें तें शहर घेतां येईना, तेव्हां बाहेरच्या पेंठेची खंडणी एक लक्ष ऐशीं हजार रुपये घेतली. मग हैदराबाद सोडून निझाम अल्लीचें काय वर्तमान आहे तो शोध घ्यावयास आला; त्यानें त्या वेळेस निझाम अल्लीकडचे जे मराठे सरदार होते, त्यांशीं कांहीं बोलणें करून सुमार पाहिला कीं, जो त्यांजकडील मराठ्यांतील मुख्य जानोजी तो आपलेकडचा होईल, कां कीं, तो निझामास मिळाला ते समयीं जसा त्याचा मनोरथ होता त्याप्रमाणें त्यास लाभ झाला नाहीं. तेव्हां रघुनाथरावानें 'प्रतिवर्षीं तुह्मास बत्तीस लक्ष रुपये देऊं,' असें कबूल करून तो समयीं आपल्या पक्षाचा होईलसा करून ठेविला. मग मोगलसहित निझाम अल्ली औरंगाबादेस जात असतां तीन चार मजली तो त्याचे पाठीमागें होता, तो गोदावरीस जाऊन पोंहचला, ते समयीं आपण व बहुतेक लोक मिळून पलीकडे उतरून गेला, तेव्हां आलीकडे आपला दिवाण व कांहीं लोक राक्षसभुवन गांवाजवळ तो सर्व खटला उतरून पार जाई तोंपर्यंत ठेविले. ते वेळेस जानोजी भोंसला आपले फौजेस कांहीं दरमहा न पोंहचल्याचें निमित्त करून त्या दिवाणास सोडून त्यापासून कांहीं अंतरानें उतरला. तें वर्तमान रघुनाथरावास कळलें, तेव्हां तो समजला कीं, हें चिन्ह आपणास हितावह आहे. त्यावरून तो मोठमोठ्या मजला करून अकस्मात् मोगलांच्या लष्करावर जाऊन पडला, तेथें मोठ्या निकराचें दोन दिवस युद्ध[1] होऊन त्यांत मोगल लोक बहुतेक मेले गेले; त्यांत दिवाणही मृत्यु पावला. त्या प्रसंगीं माधवराव होता, तो आपल्या शौर्येंकरून व सावधपणानें आणि चातुर्येंकरून

१. त्या युद्धास मराठे 'तांदुळज्याचें युद्ध' म्हणतात.

मोठा विख्यात झाला. ते समयीं निझाम अली गोदावरीचे पलीकडे होता, त्याच्यानें त्या दिवाणास कुमक करवेना; तेव्हां त्याच्या लष्कराचा नाश पाहून आपण औरंगाबाद शहरांत शिरला, त्याचेही पाठीस मराठे लागून त्यांनीं औरंगाबादेवर पुनः हल्ला केला, तेव्हांही त्यांचे लोक फार मेले गेले, परंतु अर्थ सिद्धीस गेला नाहीं.

११. त्यानंतर निझाम अली फार पश्चात्ताप पावल्याच्या आकारेंकरून रघुनाथरावाचे भेटीस आला, आणि आपण जें कृत्य केलें तें सर्व दिवाणानें करविलें, असें रघुनाथरावास समजावून त्याचें मन असें सुप्रसन्न केलें कीं, त्यानें जानोजी भोंसल्यास जो बत्तीस लक्ष रुपये उत्पन्न होतसा मुलूख देऊं केला होता, तो वजा करून बाकीचा एकावन लक्ष रुपये उत्पन्नाचा जो पूर्वीं लावून दिलेला मुलूख होता, त्याचे भरतीचा एकुणीस लक्षांचा राहिला, तो द्यावयास सिद्ध झाला; परंतु त्याच्या कारभारी लोकांनीं हें ठीक नव्हेसें समजाविलें, त्यावरून त्यानें त्यास दहा लक्ष रुपये उत्पन्नाचा मात्र दिला. याप्रमाणें पूर्वींच्या करारापैकीं नऊ लक्ष रुपयांचा मुलूख दिला नाहीं. तो पेशव्यास लाभला. मग त्या निझाम अलीशीं आणि पेशव्याशीं अकटोबर महिन्यांत नवा तह झाला. ते समयीं जानोजी भोंसल्यास बत्तीस लक्षांच्या मुलखाची सनद देतांना माधवराव त्यास बोलिला कीं, 'तूं आपल्या वडिलांचें महत्व जेणेंकरून वाढलें, असें जें मराठ्यांचें राज्य, तें बुडवावयाचें कृत्य केलेंस, आणि निझामाचा आश्रय संपादिलास; मग त्याचाही घात केलास.' याप्रमाणें त्यास निषेधून कराराप्रमाणें सनद दिली. त्या वेळेस भास्करराव प्रतिनिधि मरण पावला, तेव्हां ती जागा भवानराव प्रतिनिधि यास पुनः प्राप्त झाली; आणि गोपाळराव पटवर्धन यास मिरजेचा किल्ला रघुनाथरावानें पुनः माघारां दिला; तेच समयीं मोरोबा फडनवीस याचा अधिकार त्यास न देतां त्याचा चुलत भाऊ बाळाजी जनार्दन भानू यास तो अधिकार दिला.

१२. पूर्वीं म्हैसूरचें वर्तमान लिहिलें त्यांत हैदर अलीचा प्रकार आला. तो हैदर कोणे प्रकारें विख्यात झाला तो विस्तार असा; मराठे लोक पानपतच्या लढाईला दक्षिणेहून उत्तरेस गेले, ते समयीं बसालतजंग आपणास स्वतंत्रपणें राज्य मिळवावयास हाच उत्तम समयसा जाणून कर्नाटकांत गेला, आणि तेथच्या हैदर अलीशीं स्नेह केला. नंतर त्या बसालतजंगानें कांहींएकही मुलूख घेतला नाहीं तोंच त्या हैदर अलीनें तो शेराप्रांतींचा नबाब केला. मग ते दोघे बरोबर जाऊन हुस्कोटा व शेरा व बडा बाळापूर इतकीं घेतलीं. नंतर बसालतजंग यानें आपला भाऊ निझाम अली याच्या भयास्तव हैदर अली याची संगत सोडिली, आणि

आंदोणी नामें आपलें राहावयाचें पहिलें ठिकाण तेथें गेला; परंतु हैदर अल्ली त्यासारखा न भिऊन तेथेंच राहिला; आणि तें राज्य आणखी साधावयास उद्युक्त झाला. मग त्यानें कितीएका पाळेगारांपासून खंडणी घेऊन बेदनूर प्रांत आपल्या सत्तेंत आणिला. त्यापुढें सन १७६४ त त्यानें सावनूरचा नबाब जिंकिला. मग कांहीं कारणानिमित्त त्या हैदराला बेदनुरीं जावें लागलें; ह्मणून तेथें एक सरदार ठेविला, त्यानें धारवाड घेतलें, आणि हैदराचें ठाणें कृष्णातीरानजीक बसलें.

१३. तो हैदर अल्ली असा पराक्रम करीत असतां मराठे उगेच बसले नाहींत. त्यांनीं त्याचा उत्कर्ष आपल्या नाशास कारण असें समजून सन १७६४ त पुण्यामध्यें मोठें सैन्य जमा केलें, मग मे महिन्यांत ती फौज घेऊन माधवराव कर्नाटकांत शिरला. ते समयीं हैदर अल्लीचें लष्कर मोठें बळकट स्थळ करून अन्नवतीनामक जाग्यावर छावणी करून राहिलें होतें. माधवराव आपल्या सैन्यासुद्धां तेथून पुढें दुसरी एक युद्धाचे उपयोगी अशी बळकट चांगली जागा पाहून राहिला. त्या हैदराजवळ वीस हजार घोडेस्वार व पायदळ चाळीस हजार होतें, त्यांत वीस हजार कवाईत शिकविलेले पलटणी लोक असत. तेथें मराठ्यांचें लष्कर जवळ जाऊं लागलें, तेव्हां त्या मराठी लोकांनीं मसलत केली कीं, ‘याचें ठाणें बळकट आहे यास्तव समूर जाऊन लढूं नये. अगोदर त्यानें वर्धानदीचे उत्तरेस ठाणीं बसविलीं आहेत तीं उठवावीं, ह्मणजे तो बाहेर निघून मोठी लढाई झाली असतां त्यांत आपलें हित होईल.’ तें ऐकून त्या हैदरानें मसलत केली कीं, ‘आपण ठाणें सोडून जातों, असें दाखवून बाहेर निघून मराठे आंगावर आले असतां मागें हटून त्यांस पुरते आंगावर घेऊन एकदांच हल्ला करून मारून टाकावें.’ अशी कल्पना करून तो त्याप्रमाणें उद्योग करूं लागला. मराठेही ते समयीं तो त्याचा संपूर्ण मतलब जाणून आपण भितों असें दाखवून मागें मागें हटूं लागले. याप्रमाणें करतां करतां यांनीं त्यास पुरता आपल्या आंगावर घेऊन मग एकाएकीं त्याच्या लष्करासभोंवतीं आपले स्वारांची दाटी करून त्याचा बहुत नाश केला. तो असा कीं, शेवटीं त्याला आपलें पहिलें ठिकाण अन्नवतीजागची छावणी मोठ्या प्रयासेंकरून प्राप्त झाली. असा हैदर अल्लीचा पराभव झाल्यानंतर मुरारराव घोरपडा पेशव्यास जाऊन मिळाला. त्या मुराररावाचा मूळ पुरुष संताजी घोरपडा त्याचें स्वरूप रामराजा याच्या वेळेस अनीतीमुळें प्रकट झालें नाहीं, यास्तव या समयीं त्याचा वंशज मुरारराव जाणून सेनापतीची पदवी यास द्यावी हें सुनीतीस योग्य असें ठरून तो मुरारराव घोरपडा सेनापति केला. यानंतर तें युद्ध समाप्तीस जाऊन मराठे यश पावतील, असें निश्चित समजलें असतांही माधवरावानें आपल्या काकास निरोप

पाठविला कीं, आपण येऊन हें काम शेवटास न्यावें.' यांत त्या माधवरावाची परम सुशीलता प्रकट झाली; परंतु ती राजनीति नव्हे, कां कीं, आपणास यश येत असतां त्याचा अधिकारी दुसऱ्यास करणें हें साधुमार्गास फार योग्य आहे, आणि राजास तर अहितच; असा त्या माधवरावाचा निरोप गेल्यावर तो रघुनाथराव येऊन त्यास मिळाला, ते वेळेस तें लष्कर वर्धानदी उतरून पलीकडे जाऊं लागलें. असें सन १७६६ त घडलें. तें मराठ्यांचें लष्कर वर्धानदीपलीकडे जाऊन अन्नवतीसमीप दाट रान होतें, तें तोडून आपणास तिकडे जावयाची मोठी वाट करून हैदर अल्लीचें लष्कर व बेदनूर यांच्या मध्यभागीं ठाणें घालावयाचा बेत करीत होतें. तें वर्तमान हैदरास कळतांच तो मोठ्या त्वरेनें बेदनुराकडे जाऊं लागला. त्या समयीं मराठे तो मुलूख झाडीमुळें आंत शिरावयास फार कठीण ह्मणून हैदराच्या लष्करास दोन दिवस फारसा उपद्रव न देतां यथाशक्ति कांहींशी खटपट करीत राहिले. मग तिसरे दिवशीं मैदान मुलूख लागला तेव्हां मराठ्यांच्या लष्कराची एक टोळी त्याच्या लष्करापलीकडे जाऊन बेदनुराच्या अलीकडे अगोदरच उभी राहिली होती, तेथें जाऊन पोंहचला, ते समयीं त्या हैदरास युद्धाविषयीं उभें राहणें प्राप्त झालें. तेव्हां मराठे त्यावर मोठ्या वेगेंकरून हल्ला करूं लागले असतां हैदर अल्ली याचे बहुतेक लोक रानांतून पळून गेले. मग दहा हजार पायदळ व अडीच हजार स्वार इतक्या फौजेनिशीं तो बेदनुरास पोंहचला. त्याचे पाठीमागून मराठेही मुलूख घेत घेत गेले. शेवटीं रघुनाथराव यानें हैदराकडून कबूल करविलें कीं, 'पेशव्यास बत्तीस लक्ष रुपये द्यावे, व घोरपडे याचा मुलूख त्यानें घेतला होता तो त्यास माघारां द्यावा; याशिवाय सावनुरच्या नबाबापासून खंडणी वगैरे कांहीं घेऊं नये.' असा तह रघुनाथराव यानें केला, तो माधवराव याच्या मनास आला नाहीं; परंतु त्यावर सर्व कारभार सोंपविला होता, ह्मणून त्या वेळेस त्याला किमपि प्रतिकूळ न बोलतां त्याचे दुसरे वर्षीं फेब्रुवारी महिन्यामध्यें तो माधवराव कर्नाटक सोडून कृष्णेपलीकडे गेला.

१४. मग त्याच वर्षीं निझाम अल्ली व पेशवा हे दोघे एकचित्त होऊन वराडास जाऊन जानोजी भोंसला याशीं युद्ध करून तो अगदीं नम्र केला, आणि त्यानें पेशव्याशीं व निझाम अल्लीशीं दगलबाजी करून मुलूख संपादिला, तो बत्तीस लक्षांचा होता, त्यापैकीं त्याला चौथाई ठेवून बाकी सर्व घेतला. त्यांतून पंधरा लक्षांचा मुलूख माधवरावानें निझाम अल्लीस दिला, तो त्याचे मैत्रीसाठीं दिला, असें पुण्याचे बखरींत लिहिलें आहे, परंतु असें दिसतें कीं, कर्नाटकीं आपण स्वारी करून हैदर अल्लीला जिंकणार त्या कार्यास निझाम अल्लीनें सहाय व्हावें,

ह्मणून माधवरावानें त्याशीं गुप्तपणें कांहीं बोली केली, त्यावरून पंधरा लक्षांचा मुलूख दिला, त्यांतही तो संबंध असेल.

---

## भाग एकविसावा.

### (इसवी सन १७६६ पासून सन १७७२ पर्यंत झालेलीं वर्तमानें.)

१. इंग्लिश सरकार कंपनी बहादुर या नामाचें अर्थसूचन, व त्या इंग्लिश लोकांनीं हिंदूंच्या मुलखीं कोण निमित्तें प्रथम प्रवेश केला तें प्रकरण.—२. पुढें त्यांनीं आपल्या रक्षणार्थ राजमंद्री घेतली.—३. मग त्यांशीं आणि निझाम अल्लीशी स्नेह पडला ती गोष्ट.—४. माधवराव पेशवा कर्नाटकीं जाऊन तेथच्या खंडणीचें बहुत द्रव्य घेऊन माघारां पुण्यास आला.—५. रघुनाथरावानें हिंदुस्थानांत स्वारी केली तें व मल्हारराव होळकर याचा मृत्यु. रघुनाथराव गोहदच्या राण्याचें स्थान घ्यावयास गेला तो तेथें सिद्धि न पावतां माघारां पुण्यास आला. —६. रघुनाथरावाचा पुतण्या माधवराव पेशवा याविषयीं त्याच्या मनांत कांहीं अविश्वास उत्पन्न होऊन तो होळकर व दमाजी गाइकवाड व जानोजी भोंसला यांच्या साहाय्यानें युद्धें करून सर्व राज्य आपणास इच्छिता झाला.—७. मग मोठा युद्धप्रसंग होऊन रघुनाथराव माधवरावाचे कैदेंत सांपडला तो प्रकार.—८. माधवराव व निझाम अल्ली एकचित्त होऊन जानोजी भोंसल्याचे मुलखीं गेले. तो त्यास शरण आल्यावर पेशव्यांस हितावह असा जानोजीशीं तह झाला तो विस्तार.—९. माधवराव यानें कर्नाटकांत जाऊन हैदर अलीचा बहुत मुलूख घेतला.—१०. मलवगळचा किल्ला घेतेसमयीं घाडगेकुळाच्या दोहों तक्षिमांचा पुरातन वाद पुनः उत्पन्न झाला ती कथा.—११. कर्नाटकांत माधवराव आपलें लष्कर त्रिंबकराव मामाच्या स्वाधीन करून आपण माघारां पुण्यास आला.—१२. त्या त्रिंबकराव मामानें हैदरास जिंकून त्याशीं तह केला.—१३. पानपतचे लढाईनंतर हिंदुस्थानांत काय काय वर्तमानें झालीं त्यांचा विस्तार.—१४. दिल्लीच्या बादशाहानें इंग्लिशांचा आश्रय धरिला.—१५. जाटांचा राजा सुरजमल्ल याचा मृत्यु.—१६. विसाजी कृष्ण सैन्यासहित हिंदुस्थानांत गेला.—१७. नजीबउद्दवला यानें मराठ्यांशी तह केला.—१८. दिल्लीचा बादशाह इंग्लिश लोकांचा आश्रय सोडून मराठी लोकांकडे गेला.—१९. सुजाउद्दवला व रोहिले मिळून ते मराठे लोकांस मुलखांतून बाहेर घालवावयास सिद्ध झाले. —२०. दिल्लीचा बादशाह दक्षणी ब्राह्मणांच्या अतृप्त स्वभावास कंटाळून त्यानें आपल्या सरदारांला सर्व मराठे हांकून द्यावयास सांगितलें.—२१. माधवराव पेशवा याचा मृत्यु, व त्याचे गुणांचें कथन.—२२. रामशास्त्री यांची गोष्ट.

१. पूर्वीं हिंदूंच्या मुलखांत [१]इंग्लिश व फ्रेंच यांचें कितीएक वेळां युद्ध होऊन शेवटीं इंग्लिशांनीं फ्रेंच लोकांस जिंकिलें. ते इंग्लिश आपली विलायत सोडून प्रथम हिंदूंच्या मुलखीं आले तो प्रकार असा; तेथचे कितीएक द्रव्यवंत लोक

---

१. इंग्लिश लोकांस मराठे लोक 'इंग्रेज' असें ह्मणतात, त्याणि फ्रेंचांस 'फ्रांसीस' असें ह्मणतात. परंतु 'इंग्लिश' व 'फ्रेंच' हे शब्द शुद्ध.

मिळून एकचित्त होऊन त्यांनीं असा बेत केला कीं, हिंदूंच्या मुलखीं जाऊन कांहीं उदीम करावा, मग त्याच्या साधनार्थ ते आपल्या बादशाहाजवळ जाऊन विनंति करिते झाले कीं, 'आह्मी इतके जण मिळून आपलें द्रव्य एकत्र करून दूरदेशीं हिंदूंच्या मुलखांत जाऊन उदीम करूं इच्छितों, त्यास या आमच्या मंडळीखेरीज दुसरा कोणी तिकडे न जावा, आणि आह्मांस या कामाविषयीं अनेक प्रकारें सरकारचा आश्रय असावा, याविषयीं कृपा करून आमचा उद्योग निर्बाधपणें चालेशी आह्मांस सनद द्यावी.' त्यावरून बादशाहाची तशी सनद मिळाल्यावर त्या मंडळीचे कितीएक लोकें तेथून निघून हिंदूंच्या राज्यांत कलकत्ता व मद्रास व मुंबई या तिहीं ठिकाणीं आपलीं स्थळें करून राहिले. मग तेथें कांहीं उदीम करीत असतां त्यांस त्या मुलखींच्या रहाणारांशीं त्या कामाविषयीं कांहीं संबंध पडला, तेव्हां त्या हिंदु लोकांच्या कापट्यामुळें त्या इंग्लिश लोकांना आपल्या उदिमाचें व प्राणांचें रक्षण व्हावें ह्मणून शिपाई लोक बाळगून किल्ले बांधावे असें अगत्य पडलें. मग तेथच्या राजाशीं संबंध पडून त्यांचे हातीं कितीएक मुलूख सांपडला, तेव्हां त्यांस तें काम श्रेष्ठ असें न वाटतां राजाप्रमाणें वर्तावें लागलें.

२. फ्रेंच जिंकिले ते समयीं बहुतेक मुलूख त्यांच्या हातास लागला, तेणेंकरून ते परम विस्मय पावून मनांत विचार करूं लागले कीं, 'यांत कांहींएक भाग आपल्या कामापुरता ठेविला, आणि बाकी टाकिला तर आपणास बरें पडेल कीं नाहीं.' तेव्हां असें ठरलें कीं, 'अर्धेंमुर्धें टाकावें आणि अर्धेंमुर्धें भोगावें हें ठीक नव्हे, त्यास टाकणें तर अगदीं सारेंच टाकून विलायतेस जावें, किंवा उत्तरोत्तर जसें कारण पडेल तसें आणीक आणीक घेऊन आपण त्या लोकांचे आचरणानुरूप वर्तावें हें योग्य.' त्यावरून बंगाल्यांत क्लैव्ह नामें लॅाट तो विलायतेचे बादशाहापासून सरकारआज्ञेनें मुलखाच्या बंदोबस्तास सन १७६५ त कलकत्त्यास आला. त्यानें असें पाहिलें कीं, 'आपलें रक्षण करीत उगेंच बसणें ठीक नव्हे, कां कीं, तशानें रक्षण नीट होत नाहीं; दुसरा मारूं लागे तोंपर्यंत उपेक्षा करण्यांत मोठी हानि आहे; यास्तव पुढें होऊन अवश्य कांहीं उद्योग करावा.' असा निश्चय करून त्यास प्रथम दोन कार्यें साधावयाचें अगत्य पडलें; त्यांत एक कार्य असें; साष्टी व करंजें व मुंबईजवळचा आणखी एक टापू आपले स्वाधीन व्हावा. दुसरें कार्य असें; फ्रेंच लोकांस निझामानें शिबंदीच्या खर्चास दिलेले पांच परगणे मद्रासेजवळ

---

१. त्या सनद पावलेल्या मंडळीचें नांव विलायतेंत असें पडलें कीं, 'आनराबल ईस्ट इंडिया कंपनी' ह्मणजे 'हिंदुलोकांशी संबंध ठेवून व्यवहार करणारी श्रेष्ठ मंडळी.' २. लाट ह्मणजे मोठ्या उमरावासारिखें पद आहे.

आहेत, ते आपल्या सत्तेंत आणावे. तेव्हां साष्टी आदिकरून टापू मराठे देईनात. कां कीं, पूर्वी विलायतेचे पोर्तुगीस लोक यांस जिंकून त्यांनीं ते घेतलेले होते. ते जर या इंग्लिशांस दिले तर आपली मानहानि होईल; व यांची वृद्धि आपणास बाधक होईल, असें त्यांच्या मनांत आलें. मद्रासेजवळचे परगणे निझाम अल्ली-कडे होते, त्या पांचां परगण्यांतील एक गंठूर नामें परगणा तो त्या निझामाचा भाऊ बसालतजंग यास जहागीर होता ह्मणून तो निझाम देईना. तेव्हां त्यास लाट ह्मणाला कीं, 'या गंठूराखेरीज चार परगणे आहेत ते तुह्मी पूर्वी अर्काटचे नबाबास मख्त्यानें देत होतां तेव्हां त्यांचें उत्पन्न त्यापासून जें घ्यावयाचा नेम ठरविला असेल त्यापेक्षां दहापट आह्मी तुह्मांस देऊं, त्यास ते चारी परगणे आह्मांस तुह्मीं द्यावे.' असें सांगितलें असतांही तो निझाम ऐकेना, तेव्हां त्या लाटानें निश्चय केला कीं, 'बलात्कारेंकरून आपल्या रक्षणार्थ घेतले पाहिजेत.' त्यावरून त्यानें दिल्लीच्या बादशाहाची सनद त्या परगण्याविषयीं संपादन करून मद्रासेस जो कोणी मुख्य साहेब होता त्यास आज्ञा देऊन त्यानें राजमंद्री शहर घेतलें.

३. त्यावरून निझाम अल्लीस राग येऊन बोलिला कीं, 'आतां आह्मी इंग्लिशांला अगदीं निर्मूळ करून टाकूं.' त्यानंतर त्यानें हैदरास शिकविलें कीं, 'तुह्मीं कर्नाटकीं जाऊन इंग्लिशांनीं घेतलेला मुलूख सोडवावा.' तेव्हां तो अनर्थ चुकवावयाकरितां हैदराशीं स्नेह करावयास कांहीं बोलण्यानिमित्त इंग्लिशांनीं वकील पाठविला, परंतु तो हैदर वकिलास आपल्याकडे येऊंच देईना, हें वर्तमान लाटास समजलें, तेव्हां त्यानें मद्रासच्या साहेबास लिहिलें कीं, 'हल्लीं हैदर व निझाम व मराठे यांची एकचित्तता आहे, त्यांत मराठे व निझाम यांचें पहिलें वैमनस्य होतें. त्यावरून असें दिसतें कीं, निझामाशीं स्नेह करावा, ह्मणजे त्याच्या साहाय्येंकरून हैदर व मराठे यांच्या मर्यादेंत वागावयास फार सुलभ पडेल. मग ती स्नेहाची गोष्ट निझामास कळविली, तेव्हां त्यास तें बरें वाटलें; कां कीं, त्याच्या मनांत होतेंच कीं, हैदरास जिंकून मर्यादेंत ठेवावें, परंतु त्याच्या मनांत आलें कीं, एकदांच उभयतांशीं न विटावें; मराठ्यांशीं गुप्तपणें जो तह केला आहे तो तसाच राखून आधीं हैदर जिंकावा, त्यावरून त्या निझामानें इंग्लिशांशीं स्नेह करून चारी परगण्यांची सनद दिली, आणि त्यांपासून प्रतिवर्षी सात लक्ष रुपये घ्यावे असा करार करून घेतला. त्याशिवाय 'ज्या वेळेस गरज लागेल ते वेळेस आपल्या चाकरीस इंग्लिशांचीं दोन पलटणें व सहा तोफा सिद्ध असाव्या, त्यांचा खर्च चाकरी पडेल ते समयीं आह्मी देऊं,' असें निझामानें कबूल केलें.

४. इकडे मराठ्यांचे दरबारीं इंग्लिश व निझाम यांचे मनांतील संकेत कळले

असतील असें वाटतें; कां कीं, सन १७६७ चे जानेवारींत माधवरावानें आपल्यास निझामानें पूर्वील संकेताप्रमाणें येऊन मिळावयाची वाट न पाहतां एकाएकीं कृष्णेपलीकडे लष्करसहित जाऊन दोहों महिन्यांत सेरा व हुस्कोटा हे परगणे घेतले; व हैदरापासून तीस लक्ष रुपये घेऊन कर्नाटकचे दुसरे जे कोणी मोठे मोठे संस्थानी होते, त्यांपासून सत्रा लक्ष रुपये घेतले; आणि तें सर्व द्रव्य जमा करून निझामाची सिद्धता झाली नाहीं तोंच आपण आपले मुलखीं माघारां आला. नंतर निझाम व इंग्लिश या दोघांनीं पेशव्यास त्या नेलेल्या द्रव्याची वांटणी मागितली, तेव्हां तो त्यांस तुच्छ मानून मान्य झाला नाहीं. नंतर निझाम अली तो इंग्लिशांचा पक्ष सोडून हैदराकडे मिळून इंग्लिश जिंकावयाची मसलत बांधूं लागला. मग सन १७६८ च्या फेब्रुवारी महिन्याचे २३ वे तारिखेस तो निझाम हैदराचा पक्ष सोडून पुनः इंग्लिशांशीं स्नेह करिता झाला. त्यांत पूर्वीच्या स्नेहापेक्षां इतकें अधिक झालें. तें असें; निझाम आणि इंग्लिश या उभयतांच्या मतें असें ठरलें कीं, 'हैदर अली ह्मणजे केवळ बंड; याच्या मानरक्षणाचें आपणास प्रयोजन नाहीं. त्यास याचा मुलूख घेऊन चित्तास येईल तो प्रकार केल्यास दोष किमपि नाहीं.' त्यावरून निझामानें नेम केला कीं, 'हा हैदर दिल्लीच्या बादशाहाच्या हातचा स्थापित दक्षिणेचा अधिकारी आहे, त्यापेक्षां कर्नाटक बालेघाट घेऊन किंवा त्या स्थानांतून हैदरास भ्रष्ट करून तेथचे वहिवाटीस इंग्लिशांला दिवाण करीन; याशिवाय बसालतजंगास गंटूर परगणा जहागीर आहे, तोही बसालतजंग मेला असतां अथवा त्याचे वर्तणुकेंत अंतर पडलें असतां मी इंग्लिशांस देईन.

५. त्याचे अदले वर्षीं रघुनाथराव, मल्हारराव होळकरास बरोबर घेऊन हिंदुस्थानची स्वारी करावयास गेला, ते समयीं तो मल्हारराव मृत्यु पावला, त्या योगें रघुनाथरावानें कल्पिलेलें कार्य सिद्धीस न गेलें; व पूर्वीं पानपतचे लढाईनंतर गोहदचा राणा एक जाट होता, त्यानें पेशव्याचा पक्ष सोडून विपरीत वर्तणूक केली, यास्तव रघुनाथरावानें त्याच्या पारिपत्यासाठीं त्याच्या शहरास घेरा घातला; आणि किती एक वेळां युद्धप्रसंग करून शेवटीं तो किल्ला हातास येत नाहींसें समजून त्यापासून तीन लक्ष रुपये खंड घेऊन आपण माघारां दक्षिणेस आला.



मल्हारराव होळकर.

१. मल्हारराव होळकर मृत्यु पावला तेव्हां त्याचे जागी त्याचा नातू मालेराव स्थापिला, तोही

६. त्याचे अगोदरच माधवराव पेशवा कर्नाटकांत जाऊन पोंहचला होता, त्यानें काकास निरोप पाठविला कीं, 'आपण टोंक्यास येऊन मला भेटावें.' तेव्हां काकानें तर आनंदीबाईच्या सांगण्यावरून मुलखाचा अर्धा भाग घ्यावा अशी मसलत केली होती, त्यावरून त्यास वाटलें कीं, 'माझी मसलत फुटली, त्यास तेथें गेलों तर माधवरावाच्या कैदेंत सांपडेन,' या शंकेनें तो टोंक्यास जाईना. मग गोविंद शिवरामाच्या योगेंकरून निर्भयपणें तेथें गेला. तेव्हां पेशव्याच्या मनांत होतें कीं, 'त्या कामास बारा तेरा लक्ष रुपये वर्षास उत्पन्न होतील, अशी गोदावरीचे उगमीं जहागीर करून द्यावी, तिचा उपभोग करून काकांनीं कारभार न करितां स्वस्थ असावें.' परंतु त्या रघुनाथरावास राज्याचा अर्धा भाग पाहिजे होता, ह्मणून तें देणें त्याच्या मनास येईना. तरी त्यानें त्याप्रमाणें घेतलें, तथापि त्याचें मन संतुष्ट झालें नाहीं. त्यापुढें पर्जन्यकाळ समीप आला, ते समयीं रघुनाथरावानें पंधरा हजारांवर सैन्य जमा करून चांदोरच्या डोंगरांत धोरप ह्मणून किल्ला आहे, तेथें त्या लष्करसहित जाऊन आपणास जानोजी भोंसल्यानें येऊन मिळावें, असें करून तो त्याची मार्गप्रतीक्षा करीत त्या ठिकाणीं राहिला. त्याचे मनांत होतें कीं, आपणास पाहिजे तितकें राज्य आपण बलात्कारेंकरून घ्यावें. त्या मसलतीस दमाजी गाइकवाड व होळकराचा दिवाण गंगाधर यशवंत हे होते, त्यांत गंगाधर यशवंत रघुनाथरावाविषयीं प्रीतिमान् आणि पेशव्याविषयीं तो आंगचा द्वेषी असे; कां कीं, पूर्वीं ज्या समयीं रघुनाथरावानें राज्यकारभार टाकिला होता, ते समयीं कोणेएके दिवशीं पेशव्याचे घरीं कचेरीमध्यें बोलतां बोलतां त्या गंगाधर यशवंतानें रघुनाथरावाची स्तुति व माधवरावाची निंदा दर्शविली. तेव्हां माधवरावानें कांहीं न बोलतां आपल्या आसनावरून उठून त्याजवळ जाऊन मोठ्या आवेशानें एक त्याच्या तोंडांत मारिली होती.

७. रघुनाथरावास त्या डोंगरी ठिकाणीं पेशव्यानें फार दिवस राहूं दिलें नाहीं; कां कीं, त्यास भय उत्पन्न झालें कीं, काकाला जानोजी भोंसला येऊन कुमक करील; ह्मणून मोठी त्वरा करून लष्करसहित एकाएकीं जाऊन त्या रघुनाथरावावर पडून त्याच्या लष्कराचा अगदीं पराभव केला. तेव्हां तो रघुनाथराव त्या धोरप किल्ल्यामध्यें शिरला. मग त्यानें तो किल्लाही घेऊन काकाला धरून पुण्यास आणिलें.

---

लवकरच मेला. मग त्या मल्हाररावाचा दिवाण व अहिल्याबाई, खंडेराव होळकराची बायको, यांचा त्या अधिकाराविषयीं वाद पडला. शेवटीं अहिल्याबाईनें आपला भाऊबंद नव्हे असा कोणीएक पराक्रमी शिलेदार होता तो त्या अधिकाराचा धनी केला.

८. त्या वेळेस पर्जन्यकाळामुळें पेशव्यास जानोजीच्या पारिपत्याकरितां पुढें जावयास अवसर झाला नाहीं, परंतु दुसरे वर्षी सन १७६९ त पेशवा आपल्य सैन्यासहित बरोबर रुकनउद्दवला नामें मोगलांचा वजीर फौजेसुद्धां घेऊन नाग पुरास चालिला. ते समयीं जानोजी आपल्या संरक्षणार्थ युद्धाचे तयारीचा चांगला बंदोबस्त करिता झाला. तो समूर युद्धास उभा न राहतां अहमदनगरापलीकडे जाऊन पुण्याचे आसमंतात् लुटता झाला. इतक्यांत माधवराव पेशवा यानें त्याच्या प्रांतांत न जातां सर्व जागीं ठाणीं बसवून वसूल घेतला. मग चांदा किल्ल यास घेरा घालून गोपाळराव पटवर्धन व रामचंद्र गणेश यांजबरोबर बत्तीस हजार स्वार देऊन ते जानोजी भोंसल्याचे पाठीस लाविले. तथापि पुण्याचे आसमंतात जो उपद्रव होत असे त्याचा प्रतिबंध झाला नाहीं; कां कीं, त्या दोघांनीं त्या जानोजीशीं आंतून गुप्तपणें स्नेह ठेविला होता. त्यावरून पेशवा चांदा किल्ल्याचा घेरा उठवून गोदावरीकडे आला. ते समयीं जानोजीनें असा आकार दाखविला कीं, आतां त्याच्या समूर जाऊन लढतों, परंतु त्याच्या मनांत तसें नव्हतें; कां कीं, त्यानें पेशव्याचें लष्कर माहुरासमीप एकीकडे टाकून वाट धरली. ते वेळेस त्याचा कोणीएक सरदार बापू करांड्या नामें होता, तो त्या जानोजीकडून येऊन पेशव्याचे लष्करच्या बुणग्यावर पडून कांहीं लूट घेऊन गेला. त्यापुढें पेशवा व जानोजी भोंसला हे उभयतां युद्ध करणें ठीक नव्हेसें समजून मार्च महिन्याचे २३ वे तारिखेस भीमेचे उत्तरकांठीं कंकापुरीं तह करिते झाले. त्यांत असें ठरलें कीं, पूर्वींच्या दिलेल्या बत्तीस लक्षांच्या मुलखांपैकीं आठां लक्षांचा मुलूख त्याकडे रक्षिला होता तो पेशव्यानें घ्यावा, आणि अक्कलकोटचा राजा फत्तेशिंग भोंसला याचे जप्तीचा कांहीं वसूल होईल, तोही पेशव्यानें घ्यावा; याशिवाय पेशव्याचे लष्करचा कोणी शिलेदार रुसून येईल तो जानोजीनें आपल्याजवळ बाळगूं नये; याखेरीज दक्षिणी सुभेदार व दिल्लीचा बादशाह व अयोध्येचा नबाब व इंग्लिश व रोहिले यांतून कोणाएकाशींही त्या भोंसल्यानें राजकारणी मसलत करूं नये. याप्रमाणें कबुलात होऊन त्या दिवसापासून पांचां वर्षांनीं पांच लक्ष व एक इतके रुपये पेशव्यास द्यावे असें ठरलें. या करारांत आणखी प्रकार पुष्कळ होते, परंतु जे त्यांत मुख्य होते ते लिहिले. पेशव्यांनीं करार केला कीं, कधीं हिंदुस्थानांत सैन्यासहित जावें लागल्यास वाटेनें जानोजी भोंसल्याच्या मुलखास उपद्रव देऊं नये. जर दुसरा कोणी तिकडे स्वारी करील तर लष्कर पाठवून जानोजीचें साहाय्य करावें. याप्रमाणें पेशव्यास जो लाभ झाला, त्यापैकीं निझामास तीन लक्ष रुपये वर्षास पावूं

लागले; व त्याचा वजीर रुकनउद्दवला यास प्रतिवर्षी एक लक्ष रुपये माधवरावापासून पावूं लागले.

९. इकडे कर्नाटकांत हैदर अल्ली इंग्लिशांशीं कांहीं स्नेह करून आपल्या पुष्टीकरणार्थ समयविशेषीं ते आपल्या उपयोगीं पडतील असें जाणून मराठ्यांचें भय मानीनासा झाला. मग तो आपण मराठ्यांस खंडणी न देतां पेशव्यांचे पक्षाचा कोणी पाळेगार होता, त्यापासून खंडणी घेता झाला. असें त्याचें विपरीत आचरण कळलें, तेव्हां माधवराव पेशव्यानें बहुत स्वार जमा करून गोपाळराव पटवर्धन व मल्हारराव रास्ते वगैरे सरदार यांस त्यांबरोबर देऊन त्या हैदरावर पाठविलें. मग थोडक्याच अवकाशानें आपण वीस हजार स्वार व पंधरा हजार पायदळ बरोबर घेऊन त्यांचे पाठीमागून गेला, तो तात्काळ दोन्ही बाळापुरें व कोल्हार व नंदीदुर्ग व मलवगळ यांखेरीज सोळा पाहाडी किल्ले व पंचवीस भुईकोट किल्ले घेता झाला. असें वर्तमान सन १७७० त घडलें.

१०. मलवगळचा किल्ला घेतांना असें झालें कीं, घाटगे कुळाचे विभागी दोघे, एक बुधकर नामें, एक मलावडीकर नामें. या दोहीं कुळांचा वाद वतनाविषयीं ब्राह्मणी वंशाचे बादशाहांपासून चालत आला होता, तो ते समयीं नव्यानें उत्पन्न झाला, त्याची पंचाईत होऊन नागोजी नामें घाटगा होता, तो त्या घाटगे वतनाचा अधिकारीसा ठरला. त्याचा प्रतिवादी बाजी घाटगा नामें होता, तो जुंझारराव घाटग्याचा वंश, त्याच्या मनास ती पंचाईत येईना. तेव्हां तो माधवराव पेशवे यांजवळ बोलिला कीं, 'आमच्या वादास पंचाईत उपयोगी नाहीं; भाल्यानें जो जिंकील तो आमचे वतनाचा अधिकारी होईल.' तेव्हां माधवराव यानें तशी आज्ञा दिली नाहीं. मग त्या किल्ल्याच्या हल्ल्याचे वेळेस असा नेम ठरला कीं, 'या दोघां वाद्यांत ज्याचें निशाण जरीपटक्याच्या निशाणापुढें जाऊन या किल्ल्याच्या तटावर आधीं चढेल तो वतनाचा अधिकारी होईल.' याप्रमाणें कल्पना निघाल्यानंतर बाजी घाटगा प्रतिवादी याचा निशाण धरणारा सरदार हल्ला करितेसमयीं पडला, आणि जरीपटक्याचा धरणारा ढमढेरा नामें सरदार होता तोही पडला. तेव्हां नागोजीनें आपलें निशाण घेऊन पुढें सरून तो जरीपटका उचलून मोठ्या वेगानें किल्ल्यांत शिरून त्याच्या तटावर जाऊन तेथें आपलें निशाण उभें केलें, आणि त्याच्याच काठीवर जरीपटका उभारिला; तें पाहून सर्व मराठे लोक मोठ्या हर्षानें नागोजीची प्रशंसा करीत होत्साते मोठा जयजयकार करिते झाले. याप्रमाणें शौर्येंकरून मराठ्यांनीं तो किल्ला घेतला, परंतु त्यांत एक मोठी अपकीर्ति झाली. ती अशी, तो किल्ला घेतल्यावर जे त्यांत शिपाई लोक होते ते सर्व मारून टाकिले.

११. यापुढें माधवरावाचे प्रकृतीस बरें वाटेनासें झाल्यामुळें त्यास जून महिन्यांत माघारें पुण्यास जावें लागलें; परंतु तेथचें कार्य सिद्धीस न्यावयासाठीं वीस हजार स्वार व सारें पायदळ त्यानें तेथें त्रिंबकराव मामाचे स्वाधीन करून ठेविलें. मग पर्जन्य-काळ गेल्यावर माधवराव सैन्य घेऊन त्रिंबकराव मामास जाऊन मिळावें ह्मणून पुनः निघाला. तेव्हांही त्याचे प्रकृतीस आणखी समाधान नाहींसें झालें, यास्तव पूर्वी पानपतचे लढाईत मृत्यु पावला जो बळवंतराव मेहेंदळा, त्याचा पुत्र आपा बळवंत यास तें कार्य सोंपवून आपण माघारां पुण्यास आला.

१२. त्यानंतर सन १७७१ त तो आपा बळवंत जाऊन त्रिंबकराव मामास मिळाला, ते समयीं त्या दोघांचें मिळून सैन्य तोफखाना खेरीजकरून चाळीस हजार स्वार व दहा हजार पायदळ जमा झालें. त्या वेळेस हैदराकडे बारा हजार स्वार व पंचवीस हजार पायदळ व चाळीस तोफा होत्या, तरी तो मराठ्यांच्या भयास्तव युद्धास निघेना. तेव्हां त्रिंबकराव मामा यानें तो हैदर अल्ली बाहेर निघावयासाठीं युक्तीनें लटकेंच वर्तमान उठविलें कीं, 'त्रिंबकरावानें आपलें अर्धें लष्कर दुसऱ्या कामास पाठविलें.' तें त्यास सत्य वाटून तो हैदर धैर्येंकरून बाहेर आला; परंतु युद्धसमयीं त्यास पुर्तेपणें समजलें कीं, 'आह्मी फसलों.' तेव्हां तो आपलें पूर्वींचें शौर्य टाकून युद्ध न करितां केवळ घाबरेपणानें पळाला, आणि श्रीरंगपट्टणीं आश्रय धरून राहिला. ते वेळेस त्याचा सर्व तोफखाना व रावट्या डेरे वगैरे सरंजाम व पंचवीस हत्ती हें सर्व मराठ्यांचे हातीं लागलें. यानंतर त्रिंबकरावानें त्या श्रीरंगपट्ट-णासही घेरा घातला, आणि तेथें त्या स्थानाविषयीं सवा महिनापर्यंत झटून पाहिलें, परंतु तें स्थान हातीं लागेना; तेव्हां तें सोडून तो त्या मुलखाची खंडणी घेत चालिला. ते समयीं त्याची मसलत होती कीं, सुंदा व बेदनूर हे दोन परगणे घ्यावे, परंतु त्याचे आरंभींच असें वर्तमान आलें कीं, पुण्यांत माधवराव पेशव्याचे प्रकृ-तीस फार आजार झाला आहे. असें ऐकून त्याला पुण्यास माघारें जावें अशी उत्कंठा लागली; यास्तव तो त्या वेळेस हैदरानें तहाचें बोलणें लाविलें होतें, त्यासच आपण मान्य होऊन तह करिता झाला. त्यांत असें ठरलें कीं, 'पूर्वीं शिवाजीचे वेळेस कर्नाटकचा मुलूख जितका मराठ्यांकडे होता तो त्यांनीं घ्यावा; याशिवाय मदगिरी व गरमकोंडा हे दोन्ही किल्ले त्रिंबकराव मामानें घेतले होते तेही मरा-ठ्यांचे स्वाधीन असावे; याखेरीज तूर्त लष्करखर्चाबद्दल हैदरानें मराठ्यांस छत्तीस लक्ष रुपये द्यावे, आणि प्रतिवर्षीं चवदा लक्ष रुपये खंडणीचे द्यावे, यास अंतर करूं नये.' याप्रमाणें ठराव सन १७७२ त झाला. इकडे माधवराव पुणें येथें कफोद्भव होऊन हैराण होता, तो कफ पर्जन्यकाळांत उपशम पावून त्याची प्रकृति बरी होईल अशी दिसायाला लागली.

१३. मग हिंदुस्थानांत पानपतचे लढाईपासून काय काय वर्तमान झालें तो प्रकार असा. तें युद्ध सन १७६१ त झालें, त्यांत अबदाली बादशाह जय पावला. नंतर त्यानें दिल्लीच्या पहिल्या बादशाहाचा औरस पुत्र शाह अलम तो ते समयीं दिल्लीपासून दूर बंगाल्याचा नबाब व इंग्लिश या उभयतांशीं युद्ध करीत होता, ह्मणून तो येई तोंपर्यंत त्याचा पुत्र जवानबख्त नामें होता, त्यानें तें आधिपत्य चालवावें असें केलें; आणि त्याची वजिरी अयोध्येचा नबाब सुजाउद्दवला यास सांगितली, व नजीबउद्दवल्यानें पूर्वीं 'अमीरउलूउमरा' पदवी संपादिली होती ती पुनः त्यास दिली. इतकीं कार्यें करून तो दिल्लीस गेला. ते समयीं नजीबउद्दवला दिल्लीच्या बादशाहाजवळ राहिला, आणि सुजाउद्दवला तो आपल्या अयोध्येस जाऊन तेथचा बंदोबस्त करून काशीस गेला. तेथें शाह अलम बादशाह येऊन त्यास भेटला, मग त्या उभयतांनीं मिळून बुंदेलखंडांत जाऊन झांशी घेतली, आणि त्या प्रांतांतून मराठे लोक यांस काढून द्यावयाचें काम आरंभिलें. तें सिद्धीसच गेलें असतें; परंतु मीर कासीम नामें बंगाल्याचा अधिकारी तो इंग्लिशांचे भयेंकरून पळाला, तो सुजाउद्दवला यास शरण आला; त्याच्या अभिमानास्तव त्यानें इंग्लिशांशीं विरोध बांधिला, त्यायोगें तें काम तसेंच राहिलें. नंतर सन १७६४ चे अक्टोबराचे २३ वे तारिखेस बक्सार शहराजवळ त्याची व इंग्लिशांची गांठ पडली, तेव्हां त्या उभयतांचें युद्ध होऊन सुजाउद्दवला पराभव पावला; आणि शाह अलम बादशाह इंग्लिशांचा आश्रय करून राहिला. त्यापुढें दुसरे वर्षीं आगष्ट महिन्यांत सुजाउद्दवला यानें इंग्लिशांशीं तह करून त्यांनीं आपला मुलूख घेतला होता, त्यापैकीं अलाहाबाद व खोरा या दोहोंखेरीज अयोध्येचें राज्य संपादिलें, आणि अबदालीनें दिलेली दिल्लीच्या बादशाहाची वजिरी तिला अडथळा न होईलसें केलें.

१४. दिल्लीमध्यें जवानबख्त तो अबदालीनें तक्ताधिपति केला होता, तेथें नजीबउद्दवला यानें तें सर्व काम आपले हातीं ठेविलें, यास्तव शाह अलम बादशाह निर्बळ होऊन इंग्लिशांपासून अलाहाबाद व खोरा यांचें उत्पन्न घेऊन खात राहिला. त्यास आशा होती कीं, इंग्लिशांच्या आश्रयानें आपलें तक्त आपणास मिळेल.

१५. जाटांचा राजा सुरजमल्ल तो हळू हळू बलाढ्य होऊन नजीबउद्दवला यास युद्धेंकरून मर्यादेंत ठेवावयाविषयीं त्याशीं लढून मृत्यु पावला. त्याच्या पुत्रानें मल्हारराव होळकराच्या आश्रयेंकरून कांहीं दिवस दिल्लीसभोंवता घेरा घातला, परंतु त्या नजीबउद्दवल्यानें होळकराशीं कांहीं बोलणें करून त्यानें त्या सुरजमल्लाचे पुत्राचा पक्ष सोडून निघून गेला. हें वर्तमान सन १७६४ त घडलें.

१६. होळकराच्या या स्वारीशिवाय सन १७६१ पासून १७६९ पर्यंत

चंबळानदीपलीकडे मराठ्यांची स्वारी गेली नव्हती. त्या वर्षाचे समाप्तीस माधवराव यानें विसाजी कृष्ण यास सेनापति करून पन्नास हजार स्वार व पुष्कळ पायदळ व मोठा तोफखाना बरोबर देऊन चंबळानदीपलीकडे पाठविला. त्या विसाजी कृष्णानें सन १७७० त रजपुतांच्या राजापासून खंडणीचा बाकीऐवज राहिला, असें निमित्त करून दहा लक्ष रुपये घेतले. त्यानंतर तो जाटांचे मुलखीं जाऊन खंडणी घेत घेत भरतपुरासमीप गेला, तेथें त्यानें मोठें युद्ध करून जाटांस जिंकिलें, आणि त्यांपासून दहा लक्ष रुपये रोख घेऊन पंचावन्न लक्ष रुपये हप्त्यानें घ्यावे असें केलें.

१७. यानंतर मराठ्यांचें लष्कर दिगच्या किल्ल्याजवळ पर्जन्यकाळीं छावणी करून राहिलें असतां नजीबउद्दवला यानें ते समयीं असा विचार केला कीं, 'मराठे लोक आपले बांधव मोगलांपासून मृत्यु पावल्याचा सूड उगवितील.' असें जाणून पुढें अनर्थ न व्हावा यास्तव त्यांशीं मैत्री करावयाविषयीं वकील पाठविला, आणि बोलणें लाविलें. त्यांत विसाजी कृष्ण समजला कीं, 'या मुलखांत मराठ्यांचें हित आहे,' परंतु त्याजबरोबर रामचंद्र गणेश व महादजी शिंदा हे दोघे होते, ते रोहिल्यांचा सूड घेण्याविषयीं फार आग्रह करूं लागले. मग असें ठरलें कीं, 'धन्याचे आज्ञेप्रमाणें वागावें,' त्यावरून तें वर्तमान त्यांनीं पेशव्यास लिहून विदित केलें. त्याचें उत्तर आलें कीं, 'नजीबउद्दवला व मराठे यांशीं शुद्ध स्नेह तर होणार नाहीं, परंतु दिल्लीचा बादशाह शाह अलम तो सांप्रत इंग्लिशांच्या आश्रयास आहे, त्यास आपल्या आश्रयांत आणावयाची मसलत नजीबउद्दवल्याचे द्वारें शेवटास जाईल, यासाठीं तूर्त विसाजी कृष्णाचे विचारें चालावें.' त्यावरून मराठे व मोगल यांचा तह ठरला; मग त्या नजीबउद्दवल्यानें विश्वासार्थ आपला पुत्र झाबिताखान विसाजी कृष्णाजवळ पाठविला. त्यापुढें सन १७७० चे अक्टोबरांत तो नजीबउद्दवला मृत्यु पावला. त्या वेळीं त्याचे जागीं त्याचा पुत्र दिल्लीस जाऊन आपल्या बापाचें काम चालविता झाला.

१८. यानंतर मराठे त्या दिगच्या छावणीपासून उठून दिल्लीवर कांहीं मोहीम न करितां रोहिल्यांचा मुलूख सहज घेते झाले. त्यावरून इंग्लिशांला कांहीं आश्चर्य वाटलें; त्यांस ठाऊक नव्हतें कीं, मराठ्यांचें व शाह अलम यांचें ऐक्य आहे. पुढें त्या शाह अलमानें इंग्लिशांस समजाविलें कीं, 'मराठ्यांच्या आश्रयास जातों.' मग मराठे रोहिलखंड सोडून सन १७७१ त पर्जन्यकाळाचे अगोदर दिल्लीस आले, त्यांनीं त्या जवानबख्ताचे मर्यादेस्तव दिल्लीच्या आंतील किल्ला मात्र आपल्या सत्तेंत आणिला नाहीं; वरकड सर्व जागीं आपलें ठाणें घातलें. यानंतर महादजी शिंदा

यानें इंग्लिशांकडे जाऊन शाह अलमास भेटून त्यास आपल्या लष्करांत विसाजी कृष्णाजवळ आणिलें. तो बादशाह त्याच वर्षी डिसेंबराचे समाप्तीस मराठ्यांच्या आश्रयानें दिल्लीच्या तक्ताचा अधिपति झाला.

१९. सुजाउद्दवला दिल्लींत मराठे होते तोंपर्यंत आपण त्या बादशाहाचे वजिरीच्या कामास आंगें आला नाहीं, तथापि त्याचें व मराठ्यांचें ऐक्य होतें; कां कीं, नजीबउद्दवल्याच्या पुत्रास मराठे बुडविणार होते; आणि सुजाउद्दवला याच्या मनांत होतें कीं, रोहिले निर्बळ करून पुढें संपूर्ण मुलूख आपले सत्तेंत आणावा, त्यावरून मराठ्यांनीं झाबिताखान, नजीबउद्दवला याचा पुत्र, त्याचा बहुतेक मुलूख घेतला. ते समयीं रोहिले लोक त्यांस असे भीत होते कीं, ते मोठ्या बळकट किल्ल्यांत असले तरी त्यांनीं मराठे येतात असें ऐकूनच तें ठिकाण सोडून पळावें. त्यापुढें सुजाउद्दवला समजला कीं, जर मराठ्यांनीं रोहिले अगदीं जिंकिले तर आपलीही दशा तीच होईल; यास्तव त्यानें रोहिले यांचे सरदार यांपासून चाळीस लक्ष रुपये घेऊन त्या रोहिल्यांशीं संकेत केला कीं, 'तुह्मी व आह्मी मिळून मराठ्यांस रोहिलखंडांतून बाहेर घालवूं.'

२०. इकडे दिल्लीमध्यें बादशाह यानें विसाजी कृष्ण व दुसरे कोणी ब्राह्मण होत, ते केवळ अतृप्तस्वभाव असें जाणून तो फार पश्चात्ताप पावला, आणि मनांत निश्चय करिता झाला कीं, 'कसेंहि संकट प्राप्त झालें तरी या लोभी लोकांचा संबंध टाकावा.' मग त्यानें आपल्या लष्करचा मुख्य सरदार नजीफ्खान यास सांगितलें कीं, 'मराठे युद्धेंकरून आपल्या मुलखांतून काढून द्यावे.' हें सर्व वर्तमान विसाजी कृष्णास समजतांच तो विचार करिता झाला कीं, 'शेवटचा उपाय युद्ध, त्यावांचून दुसरी कांहीं युक्ति करून कार्य साधेल तें बरें,' ह्मणून त्यानें तेथचा सर्व वृत्तांत पुण्यास लिहून पाठविला; त्यांत सुचविलें कीं, 'आतां कोणत्या प्रकारें वर्तावें, ती आज्ञा व्हावी.'

२१. त्या उत्तराची मार्गप्रतीक्षा करीत असतां इकडे असें झालें कीं, माधवराव थेउरास मृत्यु पावला, ते समयीं त्याचे वयास अठ्ठावीस वर्षे झालेलीं होतीं. त्यास पुत्र किंवा कन्या कोणी अपत्य नव्हतें. त्याची स्त्री रमाबाई तिची व त्याची फार प्रीति असे, ह्मणून ती त्याबरोबर सती गेली. असें वर्तमान सन १७७२ च्या नवेंबराचे १८ वे तारिखेस घडलें. तो माधवराव अनेक गुणांनीं संपन्न होता. त्यानें युद्धादि कौशल्येंकरून मोठी ख्याति मिळविली, परंतु त्याची राजनीतींत दक्षता अशी होती कीं, तिच्या पुढें त्याची शौर्यप्रशंसा हलकी. तो राज्य करूं लागला ते वेळेस त्याचा मुख्य कारभारी फार दिवसांचा आणि मोठा चतुर असा सखाराम बापू नामें होता,

तो लोभी असतांही त्याच्या चातुर्यामुळें लोकांस त्याची भीड फार असे. त्याच्यापुढें माधवराव राज्याधिकारी असतांही त्याचा मान तादृश होईना, आणि रघुनाथराव तोही मोठा पराक्रमी त्यामुळें त्याची प्रशंसा होईना; पुढें त्यानें रघुनाथरावाला बंदीस घातलें त्यापासून त्यास कांहींसे लोक मानूं लागले. मग त्यानें त्या सखाराम बापूला आपल्या प्रतिष्ठेस अपायसा जाणून एक दिवस एकांतीं त्याला नेऊन विचारिलें कीं, 'या लोकांत माझा मान किमपि दिसत नाहीं, त्यास मीच अयोग्य आहें किंवा दुसरें कांहीं कारण आहे तें सांगा; व यास उपाय काय तोही सांगा.' त्यावर त्यानें त्याचे मनांतील अर्थ समजून उत्तर केलें कीं, 'याचें कारण मीच आहें; त्यास मोरोबा फडनवीस याला कारभार सांगावा,



माधवराव बल्लाळ पेशवे.

ह्मणजे तुमच्या मनोदयानुरूप होईल,' असें त्यानें शहाणपणाचें उत्तर केलें. त्यावरून माधवराव प्रसन्न होऊन त्या सखाराम बापूनें आपली जहागीर खाऊन स्वस्थ रहावें असें केलें, आणि मोरोबा फडनवीस यास कारभार सांगितला.

२२. याप्रमाणें माधवराव मोकळेपणा पावल्यावर पुढें तो कांहीं मोठें कार्य करणें तर तें आपल्या आज्ञेवांचून करूं देत नसे; त्यानें त्या वेळेस लोकांचें वृत्त समजावयास अनेक प्रकारचे उत्तम कायदे केले. तो माधवराव राज्य करीत असतां त्यास युद्धाखेरीज कधीं रिकामपण सांपडलें तर त्या अवकाशांत तो आपल्या प्रजेस कोणे प्रकारें सुख होईल तो विचार पाहात असे; कोणेही ठिकाणीं फिर्याद झाल्यास त्याचा न्याय खरा करण्याविषयीं त्यास मोठी आवड होती; याविषयीं त्यानें कोणीएक रामशास्त्री नामें ब्राह्मण बाळगला होता तो फार उपयोगी असे. त्या रामशास्त्र्यानें ज्या ज्या युक्ति करून पंचाइती ठरविल्या ते ठराव अद्यापि न्यायाचे उपयोगीं पडतात. तो रामशास्त्री चांगल्या मार्गानें वागणारास आप्तासारखा आणि दुष्टास यमासारखा होता. तो सातार्‍यानजीक माहुलीक्षेत्रीं जन्मला. त्याचें आडनांव

परभुणे. तो तरुणपणीं विद्याभ्यास करावयाकरितां काशीस गेला होता, त्यास बाळकृष्णशास्त्री याचा मृत्यु झाला ते समयीं पुण्याचे दरबारीं, त्याजकडून कांहीं यत्न नसतां बोलावून नेऊन सर्व शास्त्री यांचा तो मुख्य केला. पुढें माधवराव योग्यतेस येऊं लागला ते समयीं तो त्यास नीतिविचार सांगत असे, त्याविषयीं एक गोष्ट आहे. कोणेएके समयीं माधवराव यास पंडितांचे भाषणेंकरून इच्छा झाली कीं, कांहीं तपस्या करावी; त्यामुळें माधवराव जप करूं लागला. मग एक दिवस तो जपास बसला असतां रामशास्त्री कांहीं कामानिमित्त त्याजकडे गेला तेव्हां त्याजवळच्या शिष्यांनीं सांगितलें कीं, 'या वेळेस श्रीमंतांची गांठ पडणार नाहीं; कां कीं, ते जपास बसले आहेत.' त्यावरून तो आपल्या घरीं जाऊन विचार करिता झाला कीं, 'जर याविषयीं वाद करावा तर ठीक नव्हे; त्यास याचा आश्रय सोडून जावें हेंच बरें.' मग दुसरे दिवशीं त्याजकडे जाऊन बोलिला कीं, 'मला काशीस जावयाची आज्ञा द्यावी.' तें ऐकून माधवराव बोलला कीं, 'आपण येऊन गेलां ते समयीं मी जप करीत होतों त्या निमित्तें आपली गांठ पडली नाहीं.' त्यावर त्यानें उत्तर केलें कीं, 'आपण जें निमित्त सांगतां तें ब्राह्मणास योग्यच आहे; परंतु ब्राह्मण जर आपलें कर्म सोडून राज्य करूं लागले तर त्यांनीं प्रजापालन करावें; तें टाकून जप करीत बसले तर तो अन्याय. त्यास जर आपल्या चित्तांत जप करावा असें आहे, तर हें सर्व राज्य टाकून मजबरोबर चलावें; मी तें आपणास पुर्तेपणें शिकवीन.' त्यावरून माधवराव मनांत समजून त्यानें तें कृत्य टाकिलें, आणि रामशास्त्री याच्या अनुलक्ष्येंकरून चालूं लागला.

---

## भाग बेविसावा.

**( इसवी सन १७७२ पासून सन १७७५ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )**

१. रघुनाथराव बंदींतून सुटला परंतु नारायणराव पेशव्याच्या कांहीं तंट्यामुळें पुनः बंदींत पडला.—२. नागपुरच्या भोंसल्याची हकीकत.—३. नारायणराव मारेकरी यांनीं मारिला.—४. मराठ्यांचें सैन्य हिंदुस्थानांतून माघारें फिरलें.—५. रघूजी भोंसला यास 'सेनासाहेबसुभा' या नामें पदवी प्राप्त झाली.—६. निझाम अल्लीबराबर रघुनाथराव याचें युद्ध होऊन निझाम पराभव पावून त्यानें रघुनाथरावास दिलेला मुलूख यानें त्यास माघारा दिला.—७. रघुनाथराव कर्नाटकांत गेला असतां कारभारी लोकांनीं त्यास अहित अशी कांहीं मसलत केली.—८. त्रिंबकराव मामा रघुनाथरावाशीं युद्ध करून पराभव पावला. मग रघुनाथरावानें हिंदुस्थानांत जाऊन इंग्लिश व होळकर व शिंदे यांशीं आपल्या साहाय्यार्थ कांहीं बोलणें लाविलें.—९. नारायणरावाचा पुत्र माधवराव नारायण तो पेशवा झाला.—१०. पुण्यांत कारभारी लोकांमध्यें वैमनस्य पडून त्यांच्या दोन फळ्या झाल्या.—११. हैदर अल्लीनें कर्नाटकांतील मराठ्यांचा मुलूख घेतला.—१२. विलायतेंतून कंपनीसरकारचे आज्ञेनें

मुंबईहून कोणी वकील साहेब पुण्यांत राहावयास गेला.—१३. इंग्लिशांनीं भडोच किल्ला घेतला.—१४. ठाणें नामें साष्टीचा किल्ला इंग्लिशांनीं घेतला.—१५. शिंदा व होळकर यांनीं राघोबाचा पक्ष सोडिला, यास्तव राघोबा बडोद्यास गेला.—१६. गाइकवाडाचे कुमकेचें कांहीं वृत्त.—१७. राघोबा व इंग्लिश यांचें बोलणें होऊन तह झाला.—१८. त्याप्रमाणें त्याचे कुमकेस इंग्लिशांचें लष्कर आलें.—१९. तें व रघुनाथराव याचें लष्कर मिळून कसें कसें वर्तलें तो विस्तार.—२०. आरासाजवळचे लढाईचा प्रकार.—२१. जहाजांची लढाई.—२२. फत्तेशिंग गाइकवाड याचा इंग्लिश व राघोबा यांशीं तह झाला.—२३. रघुनाथराव याचा उत्कर्ष व माधवराव नारायण पेशवा याचा ऱ्हास लोकांमध्यें दिसूं लागला.

१. माधवराव पेशवा तो आपला अंतकाळ समीप आला असें जाणून पुढें रघुनाथराव याचें आनुकूल्य नसल्यास आणि कारभारी लोकांत वैमनस्य असल्यास आपला भाऊ नारायणराव यास राज्य संभाळावयाचें अवघड पडेल, असें समजून त्यानें सखाराम बापूला जवळ बोलावून आपली दिवाणगिरी सांगितली; आणि रघुनाथराव काका बंदींतून काढून आपल्याजवळ नेला; आणि सखाराम बापूच्या देखतां मोठ्या अगत्यानें कारभारी व धनी यांची एकचित्तता असल्यानें राज्यास फार हित आहे असें समजाविलें; मग आपल्या भावाला त्या दोघांचे स्वाधीन केलें.[१] पुढें तो माधवराव पेशवा मेल्यावर त्याचें उत्तरकार्य झाल्यानंतर त्याचा भाऊ नारायणराव तो सातार्‍यास जाऊन रामराजा याचे हातून 'पेशवे' पदवीचीं वस्त्रें पावला. ते समयीं सखाराम बापूच्या नांवास राजानें नवें 'कारभारी' असें पद जोडून बजाबा पुरंदर्‍या 'दिवाण' केला; आणि नाना फडनविसास त्याची वडिलोपार्जित फडनविशी दिली. तो नारायणराव पेशवा व त्याचा काका रघुनाथराव यांचा कांहीं दिवस स्नेह राहिला; मग रघुनाथराव याची बायको व नारायणराव याची आई या दोघींचें मन मिळेना, त्या योगें या दोघांचा द्वेष पडला. तेव्हां त्या नारायणरावानें आपले कारभारी मिळवून मसलत केली कीं, 'काकाला पुनः बंदींत घालावें.' त्या कृत्यास सखाराम बापूचें मात्र अनुमोदन नव्हतें. तो ह्मणाला कीं, 'हें केवळ अनुचित कर्म दिसतें.' मग एप्रिलचे ११ वे तारिखेस पुण्यांत नारायणराव ज्या वाड्यांत राहत होता, त्यांतच एका खोलींत रघुनाथराव काका याचा प्रतिबंध केला. यापुढें पेशवा यानें आपल्या कारभारी मंडळीच्या लोकांमध्यें बजाबा पुरंदरे व नाना फडनवीस व हरीपंत फडके यांवर विश्वास ठेवून बहुतेक राज्यकारभार यांचे हातून चालविला. हे तिघे कारभारी यांचें व सखाराम बापूचें वैमनस्य असे; परंतु ते सारे शहाणे ह्मणून बाहेर असें दिसत होतें कीं, मुख्य कारभारी सखाराम बापू.

---

१. स्वाधीन केला हा सर्व वृत्तांत थेउरास माधवरावाचे शरीरी समाधान नसतां झाला.

२. जानोजी भोंसला तोही माधवरावाचे मरणसमयीं थेउरास होता, त्यानें पूर्वींच माधवरावाचे आज्ञेनें आपला भाऊ मुधोजी भोंसला याचा पुत्र रघूजी भोंसला तो दत्तक घेतला. त्या मुधोजीशिवाय जानोजीला आणखी भाऊ होते, त्यांस संतति नव्हती. जानोजीनें तो मूल घेतल्यावर त्या मुलाचा बाप मुधोजी तोच त्याचा रक्षक केला असेल असें वाटतें; परंतु तो अर्थ निश्चित होत नाहीं. त्यापुढें दुसरे वर्षीं मे महिन्यांत तुळजापुराजवळ जानोजी भोंसला मरण पावला; तेव्हां त्याचा पुत्र रघूजी भोंसला याचा रक्षक कोण ह्मणून जानोजीचे भाऊ मुधोजी भोंसला व साबाजी भोंसला हे दोघे भांडूं लागले; ते समयीं जानोजीची स्त्री दर्याबाई भोंसली ती दोघां दिरांतून एकासही मुलाचा रक्षक न करितां आपणच भोंसल्याचे राज्याचा कारभार करिती झाली; त्या वेळेस तिनें साबाजीला आपले लष्करचें काम मुख्यत्वें सांगितलें; तेव्हां तो मुधोजी भोंसला आपणास या समयीं युद्धावांचून दुसरा उपाय नाहींसा समजून लष्कर जमा करून युद्धास सिद्ध झाला. मग तो व त्याचा भाऊ साबाजी याची गांठ पडून कुंभारी गांव अंकोल्याजवळ आहे तेथें युद्ध झालें; त्या प्रसंगीं मुधोजी भोंसला याचा अगदीं पराभव होऊन तो आपले जिवाचे रक्षणासाठीं पळून गेला. मग पेशव्याचे योगें ते दोघे भाऊ युद्ध करणें टाकून एकमेकांस भेटले असतां त्या दर्याबाईनें एकाएकीं साबाजीला टाकून मुधोजीचा पक्ष अवलंबिला. असें झाल्यावर मुधोजी एलिचपुरचा कोणी मुख्य पठाण होता, त्याचे साहाय्येंकरून पुनः युद्धास उद्युक्त झाला, आणि साबाजी, निझाम व पेशवे यांचें साहाय्य संपादावयास यत्न करूं लागला; इतक्यांत असें झालें कीं, नारायणराव पेशवा मारेकरी यांनीं मारिला; त्या अनर्थामुळें इतर सर्व मोठमोठीं कार्यें राहिलीं. असें सन १७७३ च्या आगष्ट महिन्याचे ३० वे तारिखेस झालें.

३. मारेकरी यांनीं नारायणराव पेशवा मारिला तो प्रकार असा; एके दिवशीं नारायणराव भोजन करून आपल्या महालांत निजला होता; ते समयीं त्या वाड्यांत एकाएकीं गडबड मोठीच झाली, ती ऐकून तो जागा होऊन पाहूं लागला, तों वाड्यांत गार्दी लोक शिरले, त्यांत सुमेरशिंग व महंमद यूसफ हे दोघे होते; ते आपला रोजमुरा बाकी राहिला ह्मणून कांहीं दांडगाई करितात, असेंही त्याचे दृष्टीस पडलें, आणि ते आपल्या आंगावर येतात, असें पाहून तो पळत पळत आपल्या काकाचे खोलींत गेला; त्याचे पाठीस गार्दी लोक लागले, त्यांत सुमेरशिंग फार जवळ होता, तेव्हां तो आपले काकाचे शरीरास मिठी मारून बोलिला कीं, 'काका, माझा प्राण या वेळेस वांचवा.' असें ऐकून रघुनाथराव मध्यें होऊन

सुमेरशिंगास त्याचे रक्षणार्थ दयायुक्त बोलणें बोलिला. तेव्हां सुमेरशिंग ह्मणाला कीं, 'मीं हें कृत्य येथपर्यंत केलें, तें जर आतां सोडिलें तर माझा नाश मीं आपल्या हातें केलासा होईल; आतां तुह्मी याची आशा सोडा, आणि यापासून लवकर दूर व्हा, नाहीं तर दोघे मेले जाल.' तेव्हां रघुनाथरावानें आपल्या शरीराची मिठी सोडवून त्याला दूर सारून गच्चीवर पळून गेला; त्याचे पाठीमागें फिरून त्यास धरावयास नारायणराव तिकडे त्वरेनें जाऊं लागला असतां कोणीएक हत्यारबंद रघुनाथरावाचा चाकर त्रल्या पवार होता, त्यानें त्या नारायणरावाचे पाय धरून मागें ओढून पालथा पाडिला; त्याच क्षणीं नारायणरावाचा चाकर परम विश्वासू चांपाजी टिळेकर नामें होता, तो जवळ हत्यार नसतांही मोठ्या त्वरेनें धांवून आपला धनी आपल्या आंगाखालीं घालून त्याच्या रक्षणार्थ आपण त्यावर पडला. ते समयीं सुमेरसिंग व त्रल्या पवार या दोघांनीं एके जागीं बरोबर ते दोघे धनी व चाकर तरवारीनें ठार मारिले. हें वर्तमान बाहेर कळल्यावर सखाराम बापूनें हरीपंत फडक्याचे हातानें झालेल्या प्रकाराचें पत्र लिहवून शोधास वाड्यांत रघुनाथरावाकडे पाठविलें, त्याचें त्यानें उत्तर असें दिलें कीं, 'हें कृत्य गार्दी लोकांनीं केलें.' त्यावरून रघुनाथरावानेंच हें कृत्य केलें, असा मनांत संशय उत्पन्न होऊन हरीपंत फडके तेच वेळेस बारामतीस पळून गेले; आणि सखाराम बापू यानें शहरचे लोक फार गडबडले होते, त्यांस, धैर्य देऊन स्वस्थ केलें. मग त्रिंबकराव मामा त्या वाड्यांत जाऊन त्यानें तें पेशव्याचें प्रेत नेऊन जाळिलें. रघुनाथराव त्या गार्दी लोकांचे बंदींत बाकी रोजमुरा देण्याचे निमित्तेंकरून राहिला असतांही वकील कारभारी लोक त्याजकडे जात असत; नंतर सर्व कारभारी लोकांचे मतें असें ठरलें कीं, नारायणरावास रघुनाथरावानेंच मारविलें असेल; परंतु त्याचा निश्चय होत नाहीं; त्यास हल्लीं याला 'पेशवे' पदवी प्राप्त झाली ती यानें भोगावी.' या विचारास रामशास्त्रीही अनुमोदन देता झाला; परंतु तो बहुत युक्तीनें गुप्तपणें त्याचा आंतून बारीक शोध



नारायणराव बल्लाळ पेशवे.

१. त्रल्या ह्मणजे तुळाजी असेल.

काढूं लागला, त्यावर दीड महिन्यानें त्यास पुरतेपणें तें सर्व विदित झालें. तेव्हां रामशास्त्री रघुनाथरावापाशीं जाऊन बोलिला कीं, 'हें अकर्म तुह्मींच करविलें, मी त्याचा पुरतेपणें शोध करून तुह्मांकडे आलों.' असें त्याचें भाषण ऐकून रघुनाथराव यानें इतकेंच मान्य केलें कीं, 'मीं त्यास धरावा असें मात्र पत्र दिलें होतें.' हें वर्तमान खरेंच असेल, कां कीं, पुढें तो रघुनाथरावाच्या हातचा अस्सल कागद रामशास्त्री यास सांपडला; त्यांतील लेख मूळचा असा होता कीं, 'धरावें.' त्या 'ध'कारावर कोणीं आणीक शाई घालून 'मारावें' असें केलें होतें. तें कृत्य आनंदीबाईचें असेल असें सर्वांच्या मनांत आलें. नंतर रघुनाथरावानें त्यास धरण्याविषयीं पत्र लिहिलें हा अन्याय आपणापासून घडला, असें मान्य करून रामशास्त्री यास विचारिलें कीं, 'या दोषास प्रायश्चित्त काय करावें?' त्यावर त्यानें उत्तर केलें कीं, 'यास देहान्त प्रायश्चित्त पाहिजे. कां कीं, तुमचें बाकी उरलें जें आयुष्य त्यांत तुह्मांपासून सद्वर्तन होणार नाहीं. आणि यापुढें तुह्मी व तुमचें राज्य याची धडगति मला दिसत नाहीं; यास्तव इतःपर तुह्मी राज्य करीत असाल तोंपर्यंत मी पुण्यास येणार नाहीं; आजपर्यंत सरकारचा आश्रित झालों होतों, तो मी आतां नव्हे.' इतकें बोलून तो शास्त्री तेथून निघून वांईक्षेत्राजवळ एका लहानशा गांवीं राहून काळक्षेप करिता झाला. इकडे त्या गार्दी लोकांचा बाकी रोजमुरा देऊन रघुनाथराव मोकळा झाल्यावर त्यास साताऱ्याहून 'पेशवे' पदवीचीं वस्त्रें आलीं. नारायणराव मारिला गेला तेव्हां त्याचें वय केवळ अल्प, अठरा वर्षांचें होतें, तितक्यांत त्याचे गुण अथवा दुर्गुण हे लोकांस दिसून आले नाहींत, परंतु त्याच्या धैर्याविषयीं एक कथा आहे ती अशी; माधवराव पेशवा असतां हे दोघे भाऊ पुण्यामध्यें गुलटेंकडीकडे हत्तींची लढाई पाहात बसले असतां त्यांतून एक हत्ती मोठ्या त्वरेनें जेथें ते दोघे बसले होते तेथें समूर धांवून आला, तेव्हां त्यांजवळचे चाकर लोक वगैरे होते ते सर्व पळाले, ते समयीं तो नारायणरावही उठून पळावयास सिद्ध झाला. इतक्यांत माधवराव त्याच्या हातास धरून बोलिला कीं, 'तूं जर पळालास तर तुजविषयीं अखबार लिहिणारे काय लिहितील?' तें ऐकतांच तो त्याजवळ स्थीर बसला. नंतर तो हत्ती केवळ निकट येऊन पोंहचला असतां कोणीएक आपाजीराव पाटणकर नामें मराठा शिलेदार होता, त्यानें मोठ्या धैर्यानें धांवत येऊन नारायणरावाचे पुढें होऊन हत्तीच्या सोंडेंत खंजीर खुपसून त्या हत्तीला एकीकडेस केलें.

४. हिंदुस्थानांत लष्करसुद्धां विसाजी कृष्ण होता, तो असें इच्छीत असे कीं, मोगलांशीं युद्ध न होता सलूख्यानेंच कार्य साधावें; परंतु तें न होतां सन १७७२

च्या डिसेंबराचे १९ वे तारिखेस दिल्लीजवळ त्याचा व मोगलांचा युद्धप्रसंग झाला, त्यांत मराठे जय पावले. नंतर त्यांशीं व बादशाहाशीं तह झाला, त्यांत असें ठरलें कीं, पेशव्यास बादशाहापासून 'बक्षी' पदवी असावी; आणि त्याचा हस्तक झाबिताखान त्या कामावर ठेवावा; आणि जाटापासून बादशाहानें सेरामपूर घेतलें होतें तें त्याचें त्यास द्यावें. याखेरीज इंग्लिशांनीं सुजाउद्दवल्यापासून खोरा व खरा हे दोन परगणे घेतले ते बादशाहाकडे असत तेही जाटास द्यावे. याप्रमाणें करार झाल्यावर विसाजी कृष्ण लष्करसुद्धां पर्जन्यकाळाचे अखेरीस पुण्यांत दाखल झाला.

५. जानोजी भोंसला याचा दत्तपुत्र रघूजी भोंसला तो रघुनाथरावास 'पेशवे'-पदवी प्राप्त झाली असतां आपली माता जानोजीची स्त्री दर्याबाई व मुधोजी भोंसला यांसहित येऊन पेशव्यास मिळाला; तेव्हां त्या रघूजीस 'सेनासाहेबसुभा'-पदवी प्राप्त झाली. नंतर रघूजी व दर्याबाई हीं तेथून निघून वराडाकडे गेलीं; परंतु मुधोजीनें पाहिलें कीं, साबाजी आपलेपेक्षां बलाढ्य झाला ह्मणून तो पेशव्याजवळ राहिला.

६. याप्रमाणें दक्षिणेंतील वर्तमान असतां हैदर व निझाम यांच्या राज्यांत मसलती होत होत्या कीं, 'मराठ्यांत वैमनस्य पडून फार अव्यवस्था झाली आहे, त्यास या समयीं कांहीं आपला लाभ पाहावा;' त्यांत निझाम याची सिद्धता झाली नाहीं तोंच रघुनाथराव मोठी त्वरा करून त्या निझामावर चालून गेला, तेव्हां त्यास असें अगत्य पडलें कीं, ज्याचे प्रतिवर्षी वीस लक्ष रुपये उत्पन्न व्हावे, असा मुलूख देऊन तह करावा. एवढी मिळकत त्या रघुनाथरावास मिळाली, ती जर तो आपले मराठे मुख्य सरदार यांस वांटून देता तर त्याचे 'पेशवे' पदवीस दृढता येती; परंतु तें न करतां त्यानें निझामाच्या गोड गोड गोष्टी ऐकिल्या कीं, 'तुह्मी व आह्मी बहुतां दिवसांचे सोबती,' त्यावरून मोहित होऊन तो वीस लक्ष रुपयांचा मुलूख घेतलेला त्याचा त्यास माघारां दिला.

७. त्या वेळेस जे त्या रघुनाथरावाचे अनिष्टचिंतक होते, त्यांस मोठा हर्ष झाला कीं, हा एवढा मूर्खपणा यानें केला. या योगें हा लवकरच बुडेल. असेंच आणीक एक त्यांस हर्ष होण्याचें कारण झालें, तें असें; औरंगाबादेजवळ साबाजी भोंसला लष्करसहित होता, त्यावर त्यानें त्रिंबकराव मामास पाठविलें, आणि आपण कर्नाटकांत जाऊन हैदर व इंग्लिश यांशीं युद्धप्रसंग करावयाची मसलत चालविली. त्यामुळें त्या अनिष्टचिंतकांस त्याचे 'पेशवे'पदवीस कांहीं विघ्न उत्पन्न करण्यास तो दूर गेल्यावर पाठीमागें सुलभ पडेलसें वाटलें. त्यावरून सखाराम बापू व नाना

फडनवीस हे दोघे त्या रघुनाथरावाचें लष्कर सोडून माघारें पुण्यास आले. त्यांचे मागून थोडक्याच वेळानें गणपतराव रास्त्या व बाबूजी नाईक बारामतीकर व मोरोबा फडनवीस व बजाबा पुरंदरे वगैरे लष्कर सोडून कांहीं निमित्त करून माघारें पुण्यास आले. ते समयीं त्या रघुनाथरावाचे पक्षपाती आणि तो रघुनाथराव यांखेरीज सर्व लोक समजले कीं, रघुनाथरावास घातक अशी कांहीं मोठी मसलत होत आहे. त्या वेळेस पुण्याचा कारभार चालविणारे सखाराम बापू व त्रिंबकराव मामा व नाना फडनवीस व मोरोबा फडनवीस व बजाबा पुरंदरे व आनंदराव जिवाजी व हरीपंत फडके इतके असत. ते पेशवेकुळाचे योगेंच वाढलेले. शाहू महाराजांचे अष्टप्रधान यांशिवाय दुसरे होते, असें असतां ते वेळेस त्या अष्टप्रधानांस बसवून कारभार हे चालवीत होते. त्यांनीं मसलत केलेली लोकांस पहिल्यानें कळली नाहीं, शेवटीं त्या कारभाऱ्यांनीं असें केलें कीं, नारायणरावाची स्त्री गंगाबाई गरोदर होती, तिजबरोबर दुसऱ्या कांहीं गरोदर स्त्रिया होऊन त्यांसहित ती पुरंदर किल्ल्यावर ठेविली; आणि जे रघुनाथरावाचे पक्षीय होते, त्यांस बंदीस घालून कारभार त्या गंगाबाईचे नांवें चालविला; तेव्हां लोक समजले कीं, गंगाबाईस पुत्र होईल तो अथवा त्यांतील एकीचा पुत्र तो गादीचा अधिकारी करून रघुनाथरावास भ्रष्ट करावें, अशी मसलत आहे. त्या कारभारी लोकांनीं त्या वेळेस निझाम अली व साबाजी भोंसले हे आपल्या मसलतीस अनुकूळ केले; आणि रघुनाथरावाच्या लष्करांत मुख्य कारभारी कृष्णराव बळवंत होता, तोही इकडून कांहीं सूचना झाली असतां या मसलतीस अनुसरेलसा केला. असें सन १७७४ त झालें.

८. याप्रमाणें पुण्याचें वर्तमान असतां रघुनाथराव कर्नाटकांत बेलारीपलीकडे जाऊन त्यानें हैदराशीं कांहीं बोलणें लाविलें होतें, ते समयीं त्यास कांहीं द्रव्याची गरज लागली; तेव्हां त्या हैदरानें कांहीं नगद रुपये देऊन पुढें पंचवीस लक्ष रुपयेपर्यंत द्यावयाचा करार केला, यास्तव त्या रघुनाथरावानें कर्नाटकांत मराठ्याचे तीन परगणे होते ते त्या हैदरास दिले. त्यानंतर त्यास पुण्याची मसलत कळली; तेव्हां त्याचे मनांत होतें कीं, 'अर्काटच्या नबाबाचा मुलूख लुटावा,' तें सोडून त्यानें त्या हैदराशीं तह करून ठरविलें कीं, 'वर्षास सहा लक्ष रुपये खंडणी तुह्मांसच देऊं आणि पेशवे तुह्मीच.' मग त्या रघुनाथरावास कोणीं सांगितलें कीं, 'तुमच्या लष्करांतील सरदार लोक कृत्रिमी आहेत; त्यांत भवानराव प्रतिनिधि मुख्य; त्यास तुह्मी आपली सावधगिरी ठेवा.' त्यावरून प्रतिनिधीस त्यानें विचारिलें कीं, 'तुह्मी तीनशें स्वारांनिशीं आपल्या अधिकाराप्रमाणें चाकरी करावी, असें असतां तुह्मांस

चार हजार स्वार ठेवायाचें प्रयोजन काय ?' त्यावर तो कांहीं उत्तर देईना; तेव्हां मुरारराव घोरपडे सेनापति यांस सांगितलें कीं, 'भवानराव प्रतिनिधि याचें लष्कर लुटा.' त्यावर त्यानें उत्तर केलें कीं, 'तुमचा जो शत्रू असेल त्यावर आह्मी जाऊं. हा आपले घरचा खटला यांत आह्मी शिरणार नाहीं.' मग वामनराव गोविंद पटवर्धन वगैरे सरदार यांला क्रमेंकरून तेंच सांगितलें असतां त्यांनींही तेंच उत्तर केलें, तेव्हां तो आपले खासगीचे लोक व कांहीं तोफा घेऊन त्या लष्करांतून बाहेर निघाला; तरी प्रतिनिधि त्यानें पुसल्याचें उत्तर देईना. त्या प्रतिनिधीच्या जवळचे शिपाई लोक बहुतकरून माननदीचे व येरळानदीचे कांठीं राहणारे होते. त्यांनीं प्रतिज्ञा केली कीं, 'आमच्या धन्याचे जिवास जर बेरेवाईट होईल, तर आह्मी इतकेही मरून जाऊं.' हें वर्तमान कळतांच रघुनाथराव युद्धाचा उपाय टाकून आपण त्या भवानरावाकडे एकांत करावयास गेला; तेव्हां प्रतिनिधीनें त्याचा सन्मान करून एकांतीं दोघे बसतेसमयीं आपली तरवार दोघांमध्यें ठेविली; तेव्हां रघुनाथरावानें त्यास विचारिलें कीं, 'तुह्मांस येवढ्या दूरदृष्टीचें प्रयोजन काय आहे?' त्यावर बोलिला कीं, 'कदाचित्[१] पंत प्रधान प्रतिनिधींशीं बोलताहेत, त्यांत विसर पडेल.' मग त्या एकांतांत एकमेकांचीं प्रमाणवचनें होऊन त्या रघुनाथरावानें प्रतिनिधीला कांहीं द्रव्य द्यावयाचें कबूल केल्यावर उभयपक्षीं युद्धादि प्रकार नाहींसा झाला. नंतर रघुनाथराव आपल्याबरोबर मुरारराव घोरपडा व प्रतिनिधि यांस घेऊन पुण्यास येऊं लागला, तेव्हां वामनराव पटवर्धन वगैरे सरदार तेही त्याबरोबरच होते; परंतु त्याच्या लष्करांत ते न मिळतां वेगळेच उतरत, आणि रात्रीं रघुनाथरावाचा छापा पडेल ह्मणून फार सावधपणा राखीत असत. ते समयीं रघुनाथरावावर हरिपंत फडका लष्करसहित पुण्याहून येत होता, आणि त्रिंबकराव मामा व साबाजी भोंसला हे परिंड्याहून येत होते, व निझाम अली तो कुलबुर्ग्याहून येत होता, या तिघांतून जो कोणी प्रथम पुढें येईल, त्यास मिळून रघुनाथरावाशीं युद्ध करावें, अशी वामनराव वगैरे सरदार मंडळीची मसलत होती. त्या तिघां येणारांत त्रिंबकराव याच्या मनांत आलें कीं, 'रघुनाथराव मोठा शूर आहे, त्यास जिंकिलें असतां आपली मोठी कीर्ति होईल, आणि साबाजी भोंसला तर आपल्या कामाकरितां या कामास विलंब करितो;' असें मनांत आणून आपण एकदांच पुढें लष्करसहित येऊन भीमानदीचे पार उतरून पंढरपुराजवळ मोठ्या मैदानांत रघुनाथरावास गांठून त्यावर एकाएकीं पडला; त्या समयीं मामापेक्षां त्याजवळ फौज कमी असतांही त्या रघुनाथरावानें त्याचा पराभव केला, त्यांत तो मामाही फार जखमी

---

१. पंत प्रधान ह्मणजे रघुनाथराव, त्यास प्रतिनिधीनें तुह्मी व आह्मी सारिखेच असें दर्शविलें.

झाला. ते समयीं रघुनाथरावानें त्यास धरून कैदेंत ठेविलें. त्या लढाईंत रघुनाथरावाचे सुमारें दहा हजार स्वार होते, त्यांत पुढचे तोंडीं आपण होऊन मोठ्या आवेशानें लढला. ते समयीं मामाकडचा सरदार गंगाधरराव रास्त्या तोही जखमी झाला; परंतु रघुनाथरावाचे हातीं न सांपडतां वांचला. प्रतिनिधि व मुरारराव घोरपडा हे दोघे रघुनाथरावाकडचे होते, परंतु ते त्या युद्धांत न शिरतां एकीकडे उभे राहिले; मग थोडक्याच दिवसांनीं प्रतिनिधि हरिपंताच्या लष्करांत जाऊन त्यास मिळाला; आणि मुरारराव घोरपडा आपलें स्थान घुटी येथें जाऊन राहिला; मग हरिपंत फडका, साबाजी भोंसला व निझाम अल्ली यांस जाऊन मिळाला; परंतु त्या दोघांचे मनांत लवकरच जाऊन रघुनाथरावावर पडावें असें नव्हतें. असा तो राघोबा जय पावल्यावर त्याचे मसलतींत कांहीं जीव आहेसें कांहीं दिवस दिसत होतें; कां कीं, विसाजी कृष्णानें हिंदुस्थानांतून जवाहीर आणिलेलें होतें, तें त्यानें पंढरपुरांत मोडिलें; आणि तेथची खंडणी घेऊन द्रव्य जमा केलें; त्याजवरून त्याजपाशीं फौज जमा होऊं लागली; तेव्हां तो रघुनाथराव पुण्याची वाट धरिता झाला. मग कांहीं मजला तिकडे गेला असतां त्याच्या मनांत आलें कीं, 'माझ्या जवळचें द्रव्य या एवढ्या लष्करास पुरणार नाहीं; आणि हें द्रव्य सरल्यावर लष्कर आपल्याजवळ टिकेलसा विश्वास नाहीं,' यास्तव तो पुण्याचा मार्ग सोडून बऱ्हाणपुरास चालिला; आणि इंग्लिश व होळकर व शिंदा यांची कुमक घेऊन कार्य साधावें असें मनांत योजिता झाला. याविषयीं त्यानें पूर्वींपासूनच त्या तिघांशीं कांहीं बोलणें लाविलें होतें. तो रघुनाथराव पुण्यावर येऊं लागला त्या वेळेस पुण्यांतील कारभारी लोक फार भ्याले; कां कीं, कदाचित् साबाजी भोंसला व निझाम अल्ली हे रघुनाथरावाचा पक्ष धरितील असा संशय होता; यास्तव त्यांनीं विचार ठरविला कीं, 'साताऱ्याचा राजा मुक्त करून त्याचे मुख्यत्वें रघुनाथरावाचा पराभव करावा;' परंतु तो बऱ्हाणपुरास जाऊं लागला त्यावरून ते निर्भय होत्साते लष्कर जमा करून त्याचे पाठीस लाविते झाले. त्यावर निझाम अल्ली व हरिपंत फडका तेही त्याचे पाठीस लागले. त्या सर्वांचें मिळून पन्नास हजार लष्कर होतें.

९. रघुनाथराव बऱ्हाणपुरीं शिंदा व होळकर यांची गांठ पडायाचे आशेनें थोडकेसे दिवस राहिला; मग तें न झालें ह्मणून तेथून निघाला; त्यास त्याचे लोक ते वेळेस बहुतप्रकारें निषेधीत असतां तो तें न मानितां नर्मदापार गेला; तेव्हां त्याजवळ सात हजार स्वार मात्र राहिले, त्याखेरीज मुधोजी भोंसला वगैरे सरदार त्याला सोडून निघून गेले. नंतर तो राघोबा इंदुरास पोंचला, तेथें शिंदा व होळकर होते, त्यांनीं त्याचा मोठा मान करून त्यास आपल्या लष्करामध्यें घेतलें.

त्यावरून अशी वदंता उठली कीं, 'या दोघांनीं रघुनाथरावाचा पक्ष धरिला, आणि गोविंदराव व फत्तेसिंग गाइकवाड हे दोघे भाऊ गुजराथच्या आधिपत्याविषयीं भांडताहेत तेही आपला कज्जा शिंदा व होळकर यांजकडे नेऊन ते सांगतील त्यास मान्य होऊन त्यांचे विचारें रघुनाथरावाचें साहाय्य करणार.' परंतु त्यापूर्वीं एप्रिलचे १८ व्या तारिखेस नारायणरावाची स्त्री गंगाबाई प्रसूत होऊन पुत्र झाला; तेणेंकरून रघुनाथरावास 'पेशवे'पदवी प्राप्त होणार नाहींसा निश्चय ठरला. त्या मुलाचें नांव माधवराव नारायण असें ठेविलें. त्याच्या जन्मदिवसापासून चाळिसावे दिवशीं त्यास साताऱ्याहून पेशवाईचीं वस्त्रें येऊन तो राज्यावर स्थापिला.

१०. इकडे रघुनाथरावाच्या पाठीस लागलेले निझाम अल्ली व हरिपंत फडके होते, त्यांत निझाम अल्ली तो पुण्यांतील कारभारी लोकांनीं मुलूख द्यावयाचा कबूल केला होता त्याप्रमाणें मिळाला नाहीं, व शिंदे आणि होळकर यांनीं रघुनाथरावाचा सन्मान केला, हें वर्तमान ऐकून त्याची पाठ सोडून बासमनजीक छावणी धरून राहिला; आणि हरिपंत फडके यांनीं बऱ्हाणपुराजवळ मुकाम केला. यानंतर पुण्यांतील कारभारी लोकांमध्यें ईर्ष्या उत्पन्न होऊन एकमेकांच्या विश्वासांत कांहीं अंतर पडून त्यांमध्यें दोन फळ्या झाल्या. त्यांत एक फळी अशी; मोरोबा फडनवीस व बाबूजी नाईक बारामतीकर व बजाबा पुरंदरे. हे तिघे रघुनाथरावाचे पक्षपाती झाले. त्यांनीं मसलत केली कीं, 'सखाराम बापू व नाना फडनवीस व गंगाबाई व तिचा पुत्र यांस धरून कैद करावें.' त्या वेळेस पुरंदर किल्ल्यावर पर्जन्यकाळामुळें धुकें फार ह्मणून ते सारे त्या किल्ल्याखालीं उतरून सासवडांत राहिले होते. त्यांस तें वर्तमान जून महिन्याचे ३० वे तारिखेस कळलें, तेव्हां ते तत्काळ पुरंदरावर चढले.

११. कर्नाटकीं हैदर अल्लीनें दक्षिणेंतील हें सारें वर्तमान ऐकून तुंगभद्रेचे दक्षिणेस जितका मराठ्यांच्या मुलूख होता तो सर्व हस्तगत केला; आणि बसालतजंग मराठी मुलखांत शिरून आथणी व मिरजपर्यंत खंडणी घेत आला.

१२. रघुनाथराव बरोबर तीस हजार फौज घेऊन इंदूर सोडून तापीनदीचे कांठीं जाऊन उतरला; त्या समयीं त्याजवळची फौज बहुतकरून शिंदे व होळकर यांजकडची होती; त्याचे मनांत होतें कीं, मुधोजी भोंसले व गोविंदराव गाइकवाड हे येऊन आपणास मिळतील, त्या आशेनें त्यांची मार्गप्रतीक्षा करीत असतां त्यानें इंग्लिशांशीं पुनः तहाचें बोलणें लाविलें. त्या इंग्लिशांच्या मनांत पूर्वींपासून फार दिवस असें होतें कीं, मुंबईजवळचे लहान टापू व साष्टी व वसई हीं घ्यावीं; आणि याविषयीं ते फार उद्योग करीत असत; परंतु त्यांची ती मसलत सिद्धीस गेली नाहीं.

मग रघुनाथराव यास जेव्हां त्यांचें अगत्य पडलें, तेव्हां ते समजले कीं, या रघुनाथरावाच्या द्वारें आपला अर्थ सिद्धीस जाईल, ह्मणून त्यांनीं आपला वकील मोस्टिन्[1] नामें साहेब होता त्यास आज्ञा दिली कीं, 'हें कार्य तुह्मीं साधावें.'

१३. त्यापूर्वीं सन १७७२ त ज्या दिवशीं माधवरावाचा मृत्यु झाला तेच दिवशीं इंग्लिशांनीं भडोच घेतली. त्या घेण्याचें कारण असें; इंग्लिशांकडे सुरतेचें आधिपत्य असतां त्यांस भडोचच्या नबाबाकडची खंडणी यावयाची होती ती तो देईना, तेव्हां इंग्लिशांनीं सन १७७१ त पर्जन्यकाळाचे कांहींसें पूर्वीं तो पैका मागावयास फौज पाठविली, तरी त्यानें खंडणी दिली नाहीं. मग तो नबाब पर्जन्यकाळानंतर मुंबईस येऊन इंग्लिशांशीं कांहीं तह करून गेला. पुढें तो तह त्याचे मनास ठीक वाटला नाहीं ह्मणून त्यानें तेथें इंग्लिशांचा वकील होता त्याचा कांहीं अनादर केला; त्यावरून त्या वकिलास मुंबईसरकारची आज्ञा झाली कीं, 'तुह्मीं भडोचहून निघून सुरतेस जावें; आह्मी लष्कर पाठवून तो किल्ला घेऊं.' त्यावरून वकील तेथून गेल्यावर मुंबईहून फौज जाऊन तो भडोच किल्ला घेतला.

१४. रघुनाथराव पुण्यास येत होता; तो ती वाट सोडून बऱ्हाणपुरास गेला; तेव्हां साष्टी वगैरे स्थानें हस्तगत करण्याविषयीं मोस्टिनसाहेबाचा यत्न होता; परंतु रघुनाथराव दूर पडला यास्तव तें काम सिद्धीस जाईना; पुढें रघुनाथराव तापी उतरला तेव्हां सुरतेचा अधिकारी साहेब होता, त्याकडून त्या मसलतीसंबंधें बोलणें पुनः लाविलें, परंतु तो साष्टी वगैरे द्यावयास कबूल होईना, ह्मणून तें सिद्धीस गेलें नाहीं; आणि दुसरें कांहीं बोलणें होत होतें तों पोर्तुगीज लोकांच्या विलायतेंतील बादशाहांकडून साष्टी वगैरे स्थानें हिंदुलोकांपासून माघारीं घ्यावयास फौज गोमांतकीं आली, त्यावरून मुंबईसरकारांत असें ठरलें कीं, 'ठाणें नामें साष्टीचा किल्ला तो आपण न घेतल्यास पोर्तुगीज घेतील, यास्तव त्वरा करून तें ठाणें आपण घ्यावें.' तेव्हां सहाशें गोरे लोक व एक हजार पलटणी शिपाई तोफासुद्धां त्या कामावर नेमिले, ते सन १७७४ च्या डिसेंबराचे १२ वे तारिखेस मुंबईहून निघाले. त्याचे दुसरे दिवशीं पोर्तुगीज लोकांचीं जहाजें येऊन मुंबईजवळ नागरलीं, आणि ते लोक इंग्लिशांस ह्मणाले कीं, 'साष्टी वगैरे ठिकाणें पूर्वीपासून आमचीं, तीं आह्मी घेऊं; त्यास तुमचे जे लोक तिकडे रवाना झाले ते मागें फिरवा.' असें त्यांचें बोलणें

---

१. वकील मोस्टिन् साहेब तो माधवराव पेशवा याच्या मरणाचे कांहींसा अगोदर पुण्यास पोहोंचला होता. त्यास विलायतेंतून कंपनीसरकारची आज्ञा होती की, 'हिंदूंच्या मुलखीं आपले उदमी लोक आहेत त्यांचा व तेथच्या आपल्या मुलखाचा बंदोबस्त ठेवून त्या लोकांशीं सलुखा मात्र ठेवावा, परंतु कोणाशीं देणें घेणें वगैरे कोणत्याही गोष्टीचा संबंध करूं नये.'

इंग्लिश ऐकेनात, तेव्हां ते लोक तेथूनच माघारें गेले, आणि इंग्लिशांच्या लोकांनीं तेथें गेल्यापासून सातवे दिवशी ठाणें घेतलें; नंतर थोडक्याच दिवसांत संपूर्ण साष्टी आणि उरण टापू हीं त्यांनीं हस्तगत केलीं.

१५. असें मुंबईकडचें वर्तमान असतां पुण्यांतील कारभारी लोकांनीं गुप्तपणें शिंदे व होळकर यांनीं रघुनाथरावाचा पक्ष सोडून आपला पक्ष धरावा असें केलें. आणि ते तीस हजार स्वार जमा करून पुरंदराहून निघाले ते रघुनाथरावावर चालले ती नवेंबरची २७ वी तारीख. असें झालें असतां रघुनाथराव, शिंदे व होळकर यांचें कृत्रिम समजून पुरंदराकडील लष्कर येऊन तापीवर पोंहचलें नाहीं तोंच शिंदे व होळकर यांचें लष्कर टाकून निघाला; तो तेथून पुढें तापीनदीचे कांठीं तालनेर नामें किल्ला आहे, त्यांत आपले खासगीचे लोक भरून आपण गुजराथेकडे चालला. तेव्हां त्याची स्त्री आनंदीबाई बहुतां दिवसांची गरोदर होती, ती धारेच्या किल्ल्यांत नेऊन ठेविली. आणि थोडकेसे दिवस तेथें राहिला असतां ती प्रसूत होऊन पुत्र झाला, तो बाजीराव रघुनाथ. त्याचा जन्मकाळचा योग असा होता कीं ब्राह्मणांच्या राज्याचा शेवट तो जिवंत असतांच व्हावा.

१६. यानंतर रघुनाथराव सन १७७५ त जानेवारीच्या ३ रे तारिखेस बडोद्यांत पोंहचला, ते समयीं त्याबरोबर दहा हजार स्वार व चारशें पायदळ होतें. तो बडोद्यास गेला याचें कारण असें कीं, त्याच्या मनांत गोविंदराव गाइकवाड याशीं स्नेह करावा, आणि इंग्लिशांशीं बोलणें लाविलेलें शेवटास न्यावें. इकडे पुण्यांतील कारभारी लोकांनीं तो तालनेर किल्ला घेऊन रघुनाथरावाचे पाठीस हरिपंत फडका फौज देऊन लाविला, आणि सखाराम बापू व नाना फडनवीस हे दोघे तेथून माघारें पुरंदरास आले, तेथेंच त्यांनीं कारभार चालविला. रघुनाथराव बडोद्यास गेला तेव्हां गोविंदराव गाइकवाड तो आपला भाऊ फत्तेसिंग बडोदें शहरांत असे, त्या शहरास घेरा घालून लढत होता. पूर्वीं सन १७६८ त रघुनाथरावाचें व माधवराव पेशव्याचें वैमनस्य पडलें, तेव्हां दमाजी गाइकवाडानें रघुनाथरावाच्या साहाय्यास आपला पुत्र पाठविला तोच हा गोविंदराव गाइकवाड. माधवरावानें रघुनाथरावास जिंकल्यावर पुढें थोडक्याच दिवसांनीं तो दमाजी मृत्यु पावला. त्या समयीं त्याचे पुत्र चार होते; त्यांत एक सयाजी, दुसरा गोविंदराव, तिसरा माणिकजी, चवथा फत्तेसिंग; इतक्यांत सयाजी वडील परंतु तो दमाजीच्या दुसरे स्त्रीचा पुत्र; गोविंदराव तो दुसरा पुत्र, परंतु पहिले स्त्रीचा; माणिकजी व फत्तेसिंग हे दोघे तिसरीचे. दमाजी मेला ते समयीं गोविंदराव हा रघुनाथरावाकडचा ह्मणून पुण्यांत प्रतिबंधांत होता, तथापि त्यास त्याचे बापाचें

स्थान व त्याची पदवी 'सेनाखासखेल' नामें होती, ती त्याला होण्यास कोणी प्रतिपक्षी नव्हते; कां कीं, त्यानें आपण रघुनाथरावाचा पक्ष स्वीकारला, या अन्यायाबद्दल तेवीस लाख रुपये दंड दिले आणि नजर एकवीस लाख, याशिवाय आणखी कांहीं कारणास्तव साडेसहा लाख, मिळून साडेपन्नास लक्ष रुपये दिले, आणि प्रतिवर्षी सात लक्ष एकुणहत्तर रुपये द्यावयाचे कबूल केलें; याखेरीज पुणें मुक्कामीं निरंतर त्याजकडील सरदारांनीं चाकरी तीन हजार स्वारांनिशीं करावी, आणि कधीं मोहिमेचे समयीं चार हजार स्वारांनिशीं चाकरीस असावें, असें त्यानें मान्य केलें; यास्तव तें स्थान व तें नांव त्यास मिळालें. इकडे बडोद्यांत त्याचा वडील भाऊ सयाजी तो वेडसर होता, तथापि त्याचा कनिष्ठ बंधु फत्तेसिंग त्यानें पुण्यास येऊन त्या सयाजीचें मुख्यत्व स्थापिलें, आणि आपण त्याचा मुतालीक झाला. त्यावरून तो फत्तेसिंग व गोविंदराव यांचें वांकडें पडलें. तें त्यांचें वैमनस्य माधवराव पेशव्यास इष्ट असेल; त्याची मसलत होती कीं गाइकवाड यांस वाढूं देऊं नये, आणि तो संकल्प सिद्धीस न्यावयासाठीं त्या भावाभावांत युद्ध करवावें हाच उपाय श्रेष्ठ असें तो मानीत होता. नारायणराव पेशवा याच्या मृत्यूनंतर रघुनाथराव पेशवा झाला; तेव्हां त्यानें पुनः ती पदवी गोविंदरावास दिली. त्यावर गोविंदराव गुजराथेंत जाऊन आपल्या भावास जिंकावयाचा उद्योग करूं लागला. रघुनाथराव तिकडे जाई तंवपर्यंत तें त्याचें कार्य शेवटास गेलें नव्हतें, मग तो गोविंदराव व रघुनाथराव त्या कामाविषयीं एकत्र झाले.

१७. याशिवाय रघुनाथरावानें तेच समयीं सुरतेचा अधिकारी साहेब होता, त्याशीं पूर्वींचें आरंभिलेलें बोलणें चालविलें तें बहुतेक होऊन शेवटीं सन १७७३ च्या मार्च महिन्यांत समाप्तीस गेलें. तो प्रकार असा; रघुनाथरावाचे कुमकेस मुंबईसरकारांतून पांचशें गोरे व एक हजार पलटणी शिपाई लोक व तशाच त्या बेताप्रमाणें तोफा त्वरित द्याव्या; मागून आणखी कांहीं गोरे लोक व पलटणी शिपाई पाठवून तीन हजारांची भरती करावी; त्या फौजेच्या खर्चास दरमहा दीड लक्ष रुपये राघोबानें द्यावयास कबूल केले; आणि त्या देण्याबद्दल इंग्लिशांकडे गहाणादाखल गुजराथचा आमोद परगणा व हानसोठ व वरसाल व अंकलेश्वर यांतील कांहीं विभाग इतकें दिलें. त्याशिवाय साष्टी व वसई व मुंबईजवळचे लहान लहान सर्व टापू सनद करून दिले. याखेरीज गुजराथेंतील जंबूसर परगणा व उलपाड परगणा दिला, आणि अंकलेश्वर परगण्याच्या जमेंतून वर्षास पाउण लाख रुपये द्यावयाचा करार केला. आणीकही इंग्लिशांस उपयोगी अशा कांहीं बाबती त्या करारांत होत्या; परंतु तो विशेष लिहावासा नाहीं. त्या वेळेस रघुनाथरावाज-

वळ रोकड द्रव्य नव्हतें ह्मणून सहा[1] लक्षांचें जवाहीर मुंबईमध्यें इंग्लिशांकडे तूर्त सेनेच्या खर्चानिमित्त ठेविलें. असा राघोबाचा व इंग्लिशांचा तह झाला, त्याच कारणानें पुढें इंग्लिश व मराठे लोक यांचें प्रथम युद्ध उत्पन्न झालें.

१८. हरिपंत फडके रघुनाथरावाचे पाठीस लागून गुजराथेंत गेले, तेव्हां त्यांजवळ फौज तीस हजार होती, ती जवळ आली असें समजून रघुनाथराव व गोविंदराव हे दोघे घेरा घालून बडोद्याशीं लढत होते, त्यांस तें युद्ध टाकून महीनदीपलीकडे जावें लागलें. ते तेथें वासदगांवाजवळ डेरे देऊन राहिले. मग फेब्रुवारीचे १७ वे तारिखेपर्यंत हरिपंत फडके यांजबरोबर फत्तेशिंग गाइकवाडही आला होता. त्याचे मसलतीनें आपल्या लष्कराच्या तीन टोळ्या करून तीन ठिकाणीं एकदांच महीनदी उतरले, आणि त्या तीन टोळ्यांचे मधली टोळी रघुनाथरावावर पडली, तिजबरोबर तो युद्ध करीत असतां त्याचे मागून गोविंदराव गाइकवाड व खंडेराव[2] गाइकवाड हे दोघे येऊन पोहोंचले नाहींत तों त्या दोहींकडच्या दोन टोळ्या रघुनाथरावावर येऊन पडल्या, तेव्हां रघुनाथरावाचे दोघे मोठे सरदार सखाराम हरी व मानाजी फांकडे यांस फार जखमा लागल्या, आणि त्या रघुनाथरावानें आरबांची एक टोळी नवी ठेविली होती, ती कांहीं दरमहा थकल्याचें निमित्त करून युद्ध न करितां एकीकडे उभी राहिली, आणि ती लढाईची जागा फार अडचणीची होती, त्यायोगें बहुत अव्यवस्था होऊन रघुनाथरावास असें वाटलें कीं, 'आतां माझेच लोक मला धरितील;' ह्मणून तो त्या भयेंकरून तत्काळ हजार स्वार बरोबर घेऊन मोठ्या त्वरेनें घोडीं पिटीत खंबाइतीकडे गेला. त्या खंबाइतच्या नबाबाचे मनांत पूर्वीं होतें कीं, रघुनाथरावास मिळावें; परंतु तो पळून आलासा पाहून त्यास आश्रय द्यावयास भिऊं लागला. ते समयीं तेथें इंग्लिशांचा वकील मालेटसाहेब नामें होता, त्यानें त्याला भावनगरास पोंहचविलें. मग तेथून सुरतेस दाखल झाला. नंतर चौं दिवसांनीं सन १७७५ च्या फेब्रुवारी महिन्याचे २७ वे तारिखेस मुंबईहून इंग्लिशांचें लष्कर सवाचारशें गोरे व साडेनऊशें पलटणी शिपाई तोफांसहित सर्व मिळून पंधराशें लोक त्याला कुमक येऊन पोहोंचले. तेव्हां रघुनाथरावाचे लोक पराभव पावलेले उत्तरेस पालनपुरीं गेले होते त्यांस मिळावयाविषयीं सुरतेहूनहि पुढें खंबाइतेस जाऊन उतरावें असा त्यांचा विचार ठरला, आणि रघुनाथरावही त्यांजबरोबर तिकडे गेला.

---

१. सहा लक्षांचें जवाहीर मुंबईमध्यें ठेविलें होतें तें पुढें अठ्ठावीस वर्षांनीं बाजीराव रघुनाथ पेशवा होळकरी दंगा उलगडल्यावर पुनः स्थापिला, त्या समयीं इंग्लिशांनीं त्याला बक्षीस पाठवून दिलें. २. खंडेराव गाइकवाड तो गोविंदराव गाइकवाडाचा चुलता.

१९. तें लष्कर खंबाइतेंत असतां त्यास आणीकही कुमक मुंबईहून मद्रासखा-त्याच्या शिपाईलोकांचें एक पलटण आणि पावणेदोनशें सुमारें गोरे लोक आले. यानंतर एप्रिलमध्यें पालनपुराहून राघोबाचें लष्कर इंग्लिशांस मिळावयाकरितां निघालें, तें व इंग्लिश लोक यांची खंबाइतेपासून पांचां कोसांवर गांठ पडली. त्या लष्करांत सखाराम हरी व मानाजी फांकडे यांचे लोक सहा हजार किंवा आठ हजार चांगले होते, परंतु त्यांस रोजमुरा न मिळे ह्मणून दांडगाई करीत; वरकड बारा किंवा पंधरा हजार सुमारें अणखी होते, ते केवळ लुटारू. त्यांपासून उपयोग न होतां नाशास मात्र कारण असे असत; परंतु इंग्लिशांचा जो मुख्य कर्नल् कीटिंग् नामें होता, त्याला मराठ्यांच्या लष्कराचा अनुभव नव्हता, ह्मणून त्यानें तें लष्कर एवढें मोठें आणि ज्यामध्यें निशाणें व डेरे फार पाहिले, इतक्यावरूनच तो मोठा संतुष्ट झाला; आणि त्यानें आपल्या लोकांसाठीं बरोबर द्रव्य नेलें होतें, तेंही त्यांतून कितीएकांस वांटिलें. त्यानंतर एप्रिलचे २३ वे तारिखेस तेथून तें लष्कर उत्तरेकडे मातरगांवीं गेलें, त्यास तेथें पोंहचावयाचे पूर्वीं वाटेनें दोन वेळां हरिपंताच्या लष्क-राची गांठ पडून कांहींकांहींसें युद्ध झालें. त्यांत पहिलें असामलीगांवाजवळ युद्ध झालें तें इंग्लिशांचे लोकांशीं, त्यांत इंग्लिशांचे लोक पडले नाहींत. दुसऱ्यामध्यें रघुनाथरावाकडचे जखमी व मेले मिळून पन्नास साठ सुमारें पडले, इतक्यानेंच रघुनाथरावाकडचे लोक अधीर होऊन त्यांपुढें युद्धास झटेनातसे झाले. त्या युद्धांत रघुनाथरावाच्या लोकांचा पराभव झाला असतां त्यांचे डावे बाजूस इंग्लिशांचे लोक होते, त्यांवर हरिपंताच्या लोकांनीं हल्ला केला, परंतु रघुनाथरावाच्या लोकांपेक्षां त्यांचा अधिक नाश होऊन ते निघून गेले. त्यापुढें राघोबाच्या मनांत आलें कीं, पर्जन्यकाळ जाई तोंपर्यंत अहमदाबादेंत रहावें, परंतु इंग्लिशांची मसलत होती कीं, 'त्याच वेगानें पुण्यावर जाऊन पडावें.' यास्तव त्या रघुनाथरावानें तिकडे चाल केली, परंतु कोणे रीतीची मसलत त्या कामास असावी ती नीट नव्हती, आणि त्या गुजराथेंतील मार्ग संकोचित असे, ज्यास दोन्ही बाजूंनीं उंच उंच कुडणें केलेलीं, त्यामुळें तें लष्कर फार हळू हळू जाऊं लागलें असतां नापारगांवाजवळ मे महिन्याचे १८ व्या तारिखेस पोहचलें, इतका त्यास विलंब लागला.

२०. त्या लष्करानें खंबायत सोडल्यापासून त्याबरोबर कीटिंग् साहेब होता त्यानें रघुनाथरावाच्या लोकांस सांगितलें कीं, 'तुह्मी दोन्ही बाजूंनीं चालून मध्यें बुणगें घेऊन बंदोबस्तानें चाला,' परंतु ते त्याप्रमाणें न करितां कधीं शत्रु येतो असें ऐकिलें ह्मणजे बुणग्यामध्यें शिरून चालत, अथवा इंग्लिशांचे टोळीचा आश्रय करीत. असें झालें असतां रघुनाथरावाच्या सांगण्यावरून त्या साहेबानें त्या लोकांस धैर्य यावयाक-

रितां शंभर गोरे व शंभर पलटणी शिपाई अशा दोनदोनशें लोकांच्या दोन टोळ्या करून त्यांस दोन तोफा देऊन त्यांतली एक टोळी मागें चालावयास ठेविली, व एक टोळी दोहों बाजूंनीं चालविली; आणि समय पडल्यास त्या दोन्ही टोळ्यांनीं एकमेकींस कुमक करावी अशी आज्ञा केली. याप्रमाणें बंदोबस्तानें तें लष्कर चालत असतां १८ व्या तारिखेस नापार सोडून एका कोशावर गेलें, तों तेथें वाटेच्या डावे बाजूस एक मोठमोठ्या वृक्षांची झाडी होती, तींतून एकाएकीं सहा तोफांचा मार त्या मागल्या टोळीवर चालू झाला, आणि त्या झाडींतूनच शत्रूच्या लष्कराची एक मोटी टोळी धांवून येते असें पाहिलें. तेव्हां त्या कीटिंग् साहेबानें जे लोक पुढें चालत होते ते उभे केले, आणि आपण एक तोफ व एक गरनाळ बरोबर घेऊन मागें आला इतक्यांत ती बाजूची टोळी पाठीमागचे टोळीस येऊन मिळाली, तेव्हां शत्रूनें तोफांचा मार बंद करून ती आपली टोळी मागें फिरविली. ते समयीं त्या सहा तोफांपैकीं त्यांच्या दोन तोफा तेथें राहिल्या, त्या घ्याव्या असा बेत करून इंग्लिशांचे लोक तिकडे जाऊं लागले असतां ती वाट अडचणीची आणि ते फार त्वरेनें गेले, तेणेंकरून त्यांच्या चालण्याच्या बंदोबस्तांत कांहीं अंतर पडलें, मग ते त्या तोफांचे जवळ पोंहचल्यावर आपला बंदोबस्त नीट करावयास गुंतले असतां त्यांवर शत्रूची एक टोळी मोठ्या वेगानें येऊन पडली, तेव्हां ते इंग्लिशांचे लोक त्यांशीं लढूं लागले, तों त्या कीटिंग् साहेबानें आपल्या लोकांस तोफांची कुमक करून शत्रूचे लोक मागें हटविले. नंतर इंग्लिशांचे लोक त्या तोफा घ्यावयास पुनः उद्युक्त झाले, ते समयीं त्यांवर पूर्वीचेपेक्षां मोठी स्वारांची टोळी फार वेगानें येऊन पडली, तेव्हांही त्यांनीं त्यांचे कितीएक लोक मारून त्यांस मागें हटविलें; परंतु ते समयीं इंग्लिशांचेही कितीएक लोक मेले गेले. तेव्हां राघोबाचा कोणी कारकून होता, त्यानें कृत्रिम करून त्या अडचणींत दोन हत्ती घालून ती वाट बंद केली, आणि शत्रूस धैर्य देऊन मागून हल्ला करविला, तेव्हांही त्या पलटणी लोकांनीं त्यांकडे तोंडें करून त्यांशीं लढून त्यांस दूर केलें. इतक्यांत राघोबाचे स्वार व आरब व सिद्दी लोक मिळून आले, ते इंग्लिश लोकांचें लष्कर व पुढची टोळी या दोहींमध्यें शिरले, तेव्हां शत्रूच्या पक्षाचे कोण व रघुनाथरावाचे कोण तें इंग्लिशांस समजेना असें झालें. मग ती गोरे लोकांची एक टोळी कांहीं कारण न दिसतां आज्ञेवांचून मागें हटूं लागली. तेव्हां काळे लोकही आपला मोड झाल्याच्या भ्रांतीनें तसेच मागें हटूं लागले; ते हटत हटत थोडक्याशा वेळानें आपल्या लष्कराकडे बंदोबस्त मोडून

---

१. त्या टोळीस सरदारांनीं आज्ञा दिली की, 'बाजूस व्हावें;' ते समजले कीं, 'मागें सरावें,' असें चौकशीवरून पुढें समजण्यांत आलें.

पळूं लागले. ते समयीं शत्रूचे लोकांनीं त्यांमध्यें शिरून ते लोक आपल्या ठिकाणीं पोंहचत तोंपर्यंत त्यांतील कितीएक मारिले; परंतु ते त्या ठिकाणाजवळ पोंहचले तेव्हां इंग्लिशांच्या तोफांचा व त्या सर्व पलटणी लोकांचा एकदांच मार त्यांवर पडून त्यांचा फार नाश होऊन ते पळाले. याप्रमाणें आरासाजवळची लढाई झाली, त्यांत इंग्लिश जय पावले, परंतु त्यांत अनर्थ न झाला असें नाहीं, कां कीं, त्यांचे गोरे लोक जखमी व मेले मिळून शायशीं, आणि पलटणी लोक जखमी व मेले मिळून एकशें छत्तीस, असे सर्व मिळून दोनशें बेवीस पडले. यानंतर कीटिंग् साहेब भडोचेस जाऊन आपले जखमी लोक तेथें ठेवून आपण तेथून निघून नर्मदेच्या उगमाकडे त्या भडोचेपासून बारा चौदा कोसांवर बहुपीरास एक मजल करून गेला, तेव्हां तेथें नवें वर्तमान आलें कीं, 'हरिपंताचें लष्कर नदी उतरून गेलें नाहीं, आपल्यापासून पांच कोसांचे अंतरानें आहे.' तेव्हां कीटिंग्साहेब त्याच रात्रीं निघाला आणि मनांत आणिता झाला कीं, 'एकाएकीं हरिपंताच्या लष्करावर जाऊन छापा घालावा.' ती त्याची कल्पना शेवटास जाती, परंतु रघुनाथरावाचे स्वारांस कांहीं एका दोहों रोजांचा पैका भडोचेस मिळाला होता, तितक्यानेंच त्यांस कांहीं धैर्य उत्पन्न झालें ह्मणून किंवा कांहीं त्यांस लूट मिळेल या अर्थानें ते मागें राहीनात; त्यांनीं इंग्लिशांच्या लोकांत शिरून अशी अव्यवस्था केली कीं, त्या साहेबास आपल्या पलटणी लोकांचा बंदोबस्त नीट करितां दिवस उगवे तोंपर्यंत पुढें जावयाची संधी सांपडली नाहीं. त्यामुळें ते हरिपंताचे लोक सावध झाले, आणि त्यांनीं आपल्या तोफा वगैरे जड सामान नर्मदेंत बुडवून खटलें पुढें चालतें केलें, मग हे जाऊन पोंहचत तोंपर्यंत आपणही निघून गेले; तेव्हां त्यांचे दहा पांच उंट व एक दोन हत्ती तळावर होते, ते रघुनाथरावाच्या लोकांनीं वळवून नेले. असें वर्तमान जूनचे ८ व्या तारिखेस झालें. ते समयीं पर्जन्यकाळ जवळ आल्यामुळें पुढें जावयाची सोय नाहींशी पाहून इंग्लिशांचें लष्कर बडोद्यापासून दहा कोसांवर डभई शहर आहे, तेथें छावणी करून राहिलें, आणि रघुनाथरावाचें लष्कर बडोदें व डभई यांमध्यें भीलापूर नामें गांव आहे तेथें उतरलें. तेव्हां गोविंदराव गाइकवाडाच्या बोलण्यावरून असें ठरलें कीं, 'पर्जन्यकाळ गेल्यावर फत्तेसिंगाशीं लढून बडोदें घ्यावें.'

२१. याप्रमाणें खुसकीवर युद्ध होत असतां समुद्रांतही युद्ध चालतें झालें, तो प्रकार असा; त्या युद्धाचे प्रारंभीं मराठ्यांचीं पांच जहाजें मोठीं होतीं, त्यांत एकशेंचाळीस तोफांचें एक, अडतीस तोफांचें एक, आणि बत्तिसांचें एक, व दोन सव्विसांचीं; यांखेरीज दहा फत्तेमाऱ्या, एकेकीवर दोहोंपासून नऊपर्यंत तोफा होत्या, अशीं पंधरा. याप्रमाणें असतां एके दिवशीं इंग्लिशांची व त्यांची समुद्रामध्यें गांठ

पडली तेव्हां इंग्लिश लोकांच्या जहाजांचा मुख्य सरदार कमोदोर जान मूर नामें होता, तो त्या मराठे लोकांस न भितां त्यांवर चालून गेला; त्याजवळ दोन जहाजें मात्र होतीं; असें असतांही त्यास पहातांच मराठे आपल्या गलबतांचीं सारीं शिडें हांकारून मागें पळून जाऊं लागले, तेव्हां तो त्यांचे पाठीस लागला. मग त्या इंग्लिशांच्या दोहों जहाजांतील एक मोठ्या त्वरेनें चालणारें 'मुंबई' नामें मोठें जहाज होतें, तें पुढें नेऊन मराठ्यांच्या जहाजांतील मोठें 'समशेरजंग' नामें एक शेचाळीस तोफांचें जहाज होतें, त्यास गांठून त्याशीं तो साहेब लढूं लागला, तों त्याचें दुसरेंही जहाज येऊन पोंहचलें. नंतर एक प्रहरपर्यंत युद्ध झाल्यावर त्या 'समशेरजंग' जहाजावरच्या दारूखान्यास तोफेचा गोळा लागून ती दारू पेटली, तेव्हां त्या जहाजाचे तुकडे तुकडे होऊन उंच उडाले. ते वेळेस त्या जहाजावरचा मुख्य व दुसरे त्याचे लोक बहुतेक मेले गेले, आणि त्यांतून थोडकेसे वांचले. याप्रमाणें इंग्लिशांची कुमक राघोबाचे उपयोगीं पडली असतां त्यानें आमोद परगणा व हानसोठ परगणा हे दोन्ही इंग्लिश लोकांना सनद करून दिले. ते समयीं त्या दोहों परगण्यांची जमा दोन लक्ष सत्याहत्तर हजार रुपये वर्षास उत्पन्न होत होती.

२२. इकडे बडोद्यांत गोविंदराव गाइकवाड व फत्तेसिंग गाइकवाड यांचा कलह होता, तोही इंग्लिशांच्या योगानें मिटला, त्यांत राघोबास तीन महिन्यांत सव्वीस लक्ष रुपये मिळतील असें ठरलें आणि गोविंदरावास रघुनाथराव यानें दहा लक्षांची जहागीर दक्षिणेंत द्यावी असा नेम केला; आणि कंपनीसरकारास भडोच शहरच्या वसुलांतील जितका भाग गाइकवाडाचा होता तो, व दुसऱ्या कितीएक गांवांच्या सनदा मिळून वर्षास दोन लक्ष तेरा हजार रुपये उत्पन्न होत असा मुलूख गाइकवाडानें द्यावा, असा निश्चय झाला.

२३. या प्रकारें राघोबाचा उत्कर्ष होत असतां पुण्यांत माधवराव नारायणाचा ऱ्हास दिसूं लागला. तो असा; इंग्लिशांच्या भयेंकरून हरिपंत फडका लष्करसुद्धां बहुधीरापासून माघारा दक्षिणेस आला; असा आपल्या सैन्याचा पराभव झाला असतां सखाराम बापू व नाना फडनवीस यांचें चित्त उद्विग्न झालें; आणि वरकड मंडळीच्या मनांत येऊं लागलें कीं, रघुनाथरावाचा उत्कर्ष झाला असतां वराडचा

---

१. दोहो जहाजांत एकाचें नांव 'रिव्हेंज्,' त्या तारवाचें बारदान १३०७ सुरती खंडी होते, त्यावर तोफा १२ रतली गोळ्यांच्या २० व ४ रतली गोळ्यांच्या ६ होत्या, व त्यावर दर्यावर्दी लोकांचा भरणा सर्व मिळून १६४ असामींचा होता, त्यांमध्यें सत्तर गोरे लोक होते; दुसरें 'मुंबई,' त्या तारवाचें बारदान ९६० सुरती खंडी होतें. त्यावर तोफा ९ रतली गोळ्यांच्या १६ व ३ रतली गोळ्यांच्या ८ होत्या, व त्यावर दर्यावर्दी लोकांचा भरणा सर्व मिळून १६६ असामींचा होता, त्यांमध्यें गोरे लोक ६० होते.

राजाही त्याचा पक्ष धरील. त्यापूर्वीं शिंदे व होळकरही त्या कारभारी मंडळीचा पक्ष सोडून निराळे झाले होते; आणि निझाम अली तोही त्या मंडळीस भयप्रदर्शनार्थ रघुनाथरावाशीं कांहीं बोलणें लावून त्यांस ह्मणूं लागला कीं, 'नारायणरावास पुत्र झाला तो खरा नसेलसा आह्मांस वाटतो.' त्यावरून त्या कारभारी मंडळीनें त्यास सत्रा लक्ष पंचायशीं हजारांचा मुलूख देऊन तो अनुकूळ केला. या सर्व गोष्टींवरून लोकांस असें वाटलें कीं, पुढें पर्जन्यकाळ गेल्यावर रघुनाथराव येऊन त्याचा यत्किंचित् जय झाला तरी ते सर्व कारभारी त्यास अनुकूळ होऊन तो आधिपत्य पावेल, अथवा माधवराव नारायणाचें रक्षण मुख्यत्वें आपण करील, परंतु इंग्लिशांमध्यें कांहीं अकल्पित खटला उत्पन्न झाल्यामुळें तें प्रकरण तसेंच राहिलें. तो खटला उत्पन्न झाल्याचा विस्तार पुढचे भागीं लिहिण्यांत येईल.

---

## भाग तेविसावा.

### ( इसवी सन १७७५ पासून सन १७७९ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. रघुनाथराव मुंबईसरकारापासून आपलें कार्य करून घेत होता, तें कलकत्त्याचे मुख्य साहेब आणि त्याचे मंत्री हे मध्यें पडल्यामुळें सिद्धीस गेलें नाहीं.—२. कलकत्त्याहून कोणी वकील साहेब पुरंदरास आला, त्याचे व पुरंदरचे कारभारी लोक यांचें वागणें व त्या वकिलाशीं त्या कारभारी मंडळीनें तह केला तो विस्तार.—३. सदाशिवराव भाऊचें सोंग घेणारा सदोबा याचा उत्कर्ष व पराभव आणि मृत्यु.—४. रामराजा याचा मृत्यु व त्याचे जागीं त्रिंबकजी भोंसला याचा पुत्र शाहू महाराज नामेंकरून स्थापिला.—५. कोल्हापूरकर व मुधोजी भोंसला यांचें कांहीं मागील वर्तमान.—६. पुण्यांत कारभारी लोकांमध्यें वैमनस्य पडून दुफळी झाली.—७. मोरोबा फडनवीस याची मंडळी मुख्यता पावून राघोबास आणवून तो मुख्य करावा अशी मसलत ठरली, मग नाना फडनविसानें आपला अर्थ साधावयासाठीं सकपट युक्ति केल्या त्यांवरून राघोबाविषयीं मोरोबाचें मन फिरून त्यास रघुनाथरावाविषयीं इंग्लिश बोलत असतांही त्यानें राघोबाचें अगत्य टाकिलें.—८. नाना फडनवीस व त्याची मंडळी श्रेष्ठता पावून त्यांनीं तो मोरोबा फडनवीस व त्याची मंडळी कैद केली.—९. फ्रेंचांचा वकील पुण्यांत येऊन प्रतिष्ठेनें वागला तो प्रकार.—१०. त्या निमित्तें कलकत्त्याहून सहा पलटणें मुंबईस येऊं लागलीं.—११. त्यावरून नाना फडनवीस याची तयारी झाली.—१२. नंतर मुंबईसरकारांत मसलत ठरली कीं राघोबास बळेंच पुण्यामध्यें स्थापावें, परंतु इकडे मुंबईसरकारचे मंडळींत वैमनस्य पडल्यानें राघोबाच्या कार्यास इंग्लिशांचें लष्कर विलंबेंकरून बोरघाटावर जमा झालें.—१३. मग तेथून पुढें तळेगांवाजवळ मराठी लष्कराची गांठ पडली असतां त्या मुख्य साहेबांस कांहीं भय वाटून ते पुढें न जातां त्यांनीं मागें हटावें असा नेम केला.—१४. त्या संबंधें वडगांवाजवळ त्या इंग्लिश लोकांवर कांहीं अनर्थ गुदरला तो प्रकार.—१५. बंगाल्याहून इंग्लिशांचें लष्कर मुंबईस येत होतें तो विस्तार.—१६. महादजी शिंद्यानें रघुनाथरावाविषयीं काय काय वर्तणूक

केली त्याचें कथन.—१७. त्या शिंद्यानें सखाराम बापू व चिंतो विठ्ठल हे दोघे नाना फडनविसाच्या स्वाधीन केले. ते त्यास अनिष्टकारक म्हणून त्यानें त्यांस बंदींत ठेविलें असतां त्या प्रतिबंधांतच ते उभयतां मृत्यु पावले.

१. सन १७७४ त विलायती सरकारचे आज्ञेनें बंगाल्याचा मुख्य साहेब व त्याचे मंत्री मिळून मुंबई व मद्रास येथील व हिंदूंच्या मुलखांतील जीं इंग्लिशांचीं मुख्य स्थानें तेथील मुख्य साहेब व त्यांचे मंत्री कसे कसे वागतात ती चौकशी प्रथम करूं लागले, तेव्हां त्यांस असें समजलें कीं, ‘मुंबईसरकारानें मराठे यांशीं संबंध करून कांहीं मुलूख संपादिला,’ त्यावरून त्यांनीं त्यांस सांगितलें कीं, ‘तुह्मीं हें काम सरकारहुकमाखेरीज केलें, त्यास तें लवकर टाकून द्या, आणि जें लष्कर मराठ्यांच्या कुमकेस पाठविलें आहे तें माघारें आपल्या कंपनीच्या मर्यादेमध्यें आणवा, आणि साष्टी व वसई मात्र आपल्याकडे ठेवा; आह्मी वकील पाठवून पुण्याचे गादीचा जो मुख्य असेल त्याशीं स्नेह करूं; राघोबा हत्या करणारा तस्मात् तो अयोग्य असेल, त्याचा पक्ष धरणें नीट नव्हे.’ त्यावर मुंबईसरकारानें आपण केलेल्या कृत्यास साधक अशीं अनेक प्रकारचीं साधनें बोलण्यांत आणिलीं; आणि राघोबाच्या हातून हत्या घडली नाहीं असें आह्मांस पुर्तेपणें ठाऊक आहेसें समजाविलें, तरी कलकत्त्याचा मुख्य व त्याचे मंत्री ऐकेनात; तेव्हां ते निरुपाय होऊन त्यांनीं कीटिंग् साहेबास लिहिलें कीं, ‘पत्र पावतांच युद्ध मना करावें, आणि मार्ग चालू झाले ह्मणजे कंपनीच्या मर्यादेंत सुरतेजवळ लष्करसुद्धां येऊन रहावें.’

२. यानंतर डिसेंबर महिन्यांत बंगाल्याहून अप्टन् साहेब नामें वकील पुरंदरास आला, त्याजबरोबर सखाराम बापूला गव्हर्नर जनरलाचें पत्र होतें, त्यांत लिहिलें होतें कीं, ‘आह्मी विलायतेहून बादशाहापासून आपल्या कामावर मुख्यत्वें आलों, त्यास आमचे आज्ञेवांचून मुंबईसरकारानें कोणाशीं तह किंवा युद्ध करूं नये, असें असून त्यांनीं राघोबाचा पक्ष स्वीकारिला; ह्मणून आह्मीं तें सर्व मोडून तुमच्या स्नेहाकरितां तुह्माकडे वकील पाठविला आहे.’ हें वर्तमान राघोबास कळलें, परंतु असें होण्याचें कारण काय तें तो न समजला ह्मणून त्यास आश्चर्य वाटलें. मग त्याच्या मनांत आलें कीं, ‘मीं जें इंग्लिशांस द्यावयाचें कबूल केलें, तें त्यांस थोडकें असें वाटत असेल याकरितां तो आंणखीही बहुत द्यावयास सिद्ध झाला.’ इकडे पुरंदरीं कारभारी लोक हें गव्हर्नर जनरल याचें कृत्य आपणांस फार उपयोगीं असें जाणून हर्ष पावले, आणि तो वकील त्यांशीं नम्रतेनें वागे त्यावरून त्यांस वाटलें कीं, ‘इंग्लिश आह्मांला भितात,’ तेव्हां ते त्याशीं बहुत वरचढपणा करून त्यास बोलूं लागले कीं, ‘साष्टी वगैरे स्थानें लवकर आमचे स्वाधीन करा, आणि राघोबालाही आह्मां-

कडे त्वरित पोंचता करून द्या, याप्रमाणें केल्यावर आह्मी कृपा करून तुमच्या मुंबईसरकारास खर्चानिमित्त बारा लक्ष रुपये देऊं.' या बोलण्यांतच त्यांस कांहींशी धमकीची गोष्टही दर्शविली; त्यावरून त्या वकिलानें कलकत्त्यास लिहून पाठविलें कीं, 'आह्मीं यांशीं नम्रतेनें वागतों तेणेंकरून यांस वाटतें कीं, आपणांस इंग्लिश भितात, आणि साष्टी वगैरे स्थानें यांच्या सनदा त्यांपाशीं मागाव्या अशी मला आज्ञा होती तें कांहीं घडत नाहीं; आणि यांशीं स्नेह करणें तेंही शेवटास जात नाहीं.' तें पत्र कलकत्त्यास पोंहचल्यावर पहिली मसलत फिरून असें ठरलें कीं, 'आतां महाप्रयासेंकरून राघोबाचा पक्ष स्वीकारावा.' त्यावरून गव्हर्नर जनरल आणि त्याचे मंत्री यांनीं निझाम अल्ली आणि हैदर यांचे द्वारें राघोबाला अनुकूळतेचें पत्र पाठविलें; आणि शिंदा व होळकर व मुधोजी भोंसला यांस लिहिलें कीं, 'तुह्मीं रघुनाथरावास अनुकूळ असावें, हें कदाचित् न झालें तर त्यास प्रतिकूळ तरी न व्हावें.' याखेरीज त्यांनीं कांहीं द्रव्य व कांहीं सैन्य मुंबईस जावयाकरितां सिद्ध केलें, आणि मद्रासचे पलटणी लोकही मुंबईस जावे अशी आज्ञा झाली. हें वर्तमान ऐकून राघोबास मोठा आनंद झाला, परंतु याप्रमाणें सिद्धीस गेलें नाहीं; कां कीं, पुरंदरचे कारभारी लोकही हें सर्व जाणून एकाएकीं नम्र होऊन इंग्लिशांनीं मागितल्याप्रमाणें द्यावयास सिद्ध झाले. तेव्हां तो अप्टन् साहेब वकील तो कलकत्त्याचे आज्ञेची वाट न पाहतां तह करिता झाला; त्यांत असें ठरलें कीं, 'साष्टी इंग्लिशांनीं घेतली आहे ती त्यांकडेसच असावी, आणि भडोचशहराचा पेशव्यांचा जो भाग असेल तो, व त्या शहराचे आसमंतात् तीन लक्षांचें उत्पन्न होईसा मुलूख, इंग्लिशांस जो मुलूख दिला तो द्यावयास गाइकवाडास सत्ता नाहीं असें ठरलें तर इंग्लिशांनीं तो मुलूख पेशव्यास परत द्यावा, आणखी राघोबाशीं मुंबईसरकारचा तह झाला आहे तो इतःपर नसावा. या तहास रघुनाथराव अनुकूळ झाला तर त्यानें महिना पंचवीस हजार रुपये खर्चास घेऊन गोदातीरीं कोपरगांवीं रहावें, त्याजवळ एक हजार स्वार शोभार्थ असावे.' या प्रकारें तह ठरल्यावर मुंबईसरकारास बहुत विषम वाटलें, कां कीं, ते मराठे लोकांचे माहितगार झालेले असतां त्यांस न विचारितां बंगालसरकारानें परभारां ठराव केला, तो मराठ्यांस फार हितकारक होईल. तें तहाचें वर्तमान ऐकून राघोबाचें बोलणें असें पडलें कीं, 'या तहास अनुकूळ व्हावें त्यापेक्षां मला कोणी दुसरा सहाय नसला तरी मी एकटाच युद्ध करीन'. परंतु त्यास कोणी मराठा अंतःकरणपूर्वक सहाय मिळेना, आणि कलकत्त्याची मसलत झालेली पुनः फिरणार नाहीं असें समजून त्यानें आपल्या सेनेस रजा देऊन दोनशें माणसांनिशीं तो रघुनाथराव सुरतेंत इंग्लिशांच्या आश्रयानें राहिला.

३. त्या वेळेस कोणी सदोबा नामें ब्राह्मण होता, त्यानें पानपतची लढाई झाल्यावर आठां नवां वर्षांनीं आपण सदाशिव चिमणाजी असें सोंग केलें. त्या वेळेस माधवरावानें त्याची चौकशी करून तो खोटा असें ठरविलें, आणि त्यास बंदींत घातलें होतें. त्यास एके ठिकाणीं ठेवीत नसत, त्याचें स्थानांतर करतां करतां तो रत्नागिरीस ठेविला, तेव्हां तेथचा सुभेदार रामचंद्र नाईक परांजपे नामें होता, त्यानें पुण्यांतील अव्यवस्था जाणून हा मुक्त केला तर आपणास मोठा लाभ होईल असें समजून त्यास सोडिलें; आणि लोकांस विदित केलें कीं, 'सदाशिवराव भाऊ हा खरा असतां कारभारी लोकांनीं यावर जुलूम करून उगाच यास प्रतिबंध केला.' ही गोष्ट लोकांस सत्य वाटून त्याजवळ वीस हजार फौज जमा होऊन त्यानें कोंकणांतील वीस बेवीस किल्ले घेतले. असें आलें असतां मुंबईच्या सरकारासही तो खरा वाटला, मग त्यांनीं त्याजकडे वकील पाठवून त्याचा मोठा सन्मान केला. शेवटीं तो सदोबा आपल्या सैन्यासुद्धां बोरघाटानें वर चढून गेला, व त्यानें राजमाचीचा किल्ला हस्तगत केला. तेव्हां तो त्या राजमाचीस असतां पुरंदरच्या कारभारी लोकांनीं तो तेथें कांहींसा ठरावयाकरितां भुलथापीनें तहाचें बोलणें लाविलें, आणि त्यास न कळतां शिंद्याचा सरदार रामजी पाटील नामें व भिवराव पानशा यांस लष्करासुद्धां राजमाचीस पाठवून एकाएकीं त्यावर हल्ला करविला. ते समयीं त्याचे लोक व तो भयभीत होऊन कोंकणांत पळाले, त्यांतून कितीएकांनीं साष्टीचे ठाण्यांत भिंतींचा आश्रय केला. मग तो मुंबईस गेला, परंतु तेथें मुख्य साहेब नव्हता ह्मणून तो बोलिला कीं, 'एव्हां आह्मी कुलाब्यास जातों, मग मुख्य साहेब आल्यावर पुनः येऊं'. असें ह्मणून तो कुलाब्यास गेला. तेथें रघूजी आंगऱ्या होता, त्यानें तो सदोबा कैद करून पुण्यास पाठविला; तेथें त्यास हत्तीचे पायीं देऊन मारिलें.[१] इकडे मुंबईसरकारानें त्या सदोबाचा सन्मान केला, आणि राघोबा सन १७७६ त नवेंबराचे ११ वे तारिखेस सुरतेहून मुंबईस आला त्यास इंग्लिशांनीं दरमहा दहा हजार रुपये खर्चास देऊन आपल्या आश्रयांत ठेविलें. त्यावरून पुरंदरच्या कारभारी मंडळीनें बंगालयाचा मुख्य गव्हनर जनरल व त्याचे मंत्री साहेब यांस शब्द लावून लिहिलें कीं, 'तुमचा व आमचा तह असतां मुंबईसरकारानें याप्रमाणें कृत्रिम केलें.' त्यावरून मुंबईसरकारही त्या कारभारी लोकांस शब्द लावी

१. मारिला तो ब्राह्मण होता. यास्तव पुण्यांतील ब्राह्मण आपल्याकडे ब्रह्महत्येचा दोष न यावा ह्मणून कोणी ह्मणत कीं, 'तो सोनार होता.' कोणी ह्मणत कीं, 'तो ब्राह्मण होता यास्तव तो हत्तीच्या पायीं दिला नाहीं, परंतु त्या अन्यायाची शिक्षा लोकांत दाखवायासाठीं अहमदनगरच्या किल्ल्यांत त्यास पाठवून उपोषणादि दुःख देऊन मारिला, आणि तेथें कोणीएक सोनार महाअपराधी होता त्यास जिवें मारावें अशी आज्ञा झाली होती, तो त्या सदोबाबद्दल मारिला.'

कीं, 'तुह्मी आह्मांस जो तीन लक्षांचा मुलूख दिलात त्याचें उत्पन्न आतां तसें होत नाहीं.' असा वाद कितीएक दिवस होत राहिला. फत्तेसिंग गाइकवाड तो आपणास पेशव्याचा ताबेदार ह्मणवीत असे, परंतु पेशव्याचे कारभारी लोक इच्छीत होते कीं, 'आपल्या आज्ञेवांचून कोणाशीं युद्ध किंवा तह करणार नाहीं, व मुलूखही आज्ञेवांचून कोणास देणार नाहीं,' असें गाइकवाड यापासून लिहून घ्यावें. याप्रमाणें त्यांच्या मनांतील अर्थ जाणून फत्तेसिंग यानें पेशवे यांचा धनीपणा मानिला, परंतु 'युद्ध करणें किंवा मुलूख देणें या कामास मला दुसऱ्याचे आज्ञेची गरज नाहीं,' असें बोलून त्यानें इंग्लिशांस मुलूख दिला होता तो माघारां इंग्लिशांजवळ मागितला. तें मागणें त्या कारभारी मंडळीच्या मसलतीनेंच झालें असा अर्थ नाहीं; कां कीं, राघोबानें गाइकवाडास मुलूख देऊं केला होता, तो त्याप्रमाणें त्यास प्राप्त न झाला ह्मणून त्यानें इंग्लिशांस आपला दिलेला मुलूख माघारां मागितला. इकडे पुरंदरच्या कारभारी लोकांनीं तो सदाशिवराव भाऊचें सोंग करणारा याचें पारिपत्य केल्यावर कोंकणांत फौज पाठवून त्या सदोबानें घेतलेले किल्ले सर्व हस्तगत केले.

४. यानंतर सन १७७७ त पर्जन्यकाळ गेल्यावर हरिपंत फडका फौज घेऊन हैदराशीं युद्ध करावयास कर्नाटकांत गेला, परंतु तदनुसार लाभ पावला नाहीं. त्या वेळेस त्या हरिपंताच्या लष्करांतील मानाजी फांकडा नामें सरदार व कितीएक मराठे मानकरी लोक त्या हैदर अल्लीनें फितविले होते, ते समजून हरिपंत फडका तेथून माघारां लवकर निघूं लागला. नंतर त्या लोकांतलाच एक ह्मसवाडचा देशमुख यशवंतराव नामें फितुरी होता, तो हरिपंतानें तोफेच्या तोंडीं दिला त्यावरून तो दंगा शांत झाला. त्याच वर्षीं साताऱ्यांत रामराजा फार वृद्ध झालेला होता, तो डिसेंबराचे १२ वे तारिखेस मृत्यु पावला. त्याच सुमारें भवानराव प्रतिनिधीही मरण पावला; त्याचे जागीं परशुराम श्रीनिवास नामें त्याचा पुत्र स्थापिला. रामराजा मृत्यु पावल्याचे कांहींसें पूर्वीं, त्याचा वृद्धापकाळ जाणून वावीगांवचा पाटील त्रिंबकजी राजा भोंसला, तो मालोजीचा भाऊ जो विठोजी भोंसला त्याचा वंशज, त्याचा पुत्र रामराजास दत्तक देऊन त्याचें नांव 'शाहू महाराज' ठेविलें. तो विठोजी शिवाजी महाराजाचा बाप जो शाहाजी याचा चुलता होय.

५. त्यापूर्वीं सन १७६० त कोल्हापुरचा राजा संभाजी तो डिसेंबर महिन्यांत मरण पावला होता. त्यानंतर दोन वर्षांनीं त्या राजाची स्त्री जिजाबाई इनें इंदापूर परगण्यांतील खानवटें गांवचा पाटील शाहाजी भोंसला याचा पुत्र दत्तक घेऊन तो गादीचा धनी करून त्याचा कारभार आपण चालवूं लागली. तेव्हां त्या राज्यांत पूर्वींच्या रीतीस फार अंतर पडूं लागलें, तें असें; तिनें पेशव्यांच्या राज्यास उपद्रव

विला, आणि निझामाशीं कांहीं संबंध ठेविला, तेणेंकरून माधवराव बल्लाळ, त्या वेळेचा पेशवा, यास राग येऊन त्यानें कोल्हापूरकरांचा कितीएक मुलूख घेऊन आपले सोइरे पटवर्धन यांचे जहागिरीकडे लाविला. याशिवाय तिनें समुद्रांत चांचेपणा केला ह्मणून इंग्लिशांनीं तिचा मालवण किल्ला व सावंतवाडीसंबंधें रेडी किल्ला घेतला. वराडांतील वर्तमान असें; सन १७७५ त साबाजी भोंसला व मुधोजी भोंसला या दोघांचें युद्ध होऊन त्यांत साबाजीचा जय झाला. त्याच्या लोकांनीं मुधोजीस वेढून धरिलें, आणि त्यास ते कैद करीत होते, इतक्यांत साबाजी त्या जयाच्या आनंदांत आपला हत्ती मुधोजीच्या हत्तीजवळ नेऊन बोलिला कीं, 'आतां कशास लढतां?' असें ह्मणत असतां त्या मुधोजीनें त्यास किमपि उत्तर न देतां जवळ पिस्तुल होतें त्याचा चाप दाबून त्या पिस्तुलाच्या गोळीनें त्यास मारून टाकिलें. मग तो मुधोजी आपला पुत्र रघूजी भोंसला याचा रक्षक होऊन कारभार चालवूं लागला. इकडे बडोद्यांत फत्तेसिंग गाइकवाड यानें पेशवेसरकारास पांच लाख रुपये नजर व खंडणीचा बाकी ऐवज साडेदहा लक्ष रुपये दिले, आणि नाना फडनवीस व सखाराम बापू यांस दरबारखर्च एक लक्ष रुपये देऊन तो आपलें 'सेनाखासखेल'-पद पावला.

६. सन १७७८ त पुण्यामध्यें कारभारी लोकांत वैमनस्य पडलें, तें उत्तरोत्तर वृद्धिंगत झालें. तो प्रकार असा; नाना फडनवीस आपला चुलत भाऊ मोरोबा फडनवीस याचे बुद्धीस तुच्छ मानून त्याचा द्वेष करीत होता. त्या मोरोबास जे राघोबाचे पक्षपाती मानीत होते, त्यांत मुख्य बजाबा पुरंदरे व सखाराम हरी व चिंतो विठ्ठल व विष्णु नरहर, यांनीं मिळून तुकोजी होळकर आपल्याकडे घेतला असे, आणि मोरोबा फडनवीस व सखाराम बापू यांची मसलत होऊन पुनः राघोबास स्थापावा असें ठरलें. परंतु त्याचे आदले वर्षीं माधवराव नारायणाची आई गंगाबाई मरण पावली, तेव्हांपासून मोरोबाविषयीं कांहीं मनांत शंका उत्पन्न झाल्यामुळें सखाराम बापू त्या कामांत पुर्तेपणें शिरेना. ही गोष्ट यावरून समजते कीं, ज्या वेळेस मोरोबानें हें वर्तमान मुंबई सरकारास विदित केलें, त्या वेळेस ते इंग्लिशही अनुकूळ होऊन 'सखाराम बापू, पुरंदरचा तह करणारा मुख्य, त्याची अनुकूळता या कामास पाहिजे,' असा आक्षेप धरिते झाले. तेव्हां तो तसें पत्र देईना, यास्तव तें सिद्धीस गेलें नाहीं. यावरून नाना फडनवीस यानें मनांत आणिलें कीं, 'मोरोबास धरून कैद करावें,' परंतु तो त्याचा मतलब मोरोबास कळला, तेव्हां तो पुण्याहून पळून गेला. तेव्हां नाना फडनवीस समजला कीं, 'हें कृत्य मीं एव्हांच केलें हें ठीक झालें नाहीं.' नंतर सखाराम बापूच्या द्वारें युक्तीनें तो

माघारां यावयासाठीं कारभारीमंडळी नवीच होणार, त्यांत मोरोबा व बजाबा पुरंदऱ्या हे असावे असा आकार घातला, तेव्हां मोरोबा वश होऊन पुण्यास माघारां आला; परंतु बजाबा पुरंदऱ्या नानाच्या कृत्यास विश्वासेना; आणि सखाराम हरी मोठ्या धैर्यानें स्पष्ट बोलिला कीं, 'मोठा शूर आणि प्रामाणिक व भोळा असा जो रघुनाथराव त्याचा पक्ष सोडून मी कदापि कृत्रिमी व भित्रा असा जो नाना फडनवीस याचा पक्ष धरणार नाहीं.'

७. यापुढें मोरोबाचे पक्षपाती जितके होते, त्यांवर नाना फडनविसाची शक्ति होळकराच्या बळामुळें चालेनाशी झाली, ह्मणून तो पुरंदरास निघून गेला. मग थोडक्याच दिवसांनीं त्या मोरोबास त्यानें असें दर्शविलें कीं, 'जर मला अभय असेल तर मीही रघुनाथरावास अनुकूळ आहें.' इतकें करून त्यानें सखाराम बापूचा व मोरोबाचा बहुत मान रक्षून त्यांची प्रसन्नता संपादिली. त्यानंतर पुण्यांत पुनः विचार होऊं लागला कीं, रघुनाथराव त्या पदावर स्थापावा किंवा न स्थापावा. असें असतां तो मोरोबा आपल्या भोळेपणानें समजला कीं, 'आतां मी मुख्य झालों;' आणि त्यास नाना फडनवीस वारंवार समजावूं लागला कीं, 'रघुनाथरावाचें आचरण नीट नाहीं, व तो पदारूढ असतां त्यानें बहुत द्रव्य व्यर्थ खर्चिलें;' त्यावरून त्याच्या मनांत आलें कीं, आतां रघुनाथरावाचें महत्व झालें असतां माझी योग्यता उतरेल; ह्मणून त्यास रघुनाथरावाविषयीं इंग्लिशांनीं सांगितलें असतांही त्या कामास तो आळस करूं लागला; कां कीं, त्याचे मनांत तें कार्य शेवटास जावेंसें नव्हतें. त्यावरून इंग्लिश यांनींही ती गोष्ट सोडिली.

८. यानंतर नाना फडनवीस मोठ्या आर्जवेंकरून त्या कारभारीमंडळीची सुप्रसन्नता राखीत असे. त्याचे पक्षीय महादजी शिंदे व हरिपंत फडके हे फौजेसुद्धां कर्नाटकीं जाऊन हैदर अलीशीं युद्ध उरकून मिरजेस दोघे एकत्र मिळाले, तेथून पुढें निरनिराळे निघून पुरंदरास जून महिन्याचे ८ वे तारिखेस उभयतां येऊन पोंहचले. तेव्हां नाना फडनवीस आपली मुख्यता पूर्वींच्याप्रमाणें साधूं लागला, आणि मुख्य मुख्य स्थानीं आपलीं ठाणीं बसवून शिंद्याचे द्वारें होळकरास रघुनाथरावाचा पक्ष नाहींसा केला. त्यावरून मोरोबा फडनवीस मातक्यान आपणास इंग्लिश सहाय व्हावयाविषयीं उद्युक्त झाला, परंतु तें कार्य सिद्धीस जावें असा अवकाश सांपडला नाहीं. कां कीं जुलै महिन्याचे ११ वे तारिखेस महादजी शिंद्याच्या स्वारांच्या एके टोळीनें येऊन अकस्मात् त्या मोरोबास धरून नानाजवळ नेलें, त्यानें त्यास अहमदनगरच्या किल्ल्यांत बंदींत घातलें; ते समयीं त्याचे कितीएक पक्षपातीही सांपडले ते कैद केले. सखाराम बापूनें इंग्लिशांशीं पुरंदर मुक्कामीं

जो तह केला होता, तो त्यास प्रतिबंध केला तर राहणार नाहीं ह्मणून तो तसाच मोकळा ठेविला. त्या समयीं सखाराम हरी राघोबाचा मोठा अभिमानी आणि विश्वासू असा सेवक होता, यास्तव त्याचे पायांत अशी जड बिडी घातली कीं, तो पुरुष बलाढ्य असतांही त्याला ती उचलेना आणि त्याचे खाण्यापिण्याचे असे हाल केले कीं, चौदा महिन्यांत त्याला उठावयाची शक्ति राहिली नाहीं. तरी तो आपल्या धन्याच्या अभिमानेंकरून बोलत असे कीं, 'माझें बळ गेलें, आणि प्राणही लवकरच जातील, परंतु मी मेल्यावर माझीं निर्मांस हाडेंही रघुनाथरावाच्या कल्याणाचे शब्द करीत राहतील.'



सखाराम हरी गुप्ते.

९. या प्रकारें नाना फडनवीस आपल्या कपटयुक्तींनीं त्या कारभारीमंडळींत आपली श्रेष्ठता पावला असतां, तो मनांत आणूं लागला कीं, 'अशाच कृत्रिमानें इंग्लिशही ठकतील.' त्यापूर्वीं सन १७७७ त कोणीएक फ्रेंच वकिलाच्या वेषेंकरून पुण्यांत आला होता, त्या फ्रेंच लोकांशीं व इंग्लिशांशीं हिंदूंच्या मुलखाचे राज्याविषयीं परस्परें स्पर्धा पहिल्यापासून फार आहे, असें त्या नाना फडनविसास ठाऊक होतें. त्यावरून त्यानें अशी कल्पना केली कीं, 'आपण फ्रेंच लोक हातीं धरिले असें इंग्लिशांस भय दाखवून कांहींएक प्रकारें ते वश करावे.' ह्मणून त्या दिवसापासून तो त्या फ्रेंचांचा बहुमान रक्षिता झाला.

१०. त्यापूर्वीं पुरंदरच्या तहासंबंधें कांहीं खटलें पडलें, तेंही तसेंच होतें. असें असतां नाना फडनवीस व शिंदे व होळकर यांस कलकत्त्याहून इंग्लिशांचें लिहिणें आलें कीं, 'आमचें व फ्रेंच लोकांचें विलायतेमध्यें युद्ध असतां ते लोक सांप्रत

१. तो सखाराम हरी जातीचा परभू होता, त्याशिवाय त्या जातीचे कित्तीएक पुरुष परम अभिमानेंकरून मराठ्यांची चाकरी करीत आले असें मराठ्यांच्या बखरीवरून विदित होतें.

तुमच्या राज्यांत बहुमानानें वागतात, त्यास ते कदाचित् आमच्या मुंबईसरकारास प्रतिपक्षी होतील, याकरितां आमचीं पलटणें खुसकीच्या मार्गानें कलकत्त्याहून मुंबईस येतील, त्यांस तुमचा अडथळा न होई अशी सनद द्या.' त्या गोष्टीस शिंदे व होळकर तत्काळ मान्य झाले, परंतु नाना फडनविसास असा विचार पडला कीं, 'जर मी हें मान्य करीन तर ते लोक इकडे येऊन प्रबळ होतील, आणि जर मान्य न करीन तर ते युद्धास सिद्ध होतील. तस्मात् आपण त्या इंग्लिशांस भयप्रदर्शनार्थ फ्रेंचलोकांची प्रतिष्ठा वाढविली, तो उद्योग बहुत न होता तर बरें असतें. आतां यांत फसलों असें दिसतें.' इतका विचार करून तोही निरुपाय होऊन मान्य झाला, परंतु त्याचे सरदार बुंदेलखंडांत होते, त्यांस गुप्तपणें लिहिलें कीं, 'माझें अंग न दर्शवितां होईल तितका इंग्लिशांस अडथळा करावा.' यानंतर मुंबईसरकार यांनींही त्या कारभारीमंडळीस स्पष्ट सांगितलें कीं, 'जे तुह्मी नवे कारभारी आहांत ते पुरंदरचा तह झाला आहे, त्याप्रमाणें मान्य आहांत कीं नाहीं, तें उत्तर द्या, व त्यापैकीं कांहीं अंश राहिला तो आमचा आह्मांस प्राप्त होण्यास विलंब नसावा; आणि तुह्मी पुण्यांत फ्रेंच लोकांचा वकील ठेविला, त्यावरून तुमच्या चित्तांत काय आहे, तें आह्मांस समजत नाहीं; त्यास पुढें कर्तव्य काय असेल तें आह्मांला कळविलें पाहिजे.' त्यावरून नाना फडनविसानें पुण्यांत लुबिन् नामें फ्रेंचांचा वकील होता, त्यास निघून जावयाची आज्ञा दिली, परंतु त्या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर विलंबानें कुटिल मार्गाचें आणि अस्पष्ट असें दिलें. त्यावरून मुंबईस ठरलें कीं, 'हे पुरंदरच्या तहाला मान्य नाहींत, त्यापेक्षां यांबरोबर युद्ध करावें.'

११. असें झाल्यावर नाना फडनवीस समजला कीं, 'हा मजबर मोठा अनर्थ येऊन पडेल; यास्तव कांहीं मोठा उपाय केला पाहिजे,' ह्मणून त्यानें मुंबईमध्यें या प्रकरणीं युद्धाची गोष्ट मात्र निघाली, तोंच कांहींएक युक्ति करून काळहरणार्थ कोणीएक वकील मुंबईस पाठविला, आणि 'मुलखोमुलखींच्या शिलेदारांनीं दसऱ्यास पुण्यावर येऊन मिळावें' अशी आज्ञा केली. याशिवाय कोंकणांत जेथें जेथें त्याचीं जहाजें होतीं तेथें तेथें त्या जहाजांवर धान्यादि साहित्यें भरून युद्धाची सिद्धता करविली. याप्रमाणें नाना फडनविसाची तयारी होत असतां मुंबईमध्यें त्या युद्धास जावयाची गोष्ट मात्र निघून तयारीस विलंब लागला. याचें कारण असें कीं, तेथचे मुख्य व त्यांचे मंत्री यांचा विचार एकरूप होईना.

१२. मग असें ठरलें कीं, रघुनाथरावाबरोबर कांहीं फौज देऊन त्यास पुण्यांत पाठवून तो माधवराव नारायणाचा मुख्य रक्षक करून स्थापावा. ही गोष्ट सिद्धीस न्यावयाकरितां त्याबरोबर सेना दिली. आणि त्या सेनेचा सरदार व दोघे तिऱ्हाईत

साहेब त्या कामास नेमून तो अर्थ शेवटास जावासा केला. त्या फौजेंत सहाशें सुमारें गोरे लोक व दोन हजार दोनशें पलटणी लोक तोफखान्यासहित होते. ते त्या राघोबाबरोबर निघून डिसेंबराचे २३ वे तारिखेस बोरघाटावर सारे जाऊन एके जागीं मिळाले. त्यांत पलटणी सरदार साहेब व ते दोघे तिन्हाईत साहेब यांचें कांहीं वैमनस्य पडलें, आणि तो पलटणी साहेब हिंदूंशीं युद्ध करण्याविषयीं माहीत नव्हता, ह्मणून त्यास खंडाळ्यापासून कारल्यापर्यंत जावयास शत्रूची फारशी अडचण नसतांही आठ दिवस लागले.

१३. तेथून पुढें तळेगांवावर पोंहचले तेव्हां ज्यांत महादजी शिंदे व हरिपंत फडके मुख्य असें जें मराठे यांचें मोठें लष्कर याची गांठ पडली. तें सैन्य सुमारें पन्नास हजार होतें. ते समयीं प्रथम मराठे यांनीं आपण युद्ध करणार असें दर्शविलें, परंतु इंग्लिश आपल्या बंदोबस्तानें त्यांवर चालून जात असतां ते मराठे समूर उभे राहीनातसे झाले. नंतर ते इंग्लिश तळेगांवाजवळ जाऊन पोंहचतात तों तो गांव उजाड झालेला होता; आणि त्यांस दुसरें वर्तमान कळलें कीं, 'या गांवाप्रमाणेंच चिंचवड व पुणें ओस पाडावें अशी नानाची आज्ञा झाली आहे.' त्यावरून मराठे फार निकरानें लढतील अशी अटकळ करून ते साहेब माघारें मुंबईस यावयास सिद्ध झाले. इतकें होई तोंपर्यंत लहान लहान युद्धें कोणी पागे व पतकी लोक यांशीं झालीं. त्यांत इंग्लिश जय पावले. त्यांचेजवळ आणखी अठरा दिवस पुरेशी सामग्री होती, आणि राघोबा व ते पलटणांतले कितीएक सरदार यांच्या मनास ती माघारें जावयाची मसलत येईना, असें असतां ते तसेंच पुढें जाऊन जर तत्काळ पुणें घेते तर तें कार्य सहज झालें असतें, परंतु तें न करितां त्याच रात्रीस इंग्लिश आपलें मोठ्या तोफा वगैरे जड सामान तेथच्या तळ्यांत बुडवून डेरे पाडून मागें फिरले.

१४. तेव्हां त्यांस वाटलें कीं, आह्मी शत्रूस न कळतां एक मजल पार होऊं, परंतु मध्यरात्रीनंतर दोन अडीच घटिकांनीं त्यांच्या बिनीवर शत्रूचा मार होऊं लागला; आणि त्या वेळेस त्याचें कांहीं खटलेंही लुटलें गेलें. मग थोडक्या वेळानें जी त्याच्या पाठीमागची दोन तोफांसहित सहाशें पलटणी काळ्या लोकांची एक टोळी होती तीवर शत्रूनें हल्ला केला असतांही तें लष्कर शत्रूंशीं लढतां लढतां उजेडल्यावर पुढें चालतें झालें. ते समयीं त्याच्या दृष्टीस पडलें कीं, आपल्या सभोंवतीं शत्रूच्या स्वारांची मोठी दाटी झाली आहे. आणि ते आपणांवर हल्ला करणार आहेत. असें समजलें तेव्हां तो हल्ला आपणावर घ्यावयास ते बंदोबस्तानें उभे राहिले. त्या वेळेस मराठे लोक यांनीं शाहजहानापासून चाल पडल्याप्रमाणें त्यांच्या समूर न लढतां त्यांवर मागून हल्ला केला. तेव्हां ते मागचे शिपाई लोक सर्व काळे होते. त्यांचा मुख्य साहेब हार्टली नामें

युद्धांत निपुण होता, त्याची आज्ञा वारंवार मानून ते मोठ्या स्थिरतेनें तेथेंच असून त्यांनीं तो शत्रूंच्या स्वारांचा हल्ला मागें हटविला, आणि त्यांस पिटून त्यांचे पाठीस लागावें अशी आज्ञा ते पलटणी लोक मागूं लागले. मग सूर्योदयाचे समयीं मराठ्यांचें पायदळ आणि स्वार मिळून त्यांनीं पुनः मागच्या टोळीवर चाल केली, आणि मोठमोठ्या तोफा आणून त्या लष्कराच्या थोरल्या भागावर लाविल्या. तेव्हां इंग्लिश यांनींही आपल्या तोफा सुरू केल्या. आणि मागचे टोळीचे कुमकेस चारशें सुमारें गोरे लोक व दोनशें काळे लोक पाठविले. ते त्यांस मिळतांच त्या मागल्या टोळीच्या लोकांनीं दोन प्रहरपर्यंत त्यांवर मराठे फार निकरानें हल्ला करीत होते तो निष्फळ केला. तेव्हां मराठे यांच्या बंदोबस्तांत कांहींसें अंतर पडलें. अशी संधि पाहून ते लोक आपल्या थोरल्या भागास जाऊन मिळाले. त्या समयीं ते थोरल्या भागाचे लोक वडगांवांत ठाणें धरून मराठ्यांशीं तोफांनीं लढत होते. मराठे त्या गांवांत शिरते-वेळेस त्यांचें बुणगें त्या पलटणाचे टोळींत मिसळलें, त्या योगें त्यांचा बंदोबस्त कांहींसा विस्कळित झाला; ती संधि पाहून मराठ्यांनीं त्या वेळेस मात्र हल्ला करून त्यांचा कांहींसा नाश केला. मग तिसरे प्रहरीं मराठ्यांनीं बहुतकरून युद्ध सोडिलें. त्या संधींत साहेबलोक समजले कीं, 'आह्मीं एथपर्यंत आपलें सर्व संभाळून आणिलें, आतां यापुढें नीट संभाळून जाणें होणार नाहीं,' ह्मणून त्यांनीं तहाचें बोलणें करावयासाठीं मराठ्यांकडे वकील पाठविला; आणि राघोबानेंही आपल्याविषयीं शिंद्याशीं तहाचें बोलणें लाविलें. त्यांत इंग्लिशांनीं कबूल केलें कीं, सन १७७३ पासून जो हिंदूंचा मुलूख घेतला आहे, तो माघारां द्यावा, व कलकत्त्याहून लष्कर मुंबईस येत आहे, तें माघारें फिरवावें; आणि राघोबा तर आपण होऊनच शिंद्याच्या स्वाधीन झाला. याशिवाय इंग्लिशांनीं आपला भडोच शहराचा भाग शिंद्यास द्यावा, आणि त्या शिंद्याचे कारभारी लोक यांस एकेचाळीस हजार रुपये दरबारखर्च द्यावा. असा करार झाल्यावर मराठ्यांनीं त्या इंग्लिशांस जाऊं दिलें.

१५. बंगाल्याहून लष्कर निघून मुंबईस येत होतें, तें मे महिन्यांत यमुनापार उतरलें. त्यास आज्ञा होती कीं, 'वाटेनें नीट मुंबईस जावें.' परंतु मराठ्यांच्या सरदारांनीं वाटेंतच त्यांना अडविलें, त्यावरून त्यांच्या पारिपत्याकरितां त्या लष्करास विलंब लागला; ते समयीं त्या लष्करी लोकांनीं मराठ्यांशीं युद्ध करून काल्पीचा किल्ला घेतला, आणि बुंदेलखंडच्या रजपुतांशीं लढतांनाही कांहीं उशीर लागला, त्यावरून कलकत्त्याच्या मुख्य साहेबास राग येऊन त्या लष्कराचा मुख्य सरदार साहेब होता, त्यास माघारें बोलावून कर्नल गाडर्ड नामें साहेब त्या कामावर नेमिला; तो त्या लष्करांत जाऊन पोंहचतांच तेथून पुढें सुरतेस लष्करासुद्धां चालता झाला. त्यांसही वाटेनें कोणी

मराठे सरदारांनीं उपद्रव केला. परंतु तो त्यांस जिंकून पुढें जाऊन नर्मदापार उतरला. नंतर त्यानें मुधोजी भोंसल्याशीं कांहीं तहाचें बोलणें करावयासाठीं कांहीं दिवस तेथें मुकाम केला. तो तह कलकत्त्याचे साहेब यांनीं मुधोजी भोंसला आपणास वश होऊन त्यानें पेशव्याचा पक्ष सोडावा, या आशेनें मान्य केला; आणि मुधोजीही तदनुरूप वागणार होता, परंतु पुण्यांतील तयारीचें वर्तमान ऐकून तें घडलें नाहीं. मग तो गाडर्ड साहेब नर्मदा सोडून फेब्रुवारीचे ६ वे तारिखेस बऱ्हाणपुरावरून सुरतेस जाऊन पोंहचला. तेव्हां त्याशीं मार्गांत मराठे सरदार जसे शत्रुभावानें वागत होते तसें भोपाळच्या नबाबानें न वागतां त्या इंग्लिशांचा मोठा सन्मान केला, आणि पुढें मराठ्यांचा राग आपणावर होईल, हें न मानितां त्यानें इंग्लिशांस जो जो पदार्थ पाहिजे तो तो आपल्या शक्तीप्रमाणें अनुकूळ करून देऊन त्यांशीं स्नेह ठेविला. त्या स्नेहास्तव इंग्लिशांनींही त्यास अमर केलें. तो लाभ अद्यापि त्याचे वंशज अनुभवितात.

१६. महादजी शिंदा नाना फडनविसाचा पक्षपाती असून त्याच्या मनांत होतें कीं, 'आपण नानाच्या हाताखालचा वागणारा असें न व्हावें; किंबहुना स्वतंत्रपणें वागून त्यापेक्षां आपली श्रेष्ठता असावी,' ह्मणून त्यानें रघुनाथरावास हातीं धरिलें, आणि त्यास खर्चासाठीं बुंदेलखंडीं बारा लक्षांची जहागीर नेमिली; आणि त्या राघोबास सांगितलें कीं, 'हें तुह्मांस अविच्छिन्न पोंहचेल, न पोंहचल्यास मी देईन.' इकडे नानाजवळ बोलिला कीं, 'रघुनाथराव कांहीं अनर्थ उत्पन्न करील तर त्याचा जाबसाल मला पुसावा,' असा तो उभयपक्षीं आपण मध्यस्थ झाला. त्याचा मतलब असा होता कीं, नाना फडनवीस याचा उत्कर्ष नसावा; आणि त्याशीं व इंग्लिशांशीं विरोध असला तर नानास वारंवार आमची गरज लागून आपली श्रेष्ठता राहील, यास्तव त्यानें इंग्लिशांशीं द्वेष पडावयासाठीं कांहीं नानास मसलत देऊन, त्याकडून त्या इंग्लिशांचा किल्ला बाणकोट याजवर हल्ला करविला. याशिवाय राघोबा बुंदेलखंडांत आपली जहागीर घ्यावयास पाठविला, ते वेळेस त्याचे बरोबरचे जे लोक होते ते तोफखाना वगैरे सरंजामसुद्धां त्यासमागमें जाऊं दिले; आणि त्या रघुनाथरावाच्या चौकशीस जे आपले लोक त्याबरोबर पाठविले, ते त्याच्या लोकांपेक्षां कांहींसे अधिक होते. तो राघोबा तिकडे जात असतां नर्मदेसमीप पोंहचला. तेव्हां त्यास कोणीं समजाविलें कीं, 'तुह्मांस झांशीच्या किल्ल्यामध्यें शिंदा बंदीस घालणार आहे.' त्यावरून रघुनाथरावानें आपल्या बरोबर चौकशीकरितां जे शिंद्याचे लोक आले होते, त्यांवर चोळीमहेश्वराजवळ नदी उतरतेसमयीं एकाएकीं हल्ला करून त्यांस पळविलें, आणि आपण मोठ्या त्वरेनें भडोचास जाऊन इंग्लिशांचा आश्रय केला. या सर्व प्रकाराचा विचार पाहिला असतां असें दिसतें कीं, शिंद्यानें

राघोबास बंदीस घालण्याचें भय आपणच दाखविलें असेल, कां कीं, तें सत्य मानून त्यानें पळून जावें, आणि इंग्लिशांच्या आश्रयास राहावें, तेणेंकरून इंग्लिश व नाना फडनवीस यांमध्यें पक्का विरोध उत्पन्न होऊन आपली श्रेष्ठता अधिक व्हावी; याच अर्थं त्यानें राघोबाबरोबर चौकशीस लोक थोडे पाठविले. असा राघोबा पळून जाण्यास आणीक एक शिंद्याची मसलत असेल, ती अशी कीं, समयविशेषीं आपणास इंग्लिशांची प्रसन्नता संपादन करण्याचें कारण पडल्यास हें कृत्य उपयोगास येईल, हा एक अर्थ दिसतो; कां कीं, त्यापूर्वीं त्यानें कितीएक वेळां साहेबलोकांपाशीं भाषणप्रसंगीं तुमची व आमची मैत्री असावी असें दर्शविलें होतें. त्यापैकीं एक गोष्ट अशी आहे कीं, वडगांवच्या तहानंतर कोणे एके समयीं तिघे चौघे साहेब व तो महादजी शिंदा बोलत बसले असतां, त्या बैठकींत महादजी शिंदा इंग्लिशांच्या लष्करचे मागल्या टोळीशीं पूर्वीं लढाई झाली, त्याचें स्मरण करून स्तुतिपूर्वक बोलिला कीं, 'धन्य तुमची युद्धशिक्षा; जो मी एवढा लढणारा त्या मजपुढें तुमचे पलटणी लोक एकसारखे तांबड्या भिंतीप्रमाणें मला दिसत असत. ती भिंत एखादे जागीं तुटली असतां तत्काळ पुनः सांधली जाई.' असें बोलतां बोलतां त्यांतील एक शीबाल्डनामें साहेब याच्या कानांत त्यानें सांगितलें कीं, 'असें युद्ध करणारे तुमचे लोक व माझे शिपाई एकमत झाले असतां फार चमत्कार होईल, यास्तव तो समय यावा असें मी इच्छितों.'

१७. राघोबा पळाला ते समयीं नाना फडनविसाबरोबरीचा सखाराम बापू व रघुनाथरावाचा मुख्य कारभारी चिंतो विठ्ठल, हे शिंद्यापासून नाना फडनविसानें मागून घेतले, तेव्हां त्यानेंही त्याप्रमाणें त्यांस त्याचे स्वाधीन केलें. त्यावरूनच कोणी ह्मणतील कीं, तो महादजी शिंदा अंतःकरणपूर्वक नाना फडनविसास अनुकूळ होता, तर तसें नव्हे; कां कीं, त्यानें आपलें आंग राघोबास पळवावयाविषयीं किमपि नव्हतें, असें त्या नानाला समजावयासाठीं ते त्याचे हातीं दिले असतील. यानंतर नाना फडनविसानें तो सखाराम बापू मोठा शहाणा मनुष्य कोणे वेळेस काय करील, तें समजूं न देतां आपणच सर्व आटपील, या भयास्तव त्याला एके ठिकाणीं न ठेवितां त्यास कांहीं दिवस सिंहगडीं व कांहीं दिवस प्रतापगडीं व दुसऱ्या किल्ल्यांवरून कांहीं दिवस ठेवितां ठेवितां शेवटीं तो सखाराम बापू हाल होऊन त्या बंदीमध्यें रायगडीं मृत्यु पावला; आणि चिंतो विठ्ठलही तसाच कोणे एके किल्ल्यांत मरण पावला.

# भाग चोविसावा.

## ( इसवी सन १७७९ पासून सन १७८५ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. जनरल गाडर्ड साहेब व नाना फडनवीस यांचें तहाविषयीं कांहीं बोलणें झालें.—२. इंग्लिश दुसऱ्याचा पक्ष न धरितां स्वयेंच मराठे लोकांशी युद्ध करूं लागले.—३. मग बडोद्याजवळ डभई शहर आहे तेथें इंग्लिशांचें लष्कर जाऊन तें ठिकाण घेतलें.—४. फत्तेसिंग गाइकवाड याशीं तह केल्याचा प्रकार.—५. पेशव्यांच्या लोकांपासून अहमदाबाद कोट इंग्लिशांनीं लढून घेतला.—६. मग गाडर्ड साहेब यास जिंकावयाकरितां शिंदे व होळकर गुजराथेंत गेले. ते कोणकोणत्या प्रकारें वागले तें प्रकरण.—७. बंगाल्याहून लष्कर येऊन ग्वाल्हेर व लाहोर हे दोन्ही किल्ले घेतले.—८. कोंकणांत इंग्लिश व मराठे युद्ध करिते झाले तो प्रकार.—९. दुघाराजवळची लढाई व वसई किल्ला इंग्लिशांनीं हस्तगत केला.—१०. जनरल गाडर्ड साहेब कच्चे मसलतीनें बोरघाटास ठाणें धरून राहिला. मग मुंबईकडे त्यास हटून जाणें प्राप्त झालें, त्यांत त्याचा कांहींसा नाश झाला.—११. बंगाल्याचें लष्कर शिंद्याच्या मुलखांत शिरलें तो प्रकार.—१२. मद्रासचे कुमकेस कलकत्त्याहून लष्कर पायवाटेनें पाठविलें ते समयीं मुधोजी भोंसल्याचें लष्कर कलकत्त्यास होतें तत्संबंधें आपल्या लष्करास अडथळा न व्हावा म्हणून कलकत्त्याच्या साहेबानें तो मुधोजी स्वपक्षानुसारी केला.—१३. सर्व मराठे व इंग्लिश यांचा महादजी शिंद्याच्या द्वारें तह झाला.—१४. इंग्लिशांनीं भडोच किल्ला शिंद्यास दिला—१५. हैदर अली मरण पावल्यावर त्याचा पुत्र टिपू याचे वागणें. मद्रासेच्या इंग्लिशांनीं साल्प्याच्या तहाचा बेत ध्यानांत न आणितां टिपूशी वेगळा तह केला.—१६. नाना फडनवीस व निझाम यांची टिपूवर कांहीं मसलत झाली.—१७. रघुनाथरावाचा मृत्यु व त्याच्या पुत्राची कांहीं गोष्ट.—१८. सन सत्राशें त्र्याहत्तरापासून दिल्लीकडे काय काय वर्तमान झाले तें प्रकरण, व सुजाउद्दवल्याचा मृत्यु.—१९. नजीफखानाचा दत्तपुत्र यानें शिंद्याची कुमक मागितली, तेणेकरून तो शिंदा दिल्लीमध्यें फार योग्यता पावला.—२०. त्या योगें शिंदा उन्मत्त होऊन त्यानें इंग्लिशांस कांहीं अमर्याद मागणें केलें, त्यावरून ते रुष्ट होऊन त्यांनीं शिंद्याची मध्यस्थी दूर करून आपला कोणी साहेब नेहमीं पुण्यास असावासा नेम केला.

१. गाडर्ड साहेब सुरतेस जाऊन पोंहचला, नंतर त्याचा कलकत्त्याच्या साहेबांनीं मोठा मान वाढवून त्यास 'जनरल' पदवी देऊन त्याला आज्ञा केली कीं, 'नाना फडनवीस व मुंबईसरकार यांशीं स्नेह पडेल असा उद्योग करावा, त्यांत पुरंदरच्या तहाप्रमाणें बेत असावा,' अशी आज्ञा झाली. त्यांत विशेष इतकाच कीं, फ्रेंच लोकांस हिंदूंच्या मर्यादेंत येऊं देऊं नये. त्यावरून त्या साहेबाचें व नाना फडनविसाचें बोलणें चाललें असतां सन १७७९ मध्यें पर्जन्यकाळाचे समाप्तीस त्या साहेबास वर्तमान कळलें कीं, 'एकसमयावच्छेदेंकरून इंग्लिशांचीं संस्थानें, कलकत्ता व मद्रास व मुंबई हीं हल्ला करून घ्यावीं, आणि इंग्लिशांस घालवून द्यावें, असा बेत झाला आहे. आणखी हें वर्तमान ऐकिल्याचे पूर्वींच त्यानें नाना फड-

नविसास मैत्रीसंबंधें कांहीं स्पष्ट प्रश्न केला होता, तेव्हां नानानें विलंब न करितां उत्तर दिलें कीं, 'साष्टी व राघोबा आमचे स्वाधीन केल्यानंतर तहाचा विचार करितां येईल.' या दोहों कारणांवरून तो गाडर्ड साहेब कांहीं उत्तर न देतां मुंबईस गेला. तेथचा मुख्य साहेब व त्याचे मंत्री यांच्या विचारें असें ठरलें कीं, मलबार-प्रांतीं समुद्रतीरीं मद्रासखातेसंबंधें लष्कर आहे, तें आपल्या कुमकेस बोलावून युद्धाची तयारी करावी; याशिवाय मुंबईस फौज तयार करून गुजराथेंत पाठवावी.

२. राघोबा भडोचेस पळून गेला. ते समयीं इंग्लिशांनीं त्याचा पहिल्यानें फारसा सन्मान केला नाहीं, परंतु आश्रय मात्र दिला. मग जून महिन्याचे १२ वे तारिखेस तो राघोबा आपले पुत्र अमृतराव व बाजीराव हे दोघे बरोबर घेऊन सुरतेस जनरल गाडर्ड साहेब याचे भेटीस गेला, तेव्हां त्या साहेबानें त्यास दरमहा पन्नास हजार रुपये खर्चास देऊन ठेविला; आणि पुढें जें काय विशेष कर्तव्य तें त्यास किमपि सांगितलें नाहीं. का कीं, तो मराठे लोकांचे मनांतून उतरलेला त्यास बळेंच मुख्य करून स्थापणें हें चांगलें नव्हे, आणि आपण याची तादृश प्रतिष्ठा न वाढविली असतांही ते कारभारी लोक पुरंदरच्या तहाप्रमाणें न वागले तरी आपण आपल्या मानरक्षणार्थ स्वयेंच युद्ध करायें, हें उचित; असा विचार त्यांनीं ठरविला होता.

३. यानंतर गाडर्ड साहेब यानें सन १७७९ च्या शेवटीं सुरतेस माघारें येऊन तेथें नाना फडनविसाचा वकील होता त्यास निरोप दिला, आणि आपण आपल्या लष्कराची तयारी करूं लागला. तेच समयीं त्या साहेबानें फत्तेसिंग गाइकवाड यास मैत्रीसंबंधें कांहीं प्रश्न केले, त्यांचें त्यानें उत्तर विलंबेंकरून अस्पष्ट दिलें. त्यावरून तो गाइकवाड पूर्वींच्या बोलण्याप्रमाणें वागणार नाहींसें समजून गाडर्ड साहेब आपल्या लष्करासुद्धां तापी उतरून सन १७८० च्या जानेवारीच्या १ ले तारिखेस उत्तरेकडे गेला. तों बडोद्याजवळ डभई शहर आहे, तेथें किल्लेदार ब्राह्मण दोनहजार लोकांसहित त्या कोटांत होता, त्यापाशीं तें ठिकाण साहेबानें मागितलें असतां त्यानें दांडगाईचें उत्तर केलें, आणि आंतून जेजालांचे बार टाकिले. तेव्हां इंग्लिश रात्रीमध्यें मोर्चा बांधून प्रातःकाळीं पाहूं लागले तों कोट रिकामा टाकून ते लोक रात्रीसच निघून गेले होते. असें तें शहर हस्तगत झालें.

४. नंतर फत्तेसिंग गाइकवाड कृत्रिम टाकून सरळपणें तहाचें बोलणें करूं लागला, तेव्हां असें ठरलें कीं, 'महीनदीचे उत्तरेस पेशव्याचा जो भाग आहे, तो फत्तेसिंगास असावा.' त्याबद्दल फत्तेसिंगानें अठ्ठाविशी नामें तापीनदीचे दक्षिणेस अठ्ठावीस महाल आहेत ते, व भडोचचा जो गाइकवाडाचा भाग होता तो, व त्या

परगण्यांत त्यांचे कांहीं गांव होते ते, व नर्मदेच्या कांठीं सिन्नर नामें परगणा आहे तो, इतकें इंग्लिशांस द्यावें, परंतु इंग्लिशांनीं पेशव्याचें अहमदाबाद शहर घेऊन गाइकवाडास अगोदर दिलें पाहिजे.'

५. असा करार झाल्यावर जनरल गाडर्ड साहेब मोठ्या त्वरेनें अहमदाबादेवर गेला. तें शहर मोठें आणि त्याचा कोट फार बळकट असे. त्या वेळेस तें शहर ओस होतें, तथापि त्यांत एक लक्ष मनुष्यांची वस्ती होती, आणि तेथचा किल्लेदार ब्राह्मण असे, त्यास तो किल्ला इंग्लिशांनीं मागितला, तेव्हां त्यानें उत्तर केलें कीं, 'मी एव्हांच द्यावयास सिद्ध आहें, परंतु मजपाशीं आरब व सिंधी लोक मिळून सहा हजार व दोन हजार मराठे स्वार आहेत, इतके वश करावयास कांहीं विलंब लागेल.' असें बोलणें लागलें असतांही दुसरे दिवशीं इंग्लिशांचे कितीएक लोक त्या कोटाजवळ गेले, त्यांवर त्या कोटकऱ्यांनीं तोफांचा भडिमार करून त्यांतील कितीएक लोक मारिले. त्यावरून त्या गाडर्ड साहेबानें मोर्चा लावून एके जागीं तो कोट पाडून मोठें खंडार आंत जावयाजोगें एका दिवसांत केलें. मग दुसरे दिवशीं प्रातःकाळीं इंग्लिशांच्या लष्कराची टोळी त्या कोटांत जावयास सिद्ध झाली असतां आरब व सिंधी लोक त्या खंडारावर चढून त्यांस प्रतिबंध करावयास उभे राहिले, तेव्हां त्या उभयतांचा युद्धप्रसंग झाला, त्या समयीं त्यांचे तीनशें लोक पडले, आणि इंग्लिशांचे जखमी व मेले मिळून एकशें सहा पडले. शेवटीं ते आंतून मोठ्या निकरानें वाट धरून उभे होते ते मागें सरले, आणि इंग्लिशांचे लोक आंत चढून गेले. असें तें शहर इंग्लिशांनीं घेतलें, तेव्हां त्या साहेबानें फार बंदोबस्त ठेविला कीं, आपण आंत शिरल्यावर शहरांतील कोणाएकाही माणसास उपद्रव न व्हावा. तरी ते आंत गेल्यावर तेथच्या शिपायांखेरीज त्या शहराचीं दोन माणसें मारिलीं गेलीं.

६. याप्रमाणें गुजराथेंत इंग्लिश जय पावत असतां शिंदे व होळकर यांनीं वीस हजार स्वारांसहित नर्मदा उतरून बडोद्याजवळ येऊन मुकाम केला. हें वर्तमान ऐकून जनरल गाडर्ड साहेब अहमदाबादेहून निघाला, तो फझलपुराजवळ मही-नदी उतरून बडोद्याकडे चालिला, तेव्हां शिंदे होळकर बडोद्यापासून निघून पावनगडास गेले. त्या समयीं शिंद्याजवळ वडगांवच्या तहासंबंधें जामिनादाखल दोन साहेब होते, ते त्यानें गाडर्ड साहेबाकडे पाठवून त्यास समजाविलें कीं, 'मी तुमचा स्नेही आहें.' त्याच्या मनांत आलें असेल कीं, 'आपण इंग्लिशांशीं स्नेह ठेवून पेशव्यांकडे भारीपणानें वागावें;' परंतु इंग्लिश असें इच्छीत होते कीं, 'आपला मान किमपि कमी न होतां त्या लोकांशीं निक्षुण स्नेह मात्र असावा,' पण कांहींएक निमित्तें दुसऱ्यांशीं संबंध ठेवून आपलें राज्य वाढवावें, अशी त्यांची वासना नव्हती. त्यानंतर

शिंद्यानें त्या जनरल साहेबाकडे वकील पाठविल्यावर त्याजवळ तो साहेब बोलिला कीं, 'तुमचें तहाचें बोलणें तीन दिवसांत व्हावें, उगाच विलंब कामाचा नाहीं.' त्यावरून तो वकील शिंद्याकडे जाऊन त्यानें तेथून उत्तर आणिलें कीं, 'राघोबानें बडगांवच्या तहामध्यें कबूल केलें होतें कीं, आह्मी झांशीकडे बारा लक्ष रुपयांची जहागीर खाऊन राहूं, आमचा पुत्र बाजीराव हा माधवराव नारायण पेशवा याचा दिवाण करावा, याप्रमाणें झालें पाहिजे.' त्यावर इंग्लिशांचें बोलणें पडलें कीं, 'राघोबाचे मनास आलें तर तो झांशीस जाईल. त्यावर बलात्कार कर्तव्य नाहीं.' याप्रमाणें उभयपक्षीं विचार परस्परें थोडक्याच दिवसांत विदित झाले. नंतर तो महादजी शिंदा समजला कीं, या गाडर्ड साहेबाशीं आपल्या कपटाच्या युक्ती चालावयाच्या नाहींत, आणि तहाच्या निमित्तें कालक्रमणा होईलशी दिसत नाहीं. ह्मणून त्यानें गोविंदराव गायकवाडाशीं बोलणें लाविलें कीं, 'मी तुह्मांला गुजराथेच्या राज्याचा अधिकारी करितों.' असें असतां तो शिंदा आपणावर त्या साहेबाच्या लष्कराचा छापा एकाएकीं येऊन न पडावा, ह्मणून आपल्या लष्करासभोंवत्या लहान लहान टोळ्या बसवून तोफा वगैरे जड सामान पावनगडाचे तटाखालीं पाठवून सावधपणें राहूं लागला. असा बंदोबस्त झाल्यावर इंग्लिशांचें लष्कर त्यांच्या जवळ तीन कोसांवर उतरलें असतां त्यानें त्यास किमपि अडथळा केला नाहीं. मग तीं दोन्हीं लष्करें एकमेकांची चौकशी सात दिवस करीत राहिलीं होतीं. नंतर एप्रिलचे २ ऱ्या तारिखेस गाडर्ड साहेब कांहींएक लोकांची टोळी तयार करून आपल्याबरोबर घेऊन गुप्तपणें रात्रीस शिंद्याच्या लष्करावर चालून गेला, तो त्याच्या लष्कराचे सभोंवत्या टोळ्या बातमीस ठेविल्या होत्या, त्यांस कळूं न देतां त्याच्या थोरल्या लष्कराजवळ जाऊन पोंहचला, परंतु दिवस उगवावयाचा समय झाला, त्यामुळें छापा घालावयाचा बेत साधला नाहीं. ते लोक घोड्यावर तयारच होते. त्यांनीं प्रथम त्या इंग्लिशांच्या समूर उभे राहून त्यांवर चालून जातात असें त्यांस दाखविलें, मग ते इंग्लिश त्यांजवर भडिमार करूं लागले, तेव्हां ते तेथून मागें सरून त्यांच्या गोळीचा मार चुकवून दूर उभे राहिले. तेव्हां इंग्लिशांनीं आपल्याकडचे अयोध्येच्या नबाबाचे स्वार त्यांचे पाठीस लाविले, तेव्हां ते तेथूनही दूर पळून गेले. त्या प्रसंगीं इंग्लिशांच्या पलटणी लोकांपैकीं कोणीएकही पडला नाहीं; नबाबाचे पंधरा स्वार मात्र पडले. त्या वेळेस त्यापेक्षां मराठ्यांचें लष्कर पळाल्यानें तो गाडर्ड साहेब समजला कीं, 'आपला जय झाला,' परंतु मराठे तेथून पळाले होते, ते परतून येऊन तो साहेब जेव्हां डेरे देऊन उतरला, तेव्हां तेही पहिल्याप्रमाणें त्यापासून तीन कोसांच्या अंतरानें डेरे देऊन उतरले, आणि पूर्वींपेक्षां विशेष सावध झाले. त्यानंतर मुंब-

ईहून मद्रासखात्याचे कांहीं लोक येऊन त्या साहेबास मिळाले, तेव्हां त्यानें त्याच महिन्याचे १९ वे तारिखेस पुनः मराठ्यांवर छापा घालावयाचा उद्योग केला. त्या समयीं मराठे उभे राहून इंग्लिशांस आपल्याजवळ बाणाच्या टप्प्यांत येऊं देऊन एकाएकीं त्यांजवर बाणांची सरबत्ती करून मागें सरले. त्या समयीं मुंबईकडे युद्धाचें कांहीं प्रयोजन लागलें, यास्तव त्या साहेबास लिहून आलें कीं, 'तुह्मांजवळ कर्नल हार्टलीसाहेब आहे, त्याजबरोबर कांहीं लोक देऊन तो आह्मांकडे पाठवून द्यावा.' मग त्यास पाठविल्यावर गाडर्ड साहेब उरलेले लोक घेऊन पर्जन्यकाळ जाई तोंपर्यंत नर्मदेच्या कांठीं जाऊन राहिला. त्यापूर्वीं सुरतेच्या साहेबानें गाडर्ड साहेबास लिहिलें कीं, 'एथें कोणी मराठा गणेशपंत नामें लष्करासहित आला आहे.' त्यावरून त्या साहेबानें बंगाल्याच्या तुर्कस्वारांचें एक पलटण व अयोध्येच्या नबाबाचे स्वार व कितीएक पायदळ पाठवून एप्रिलच्या २३ वे तारिखेस त्या गणेशपंताच्या लष्करावर छापा घातला, तेव्हां त्याचे शेंसवाशें लोक मारिले गेले, आणि त्या गणेशपंतालाही फार जखमा लागल्या, त्या कांहीं उपाय चालेनाशा होत्या. त्याच्या तीन तोफा व त्या लष्कराचें बुणगें लुटून त्याचें सर्व सामान घेतलें; मग त्या लोकांनीं पारनीरा व बगवाडा व इंद्रगड हे तीन किल्ले घेतले. त्याच सुमारें गाडर्ड साहेबानें नर्मदेच्या कांठीं सिन्नरासमीप एक शिंद्याच्या लष्कराची टोळी होती, तिजवर बंगाल्याचे पलटणी लोक पाठवून त्या लोकांस तेथून हांकून दिलें, त्यायोगें इंग्लिशांनीं गुजराथेंत नवा मुलूख जितका संपादिला होता, त्यास पर्जन्यकाळ जाई तोंपर्यंत कांहीं उपद्रव न व्हावासा बंदोबस्त झाला. हार्टलीसाहेब कोंकणांत गेला, त्या समयीं मराठे लोक इंग्लिशांनीं घेतलेला कल्याणगांव घ्यावयास फार जमून आले होते, ते मे महिन्याचे २५ वे तारिखेस हल्ला करून कल्याण घेणार होते, परंतु अगोदर २४ वे तारिखेस मध्यरात्रीं हार्टलीसाहेब येऊन पोंहचला, त्यानें एकाएकीं त्या लष्करांत शिरून त्यांचा कांहींसा नाश करून त्यांस पळविलें. त्या दिवसापासून फार दिवसपर्यंत मराठ्यांचें मोठें लष्कर कोंकणात गेलें नाहीं.

७. असें मुंबईकडचें वर्तमान असतां बंगाल्यांत मसलत झाली कीं, 'माळव्याचे ईशानीस लष्कर पाठवून मराठ्यांशीं युद्ध करून त्यांचें चित्त आपणाकडे गुंतवून मुंबईसरकारास सुलभ पडेलसें करावें.' त्यावरून दोन हजार चारशें पलटणी लोक पायदळ व पलटणी स्वार यांची एक टोळी व लहान लहान तोफा गोरे गोलंदाजांसहित असें सैन्य तयार करून पाठविलें. तें फेब्रुवारी महिन्यांत यमुनापार उतरलें. तेव्हां गोहद शहराचे आसमंतात् मराठ्यांची फौज कांहीं गांव लुटीत होती ती त्यांनीं जिंकिली. नंतर त्या गोहदच्या राण्याचे बोलण्यावरून काल्पीच्या पश्चिमेस एक

लहर नामें किल्ला आहे; तो घ्यावयास ते उद्युक्त झाले, तेव्हां त्या इंग्लिशांजवळ भिंत पाडावयाजोग्या तोफा नव्हत्या, तरी त्या लष्करचा कप्तान पोफम नामें मुख्य साहेब होता, तो आपल्या लोकांच्या शौर्यावर विश्वास ठेवून थोडकीशी भिंत पाडून हल्ला करिता झाला. तेव्हां तो किल्ला हातीं आला, परंतु जे लोक हल्ला करावयास पुढें गेले होते, त्यांतील दोन सरदार साहेब व सवाशें शिपाई लोक मेले गेले. असा त्या साहेबानें तो किल्ला घेतला, त्या योगें त्याची प्रशंसा झाली, परंतु त्यानें त्यापूर्वी ग्वाल्हेरनामें किल्ला त्याहून फार बळकट होता, तथापि आपलें एकही मनुष्य न मारवितां तो किल्ला हस्तगत केला; तेव्हांच तो मोठा नामांकित झालेला होता. तो किल्ला घेतल्याचा प्रकार असा; तो पोफमसाहेब त्या किल्ल्यापासून पांच कोसांवर पाऊसकाळ जाई तोंपर्यंत छावणी करून राहिला होता, तो तेथें गेल्यापासून हा किल्ला कोणत्या प्रकारें हातीं लागेल असा विचार करीत होता. त्यास तेथचें कच्चें वर्तमान गोहदच्या राण्याचे लोक कळवीत होते. त्याप्रमाणें दोन महिन्यांनीं तो किल्ला हातीं लागावयास मसलत योजिली कीं, 'पलटणी काळ्या लोकांच्या कंपनी[१] दोन त्यांजबरोबर चार साहेबलोक सरदार देऊन रात्रीसच त्यांनीं पुढें जावें, आणि त्यांचे पाठोपाठ वीसें[२] गोरेलोक शिपाई व त्यांमागून काळ्या शिपायांचीं पलटणें पाठवावीं,' अशी कल्पना करून त्याप्रमाणें रात्रीसच निघाले. ते तेथें जाऊन पोंहचतांच त्या किल्ल्याचे तळची भिंत दहा हात उंच होती, तिला शिडी लावून सर्व चढून आंत उतरले. मग त्या भिंतीच्या आंत त्यांस ऐशीं हात सुमारें चढाव लागला तोही ते चढून गेले. त्यापुढें दुसरी भिंत वीस हात उंचीची लागली. तेव्हां त्यांजबरोबर जे त्यांस माहितगारी करून देणारे लोक होते, ते बहुत युक्तीनें त्या भिंतीवर चढले, आणि तेथून दोरीची शिडी लाविली, मग त्यावरून एकेक शिपाई चढून आंत उतरून त्या भिंतीजवळच बसले. याप्रमाणें वीस शिपाई व एक साहेब आंत उतरून गेले, इतक्यांत त्यांतल्या तिघां शिपायांनीं फार वेडेपणा केला. तो असा; तेथं कोणी शत्रूचे लोक निजले होते, त्यांवर बंदुकेचे बार टाकिले; त्या योगें ते आंतले लोक जागे होऊन त्यांवर चालून आले, तेव्हां ते वीस शिपाई व तो साहेब त्या लोकांशीं चांगले लढूं लागले तोंच त्यांचे मागून दुसरे लोक मोठ्या त्वरेनें येऊन विशेष जमाव होत चालिला, तो पाहून ते लोक पळाले. नंतर सूर्योदयसमयीं आगष्ट महिन्याचे ४ थ्या तारिखेस तो किल्ला इंग्लिशांचे स्वाधीन झाला.

८. त्याच रात्रीं कोंकणांत पनवेलीजवळ मोठा बळकट बावा मलंगगड नामें

---

१. कंपनी म्हणजे ऐशींपासून शंभरपर्यंत शिपाई असतात. २. त्या समयीं वीस गोरे पुढें न चालविले याचें कारण असें कीं, ते पुढें गेल्यास कदाचित् शत्रु सावध होतील.

किल्ला आहे, तो मुंबईच्या वांकणांतून फार चमत्कारिक दिसतो, त्यावरही इंग्लिशांनीं जाऊन छापा घातला, परंतु त्याप्रमाणें ते समयीं किल्ला हस्तगत झाला नाहीं. ते छापा घालणारे लोक त्या किल्ल्याचे माचीस गेले, परंतु त्या किल्ल्याचे लोकांत मिसळल्याचे पूर्वींच ते किल्ल्यावरचे लोक सावध होऊन पळून बालेकिल्ल्यावर चढले. तो डोंगर अवघड यास्तव त्यांचे पाठीस लागून इंग्लिशांच्या शिपायांस वर जाववेना, तेव्हां ते खालींच राहून त्या वर गेलेल्या लोकांला वरच कोंडिते झाले. त्या वर्षीं मुंबईसरकारांत द्रव्याच्या तोट्यामुळें पुढें व्यवस्था कोणे प्रकारची होईल असा विचार पडला, त्यावरून त्यांनीं बंगाल्यास लिहिलें, त्याचें उत्तर आलें कीं, 'या समयीं हैदर अल्ली मोठ्या लष्करासहित अर्काटप्रांतीं आला आहे, या संकटामुळें आह्मांकडून पैक्याची तरतूद होणार नाहीं.' तेव्हां मुंबईसरकारांत असें ठरलें कीं, मराठ्यांचा कोंकणांतील मुलूख घेऊन वसुलाचा ऐवज जमा करावा. ते वेळेस मुंबईच्या कोठींत दहाबारा लक्षांचें तांबें होतें, तें विकून पैका केला, मग जनरल गाडर्ड साहेब यास वसई किल्ला घ्यावयाची आज्ञा झाली. नंतर पर्जन्यकाळ गेल्यावर येऊन वसई किल्ल्यास घेरा घातला, आणि कर्नल हार्टलीसाहेब यास पांच पलटणी देऊन कोंकणांतील मराठ्यांचीं ठाणीं उठवून वसुलाचा बंदोबस्त करावयास सांगितलें, परंतु जे लोक बाबा मलंगगड घ्यावयास घेरा घालून त्यावरच्या लोकांस प्रतिबंध करून राहिले होते, त्यांवर मराठ्यांचे तीन हजार लोक जाऊन त्यांनीं त्यासभोंवता वेढा घातला होता, यासाठीं त्या कर्नलास ते लोक सोडवायाचें काम आधीं करावें लागलें. हार्टली साहेबानें तें कार्य फार युक्तीनें करून मराठ्यांचें लष्कर कोंकणांतून पार घालविलें, आणि आपण बोरघाटाखालीं जाऊन आपल्या लोकांसहित राहिला. नंतर तेथून कोंकणचा वसूल मुंबईसरकाराकडे जमा होऊं लागला.

९. इकडे पुण्यांत हरिपंत फडके व नाना फडनवीस मिळून कोंकणांतील मुलूख इंग्लिशांपासून सोडवावा, व वसई किल्ल्याचा घेरा उठवावा याविषयीं फार उद्युक्त झाले, परंतु त्यांची तयारी तशी झाली नव्हती; ह्मणून त्या वेळीं त्यांनीं रामचंद्र गणेश व आनंदराव रास्ते व परशुराम भाऊ पटवर्धन यांस कोंकणांत पुढें पाठवून मग त्यांमागून जो जो सरदार आला, तो तो एकएकटाच त्यांच्या कुमकेस पाठवून दिला; त्यामुळें कर्नल हार्टलीसाहेब त्यांचे वाटेवर होता, ह्मणून त्याच्या लष्करास प्रतिदिवशीं युद्ध करावें लागलें; असा एक महिना गेला, तेव्हां त्याच्या लोकांत जखमी व आजारी मिळून सहाशें लोक निरुपयोगी झाले; आणि त्यानें वसुलाच्या कामास कोंकणांत जागोजाग लहान लहान टोळ्या पाठविल्या होत्या, त्यायोगें त्याज-

वळ दोन हजारांवर कांहींसे अधिक लोक मात्र राहिले. त्या समयीं तो साहेब मराठ्यांस जिंकून वसुलाचा आटोप आपणास होणार नाहींसें जाणून बोरघाटाहून निघून वसईचे पूर्वेस साडेचार कोसांवर दुघारापाशीं ठाणें धरून राहिला. तेव्हां रामचंद्र गणेश समजला कीं, कर्नल वसईकडे गेला; यास्तव तो घेरा उठवावयाचें कार्य शेवटास जाणार नाहीं. त्यावरून तो मोठ्या रागानें कर्नलाच्या लष्कराचा नाश करावयास उद्युक्त झाला. त्यानें डिसेंबराचे १० वे तारिखेस पायदळ व स्वार मिळून वीस हजार फौजेसहित येऊन तीन वेळां त्या कर्नल साहेबाच्या लष्करावर हल्ला केला, परंतु त्या इंग्लिशांनीं तितके वेळां तो मागें हटविला. त्यांतील एका हल्ल्यांत रामचंद्र गणेश याची पांच हजार स्वारांची टोळी इंग्लिशांचे पलटणाचे डावे बाजूवर चालून मोठ्या वेगानें येऊन पडली. तेव्हां इंग्लिशांचे जखमी व मेलेले मिळून अठरा शिपाई व दोघे साहेब पडले. असें तें युद्ध झालें, परंतु ते इंग्लिशांचे लोक मोठ्या स्थिरतेनें वागले, त्या योगें त्या दिवशीं त्याचा आणखी नाश झाला. दुसरे दिवशीं मराठ्यांचे स्वार यांनीं त्यांजवर हल्ला केला नाहीं, तथापि त्याच्या मोठमोठ्या तोफाच्या मारानें इंग्लिशांचे मेले व जखमी मिळून शेसवाशें शिपाई लोक व दोघे साहेब पडले. त्या दिवशीं इंग्लिशांनीं आपल्या लष्कराच्या डाव्या व उजव्या बाजूच्या दोहों टेंकड्यांवर लष्कराच्या संरक्षणार्थ दोन टोळ्या ठेविल्या, त्या युद्धाच्या कामास बहुत उपयोगी झाल्या, परंतु त्याच्या नाशाविषयीं मराठे फार उद्युक्त झाले, असें इंग्लिशांस दिसूं लागलें. त्यावरून कर्नल हार्टलीसाहेब याला समजलें कीं, 'उद्यां निःसंशय शत्रु या दोहों टोळ्यावरच हल्ला करितील,' यास्तव त्यानें त्याच रात्रीं त्यांच्या बंदोबस्तास त्या दोहों टेंकड्यांवरून एकेक तोफ ठेविली, आणि त्या सभोंवते तट व खंदक केले. दुसरे दिवशीं सूर्योदयानंतर तीन घटिका दिवसास त्यांतील उजव्या बाजूच्या टेंकडीवरच्या लोकांस समजलें कीं, 'आपणावर मराठे याची तयारी झाली,' परंतु त्या वेळीं धुकें फार होतें, त्या योगें ते लोक अगदीं त्याच्या समीप आले तरी त्यास समजलें नाहीं. मग एकाएकीं तें धुकें जाऊन सूर्यप्रकाश स्पष्ट झाला, तेव्हां त्यांस असें दिसलें कीं, 'आपल्या पाठीमागें व पुढें आपल्या शत्रूचे स्वार व उजवे बाजूनें पायदळ व कवाईत शिकविलेले पेशव्याचे पलटणी लोक आपणावर चालून येतात. त्या समयीं ते इंग्लिशांचे टेंकडीवरचे लोक यांनीं मराठ्यांवर फार त्वरेनें गोळ्या घातल्या असतांही मराठ्यांच्या मोठ्या लष्कराच्या तोफांचा मार त्यांवर पडून त्यांचा फार नाश झाला तरी ते मागें हटेनात, आणि त्यांचे पायदळ लोकही बार करीत करीत पुढें चालून येऊं लागले. असें असतां एकाएकीं मराठे लोक झटून लढेनातसे झाले; आणि कोणा मोठ्या सरदाराचें प्रेत मराठे माघारें घेऊन जातात, असें

इंग्लिशांनीं पाहिलें. मग त्यांस तो रामचंद्र गणेश पडला असें समजलें. तो पडला तेव्हांच त्याच्या पलटणी लोकांचा सरदार पोर्तुगीज तोही जखमी झाला, यास्तव मराठे तें युद्ध सोडून निघून गेले. अशी दुघाराजवळची लढाई झाली. तींत मुंबईचे शिपाई लोक यांचा जय होऊन मोठा मान पावले. त्याचे पूर्व दिवशीं गाडर्ड साहेब यास वसई किल्ला तेथचा किल्लेदार निरुपाय होऊन देता झाला. मग तो साहेब तेथून उठून कर्नेल हार्टलीसाहेबाचे कुमकेस गेला, तेव्हां तीं दोन लष्करें एकत्र झालीं; त्यांत आपल्यापेक्षां दुसरे मोठमोठे साहेब आलेले पाहून तो कर्नेल हार्टलीसाहेब सरकारची आज्ञा घेऊन विलायतेस गेला.

१०. त्यानंतर जनरल गाडर्ड साहेब यास वर्तमान कळलें कीं, कलकत्त्यांतील मुख्य साहेब यानें मुधोजी भोंसला याच्या द्वारें मराठ्यांशीं स्नेह करून त्यांचे द्वारें इंग्लिशांस बुडविणारे हैदर व निझाम यांस जिंकावयाविषयीं उद्योग केला, याप्रमाणें समजतांच त्याच्या मनांत आलें कीं, 'जर मी या समयीं पुण्यास गेलों तर ही बंगाल्याची मसलत सिद्धीस लवकर जाईल.' त्यावरून तो आपलें लष्कर घेऊन बोरघाटावर चालिला. ते समयीं हरिपंत फडका कोंकणांत होता तो पुण्यास गेला, त्यानें जातां जातां बोरघाटांत वाटेच्या प्रतिबंधार्थ कांहीं लोक ठेवून आपण पुढें गेला. त्यामागून इंग्लिशांचे लोक येऊन त्या घाटांतील लोकांचा तत्काळ पराजय करून घाटावर चढून खंडाळ्याजवळ डेरे देऊन उतरले, परंतु तो जनरल गाडर्ड साहेब आपण कितीएक लोकांनिशीं त्या घाटाखालींच खोंपवलीस राहिला. त्या वेळेस इंग्लिशांचें लष्कर साडेसहाशें सुमारें गोरे लोक व साडेपांच हजार सुमारें काळे लोक इतकें होतें. पुण्यांत नाना फडनवीस यानें इंग्लिश जवळ आल्याचें किमपि भय न मानितां आपल्या लष्कराची तयारी आरंभिली; आणि कितीएक नवे नवे लोकही ठेवावे, व कारण पडल्यास पुणें शहर व तेथपासून खंडाळ्यापर्यंत मुलूख उद्ध्वस्त करावा असा बेत केला. तेव्हां जनरल गाडर्ड साहेब यानें मुधोजी भोंसला याशीं व कलकत्त्याच्या साहेबाशीं तह झाल्याचा प्रकार नाना फडनविसास लिहून समजविला, तो त्यानें न मानून उत्तर दिलें कीं, 'हें वर्तमान आह्मांस मुधोजीनें लिहिलें नाहीं, आणि हैदर अल्ली तर आमचा विभागीच आहे;' त्यावरून जनरल गाडर्ड साहेब मनांत असें योजीत होता कीं, 'आपणास पुण्यास जाऊन पुणें घ्यावयाचें सामर्थ्य नाहीं, पण मराठ्यांस उगीच धमकी दाखविल्यानेंच बंगाल्याची मसलत सिद्धीस जाईल,' परंतु तें झालें नाहीं. त्या वेळेस नाना फडनवीस यानें परशुराम भाऊबरोबर बारा हजार फौज देऊन त्यानें कोंकणांत जाऊन गाडर्ड साहेबाच्या लष्कराच्या कोटीस उपद्रव करावा, आणि मुंबईची वाट बंद करावी, अशी योजना केली; आणि

आपल्याबरोबर हरिपंत फडके व तुकोजी होळकर यांस मोठ्या लष्करासहित घेऊन आपण सह्याद्रीकडे चालिला. त्या समयीं माधवराव पेशवा पुरंदरीं पाठविला, तेव्हां तो सातां वर्षांचा होता. त्या वेळेस मद्रासेकडे हैदर अल्ली बहुत उपद्रव करीत होता, त्यासारिखा शत्रु त्या इंग्लिशांस त्यापूर्वीं कधींही भेटला नाहीं. ह्मणून त्यांनीं मुंबईसरकारास लिहिलें कीं, 'या समयीं तुह्मीं आमची कुमक करावी, हें न होईल तर आमचें जें लष्कर पूर्वीं तुह्मांकडे आलें आहे, तें आमचें आह्मांकडे पाठवावें.' असें पत्र पाहून मुंबईसरकारांत असें ठरलें कीं, 'गाडर्ड साहेब घाटावर गेला आहे, त्यास मुंबईकडे बोलावून समुद्रकांठीं हैदर अल्लीच्या मुलखीं दोन पलटणें पाठवून त्या हैदराशीं युद्ध चालवावें, व मद्रासेचे लोक मद्रासेस पाठवावे, असें होऊन गाडर्ड साहेबास आज्ञा गेली. त्या समयीं त्या साहेबानें आपलीं तीन पलटणें तोफखान्यासहित व सातशें स्वार मुंबईहून लष्करी सामान आणावयाकरितां पनवेलीस पाठविले होते. त्यांची तो मार्गप्रतीक्षा करीत होता. मग तें लष्कर सामानसुद्धां एप्रिलचे ४ थे तारिखेस खोंपवलींत येऊन पोंहचलें. नंतर तो साहेब तेथून निघून मुंबईस जावयाची तयारी करूं लागला; त्यांत प्रथम त्यानें आपले लोक मोठ्या मोठ्या तोफा व बुणगें यांसहित खंडाळ्याहून खोंपवलीस चोंहों दिवसांत आणिले. तेव्हां त्या गाडर्ड साहेबास वाटलें कीं, 'मी एथून निघून जाणार हें वर्तमान कोणास ठाऊक नाहीं, परंतु तो तेथून दुसरे दिवशीं २० वे तारिखेस निघाला, त्या वेळेस त्याचें सर्व खटलें मुक्कामाहून चालतें झालें नाहीं तोंच खंडाळें व कारलें या दोहींच्या मध्यभागीं हरिपंत फडका पंचवीस हजार स्वार व तोफखान्यासहित चार हजार पायदळ यांनिशीं उतरला होता, तो अकस्मात् तेथें येऊन पोंहचला. तेव्हां त्या हरिपंतानें त्या साहेबाचे कितीएक डेरे व बंदुकांचे दारूगोळी भरलेल्या तोट्यांचे बस्ते व दोन हजार तोफांचे गोळे वगैरे सामान लुटून नेलें. त्या समयीं वरकड मराठे सरदारही इंग्लिशांच्या नाशाविषयीं पूर्वींपासून त्या समयाची वाट पाहात होते; त्यांत तुकोजी होळकर पंचवीस हजार स्वारांसहित कुसूरघाटाचे पायीं उतरला होता, आणि परशुराम भाऊ बारा हजार स्वारांसहित भीमाशंकराजवळ पडला असे, तेही त्या हरिपंत फडक्याबरोबर इंग्लिशांच्या पाठीस लागले. त्या दिवशीं दोन प्रहरांवर दोन घटिकांपर्यंत

---

१. तें सामान आणणारे लोक यांस लुटावयाकरितां परशुराम भाऊ याचे कुमकेस नाना फडनविसानें तुकोजी होळकर पाठविला, तो जाऊन त्यास मिळाला, तेव्हां त्या दोघांचें मिळून लष्कर सुमारें पायदळ व बाणदार खेरीज करून पंचवीस हजार स्वार जमा झाले. त्यांशीं लढत लढत इंग्लिशांचे लोक आपलें सामान संभाळून पनवेलीहून निघाले ते तीन दिवसांनी खोंपवलीस पोंहचले. तोंपर्यंत त्या युद्धप्रसंगेंकरून त्या लष्करांतील लोक मेले व जखमी मिळून एकशें सहा काळे पलटणी शिपाई व पांच साहेब पडले.

गाडर्ड साहेब यास त्या लोकांशीं युद्ध करितां खोंपवलीहून चौकापावेतों पोंहचे तोंपर्यंत डेरे देऊन उतरावयास अवसर सांपडला नाहीं. मग दुसरे दिवशीं त्या साहेबास त्याहून मोठ्या निकरानें युद्ध करावें लागलें; त्या प्रसंगीं त्यानें बंगाल्याचे लोक आपल्या लष्कराच्या पाठीमागें चालविले होते, त्यांवर मराठ्यांचा मार विशेष पडला. मग त्या दिवशीं मध्यें मुक्काम करून दुसरे दिवशीं २३ वे तारिखेस तो गाडर्ड साहेब आपल्या पलटणासहित पनवेलीस पोंहचला. त्या वेळेस बंगाल्याचें सहावें पलटण व मुंबईचें तेरावें पलटण हीं दोन्हीं त्या लष्कराच्या पाठीमागचे टोळींत बुणग्याच्या रक्षणार्थ नेमिलीं होतीं, तीं विशेष युद्धप्रसंगेंकरून मोठ्या योग्यतेस चढलीं. त्या दोन्ही पलटणांचा मुख्य बंगाल्याचा कर्नल पार्कर नामें साहेब होता, तो त्या लढाईतच मृत्यु पावला; आणि गाडर्ड साहेबाचे मेले व जखमी झाले मिळून चारशें शेचाळीस काळे शिपाई व अठरा साहेब लोक पडले. असा नाश पावून इंग्लिश खोंपवलीहूस मुंबईकडे गेले, त्यावरून मराठे आपण जय पावल्याची प्रसिद्धि लोकांत करूं लागले, परंतु त्यांत त्यांचा नाश न झालासा नव्हता. यानंतर इंग्लिश महिना दीड महिना पनवेलीस राहून मग तेथून कल्याणास जाऊन पर्जन्यकाळ जाई तोंपर्यंत तेथें छावणी करून राहिले. इतकें होई तोंपर्यंत मराठ्यांच्या लष्करांतील सरदार माधवराव रामचंद्र बरोबर दहा हजार स्वार घेऊन गुजराथेंत गेला, आणि कोंकणच्या किल्ल्यांच्या बंदोबस्तास प्रतिकिल्ल्यावर पहिल्यापेक्षां शिबंदी वाढवून बाकी उरलेले लष्करी लोक सर्व निघून आपआपल्या ठिकाणास गेले.

११. असें मुंबईकडचें वर्तमान असतां, गोहदच्या राण्याचे कुमकेस जाऊन ग्वाल्हेर घेऊन मग माळव्यांत शिरून शिप्री हस्तगत करून सरोजपर्यंत गेलेलें जें इंग्लिशांचें लष्कर तें बाहेर घालवावयास महादजी शिंदा येऊन त्या इंग्लिशांच्या लष्करास आसमंतात् कोंडून सात दिवस त्यांच्या डेऱ्यावर मोठमोठ्या तोफांचे गोळे दुरून टाकिता झाला, तेणेंकरून इंग्लिशांस तें स्थळ सोडून जाणें प्राप्त झालें. तेव्हां तो साहेब कोणास न कळतां मार्चाचे ७ वे तारिखेस मध्यरात्रीं उठून निघून गेला. मग दिवस उगवल्यावर तो साहेब गेला, असें समजून शिंदा लष्करसुद्धां त्याचे पाठीस लागला. तो वाटेनें दिवसास त्यांबरोबर युद्ध करी आणि रात्रीस त्यापासून दोन कोसांच्या अंतरानें मोठ्या सावधपणानें रहात असे. याप्रमाणें २४ वे तारिखेपर्यंत त्या साहेबानें आपलें लष्कर मात्र संभाळिलें, त्या शिंद्यावर हल्ला केला नाहीं. त्यावरून तो शिंदा पूर्वी जसा रात्रीस सावधपणा ठेवीत असे तसा ठेवीनासा झाला. तेव्हां इंग्लिश तर त्याच्या असावधपणाची संधी पाहतच होते; त्यांस ती संधी सांपडतांच त्यांनीं २४ वे तारिखेस रात्रीं शिंद्याच्या लष्करावर छापा घालून त्याचे बहु-

तेक लोक मारिले, आणि त्याच्या तेरा तोफा व तीन हत्ती व थोरला झेंडा व कितीएक उंट व कितीएक घोडे लुटून घेतले, आणि तें सर्व लष्कर हांकून दिलें. मग पर्जन्यकाळीं ते इंग्लिश त्या शिंद्याच्या मुलखांतच राहिले; आणि त्यांनीं पूर्वीं ग्वाल्हेर किल्ला घेतला होता, तो गोहदच्या राण्याचे स्वाधीन केला. त्या समयीं कलकत्त्याचा मुख्य साहेब यानेंही त्या मुलखासमीप राहणारे जे रजपूत लोक यांनीं मराठ्यांचा पक्ष सोडून आपणास वश व्हावें यासाठीं उद्योग केला, परंतु तो शेवटास गेला नाहीं. गोहदचा राणा मराठ्यांशीं वक्र व्हावा या आशेनें त्यास ग्वाल्हेर किल्ला दिला, तरी तो आपल्या सामर्थ्याप्रमाणें मराठ्यांशीं विरोध करीना.

१२. त्या वेळेस कलकत्त्यांत मसलत ठरली कीं, मद्रासेचे कुमकेस सहा पलटणें पायवाटेनें पाठवावीं, त्याप्रमाणें पायवाटेनें सहा पलटणें पाठविलीं, त्या समयीं त्यांस अडथळा न होण्याविषयीं मुधोजी भोंसला व कलकत्त्याचा साहेब यांची कांहीं गुप्तरूपें समजूत पडली होती. तो मुधोजी भोंसला, पेशवे व वरकड मराठे सरदार यांस आपण इंग्लिशांचा पक्ष धरिला हें कळूं न द्यावें ह्मणून त्यानें आपला पुत्र चिमणाजी याजबरोबर आपलें लष्कर तीस हजार स्वार देऊन कटकप्रांतीं पाठविला. परंतु त्या मुधोजीनें इंग्लिशांपासून सोळा लक्ष रुपये घेऊन गुप्तपणें त्यांशीं स्नेह केला, हें वर्तमान पुण्यामध्यें थोडक्याच दिवसांनीं प्रसिद्धीस आलें असेल; कां कीं, जनरल गाडर्ड साहेब पनवेलीस पोंहचल्यानंतर त्या मुधोजी भोंसल्यास नाना फडनविसाचें पत्र गेलें कीं, 'इकडे असा पेशव्यांचा जय झाला, या समयीं तुह्मीं यांचा पक्ष सोडिला, यास्तव सरकार तुमचें पारिपत्य करील.' हें वर्तमान त्या मुधोजीनें कलकत्त्याच्या साहेबास कळविलें, आणि लिहिलें कीं, 'असें असतांही माझे द्वारें पेशवे व सर्व मराठे सरदार हैदरअल्लीला हांकून द्यावयास तुह्मांस अनुकूळ होतील, याविषयीं मी आपला दिवाण दिवाकरपंत पुण्यास पाठवितों. यास्तव त्याची व तुमची प्रथम भेट झाली असतां उत्तम आहे, त्यास हा काशीमध्यें तुमची भेट घेईल.' असें मुधोजीचें बोलणें झालें; परंतु तें शेवटास गेलें नाहीं. कां कीं, त्याचा दिवाण काशीस जातांना मार्गांतच मृत्यु पावला. आणि त्या समयीं कलकत्त्याच्या मुख्यास वर्तमान आलें कीं, महादजी शिंदा पराभव पावल्यानंतर त्यानें त्या लष्करच्या साहेबास तहाविषयीं प्रार्थना केली आहे, तीच सल्ला करण्यास कारण होईल.

१३. असें समजल्यावरून कलकत्त्याच्या मुख्यानें तो अर्थ सिद्धीस न्यावयासाठीं अंडरसन् नामें कोणी एक साहेब पुण्यास पाठविला. तो आणि महादजी शिंदा यांची साल्पेगांवीं भेट होऊन उभयतांच्या भाषणेंकरून सर्व मराठे व इंग्लिश यांचा

तह झाला. त्यांत उभयपक्षीं जामीनकी त्या महादजी शिंद्यानें स्वीकारली. त्या तहाचा प्रकार असा; पुरंदरचा तह झाल्यापासून इंग्लिशांनीं जितका मराठ्यांचा मुलख घेतला आहे, तो सर्व माघारां द्यावा, व भडोचेजवळचा तीन लक्षांचा मुलूख पुरंदरच्या तहामध्यें पेशव्यांनीं इंग्लिशांस देऊं केला होता, तो इंग्लिशांनीं मागूं नये. याशिवाय गाइकवाडाचा मुलूख व गुजराथ हीं दोन्हीं सन १७७५ त युद्ध झालें त्यापूर्वी ज्याकडे होतीं त्याकडेसच असावीं; आणि पेशव्यांनीं गाइकवाड यास खंडणीची बाकी मागूं नये; व रघुनाथराव यास दरमहा पंचवीस हजार रुपये खर्चास देऊन त्याच्या मनास येईल तें एक ठिकाण त्यास रहावयास नेमावें. याखेरीच आणीक ठरलें कीं, 'सर्व मराठे व इंग्लिश मिळून हैदर अल्लीला जिंकून त्यानें अर्काटच्या नबाबाचा व इंग्लिशांचा जो मुलूख घेतला तो अवश्य सोडवावा, व इंग्लिश लोक जे महाराष्ट्रमुलखीं सावकारी करितील, त्यांपासून सरकारदस्तुरी इतर सावकारांपेक्षां विशेष न घेता इतरांप्रमाणेंच त्याचे वहिवाटीस अडथळा नसावा, व पोर्तुगीज लोकांखेरीज कोणी फिरंगी मुलखाचा पुरुष येईल तर त्यास मराठ्यांच्या मुलखीं ठाणें धरून राहूं देऊं नये.' असा तह कलकत्त्याच्या साहेबानें सन १७८२ च्या जून महिन्यात ठरविला. परंतु नाना फडनविसाच्या मनात आले कीं, हा तह लांबवून आपण हैदराचा पक्ष स्वीकारितों, असें इंग्लिशांस भय दाखवून त्यांपासून साष्टी हस्तगत करून घेऊन मग तह शेवटास न्यावा; याप्रमाणेंच हैदर अल्लीसही आपण इंग्लिशांकडचे होणार, अशी कल्पना दाखवून त्यापासून कांहीं लाभ संपादावा, यास्तव त्याने त्या तहनाम्यावर आपली मान्यता लिहावयास ते वर्ष शेवटास जाई तोंपर्यंत विलंब केला, परंतु तो हैदर अल्ली डिसेंबराचे ७ वे तारिखेस मृत्यु पावला, तेणेंकरून त्या नाना फडनविसास २० वे तारिखेस त्या पत्रावर मान्यता लिहिणें प्राप्त झालें.



हैदर अल्ली.

१४. याच अवकाशांत इंग्लिशांनीं वडगांवच्या तहांत शिंद्यास भडोच किल्ला देऊं केला होता, त्याप्रमाणें त्याच्या स्वाधीन केला.

१५. हैदर अल्ली मरण पावल्यानंतर त्याचा पुत्र टिपू यास त्याचे जागीं स्थापिलें. तो मराठ्यांस दाखवी कीं, 'आपण साल्प्याच्या तहास मान्य आहोंत;' परंतु इंग्लिशांशीं युद्धप्रसंग करण्याविषयीं त्यानें अंतर केलें नाहीं. मग महादजी शिंदा त्या हैदराच्या पुत्रास निषेधीत असतां त्यानें तें न मानिलें, त्यावरून महादजी शिंदा

मराठ्यांचें व इंग्लिशांचें लष्कर एकत्र करून त्यावर जावें अशी मसलत करूं लागला. त्या समयीं नाना फडनविसासही त्या कामांत आपलें हित आहेसें समजत होतें, परंतु त्या महादजी शिंद्याचा उत्कर्ष होईल ह्मणून त्याविषयीं नाना फडनविसास मत्सर उत्पन्न झाला, यास्तव त्यानें ती मसलत लांबविली. इतक्यांत मद्रासचे इंग्लिश यांनीं केवळ आपल्याच हितार्थ टिपूचा उपद्रव आपणास न लागावा, ह्मणून साल्प्याच्या तहाप्रमाणें तो बेत न ठेवितां त्यानिराळा त्या टिपूशीं तह केला. हें वर्तमान कलकत्त्याच्या मुख्यास कळतांच तो क्रुद्ध होऊन त्याच्या मनांत आलें कीं, तो तह मोडावा. परंतु मद्राससरकारानें तें काम बहुतेक शेवटास नेलें. त्यामुळें त्याचा उपाय चालेनासा झाला. ती गोष्ट साल्प्याच्या तहानिराळीशी जाणून मराठे रुष्ट झाले. त्या समयीं त्यांच्या रोषाच्या शमनार्थ कलकत्त्याच्या साहेबानें मराठ्यांची समजूत पाडिली कीं, 'मद्राससरकारांनीं माझ्या आज्ञेचा भंग केला.'

१६. नाना फडनवीस याच्या मनांत पूर्वींपासून होतें कीं, टिपूला सामर्थ्यहीन करावें; यासाठीं त्यानें निझामाशीं स्नेह करून त्या उभयतांनीं संकेत ठरविला कीं, 'निझामापाशीं खंडणीची बाकी मागावयाचे मिषेंकरून नानानें फौजेसहित आपले देशाचे मर्यादेपर्यंत जावें; आणि निझामानेंही त्या खंडणीबाबद कांहीं बोलण्याचें निमित्त करून फौजेसहित त्या ठिकाणीं येऊन पोंहचावें; मग त्या उभयतांनीं एकत्र मिळून हैदरावर स्वारी करावी. त्यांत जो लाभ होईल त्यापैकीं इंग्लिशांस भाग देऊं नये, व यासाठीं त्यांची कुमकही घेऊं नये. याप्रमाणें गुप्त मसलत ठरवून नानानें निझामास व टिपूस एकदांच खंडबाकीचें मागणें केलें, तें टिपूनें मान्य करून उत्तर दिलें कीं, 'सांप्रत आपणाजवळ ऐवज नाहीं.' निझामानें लिहिलें कीं, 'या प्रकरणीं बोलणें करावयास आपण फौजेसहित येदगिरास यावें, आह्मीही लष्करसुद्धां तेथें येतों, मग दोघांच्या बेताप्रमाणें ठराव होईल.' असें झाल्यावर नाना व निझाम हे उभयतां संकेताप्रमाणें लष्करसुद्धां भीमा व कृष्णा यांच्या संगमाजवळ त्या संकेतस्थळीं येदगिरास एकत्र मिळाले. त्या समयीं त्या उभयतांचें बोलणें त्या बाकीप्रकरणीं मात्र प्रसिद्धपणें झालें, आणि दुसरें बोलणें हैदरानें निझामाचा व मराठ्यांचा मुलूख घेतला होता, तो माघारां घ्यावा व टिपूवर मोहिम करावी, याविषयीं जो संकेत झाला तो गुप्त रक्षिला; आणि ते समयीं तें काम तसेंच राहिलें. कां कीं, निझाम आपलें सामर्थ्य विशेषसें जाणून नानास अगोदरच असा विभाग मागूं लागला कीं, त्याप्रमाणें नानास कबूल करवेना. मग इतकेंच ठरलें कीं, 'तूर्त हें काम असेंच राहावें. पुढें जेव्हां उभयतांचें एकमतें ठरेल तेव्हां करतां येईल.' नंतर ते दोघे आपआपले ठिकाणीं गेले. त्यांत निझाम अल्ली आपली राजधानी हैदराबाद

येथें पोंहचतांच त्यास वर्तमान कळलें कीं, टिपू फौजेसहित येऊन कृष्णेचे दक्षिणेस मोगलांचे मुलखीं स्वारी घालणार आहे; आणि त्या वेळेस त्या टिपूनेंही निझामास खेद उत्पन्न होईसा निरोप पाठविला कीं, 'तुह्मी विजापुरचा धनीपणा करितां तो खोटा, त्यास तें स्थळ माझे स्वाधीन करा.' यावरून असें वाटतें कीं, निझामाचा व नाना फडनविसाचा गुप्त तह झाला तो टिपूला कळला असेल. तो निरोप पोंहचतांच निझाम अल्लीनें नाना फडनविसास आपल्या कुमकेस बोलाविलें, परंतु तो नाना आपल्या राज्यांत कांहीं कामास गुंतला, आणि त्याच्या लष्कराचीही तयारी तादृश नव्हती, ह्मणून निझामानें आपला वकील टिपूजवळ होता त्याचे हातून तो अनर्थ शमविला.

१७. नाना फडनवीस कामास गुंतला ह्मणून ह्मटलें तें असें; त्यास वर्तमान कळलें कीं, माधवराव नारायण यास पदच्युत करून गादीचा अधिकारी रघुनाथरावाचा पुत्र बाजीराव करावा, अशी मसलत बहुतां जणांनीं फार दिवसांपासून केलेली आहे ती सिद्धीस जाईल; यास्तव तें बंड मोडावयाविषयीं त्यास यत्न करावा लागला. त्या वेळेस रघुनाथराव याचें कुटुंब साल्प्याच्या तहाप्रमाणें कोपरगांवीं होतें, आणि तो रघुनाथराव तेथें गेल्यावर दोन तीन महिन्यांनीं मृत्यु पावला होता, त्या समयीं त्याची स्त्री आनंदीबाई गरोदर होती ती त्याच्या मरणानंतर थोडक्याच दिवसांनीं प्रसूत होऊन पुत्र झाला. त्याचें नांव चिमणाजी आपा. रघुनाथरावाच्या मृत्युसमयीं बाजीराव नवां वर्षांचा लहान असतांही त्या रघुनाथरावाचे



रघुनाथराव पेशवे.

पक्षपाती व नाना फडनविसाशीं रुष्ट झालेले जे लोक होते, ते सर्व मिळून त्या बाजीरावाला गादीचा अधिकारी करावयास उद्युक्त झाले असत. तेव्हां नाना फडनवीस याचें त्या कोपरगांवप्रकरणीं मंडळीस किमपि उपद्रव न देतां त्यांचा विश्वास मात्र ठेविला नाहीं. मग पुढें रघुनाथरावाचे पुत्र बाजीराव व चिमणाजी आपा ह्यांचा आणि नाना फडनविसाचा द्वेष पडला, त्याचें कारण हेंच.

१८. रघुनाथरावाच्या पुत्रास गादीचा अधिकारी करणारे जे लोक यांत महा-

दजी शिंदा मुख्यत्वें आहे अशी त्या वेळेस वदंता उठली होती, परंतु ती खरीच असेल, असा निश्चय करितां येत नाहीं. त्यांत इतकें मात्र खरें कीं, नानानें निरंतर चिंतेत असावें याविषयीं महादजी शिंदा यास मोठी आवड होती, परंतु तें सिद्धीस न्यावेंच असा त्याचा मनोरथ नसेल; उगेंच त्या नानाला भय मात्र असावें इतकेंच असेल. कां कीं, त्याचें मन पुण्याच्या कारभारांत फारसें नव्हतें. तो हिंदुस्थानांत आपली श्रेष्ठता वाढवावयाविषयीं अत्यंत उद्युक्त होता. त्याच्या उद्योगाचा प्रकार समजावयासाठीं सन १७७३ त मराठ्यांनीं हिंदुस्थान सोडलें, त्यापासून तिकडे काय काय वर्तमान झालें तें ध्यानांत आलें पाहिजे. मराठ्यांनीं दिल्ली घेतली ते समयीं तेथच्या बादशाहाचा सेनापति नजीफखान यास पदच्युत केलें. मग मराठे दक्षिणेस आल्याबर तो पुनः अधिकारावर कायम होऊन तिकडे मराठ्यांचीं ठाणीं होतीं तीं उठवूं लागला; आणि बंगाल्याचा नबाब सुजा उद्दवलाही तसाच वागत असतां त्याच्या मनांत आलें कीं, आपण नजीफखान यास मिळून नर्मदेच्या उत्तरेस जितके मराठे असतील तितके हांकून द्यावे, परंतु तो सुजा उद्दवला सन १७७५ च्या जानेवारींत मृत्यु पावला. त्यामुळें तें तसेंच राहिलें.

१९. त्यापुढें नजीफखान दिल्लीच्या बादशाहाचा सर्व कारभार फार चातुर्येंकरून मुख्यत्वें आपण करूं लागला. तो सन १७८२ च्या एप्रिल महिन्यांत मृत्यु पावला. तेव्हां त्याचा दत्तपुत्र होता तो व तेथचे दरबारी लोक यांचीं बहुत भांडणें होऊन मग त्याशीं विरोध करणारे बहुतेक लयास गेले; त्यापैकीं साल्प्याच्या तहाच्या वेळेचा एक मात्र त्याचा विरोधी राहिला होता. मग दुसरे वर्षीं तो दत्तपुत्र याच्या स्वाधीन तो बादशाहही झाला असतां त्यानें त्या शत्रूपेक्षां आपलें सामर्थ्य कमीसें जाणून दुसऱ्या कोणा बळवानाचें इष्टत्व संपादन करून त्यास जिंकावयाचा उद्योग आरंभिला. त्यांत प्रथम त्यानें इंग्लिशांकडे यत्न केला, तो साधेना; यास्तव शिंद्याकडे यत्न करिता झाला, तेव्हां शिंद्यानें तत्काळ तें अंगीकारून तो महादजी शिंदा व तो दत्तपुत्र यांची आग्र्यामध्यें भेट झाली, परंतु थोडक्याच दिवसांत तो दत्तपुत्र मारेकरी यांनीं मारिला. त्यानंतर शिंदा मुख्यत्वें दिल्लीचा कारभार करूं लागला, त्यावर बादशाहाची कृपा होऊन बादशाहानें त्यास आपला सेनापति करून दिल्ली व आग्रें हीं दोन्हीं त्याचे स्वाधीन केलीं.

२०. असा शिंद्याचा उत्कर्ष झाल्याचें वर्तमान पुण्यास येऊन पेशवे व नाना फडनवीस वगैरे कारभारी यांस विस्मय आणि आनंद झाला. त्यावरून पेशव्यांनीं एक फौजेची टोळी त्या शिंद्याकडे पाठविली; त्यांत अर्थ असा कीं, या लाभांत पेशवे यांचा अंश आहेसें सर्वांस प्रसिद्ध व्हावें. याप्रमाणें तो शिंदा योग्यतेस आला

तेव्हां त्यास गर्व झाला. नाना फडनवीस व होळकर हे आपला मत्सर करतील, हा अर्थ त्याच्या मनांतच आला नाहीं, आणि तो केवळ उन्मत्त होऊन त्यानें इंग्लिशांकडे बंगाल्याचीही चौथ मागितली, तेव्हां तेथच्या मुख्य साहेबानें त्याचा धिक्कार करून त्यापासून उलटें असें लिहून घेतलें कीं, 'तुह्मांजवळ आह्मीं मागणें केलें ही आह्मांपासून चूक झाली.' त्या शिंद्याचा मान हलका करावयाविषयीं नाना फडनवीस इंग्लिशांस ह्मणत होता कीं, 'तुमचा कोणीएक साहेब आह्मांजवळ असावा, केवळ शिंद्याच्याच द्वारें कारभार न चालावा.' असें असतांही ते इंग्लिश आपला साहेब देत नव्हते, परंतु तो शिंदा जेव्हां उन्मत्त दिसला तेव्हां त्यांनीं ती गोष्ट मान्य केली. त्या समयीं त्यांनीं पुण्यास मालेट साहेब नामें आपला वकील पाठवावयाचें मान्य केलें. असें वर्तमान सन १७८५ त घडलें.

---

## भाग पंचविसावा.

### ( इसवी सन १७८५ पासून सन १७९० पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. टिपू नरगुंदच्या देसायाबरोबर कसकसा वागला ते प्रकरण.—२. त्या टिपूनें हिंदूंवर जुलूम करून त्यांस मुसलमान केले.—३. नाना फडनवीस यानें टिपूला जिकावयाकरितां इंग्लिशांचे कुमकेविषयी यत्न केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं.—४. पुण्याहून मराठ्यांचें लष्कर निघालें तें निझाम अल्ली व मुधोजी भोसले यांस मिळून टिपूवर चालिलें.—५. बदामी किल्ला युद्ध करून मराठ्यांनीं घेतला.—६. तुकोजी होळकर कितुरास जाऊन काय काय करिता झाला तो प्रकार.—७. सावनूरच्या नबाबाची कांहीं गोष्ट.—८. टिपूनें एकाएकीं मराठ्यांशीं तहाचें बोलणें लाविलें तो विस्तार.—९. महादजी शिंदा दिल्लीमध्यें योग्यतेस चढूं लागला असतां त्यानें अन्यायकर्में केली त्यामुळें मुसलमान लोक त्याचा द्वेष करूं लागले.—१०. त्या शिंद्यानें रजपुतांकडे खंडणी मागितली असतां ते सारे एकत्र मिळून त्याशी युद्ध करिते झाले. त्या युद्धाचा प्रकार व त्याचा शेवट कसा झाला तें प्रकरण.—११. त्या शिंद्यास संकट प्राप्त झालें असतां तो कसकसा वागला तें प्रकरण.—१२. त्यानें पुण्याहून कुमक आणविली.—१३. आग्र्याजवळची लढाई.—१४. इस्माइलबेगाचा पराभव आणि शिंद्याचा जय.—१५. कोणी गुलाम कादर मामा याचे आचरण व मृत्यु.—१६. शिंदा दिल्लीमध्यें पुनः मोठी योग्यता पावला. —१७. त्यानें आपल्या लष्कराचा काय काय बंदोबस्त केला तो विस्तार.

१. टिपूनें निझामास लिहिलें होतें कीं, 'विजापूर माझे स्वाधीन करा.' त्या धमकावणींत अर्थ इतकाच कीं, 'तुह्मी व पेशवे मिळून ज्या ज्या मसलती करितां, त्या सर्व मी जाणतों.' कां कीं, ते समयीं टिपूनें निझामावर चालून जावें अशी त्याजवळ फौजेची तयारी नव्हती; आणि निझामानेंही त्यास उलट गोष्ट सांगावी, अशी त्या निझामासही शक्ति नव्हती; ह्मणून त्या उभयतांचा तह श्रीरंगपट्टणाजवळ झाला, तो त्या उभयपक्षीं निर्बळतेमुळेंच ठरला; परंतु तो फार दिवस टिकणार नाहीं असें

ते दोघे जाणत होते. यास्तव तो तह झाला तरी युद्धोपयोगी लष्कराची सिद्धता व आपल्या मुलखांतील किल्ल्यांचा बंदोबस्त यत्नेंकरून करीत होता. त्याची सिद्धता झाल्यावर त्या टिपूनें ते समयीं युद्ध उत्पन्न होण्यास कांहीं निमित्त केलें. तें असें; मलप्रभेचे दक्षिणेस सहा कोसांवर नरगुंद नामें किल्ला आहे, तो व त्याच्या आसमंताद्भागाचा मुलूख कोणी देसाई ब्राह्मण याच्या स्वाधीन होता. तो देसाई पूर्वीं मराठ्यांस त्या देशाची खंडणी देत असे, मग हैदरानें कृष्णेचे दक्षिणेकडचा मराठ्यांकडील मुलूख घेतला; त्यांतच तो देसायाचाही मुलूख त्याजकडे गेला, तेव्हां तो देसाई त्या हैदरास मराठ्यांप्रमाणें खंडणी देऊं लागला. पुढें तो हैदर मेल्यावर टिपू त्या देसायाकडे अमर्याद मागणें मागूं लागला, तेव्हां तो ब्राह्मण पेशव्यांस शरण गेला; त्यावरून त्या टिपूस त्यांनीं निषेधून सांगितलें कीं, 'जहागीरदार आपल्या मार्गानें वागत असतां दुसरी मुद्रा झाली तरी त्यापासून अधिक घेणें हें ठीक नव्हे.' त्यावर टिपूनें उत्तर केलें कीं, 'मी आपल्या राज्यांत इच्छेस येईल तसें आपल्या प्रजेपासून घेईन.' असें उत्तर पेशव्यांस करून तिकडे लष्कर पाठवून त्यास आज्ञा दिली कीं, 'जर तो देसाई ब्राह्मण आह्मीं पैका मागितल्याप्रमाणें न देईल तर तो किल्ला घ्यावा.' यानंतर तें लष्कर जाऊन त्यानें किल्ल्यास घेरा घातला, तेव्हां त्या ब्राह्मणाचे कुमकेस मराठ्यांकडून गणेशपंत बेहरे व परशुराम भाऊ पटवर्धन हे लष्करासुद्धां तिकडे गेले. त्या समयीं टिपूचा वकील पुण्यांत होता; ह्मणून नाना फडनविसानें त्या उभयतांस सांगितलें कीं, 'आधीं मराठ्यांनीं युद्धाचा आरंभ न करावा.' मग ते दोघे सरदार नरगुंदास पोंहचल्यावर त्यांस टिपूच्या सरदाराकडून विनोदयुक्त कांहीं धटाईचा निरोप आला. त्यावरून ते गणेशपंत बेहरे व परशुराम भाऊ क्रुद्ध होऊन नानाचें सांगणें न मानितां टिपूच्या लष्करावर चालून जाऊन त्या लष्करासभोंवत्या त्यानें लहान लहान टोळ्या बंदोबस्तास ठेविल्या होत्या त्यांवर पडून त्या टोळ्या त्याच्या थोरल्या लष्करांत मिळविल्या. तेव्हां त्यांतून टिपूचीं दोन पलटणें व कितीएक स्वार पुढें होऊन लढूं लागले, ते समयीं मराठ्यांचे वीस शिपाई व एक हत्ती मेला. इतकें होतांच ते मराठे मागें हटले. हें वर्तमान नानास कळतांच त्यानें दुसरें मोठें लष्कर तयार करून तें गणेशपंत व परशुराम भाऊ यांच्या कुमकेस पाठवून त्या टिपूला लिहिलें कीं, 'हा कलह मजकडून उत्पन्न झाला नाहीं; हे चाकरलोकच भांडतात, त्यास हा कलह जर मिटेल तर मी फार संतोष पावेन.' त्यावर टिपूनें उत्तर दिलें कीं, 'मीही तेंच इच्छितों, आणि जर तुह्मी या नरगुंदसंबंधें माझा धनीपणा मात्र मानाल, तर मी याची खंडणी तुह्मांस दोन वर्षांची देईन.' असें उत्तर गेल्यावर नानानें निझाम अल्लीच्या मसलतीप्रमाणें मान्य करून आपलें

लष्कर कृष्णेच्या उत्तरेस नेलें, आणि टिपूनें आपल्या बोलीप्रमाणें खंडणीचा ऐवज सत्तावीस दिवसांत पोंहचता करून देतों ह्मणून कबूल केलें. याप्रमाणें मराठ्यांचें लष्कर दूर झालें असतां टिपूनें तो नरगुंद किल्ला घेऊन त्या देसायाला कुटुंबसुद्धां अक्षय बंदींत ठेविलें, आणि त्याची कन्या आपली स्त्री केली; तीशिवाय त्याच्या पहिल्या बायका होत्या. तरी त्यानें एवढें अन्यायकर्म केलें, आणि मराठ्यांस जें द्यावयाचें कबूल केलें होतें तेंही दिलें नाहीं, यांत टिपूचा कुटिलपणा स्पष्ट दिसून आला.

२. याशिवाय कितूर किल्ला याचा खंड मराठे घेत होते, तोही नरगुंदासारखा हैदराकडे गेला. नंतर त्या टिपूनें तो हस्तगत केला. मग त्यानें जितकीं अन्यायकर्में केलीं तितक्यांनींच मराठ्यांस कदाचित् पुर्ता खेद न होईल, ह्मणून त्यानें कृष्णेच्या दक्षिणेचे बहुतेक हिंदु धरून बलात्कारानें त्यांच्या सुंता करून मुसलमान केले. असा टिपूनें अनर्थ केला तेव्हां शंकराचार्यांचे शिष्ये दोन हजार ब्राह्मण यांस तो जुलूम सोसेना, यास्तव त्यांनीं अनेक प्रकारानें प्राणत्याग केले.

३. नाना फडनवीस यानें मनांत निश्चय केला होता कीं, टिपूला जिंकून तत्संबंधी लाभापैकीं इंग्लिशांस किमपि भाग देऊं नये, तथापि या समयीं टिपू प्रबळ झाला. आणि त्याच्या पलटणीचा बंदोबस्त फार चांगला आहे, आणखी आपला सहाय जो निझाम अली त्याचें लष्कर केवळ अव्यवस्थित, असें जाणून त्यानें इंग्लिशांकडे कुमक मागावयाकरितां मनांत कल्पना आणिली कीं, टिपू व इंग्लिश यामध्यें पहिलेंच वैमनस्य आहे, यास्तव तो जिंकावयाविषयीं यत्किंचित् लाभ दाखविल्यानेंच इंग्लिश आपल्यास सहाय होतील, ह्मणून मुंबई सरकारांत त्यानें आपला वकील पाठविला. तेव्हां त्यांनीं त्या वकिलाचें बोलणें आळसत आळसत ऐकून त्याचा अंगीकार न करितां तें प्रकरण कलकत्त्याच्या मुख्याकडे लोटून दिलें. तेव्हां तेथच्या मुख्यानेंही तें काम स्वीकारिलें नाहीं. इतक्यांत पुण्यामध्यें मराठ्यांचें लष्कर त्या टिपूवर जावयास सिद्ध झालें, ते समयीं पेशवे व मुधोजी भोंसले यांचा तह झाला कीं, इंग्लिश पेशव्यावर चालून येत असतां मुधोजीनें त्यांस अनुकूळ न व्हावें, व पूर्वीं माधवराव पेशवे व जानोजी भोंसले यांचा तह झाला आहे, त्यांत अंतर न करितां मुधोजी भोंसल्यानें वागावें.

४. त्या वर्षीं पर्जन्य फार लांबला ह्मणून मराठ्यांच्या लष्करास डिसेंबराचे १ ले तारिखेपर्यंत निघावयास अवसर सांपडला नाहीं. मग हरिपंत फडका लष्करसुद्धां पुण्याहून निघून भोंसले व निझाम यांच्या लष्करास मिळावयासाठीं पूर्वींचे संकेतस्थळीं येदगिरास जाऊं लागला, त्याबरोबर नाना फडनवीसही निझाम

अल्लीशीं कांहीं बोलणें करावयास निघाला. नंतर तीं सर्व लष्करें एकत्र मिळाल्यावर निझामाशीं आणि मराठ्यांशीं मसलत ठरली कीं, टिपूचें सर्व राज्य घ्यावें, आणि त्याचे सहा विभाग करून त्यांतील दोन विभाग पेशवे यांनीं घ्यावे, व दोन निझाम अल्लीनें स्वीकारावे व एक शिंद्यास द्यावा, व एक होळकरास द्यावा. असा नेम होऊन तुकोजी होळकर व गणेशपंत बेहरे या दोघांबरोबर पंचवीस हजार फौज देऊन त्यांस टिपूचें कांहीं लष्कर कितुरापाशीं होतें त्यावर नेमिलें, आणि थोरलें लष्कर टिपूच्या मुलखांत बदामीवर चालिलें. त्या समयीं मसलत झाली कीं, बदामीजवळ जाऊन पर्जन्यकाळपर्यंत युद्धाचा उपक्रम न करितां उगेंच राहावें; पुढें पर्जन्यकाळीं नद्या भरल्यावर तेथें टिपूची कुमक पोंहचेनाशी झाली ह्मणजे युद्ध आरंभावें. त्या मसलतीस निझाम अल्ली मान्य झाला होता, परंतु पर्जन्यांत युद्ध करणें त्यास आवडेना. यास्तव तो आपला सेनापति पंचवीस हजार सैन्यासहित हरिपंताचे स्वाधीन करून आपण हैदराबादेस माघारा गेला.

५. त्यानंतर मराठ्यांनीं टिपूची अडचण न होईलसें समजून त्या किल्ल्यास सन १७८६ च्या मे महिन्याचे १ ले तारिखेस घेरा घातला. त्या बदामी किल्ल्याचें शहर मोठ्या मैदानांत असून त्यासभोंवता तट आहे, त्याच्या मध्यभागीं गढी आहे, आणि त्या तटाच्या दोहों बाजूंस बाहेरचे आंगीं दोन डोंगरी किल्ले आहेत. त्या तटाशीं मराठे वीस दिवस तोफांचा मार करून लढले, तथापि तो तट फारसा ढांसळला नाहीं. तेव्हां असें ठरलें कीं, याच्या आंत जावयास शिडीशिवाय दुसरा उपाय नाहीं. मग २० वे तारिखेस मोगल व मराठे त्या कृत्यास सिद्ध झाले. तेव्हां त्या कोटांतील साडेतीन हजार लोक त्यांच्या नाशार्थ आंतून त्या भिंतींवर चढले; त्यांनीं पूर्वींच त्या तटासभोंवते दारू भरलेले बुधले जागोजाग पुरून ठेविले होते; मग ते मराठे व मोगल त्यांवर हल्ला करीत असतां ते केवळ त्या पुरलेल्या बुधल्यांवर येऊन पोंहचले, तेव्हां अकस्मात् त्या बदामीकरांनीं त्या बुधल्यांस बत्ती देऊन त्यांचा फार नाश केला; तथापि ते मराठे व ते मोगल यांमध्यें मोठी ईर्ष्या उत्पन्न झाली होती, त्या योगें ते तो नाश न मानितां तसेच मोठ्या वेगानें पुढें सरून त्या तटास जागोजाग शिड्या लावून वर चढून आंत उतरले. नंतर त्या शहराच्या आंतील गढीपाशीं मात्र कांहींसा विलंब लागला. ते समयीं त्या तटांतील लोकांचे पाठीस शत्रु लागले असतां ते बहुतेक पळून त्या दोहों बाजूंच्या दोहों किल्ल्यांवर चढून स्वस्थपणें राहिले. नंतर त्यांच्या पाठीस लागलेले मराठे व मोगल यांवर त्यांनीं त्या दोहों किल्ल्यांवरून मोठे मोठे दगड लोटून त्यांवर बंदुकांचाही भडिमार करून त्यांचा बहुत नाश केला, तरी ते मराठे व मोगल यांचा सतत

उद्योग व मोठा वेग पाहून ते किल्लेकरी अत्यंत भयभीत होऊन केवळ जीवदान मात्र मागून त्यांस ते दोन्ही किल्ले देते झाले.

६. असें झाल्यावर नाना फडनवीस तें युद्धाचें काम हरिपंत फडके यांस सोंपवून आपण पुण्यास माघारां गेला. तसाच मुधोजी भोंसला यानेंही आपले बहुतेक लोक आपला दुसरा पुत्र खंडोजी भोंसला याच्या स्वाधीन करून तें कृत्य हरिपंतास सोंपवून त्यास कबूल केलें कीं, 'मी दसरा झाल्यावर आणिक फौज घेऊन तुमचे कुमकेस येतों.' इतकें करून तो माघारां नागपुरास गेला. ते समयीं होळकर अगोदरच कितुरास गेला होता, तो त्या परगण्यांतील सर्व टिपूचीं ठाणीं उठवून त्या किल्ल्याशीं लढत होता; त्यावर कांहीं वेळानें तो किल्ला घ्यावयाचें काम तसेंच ठेवून तो होळकर तेथून एका दिवसांत तीस बत्तीस कोस जाऊन सावनुरास पोंहचला; तो तेथें टिपूचा एक मोठा सावकार राघवेंद्र नाईक नामें होता, त्यास धरावयाच्या बेतानें गेला, परंतु तो तेथून पळून गेला होता; तेव्हां त्या होळकरानें तेथचे दुसरे दोन तीन सावकार धरून त्यांपासून दोन लाख रुपये खंडणी घेतली.

७. सावनुरचा नबाब यास पूर्वीं टिपूनें आपली बहीण देऊन त्याचे पहिले घेतलेले बारा परगणे त्यास माघारे दिले होते, तथापि ते समयीं टिपूनें त्या नबाबास कांहीं उपद्रव दिल्यामुळें तो टिपूचा पक्ष सोडून होळकरास मिळाला.

८. हरिपंत फडका तो बदामी किल्ला घेतल्यानंतर गजेंद्रगड वगैरे आणिक किल्ले घेऊन कोपाळ किल्ल्यास गेला असतां त्यास वर्तमान कळलें कीं, टिपू मोठ्या लष्करासहित आपणावर येण्यासाठीं टोकऱ्यांच्या नावांत बसून तुंगभद्रानदी उतरून आलीकडे आला; तेव्हां हरिपंत फडका त्या टिपूवर जावयास सिद्ध झाला, परंतु तो मुलूख स्वारांच्या युद्धास उपयोगीं नाहींसा समजून तो सावनुरास गेला. तों तेथें टिपूही येऊन मराठे व मोगल यांच्या लष्करांपासून तीन कोसांवर उतरला; तेव्हां तीं दोन्हीं लष्करें सावनुराच्या दोहोंकडे होतीं. मग पंधरा दिवसपर्यंत ते उभयपक्षांचे लोक आपआपले तळावर उगेच होते. नंतर टिपूनें पहांटेची पांच घटिका रात्र असतां मराठ्यांच्या तोफखान्यावर छापा घातला, परंतु तत्संबंधें त्या टिपूच्या हातीं कांहींच लागलें नाहीं. त्या वेळेस मराठ्यांच्या लष्करांत कांहीं धान्यादिकांचा तोटा पडला, आणि टिपूच्यानेंही मैदानांत येववणार नाहीं, या दोहों कारणांस्तव तो हरिपंत फडका सावनूर टाकून लष्करसुद्धां पांच कोस मागें जाऊन दुसरी मैदानाची जागा धरून राहिला. तेव्हां टिपूला त्याचे पाठीस लागवेना; ह्मणून तो सावनुरांत शिरून राहिला. याप्रमाणें त्या दोहीं लष्करांचा युद्धप्रसंग न होतां, व त्यांतील एकासही विशेष लाभ नसतां, एकाएकीं टिपूनें सन १७८७ च्या फेब्रुवारींत

मराठ्यांशीं तहाचें बोलणें करावयाकरितां हरिपंतांकडे तुकोजी होळकराचे द्वारें वकील पाठविला. त्याच्या बोलण्याचा विश्वास हरिपंत धरीना, ह्मणून एप्रिलपर्यंत तें तहप्रकरणीं बोलणें चाललें होतें, मग तो तह ठरून मराठ्यांस कितूर व बदामी व नरगुंद देणें प्राप्त झालें. याशिवाय पंचेचाळीस लक्ष रुपये टिपूनें मराठ्यांस देतों ह्मणून कबूल केलें, आणि सावनुरच्या नबाबासही आपल्या मुलखाचा कांहीं भाग द्यावयास तो कबूल झाला, परंतु त्यासही टिपूचा विश्वास येईना, ह्मणून तो मराठ्यांच्या लष्कराबरोबर पुण्यास गेला. टिपूनें एकाएकीं मराठ्यांशीं तह करून कलह मिटविला, याचें कारण असें; बदामीस नाना फडनवीस असतां इंग्लिशांचा वकील मालेटसाहेब मराठ्यांकडे नेहमीं राहावयास पूर्वसंकेताप्रमाणें आला, तेव्हां त्याची व नाना फडनविसाची प्रथम भेट बदामीस झाली. मग तो नानाबरोबर होता, आणि कलकत्त्यास ते समयीं नवा मुख्य साहेब आला, त्यानें कलकत्ता व मद्रास व मुंबई इतक्या जागीं आपल्या पलटणींचा बंदोबस्त चांगला आरंभिला, या सर्व प्रकारांवरून टिपूला वाटलें कीं, मराठे व इंग्लिश निःसंशय एकचित्त आहेत, हेंच भय मानून त्यानें युद्ध सोडिलें.

९. महादजी शिंदा यास दिल्ली व आग्रे प्राप्त झालें, तथापि तेथें पूर्वीं अव्यवस्था झाली होती. त्यामुळें त्या बंदोबस्तास जो खर्च लागला, त्याप्रमाणें तेथें उत्पन्न झालें नाहीं; लौकिकांत दिसण्यांत तर तो त्यास मोठा लाभ झाला असें झालें, परंतु निश्चितार्थ तसा नव्हता. मग थोडक्याच दिवसांत त्यास द्रव्याचा तोटा पडला, यास्तव त्याला ज्यांत मसलत नाहीं असें अन्यायकर्म करावें लागलें. त्यांत जे मुसलमान सरदार त्या शिंद्यास मिळाले होते, त्या बहुतेकांच्या जहागिरी त्यानें जप्त केल्या; आणि ज्यांच्या जप्त केल्या नव्हत्या त्यांसही शंका उत्पन्न होऊन ते त्याचा द्वेष करूं लागले.

१०. असें असतां शिंद्यानें बादशाहाचें नांव करून त्या रजपुतांस खंडणी मागावयाकरितां आपण लष्करासहित जयपुरच्या दरवाज्यापाशीं जाऊन तेथें डेरा देऊन उतरला, आणि त्या सर्व रजपुतांस साठ लक्ष रुपये खंडणी मागितली, त्याप्रमाणें त्यांनीं बहुतेक पैका देऊन बाकी राहिला तो 'कांहीं अवकाशानें देऊं' ह्मणून कबूल केलें. मग त्या अवकाशाप्रमाणें ती वेळ आल्यावर महादजी शिंद्यानें तो ऐवज मागावयास रायाजी पाटील नामें आपला सरदार पाठविला. तेव्हां त्या जयपूरकरांस बादशाहाचे मुसलमान सरदार आंतून अनुकूळ होते; यास्तव त्या रजपुतांनीं त्या रायाजीशीं लढून त्याचा पराभव केला. ते वेळेस दिल्लीचा बादशाह जो कोणी बळवान् होईल त्यास आपलें कार्य करून घेण्यास निमित्तमात्र झालेला असे, आणि

केवळ दुसऱ्यानें दिलेलें खाऊन गरीबासारिखा होता, तोही त्या संधींत शिंद्याचा तिरस्कार करून ह्मणूं लागला कीं, 'या शिंद्यानें माझा किमपि मान ठेविला नाहीं, असे हे मराठे लोक केवळ रानवट आहेत.'

११. त्या समयीं त्या महादजी शिंद्यानें मनांत विचार केला कीं, 'मी रजपुतांशीं वांकडा झालों; आणि मजविषयीं बादशाहाचे लोक रुष्ट झाले, याशिवाय आपलें लष्कर व बादशाहाचें लष्कर यांच्या रोजमुऱ्याची बाकी देणें पुष्कळ थकली, अशा समयीं युद्ध करून जय न झाला तर माझा समूळ नाश होईल. एवढें संकट त्याजवर पडलें असतांही त्या महादजी शिंद्यास युद्धावांचून दुसरा उपाय दिसेनासा झाला. तेव्हां त्यानें आपा खंडेराव नामें आपला सरदार जवळ बोलाविला, आणि पूर्वीं डिबॉयन्‌नामें फ्रेंच जातीच्या मोठ्या नामांकित सरदारानें शिकविलेलीं त्याचीं दोन पलटणें नुकतींच बुंदेलखंडांतून आलेलीं होतीं, तींही जवळ बोलाविलीं; मग तो आपलें लष्कर व बादशाहाचें लष्कर बरोबर घेऊन सन १७८७ त दिल्लीहून रजपुतांवर चालिला. तो जयपुराजवळ पोंहचला असतां त्याच्या मनांत आलें कीं, रजपुतांशीं युद्ध करून आपला परिणाम नीट होणार नाहीं, ह्मणून त्यानें त्या जयपूरवाल्याशीं तह करावयाचा उद्योग आरंभिला, परंतु तो जयपूरचा राजा प्रतापसिंग यास जोधपुराचा राजा व दुसरेही कितीएक रजपूत राजे मिळून तेथें मोठें सैन्य जमा झालें होतें, ह्मणून ते सर्व रजपूत तो तह न मानून त्या शिंद्याच्या लष्करचे कोठीस उपद्रव करून अनेक प्रकारें त्यास बेजार करूं लागले. असा थोडकासा वेळ गेल्यावर त्या महादजी शिंद्याकडचे मोगल व मराठे त्या उपद्रवास कंटाळून बादशाहाकडच्या सर्व सरदारांत मोठा सरदार महंमद बेग अमदानी नामें होता, तो व त्याचा पुतण्या इस्माइल बेग, हे दोघे त्या शिंद्याचा पक्ष सोडून रजपुतांस मिळाले. तेव्हां तो महादजी शिंदा समजला कीं, 'जर आतां युद्धास विलंब करीन, तर हे बादशाहाचे सर्व लोक रजपुतांस जाऊन मिळतील,' ह्मणून तत्काळ मोठ्या निकरानें परस्परें युद्ध होऊं लागलें. त्यांत महंमद बेग मोठ्या तोफेच्या गोळ्यानें मृत्यु पावला. त्या समयीं अशी संधी उत्पन्न झाली कीं, त्या महंमदाचें सर्व लष्कर पळून जावें आणि मराठ्यांचा जय व्हावा, परंतु इस्माइल बेग यानें मोठा उद्योग करून त्या सर्व लोकांची थोपाथोपी केली, आणि युद्ध चालविलें. ते समयीं शिंद्यास मार्गें हटावें लागलें. त्यानंतर तिसरे दिवशीं शिंदा फिरून रजपुतांशीं लढावयास सिद्ध झाला, ते समयीं बादशाहाचे सर्व पायदळ लोक ऐशीं तोफांसहित अकस्मात् त्या इस्माइल बेगास मिळाले. अशाही संकटसमयीं शिंद्यानें आपलें धैर्य किमपि न सोडितां फार युक्तीनें वागणूक केली, ती अशी; त्या समयीं त्यानें आपलें सर्व जड

सामान व बहुतेक बुणगें खुशालगडाकडून ग्वाल्हेरीस पाठविलें, मग आपल्या लष्करासुद्धां मोठ्या त्वरेनें दीग किल्ल्यापर्यंत हटत गेला, तो तेथें राहून आपल्या लष्कराच्या लहान टोळ्या आसमंतात् चहूंकडे गेलेल्या जमा करिता झाला. मग आपणास जाटलोक सहाय करून घेण्याविषयीं त्या जाटांचा दीग किल्ला त्यांस माघारां दिला, आणि आपल्या मोठमोठ्या तोफा त्या जाटांचा दुसरा भरतपूर नामें किल्ला आहे तेथें ठेविल्या. मग आपण आग्र्याजवळ जाऊन तो किल्ला व त्या आग्र्याखेरीज अल्लीगड नामें दुसरा किल्ला आहे, त्या दोन्ही जागीं शिबंदी पाठविली.

१२. त्या समयीं त्या रजपूतलोकांच्या मनांत मराठे समूळ बुडवावे असें नव्हतें ह्मणून ते निरनिराळे होऊन आपआपल्या ठिकाणास गेले. मग इस्माइल बेग बादशाहाचा मुलूख मराठ्यांनीं घेतलेला सोडवावयास एकटाच उद्युक्त झाला. तो प्रथम आग्र्याजवळ जाऊन उतरला, आणि शिंद्याशीं मोठें युद्ध करून आग्रें घेणार होता; परंतु शिंदा हलके हलके युद्ध करी, मोठ्या युद्धास झटेना, असे आठ दिवस गेले; नंतर शिंद्याला असें वर्तमान कळलें कीं, इस्माइल बेगाचे कुमकेस गुलाम कादर नामें रोहिला, झाबिताखान रोहिला याचा पुत्र येतो. असें ऐकतांच तो शिंदा आपल्या लष्करासहित निघून ग्वाल्हेरीस गेला. तेथें त्यानें पूर्वीं पेशव्यांस कुमक मागितली होती ती पोंहचली नाहीं; ह्मणून नाना फडनविसास पुनः मोठ्या आग्रहानें लिहिलें कीं, 'माझें कार्य अद्यापि नष्ट झालेंसें नाहीं, परंतु सांप्रत मोगल व इंग्लिश रजपुतांस मिळतील असें दिसतें, हें झालें तर मराठ्यांचा समूळ नाश होईल. त्यास या समयीं सर्वांनीं आपला धनी एकच आहे, असें ध्यानांत आणून निर्मत्सरपणें एकचित्त होऊन आपलें राष्ट्र संभाळावयाचा अभिमान धरिला पाहिजे.' असें त्या महादजी शिंद्यानें नाना फडनविसास कुमकेविषयीं लिहिलें असतां स्वतः उद्योग किमपि टाकिला नाहीं.

१३. त्या शिंद्याचे लोक आग्र्यामध्यें इस्माइल बेगाशीं लढत आहेत, आणि जाट लोक यांची इस्माइल बेग स्पर्धा करितो ह्मणून ते आपल्या लोकांच्या साहाय्यार्थ इस्माइल बेगाला उपद्रव करिताहेत; असें जाणून त्या महादजी शिंद्यानें मनांत आणिलें कीं, इस्माइल बेगास गुलाम कादर जरी मिळाला आहे, तरी या समयीं आपण जाऊन ते आपले आग्र्याचे लोक यांस कुमक करावी.' त्यावरून त्यानें आपला सरदार राणेखान व आपा खंडेराव या दोघांबरोबर लष्कर देऊन त्यांत डिबॉयनाचीं दोन पलटणेंही नेमिलीं. तो राणेखान भरतपुरास जाऊन तेथून जाटांचें लष्कर घेऊन ते सर्व आग्र्यावर जावयास निघाले, तों इस्माइल बेग व गुलाम कादर आग्र्याची लढाई कांहींशी राखून तेथून निघून त्यांवर आले; त्यांची व राणेखान

याची गांठ त्या भरतपुरापासून आठां कोसांवर पडतांच त्या उभयपक्षीं लष्कराचें युद्ध मोठ्या निकराचें झालें. तेव्हां महादजी शिंद्याचीं पलटणें फार झटून लढलीं. त्यावर इस्माइल बेग आपल्या रीतीप्रमाणें मोठ्या त्वरेनें स्वयें चालून आला असतांही फार वेळपर्यंत त्याचा उपाय त्या पलटणांपुढें चालला नाहीं. त्याप्रमाणेंच दुसरा एक लिस्टेनो नामें फ्रेंच जातीचा मोठा नामांकित जाटांकडचा सरदार असे, त्याचींही पलटणें फार झटून गुलाम कादराशीं लढलीं; त्यापुढेंही गुलाम कादराचा इलाज चालेना; परंतु त्या जाटांचीं दुसरीं तीन पलटणें कोणी जहानगीरखान नामें मुसलमान सरदार याचे स्वाधीन होतीं, तो एकही बार न करितां इस्माएल बेगास जाऊन मिळाला. हें न होतें, आणि त्या लष्कराचे स्वार तीं युद्ध करणारीं पलटणें यांस झटून कुमक करिते, तर त्या समयींच शिंदा जय पावला असता; परंतु तें झालें नाहीं, ह्मणून त्या पलटणी लोकांचा बहुत नाश होऊन त्यांस युद्ध सोडून रात्रीच्या आश्रयानें आपल्या जीवाचें संरक्षण करून माघारें भरतपुरास जावें लागलें.

१४. असा मुसलमानांचा जय झाल्यावर जाटांचा मुख्य रणजितशिंग यास इस्माइल बेग ह्मणूं लागला कीं, 'आग्रें घेतलें ह्मणजे मी तुझें पारिपत्य करावयास चुकणार नाहीं.' असें त्या इस्माएल बेगाचें फुशारकीचें बोलणें शेवटास गेलें नाहीं; कां कीं, लखबा दादा नामें आग्र्याचा किल्लेदार होता; त्यानें आपल्या किल्ल्याच्या संभाळण्याचा उद्योग निरालसपणें केला, त्यामुळें तें कार्य फार लांबलें; तेव्हां त्या मुसलमान लोकांत परस्पेरं अविश्वास उत्पन्न होऊन वैमनस्यें पडत गेलीं. याखेरीज त्या समयीं राणेखानास वर्तमान कळलें कीं, 'शीख लोकांनीं उत्तरेकडून येऊन मोंगलांच्या मुलखांत स्वारी घातली.' तेव्हां त्या राणेखानानें आपल्या लष्कराची एक टोळी त्या शिखांचे कुमकेस पाठवून त्यांस सांगितलें कीं, 'गुलाम कादराचे जहागिरीचा नाश करावा.' त्या समयीं त्यांनीं तसेंच केलें असतां गुलाम कादर आपलें सैन्य घेऊन तो उपद्रव मोडावयासाठीं आपल्या मुलखास गेला. तेच समयीं शिंद्यानें राणेखानाच्या लष्करास कुमक पाठविली, तेव्हां तो पुनः इस्माएल बेगास जिंकावयाकरितां आग्र्यास गेला. मग सन १७८८ च्या जून महिन्याचे १८ वे तारिखेस आग्र्याजवळ मोठें युद्ध होऊन त्या इस्माएल बेगाचा पराभव झाला. त्या युद्धांत तो इस्माएल बेग फार जखमी झाला, परंतु त्याचा घोडा बहुत चांगला होता, ह्मणून तो घोड्यासुद्धां यमुनेंत उडी घालून आपला जीव वांचवून पार निघून गेला; मग तसेच त्याबरोबर यमुनेंतून पार गेलेल्या थोडक्याशा लोकांनिशीं तो गुलाम कादराच्या लष्करांत गेला; आणि त्याचे जे लोक पळाले ते बहुतेक दिल्लीस गेले. त्या समयीं शिंद्याचा डिबायन याचीं पलटणें मोठी योग्यता पावलीं. असा जय पावल्यावर तो महादजी

शिंदा लागलाच दिल्लीस गेला नाहीं, ह्मणून ते वेळचे लोक ती त्याची मोठी चूकशी मानूं लागले; परंतु त्या न जाण्यांत शिंदा आपलें हित असें समजला असेल कीं, 'इस्माएल बेग व गुलाम कादर हे दोघे दिल्लीमध्यें आपल्या लष्कराचा बंदोबस्त करीत असतां यांचा स्नेह फार दिवस टिकणार नाहीं, मग दुफळी झाल्यावर एक आपणास अनुकूळ होईल; याखेरीज पुण्याहून नाना फडनविसाकडून कुमकही तोंपर्यंत येईल.' मग त्याप्रमाणें पुण्याहून तुकोजी होळकर व अल्ली बहादर हे दोघे लष्कर घेऊन आले. नंतर शिंद्यानें राणेखान व आपाजी खंडेराव व अल्ली बहादर व डिबायन याचीं दोन पलटणें इतकीं दिल्लीस पाठविलीं.

१५. इकडे दिल्लीस गुलाम कादर व इस्माइल बेग यांनीं आपल्या लष्कराचा बाकी ऐवज घ्यावयाकरितां बादशाहाचें घर लुटलें. नंतर तो गुलाम कादर दिल्लींत प्रबळ होऊन त्यानें दोन महिनेपर्यंत त्या बादशाहास व त्याच्या कुटुंबास अत्यंत दुःख [1] दिलें.' असें कीं, तें पाहून इस्माइल बेगासही बहुत खेद वाटून त्या उभयतांचें वांकडें पडलें. मग मराठ्यांचें लष्कर दिल्लीस येऊन पोंहचलें, तेव्हां तो इस्मायल बेग व दुसरे तेथचे लोक मोठ्या हर्षेंकरून त्यांस आंत घेते झाले. नंतर त्यांनीं एक मोठीशी टोळी सिद्ध करून त्या गुलाम कादरास धरावयाचा उद्योग आरंभिला. तेव्हां तो आपल्या लोकांसुद्धां पळून जाऊन मिरत नामें किल्ला आहे त्यांत शिरला. मग त्याचे पाठीस लागलेल्या लोकांशीं तो तेथून मोठ्या निकरानें लढला, परंतु त्या किल्ल्यांतली धान्यादिकाची बेगमी सरली; तेव्हां तो चांगल्या घोड्यावर बसून एकटाच तेथून पळाला, तो कांहींसा दूर गेल्यावर रात्रीं आंधारांत त्याचा घोडा अडखळून पडला, तेव्हां त्यास असा धक्का बसला कीं, त्या योगें त्याला गतप्राणाचे परी मूर्च्छा येऊन तो अचेतन पडला; मग दिवस उगवल्यावर कोणी शूद्र तेथें आला, त्यानें त्यास पाहिलें, मग तेथून उचलून तो मराठ्यांच्या लष्करांत नेला. नंतर तो त्या लष्करांत बंदींत असतां कांहीं दिवसांनीं शिंद्यानें त्याचे हात पाय तोडून तो थोटा केला; मग तो कांहीं दिवसांनीं मृत्यु पावला. नंतर त्या गुलाम कादरानें शाह अलम बादशाहाचा पुत्र बेदरबख्त दिल्लीहून आपण पळून जातांना आपल्या बरोबर मिरत किल्ल्यांत नेला होता; तो मराठ्यांच्या हातीं लागला, त्यांनीं त्यास किमपि दुःख न देतां तो मर्यादेनें बंदींत ठेविला; शेवटीं त्याच्या वडिलास शिंद्याचे योगें पुनः

१. तो गुलाम कादर दिल्लींत प्रबळ होऊन त्यानें तेथचा बादशाह शाह अलम यास तक्तावरून उठवून त्याचा पुत्र बेदरबख्त यास त्याचे जागीं स्थापून त्या बादशाहाचा फार अपमान करून खंजिराच्या अणीनें आपल्या हातें त्याचे डोळे काढिले, आणि त्याच्या स्त्रिया व कन्या व त्याचे सखे सोयरे व त्यांच्या स्त्रिया यांची अनिर्वाच्य विटंबना केली, आणि त्यांतून कितीएकांस अन्नावांचून उपाशी मारिलें.

तक्ताधिपत्य प्राप्त झाल्यावर त्यानें त्या आपल्या पुत्रास जिवें मारून टाकिलें. असें वर्तमान सन १७८९ त घडलें.

१६. त्यानंतर महादजी शिंदा यानें गुलाम कादर याची जहागीर व बहुतेक दुवाब प्रांत व दिल्ली व आग्रे हे दोन परगणे घेतले. एवढें यश त्यास प्राप्त झालें, तथापि तो निर्भय झाला नव्हता. ते वेळेस आफगाणचा बादशाह तिमूरशाह याचा सरदार अबदाली याचे लोक मुलखांत स्वाऱ्या घालीत होते, ते आपणावर येतील असें त्या महादजी शिंद्यास वाटत होतें. याखेरीज रजपुतांमध्येंही मोठमोठे त्याचे द्वेष्टे असत. याशिवाय त्याचें साहाय्य करणारे जे होळकर व अल्ली बहादर यांस त्याचें कार्य शेवटास नेण्यापेक्षां त्यानें संपादिलेल्या मुलखाचा भाग घेण्याविषयीं आशा फार होती. तो हें सर्व जाणून होता तथापि आपल्या वृद्धीचा उद्योग त्यानें टाकिला नाहीं. तो प्रकार लिहिण्याचे पूर्वी शिंद्यानें आपल्या लष्कराचा काय काय बंदोबस्त नवा केला तो समजला पाहिजे.

१७. प्रथम त्यानें पहिल्यापेक्षां रजपूत व मुसलमान बहुत चाकरीस ठेविले, आणि त्याचे स्वार पूर्वीं चोळणे घालीत असत, ती चाल मोडून स्वारांनीं खोटेपर्यंत लांबीच्या विजारा घालावयाची चाल पाडिली; आणि त्यापूर्वीं मराठ्यांच्या लष्करांत गोसांवी लोक फारसे नव्हते ते अधिक ठेवून त्यांचा एक नवाच मोठासा जमाव करून हिंमत बहादर नामें त्यांचा गुरु होता त्यास त्या मंडळीची मुख्यता दिली. या सर्वांपेक्षां त्यानें त्या डिबायनाचीं दोन पलटणें होतीं तीं, प्रतिपलटणास सातशें लोक, याप्रमाणें चोवीस पलटणें केलीं, आणि त्या प्रतिपलटणास मैदानांत लढाईच्या उपयोगी अशा हलक्या हलक्या तोफा पांच पांच दिल्या. त्या चोविसां पलटणांतील आठां आठां पलटणांचा ब्रिगेड नामें एक एक भाग करून एकेका ब्रिगेडास पांचपांचशें स्वार नेमिले. इतक्या समुदायाचें मुख्यत्व डिबायनास दिलें; आणि त्या पलटणांच्या खर्चास पुरेसा मुलूख देऊन त्या मुलखाचे उत्पन्नांत शेंकडा दोन रुपयेप्रमाणें त्या डिबायनानें आपलें स्वामित्व घ्यावेंसें केलें, व त्यास जातीनें दरमहा दहा हजार रुपये केला. त्या पलटणी लोकांत त्या डिबायनानें आपल्या हाताखालीं विलायतच्या कित्येक मुलुखचे मोठे मोठे चतुर साहेब लोक ठेविले होते. त्यांत एक सांगस्टर नामें साहेब होता, तो बंगाल्याच्या मुख्य साहेबापाशीं होता. मग त्यानें गोहदच्या राण्याची चाकरी कांहीं दिवस करून शिंद्याच्या पलटणांत राहिला. तो तोफा ओतावयाच्या कामांत अत्यंत कुशल असे. त्यानें फार चांगल्या साठ तोफा शिंद्यास ओतून दिल्या. मग शिंद्याचा तोफखाना वाढतां वाढतां त्यांत अनेक प्रकारच्या तोफा दोनशांवर जमल्या, एवढी त्या महादजी शिंद्याची दौलत वृद्धीस पावली.

---

## भाग सव्विसावा.

**( इसवी सन १७८७ पासून सन १७९२ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )**

१. टिपूनें पेशव्यांशीं तह केलेला मोडून फौजेची तयारी केली.—२. नंतर टिपूनें इंग्लिशांचा मित्र त्रावणकोरवाला याशीं युद्ध केलें असतां त्याच्या पारिपत्याविषयीं इंग्लिश व मराठे व मोगल यांचें ऐक्य झालें.—३. इंग्लिशांची टोळी परशुराम भाऊस मिळून टिपूशीं युद्धाचा उपक्रम केला.—४. धारवाड किल्ल्याच्या युद्धाचा प्रकार.—५. मद्रासेकडून इंग्लिशांचें लष्कर आलें त्याचें वागणें.—६. मोगलाची वर्तणूक.—७. हरिपंत फडके व परशुराम भाऊ यांचें लष्कर इंग्लिशांस मिळालें तो विस्तार.—८. लॉर्ड कॉर्नवॉलिसानें टिपूचा पराभव करून श्रीरंगपट्टणास घेरा घालावयाची तयारी केली असतां अन्नतृणादिकांचे तोट्यामुळें त्यास तो उद्योग सोडावा लागला.—९. यानंतर इंग्लिश व मराठे व मोगल यांचा टिपूच्या मुलखीं कसकसा संचार झाला तो प्रकार.—१०. लॉर्ड कॉर्नवॉलिसानें पुनः श्रीरंगपट्टणास घेरा घातला.—११. मग सल्ला झाल्यावर इंग्लिश व मराठे व मोगल यांस काय काय लाभ झाला ती कथा.—१२. परशुराम भाऊ श्रीरंगपट्टणास विलंबेंकरून आला तो विस्तार.—१३. त्यास तेथून माघारां पुण्यास जातांना वाटेनें बहुत उपद्रव सोसावा लागला.

१. सन १७८७ मध्यें टिपूनें फार झटून तह केला. तथापि हरिपंत फडक्याचें लष्कर नुक्तेंच कृष्णेचे पलीकडे पोंहचलें न पोंहचलें तोंच त्यानें कितूर मराठ्यांपासून घेतलें, व बेदनुरासही कांहीं लष्कर जमा करून कोंकणपट्टी मराठ्यांपासून घेणार असें दर्शविलें. असें त्याचें एकसमयींच तह करणें आणि तद्विपरीत वागणें झालें. याचें मूळ कारण त्या टिपूच्या चंचल स्वभावावांचून दुसरें कांहीं दिसत नाहीं. परंतु त्या समयीं कितीएक इंग्लिश असें समजले कीं, 'टिपू व नाना फडनवीस व निझाम अल्ली व फ्रेंच हे सर्व मिळून आह्मांस बुडविणार आहेत.' आणि नाना फडनवीस समजला कीं, 'मराठे बुडवावे असेंच टिपूच्या मसलतीचें तात्पर्य.' त्यावरून नानानें कलकत्त्याचा मुख्य लॉर्ड कॉर्नवॉलीस् नामें साहेब होता, त्याकडे वकील पाठवून सुचविलें कीं, 'टिपूचें प्राबल्य न होण्यास तुमचें व आमचें ऐक्य असावें.' त्यावर त्या साहेबानें उत्तर दिलें कीं, 'यांत आमचें हितच आहे, परंतु आमच्या सरकाराची आज्ञा अशी आहे कीं, जो आपणांशीं विरोध करील त्याशीं मात्र वांकडें असावें. टिपूनें पूर्वीं आह्मांशीं जें बोलणें केलें आहे, त्यांत जर त्याकडून कांहीं अंतर पडेल तर आह्मी तुह्मांस मिळूं.'

२. यानंतर टिपूचें आचरण इंग्लिशांविषयीं विपरीत नाहींसें समजून कलकत्त्याच्या मुख्यानें मनांत निश्चय केला कीं, पूर्वीं सन १७६८ त निझाम अल्लीनें करार केला होता कीं, 'बसालतजंग मृत्यु पावल्यावर त्याची जहागीर गंटूर परगणा इंग्लिशांस मी देईन,' त्याप्रमाणें तो बसालतजंग सन १७८२ त मृत्यु पावला, त्यास या

समयीं त्याला तो मागावयास योग्य आहे, असें समजून त्याकडे त्या साहेबानें वकील पाठवून मागतांच त्या निझामानें तो परगणा त्यांस दिला. तो प्रांत अतिउत्कृष्ट असून त्यानें उगाच दिला असें नाहीं; तो समजला कीं, 'हल्लीं हिंदूमुलखीं मराठे व इंग्लिश व टिपू व आह्मी सत्ता करितों. या सर्वांमध्यें न्यूनबळ असा मीच आहें, त्यास यांतील कोणा एकाचा आश्रय केल्यावांचून माझें राज्य टिकणार नाहीं.' त्या निझामाच्या मनांत होतें कीं, टिपूशीं स्नेह करावा, कां कीं, तो आपल्या जातीचा मुसलमान आहे, परंतु त्याचे वजीर वगैरे मुत्सद्दी यांनीं त्यास मसलत दिली कीं, या समयीं तुह्मीं पूर्वींच्या तहाप्रमाणें इंग्लिशांस गंटूर परगणा देऊन दोन पलटणें व सहा तोफा व खंडणी पहिल्या कराराप्रमाणें इंग्लिशांस मागून मग त्यांशीं स्नेह ठेवाल तर तो उपयोगी होईल. असें ठरल्यावरून त्या निझाम अल्लीनें कलकत्त्यास वकीलही पाठविला, परंतु सरळपणानें वागणें त्याच्यानें होईना; तें असें, त्यानें कलकत्त्याच्या मुख्याकडे वकील पाठविला असतांही टिपूशीं स्नेह साधावयाकरितां दुसरा वकील पाठविला. त्याचें बोलणें आलें कीं, 'तुमचा स्नेह मला मान्य आहे, आणि तुमचा व आमचा कांहीं शरीरसंबंधही व्हावा.' त्यावर निझामास राग येऊन तें मान्य न करितां तसेंच राहिलें. असें असतांही इंग्लिशांकडे टिपूचा वकील बोलणें करीत होता ह्मणून त्या निझामाचे वकिलास त्या लॉर्ड कॉर्नवॉलिसानें उत्तर दिलें कीं, 'पूर्वींच्या कराराप्रमाणें तुह्मांस आह्मी पलटणें व तोफा व खंडणीही देतों, परंतु टिपूला जिंकावयाविषयीं या वेळेस आह्मी तुमचे साहाय्यास विलायतेचे आज्ञेवांचून येणार नाहीं; आणि पुढें कधींही कर्नाटक बालेघाट आमच्या स्वाधीन झाल्यावर त्याविषयीं जो तुमचा व आमचा पूर्वीं करार ठरलेला आहे, त्याप्रमाणें तो मुलूख तुह्मांस देऊं.' असें त्या लार्डाचें उत्तर निझामास गेल्यावर टिपूला समजलें कीं, 'आह्मांस जिंकावयाविषयीं निझामाला इंग्लिश अनुकूळ झाले.' यावरून तो टिपू क्रुद्ध झाला, आणि पूर्वीं त्यानें इंग्लिशांचें साहाय्य करणारा जो त्रावणकोरचा राजा त्यावर मोहिम करून तो मुलूख घ्यावयाचा बेत केला होता, तो सिद्धीस न्यावयाचा उद्योग करूं लागला. तो टिपू सन १७८९ च्या डिसेंबर महिन्यामध्यें त्रावणकोरास जाऊन त्या राजाच्या लष्करावर हल्ला करिता झाला. त्या युद्धामुळें नाना फडनवीस याच्या पूर्वींच्या बोलण्याप्रमाणें सन १७९० च्या जून महिन्याचे १ ले तारिखेस पुण्यामध्यें इंग्लिश व नाना फडनवीस व निझाम अल्ली यांचें ऐक्य झालें. त्या समयीं असें ठरलें कीं, निझाम अल्ली व नाना फडनवीस मिळून पंचवीस हजार फौज घेऊन या पर्जन्यकाळांतच जाऊन उत्तरेकडचा टिपूचा मुलूख घ्यावा, त्यानंतर पर्जन्यकाळ गेल्यावर त्या तिघानीं मिळून होईल तितकें लष्कर जमा करून टिपूचा सर्व मुलूख घ्यावा. त्या

कामास इंग्लिशांनीं दोन पलटणें मराठ्यांस द्यावीं, व दोन निझामास द्यावीं; त्या पलटणांचा खर्च त्या उभयतांनीं द्यावा.

३. 'त्या मुलखांत जेथें या तिघांतील कोणाएकाचेंही पूर्वीचें स्वामित्व नाहीं, असा जो मुलूख असेल, तो तिघांनीं वांटून घ्यावा, याशिवाय कोणी पेशव्यांकडील किंवा निझामाकडील पाळेगार अथवा जमीनदार हैदरानें घालवून दिलेला असेल, त्यास त्याचे जागीं स्थापून त्याजपासून कांहीं द्रव्य नजर घ्यावें, तें तिघांनीं वांटून घ्यावें; आणि या तिघांतील ज्या कोणांचा मुलूख पूर्वींचा असेल त्याचें स्वामित्व त्यानें करावें.' असा नेम ठरल्यावर इंग्लिशांचें लष्कर मद्रासेहून निघालें, आणि मुंबईहून दोन पलटणें व सहा तोफा निघाल्या, त्या आंबेघाटानें वर चढून तासगांवाजवळ जून महिन्याचे १८ वे तारिखेस पोंहचल्या, त्यांचा मुख्य कप्तान लिटल् नामें साहेब होता, त्याबरोबर मराठ्यांनीं आपला कारकून संगमेश्वरापासून दिला होता. त्यानें त्या साहेबाचे जाण्यास कांहीं युक्ति करून अनेक प्रकारें विलंब लाविला; आणि टिपूचा वकील पुण्याहून अद्यापि गेला नाहीं, असें त्या साहेबास वर्तमान कळलें, त्यावरून त्या साहेबाला कांहीं चमत्कार वाटला. जेव्हां तो तासगांवास पोंहचला तेव्हां तेथें मराठ्यांच्या स्वारांची तयारी त्यांनीं ह्मटल्याप्रमाणें नाहींशी पाहून तो समजला कीं, कारकुनानें विलंब लावल्याचें कारण हेंच. तो तेथें पोंहचला तेव्हां मराठ्याचे स्वार दोन हजार मात्र जमले होते. मग ती तयारी न होण्याचें कारण शोधितां इंग्लिशांस असा ठिकाण लागला कीं, मराठे टिपूस ह्मणतात कीं, 'आह्मी व निझाम अली व इंग्लिश एकमत झालों आहोंत, तर तुह्मी आह्मांस कांहीं द्रव्य द्याल तर आह्मी तें मोडून तुमचा पक्ष स्वीकारूं.' असें त्याशीं बोलणें मात्र करून त्या टिपूपासून द्रव्य घेतल्यानंतर त्यावर उलटून त्यास बुडवावयाच्या मसलतींत ते आहेत, इतकें इंग्लिशांस समजलें. ते मराठे टिपूकडून द्रव्य येईल ह्मणून फार दिवस वाट पहात होते; परंतु तें सिद्धीस जात नाहींसें पाहून मग त्यांनीं आगष्ट महिन्याचे ५ वे तारिखेस त्या वकिलाला निरोप दिला. यानंतर परशुराम भाऊ यास पुण्याहून निघून कृष्णा उतरावयास आगष्टाची ११ वी तारीख लागली, त्याबरोबर पांच हजार स्वार व दीडहजार पायदळ होतें. त्यानंतर थोडकेच दिवसांत प्रतिनिधि कांहीं स्वारांसहित येऊन त्या परशुराम भाऊस मिळाला. याशिवाय विजयदुर्गचे बंदरच्या कामावर धोंडोपंत गोखला नामें होता, तो एक हजार स्वारांसहित येऊन त्या भाऊस मिळाला. त्या धोंडोपंतानें इंग्लिशांचे आज्ञेंत वागावें, असें परशुराम भाऊच्या मनांत आलें, परंतु ती मसलत कांहीं कारणामुळें सिद्धीस गेली नाहीं. तथापि त्या दिवसापासून इंग्लिश व गोखले यांचा परिचय झाला. मग त्या इंग्लि-

शांच्या द्वारें त्या धोंडोपंताचा पुतण्या बापू गोखला पुण्याचे दरबारीं मोठी योग्यता पावला. नंतर कालेंकरून त्याशीं व इंग्लिशांशीं द्वेष पडला, तें प्रकरण पुढें लिहिण्यांत येईल.

४. यानंतर २५ वे तारिखेस मराठ्यांनीं टिपूचा लहानसा कोटाचा गांव घेतला, त्यापासून परस्परें युद्ध चालू झालें, आणि मराठ्यांचें लष्कर तेथून पुढें चालतां चालतां टिपूच्या मुलखचे रयतलोकही टिपूचे शिबंदीस घालवून मराठ्यांकडे मिळावयास सिद्ध झाले. मग ते शिबंदीलोक आपला धनी कोण हा विचार मनांत न आणितां त्या परशुराम भाऊची चाकरी धरून मुलखाची बाकी घेण्यास त्याला सहाय झाले. नंतर थोडक्याच वेळांत आणखी मराठे लोक थोडे थोडे येऊन त्या परशुराम भाऊस मिळतां मिळतां इंग्लिशांचीं दोन पलटणें खेरीज करून मराठ्यांचें लष्कर सुमारें दहा हजार स्वार व तीन हजार पायदळ जमलें. मग त्या लष्करासहित तो परशुराम भाऊ सप्टेंबरचे १८ वे तारिखेस धारवाडाजवळ जाऊन तो किल्ला घ्यावयाचा उद्योग करूं लागला. त्यांत दिवसास दुरून तोफांचे गोळे त्या किल्ल्यास मारावे, आणि रात्रीं त्या तोफा माघारां नेऊन तोफखान्यांत ठेवाव्या; असें निरुपयोगी आणि उपहास होण्याजोगें युद्ध दीड महिन्यापर्यंत त्या परशुराम भाऊनें चालविलें. मग तो कांहींसा उपयोगी चालीनें वर्तला; तो असा. कितीएक लोक त्या किल्ल्यांतून बाहेर येऊन युद्धाविषयीं उभे राहिले होते, त्यांवर हल्ला करून त्यांस किल्ल्यांत घालवून त्यांच्या तीन तोफा घेतल्या; ते समयीं इंग्लिशांचीं पलटणें उपयोगीं पडलीं. त्यांनीं मराठ्यांच्या साहाय्यावांचून त्या किल्ल्याची पेंठ शिडी लावून घेतली. ते समयीं त्या पलटणांचा लिटल् साहेब व दुसरा कोणीएक साहेब हे दोघे सर्वांच्या पुढें त्या भिंतीवर चढले, तेव्हां त्या दोघांसही जखमा लागल्या, आणि त्या पलटणांतील शिपाई लोक मेले व जखमी मिळून बासष्ट पडले. मग ती घेतलेली पेंठ इंग्लिशांनीं परशुराम भाऊचा पुत्र आपासाहेब याच्या स्वाधीन करून आपण आपल्या छावणीस गेले. तेव्हां त्या पेंठेंत मराठ्यांवर आंतले किल्लेकरी चालून येऊन त्या उभयतांचें मोठ्या निकराचें युद्ध झालें, ते समयीं मराठे मेले व जखमी मिळून पांचशें पडले. त्यांपेक्षां त्या किल्लेकऱ्यांचा अधिक नाश झाला, आणि ते माघारे गेले; असें असतांही तो आपासाहेब तेथून निघून आपल्या लोकांसहित माघारां लष्करांत गेला, तेव्हां ती पेंठ त्या किल्लेकऱ्यांच्या स्वाधीन सहज झाली. नंतर उभयपक्षींच्या मेलेल्या लोकांस जाळावयासाठीं कांहीं दिवसांचा सल्ला झाला. असें त्या युद्धाच्या आरंभदिवसापासून मराठ्यांनीं तीन महिने कच्च्या मसलतीनें घालविले; नंतर पुनः ती पेंठ घ्यावयाचा अभिमान धरून लाजेनें इंग्लिशांची कुमक न घेतां

मराठ्यांनीं झटून लढून ती पेंठ घेतली. यापुढें मराठे व इंग्लिश त्या किल्ल्याशीं लढतां लढतां तेथच्या किल्लेदारानें मोठ्या शौर्येंकरून किल्ला साडेसहा महिने संभाळिला. शेवटीं निरुपाय होऊन सन १७९० च्या एप्रिलचे ४ थे तारिखेस त्यानें तो मराठ्यांच्या स्वाधीन केला.

५. असें धारवाडचें वर्तमान असतां इंग्लिशांचें लष्कर मद्रासेहून निघालें, तें दक्षिणेकडून टिपूच्या मुलखांत शिरून कारूळ व दिंडीगाळ व कुइंबिटूर व पालघाट इतका मुलूख जानेवारीचे समाप्तीपर्यंत हस्तगत करून, ते लोक माघारे मद्रासेस गेले. इतक्यांत मुंबईकडून फौज निघून समुद्रकांठीं कालीकोटनामक बंदराजवळ टिपूचें कांहीं लष्कर होतें, त्याचा पराभव प्रथम करून टिपूचे लोक मलबारांतून घालवून तो मुलूख घेतला.

६. इकडे मद्रासेस पहिलें लष्कर माघारें आल्यावर विलंब न करितां लॉर्ड कॉनवॉलिस नामें साहेब आपलेबरोबर लष्कर घेऊन पुनः टिपूच्या मुलखास चालिला, तो बिलोरावरून बंगळोरास गेला. तेथें जाऊन त्यानें मार्चाचे ५ वे तारिखेस बंगळोरास घेरा घालून युद्ध करून तें शहर घेतलें. ते समयीं मोगलांचें लष्कर मद्रासेच्या दोहों पलटणांच्या साहाय्येंकरून कोपाळाशीं लढत होतें, मग इंग्लिशांनीं तें शहर घेतलेंसें ऐकून तो किल्लेदार अधीर होऊन निझामास किल्ला देता झाला.

७. त्यापूर्वीं पुण्याहून जानेवारीचे १ ले तारिखेस पंचवीस हजार स्वार व पांच हजार पायदळ घेऊन हरिपंत फडका पंढरपुराकडून भीमा व कृष्णा यांच्या संगमापाशीं पार उतरून गेंडावळापर्यंत गेला. मग तेथून आपलें दोन हजार लष्कर खेरीज करून बाकी सर्व लष्करानें करनोळापर्यंत चालावें, अशी आज्ञा देऊन आपण त्या दोन हजार लष्करासहित निघाला, तो निझाम अल्ली आपल्या मुलखाचे मर्यादेवरील पांगल गांवीं होता तेथून आपल्या लष्कराची वर्तणूक चांगली करवितों असें दाखवीत होत्साता तेथें मुक्काम करून राहिला असे, त्याच्या भेटीस गेला. त्या भेटींत असें ठरलें कीं, 'इंग्लिशांशीं तहाप्रमाणेंच वागावें;' परंतु टिपूचा समूळ नाश न करावा. त्यानंतर हरिपंत फडका यानें लॉर्ड कॉर्नवॉलिस् याचे कुमकेस दहा हजार फौज पाठविली; ते लोक अनंतपुरास पोंहचले तेव्हां त्यांस कळविलें कीं, मोगलाची दहा हजार फौज त्या लॉर्डाच्या कुमकेस जात असतां वाटेंत टिपूचा कोणी कुतुबउद्दीन नामें सरदार आढळला, त्यास जिंकून मग लॉर्डास मिळून ते सर्व श्रीरंगपट्टणास गेले, यास्तव आपलें तिकडे जाण्याचें प्रयोजन नाहींसें समजून ते लोक हरिपंताची मार्गप्रतीक्षा करीत तेथें मुक्काम करून राहिले.

८. तो लॉर्ड कॉर्नवॉलीस् श्रीरंगपट्टणावर निघाला असतां टिपूनें आपल्या

राजधानीपासून लॉर्डाच्या लष्करापर्यंत मुलूख जाळून उद्धस्त करून शत्रूच्या लष्करास घांसदाणा मिळेनासें करून ठेविलें होतें. मग तें लष्कर त्या श्रीरंगपट्टणाजवळ येऊन पोंहचलें असतां टिपू युद्धास उभा राहिला. ते समयीं तो पराभव पावला ह्मणून त्यास श्रीरंगपट्टणाच्या आंत पळून जाणें प्राप्त झालें, तेव्हां लॉर्ड कॉर्नवॉलीस् साहेब यानें श्रीरंगपट्टणाजवळ मे महिन्याचे २९ वे तारिखेस डेरे दिले. ते समयीं पर्जन्यकाळ जवळ आला, आणि त्याच्या लष्करास वाटेनें अन्नतृणादि मिळालें नव्हतें, त्या योगें लोक बहुत हैराण झाले. याजमुळें त्या साहेबास वाटलें कीं, हें कार्य शेवटास जात नाहीं. याशिवाय मराठ्यांचें लष्कर साहाय्यास येणार होतें, त्याचेंही कांहीं वर्तमान कळत नाहीं. हा सर्व विचार मनांत आणून त्या लॉर्डानें मुंबईहून लष्कर येत होतें, त्यास आज्ञा केली कीं, या वेळेस तुह्मीं माघारें जावें, आणि आपण आपल्या मोठ्या मोठ्या तोफा नासून टाकून तें युद्धाचें काम सोडून तेथून निघून मेलगोटाची पहिली मजल करावयाच्या बेतानें तिकडे चालिला; तो तेथें पोंहचला नाहीं तोंच त्याच्या दृष्टीस पडलें कीं, मोठ्या मोठ्या स्वारांच्या टोळ्या आपणाकडे चोहींकडून येतात, तेव्हां त्यास वाटलें कीं, हे आपणावर कोणी शत्रूचे लोक चालून आले, ह्मणून त्यानें युद्धाविषयीं तयारी केली. मग त्यास समजलें कीं, हें लष्कर आपल्या कुमकेस परशुराम भाऊ व नाना फडनवीस यांचें आलें. त्यांत परशुराम भाऊचें लष्कर धारवाडाकडून आलें, आणि नानाकडूनही येऊन पोंह-चलें. तीं दोन्ही लष्करें २४ वे तारिखेस एकत्र मिळून त्यांची व लॉर्डाची दुसरे दिवशीं २५ वे तारिखेस गांठ पडली. ती कुमक आपणास येते असें लॉर्डास पूर्वीं न समजण्याचें कारण असें कीं, कोणी टिपूकडचे पेंढारी लोक व बेरड लोक होते, त्यांनीं बहुत चातुर्येंकरून जे त्या लॉर्डास बातमी पोंहचविणारे जासूद होते, ते वाटेंतच मारून टाकिले, यास्तव त्यास वाटलें कीं, आपणास कोणी कुमक येत नाहीं; ह्मणून त्यानें तें काम सोडिलें, आणि तेथून निघाला. नंतर ती कुमक पोंहचल्यावर त्या लॉर्ड कॉर्नवॉलिसास पश्चात्ताप झाला कीं, आपण श्रीरंगपट्टणास घेरा घातलेला उठवून निघालों, हें दैवगतीनें विसंगत पडलें; मग त्या लॉर्डास मराठ्यांच्या लष्करी बाजारांत धान्यतृणादि सर्व सामग्री मिळेलसें वाटून फार संतोष झाला.

९. त्यानंतर असें ठरलें कीं, 'तिघांनीं मिळून बारा महाल हस्तगत करावे;' तें कार्य लॉर्ड कॉर्नवॉलीस यानें सिद्धीस नेलें, आणि मराठे व मोगल यांनीं आणखी कांहीं किल्ले घेतले. नंतर डिसेंबरच्या शेवटास त्या साहेबानें फिरून त्या श्रीरंगपट्टणा-वर जावयाची तयारी केली, परंतु परशुराम भाऊ आपल्या कांहीं लाभसाधनास चित्रदुर्गापाशीं गुंतून राहिला त्यास लॉर्डाकडे जाववेना, आणि मोगलांचें लष्कर

गरमकोंड्याजवळ छावणी करून होतें, त्याच्याही येण्याची त्वरा दिसेना. हरिपंत फडका तर त्या लॉर्डाच्या जवळच होता, परंतु त्यानें आपल्या लाभासाठीं युद्धाचें निमित्त करून मुलखाचा वसूल जमा करावयास जागोजाग लष्कर पाठवून आपले बहुतेक लोक गुंतविले होते, अशा या अडचणीमुळें तें श्रीरंगपट्टण घेण्याचें काम तसेंच ठेवून तिकडे जावयाच्या मार्गांतील किल्ले घ्यावयाचा उद्योग आरंभिला.

१०. मग त्यानें पांच किल्ले हस्तगत केल्यावर सन १७९२ च्या जानेवारीचे २५ वे तारिखेस तो उत्तरदुर्ग किल्ल्याजवळ गेला असतां, तेथें मोगलांचें लष्कर येऊन त्यास मिळालें. तेव्हां तो लॉर्ड कॉर्नवॉलीस् व हरिपंत फडके व निझाम अलीचा पुत्र शिकंदरजहा हे तिघे मिळून फेब्रुवारीचे ५ वे तारिखेस श्रीरंगपट्टणाजवळ जाऊन पोंहचले. मग दुसरे दिवशीं टिपूचे लोक त्या पट्टणाच्या तटाबाहेर जे होते, त्यांवर हल्ला करून ते माघारें कोटांत घालविले, आणि त्या शहरास घेरा घालावयाची तयारी केली. नंतर मुंबईसरकारचें लष्कर १६ वे तारिखेस येऊन पोंहचलें, तें त्या घेरा घालण्याच्या कामास फार उपयोगीं पडलें; आणि २२ वे तारिखेस टिपूने त्यांवर आंतून मोठी स्वारी घातली असतां त्यांनीं आपला बंदोबस्त नाट राखून त्यास मागें हटविलें.

११. त्याचे पूर्वींपासूनच टिपूनें तहाचें बोलणें लाविलें होतें, परंतु तें लॉर्डाच्या मनास येईना; शेवटीं टिपूनें त्या मुंबईचे टोळीवर हल्ला केला, तो व्यर्थ झाल्यावर दुसरे दिवशीं टिपू त्या लॉर्डाच्या मनास येईसा तह करिता झाला. तो प्रकार असा; त्या युद्धप्रसंगाच्या पूर्वीं जितका मुलूख टिपूचा होता, त्यापैकीं निमे त्या तिघां जणांस असावा, आणि एक कोटि पासष्ट लक्ष रुपये रोकड तूर्त घ्यावे, याप्रमाणें भरणा पुरता होई तोंपर्यंत टिपूनें आपले दोघे पुत्र ओलीस द्यावे; असें झाल्यावर त्या टिपूकडून आलेलें द्रव्य त्या तिघांनीं वांटून घेतलें, आणि त्यापासून घेतलेल्या मुलखाची वांटणी करून घेत असतां एकेकास चाळीसचाळीस लक्षाचा विभाग आला, त्यात मराठ्यांस विभाग—वरधानदी व कृष्णा या दोहोंच्या मधला बहुतेक मुलूख आणि बिलारी-पाशीं सोंडूर नामें खोरें आहे, ती जमीन आली. निझामाच्या वांटणीस—घुटी व खरपा या दोन जागा व त्यांच्या मधला मुलूख आला; त्याची पश्चिम मर्यादा[1] मुद्गल व कनकगिरी व कोपाळ. इंग्लिशांस वांटणी आली ती—दिंडिगाळ, बारा महाल व कुर्ग व मलबार. यानंतर मार्चाच्या शेवटास ते तिघेही मुख्य एकमेकांचा परस्परें सन्मान करून एकमेकांची आज्ञा घेऊन आपआपल्या ठिकाणास गेले.

१२. परशुराम भाऊ तो तह होईपर्यंत त्या श्रीरंगपट्टणास लष्करसुद्धां पोंहचला नव्हता. त्यास कितीएक वेळां हरिपंत फडका यानें तेथें येण्याविषयीं बोलावणें केलें,

---

१. या मर्यादेमध्यें अनागोंदीसंबंधें थोडकासा मुलूख आहे, तो टिपूनें आपल्याकडे ठेविला.

आणि त्यास लॉर्ड कॉर्नवॉलीस् याची मसलतही कळली होती, परंतु ते समयीं तो समजला कीं, या वेळेस आपल्याजवळ इंग्लिशांचीं पलटणें आहेत, या योगें बेदनूर हस्तगत होईल, अशा अर्थे तो त्या श्रीरंगपट्टणाकडे न जातां बेदनुराकडे चालिला. तेव्हां त्यास वाटेंत होळीआनूर नामें किल्ला लागला तो त्या पलटणांनीं घेतला. मग तो परशुराम भाऊ तेथून पुढें तुंगेच्या कांठानें चालत असतां त्यास शिमोगा नामें दुसरा किल्ला लागला, तो घ्यावयाचा नेम केला तेव्हां त्या किल्ल्याचे नैर्ऋता दिशस दोन कोसांवर एक मोठ्या झाडीचा मुलूख होता, त्यांत टिपूचा कोणी भाऊबंद सात हजार पायदळ व आठशे स्वार व दहा तोफा इतक्यांसहित ठाणें धरून राहिला असे; त्यास जिंकावयाकरितां परशुराम भाऊनें आपला पुत्र आपासाहेब याजबरोबर स्वार देऊन पाठविला, आणि त्या पलटणांतील आठ कंपनी आपल्या लष्कराच्या तळावर ठेवून बाकी लोकांसहित त्या लिटल् साहेबासही त्याच्या साहाय्यास बरोबर नेमिलें. ती शत्रूची जागा स्वारांना आंत जावयास फार कठीण होती; ह्मणून त्या लिटल् साहेबास आपल्या जवळ आठशें लोक मात्र असतांही त्या युद्धाचा सर्व भार संभाळावा लागला. तेव्हां फार वेळ परम शौर्येंकरून अतूट उद्योग केल्यानें त्यास ती जागा प्राप्त झाली, मग थोड-क्याच वेळानें तो किल्ला हस्तगत झाला. नंतर परशुराम भाऊ त्या रानाचे वाटेनें बेदनुरास जाऊन त्या किल्ल्याला घेरा घालणार होता, परंतु त्यास वाटेंतच वर्तमान कळलें कीं, आपणावर टिपूचा कोणी मोठा सरदार श्रीरंगपट्टणाकडून येतो आहे, ह्मणून तो बेदनूर घेण्याचें काम टाकून श्रीरंगपट्टणास जाऊन लॉर्ड कॉर्नवॉलीस् याला मिळावयास चालिला, तो तें तहाचें काम पुरतें झाल्यावर तेथें पोंहचला.

१२. नंतर ते श्रीरंगपट्टण घेणारे तिघेही आपआपल्या ठिकाणास जाऊं लागले. तेव्हां मराठ्यांचें तोफखाना वगैरे जड सामान व इंग्लिशांनीं मराठ्यांस मोठ्या मोठ्या सत्रा तोफा दिल्या होत्या त्या, हें सर्व त्या परशुराम भाऊला पुण्यास पोंहच-वावयाचें काम पडलें. त्यामुळें तो वाटेने हळू हळू जात असताना टिपूशीं व मरा-ठ्यांशीं तह झालेला असूनहा त्या भाऊला टिपूकडचे पेंढारी व बेरड यांचा बहुत उपद्रव लागला, आणि तो परशुराम भाऊ पूर्वीं तिकडे गेला, तेव्हां त्याच्या लोकानीं त्या वाटेचा मुलूख उद्ध्वस्त केला होता; ह्मणून तो त्या श्रीरंगपट्टणाहून तुंगभद्रेस पोंहोचेपर्यंत असा बेजार झाला कीं, त्याप्रमाणे मराठ्यांचे हाल कधींही झाले नाहींत.

---

## भाग सत्ताविसावा.

**( इसवी सन १७९२ पासून सन १७९५ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )**

१. महादजी शिंदा पुण्यांतील कारभारी मंडळीपेक्षां वरचढ होण्याविषयी पुण्यास गेला.— २. पेशव्यास वश करून घ्यावयाविषयी त्यानें उद्योग कसकसा केला तो प्रकार.—३. पेशव्यास

'वकील-इ-मुतलक' नामें पदवी प्राप्त होऊन पेशव्यानेंही महादजी शिंद्यास आपला हस्तक करून तो दिल्लीच्या कामावर स्थापिला तो विस्तार.—४. रजपुतांच्या मुलखांत शिंदे होळकर यांच्या सरदारां सरदारांची लखेरीजवळ लढाई झाली तें प्रकरण.—५. त्यामुळें पुण्यांतील वहिवाटींत कांहीं अंतर पडलें.—६. नाना फडनवीस यानें पेशव्यांशीं एकांत करून आपली मुख्यता बळकट केली.—७. महादजी शिंद्याचा मृत्यु.—८. त्याच्या स्वभावाचें व बुद्धीचें वर्णन.—९. त्याचे जागीं त्याच्या भावाचा नातू दौलतराव शिंदा याची स्थापना.—१०. नागपुरच्या भोंसल्याची गोष्ट.—११. बडोद्याचें वर्तमान व गोविंदराव गाईकवाड यास बडोद्यांत अधिकार प्राप्त झाला तें.—१२. महाराष्ट्र मुलखाचा पश्चिमभाग समुद्रतीर तेथचे मंडळाधिपति त्यांचीं वर्तमानें.—१३. त्यांनीं चांचेपणा केला तो व त्यांचें निवारण.—१४. मराठे लोक पहिल्या लढाईची चाल टाकून पलटणांच्या भरंवशावर लढूं लागल्यानें काय काय परिणाम झाला तो प्रकार.—१५. होळकरानें पलटणें चाकरीस ठेविलीं.—१६. मराठी समुदाय मिळून निझामाशीं बाकी ऐवज मागावयाचे निमित्तें युद्धास सिद्ध झाले, व खर्ड्यांची लढाई.—१७. निझामाचा पुत्र जो अलीजहा तो मृत्यु पावला.—१८. नाना फडनवीस याची कांहीं गोष्ट.

१. महादजी शिंदा हिंदुस्थानांत असतां त्याचे साहाय्यास आलेले होळकर व अली बहादर हे त्याच्या कामास तादृश झटले नाहींत. त्यायोगें त्यांशीं व ह्याशीं मात्सर्येंकरून कलह होई. ते समयीं तो महादजी त्यांस ह्मणे कीं, 'मी अंगें पुण्यास जाऊन तुह्मांस माघारें बोलावणें करीन.' असें बोले, परंतु त्या दोघांस ठाऊक होतें कीं, नानाच्या मनांत शिंदा फार वाढूं देऊं नये, आणि हा शिंदा इतके लांब या दिल्लीहून पुण्यापर्यंत जाई तोंपर्यंत इकडचा बंदोबस्त विसकटेल, ह्मणून याला तिकडे जावयास अवकाश होणार नाहीं, हें समजून शिंद्याचें तें भाषण लक्षांत आणीनात. मग तो उज्जनीस जाऊन तेथून पुण्यास जावयास निघाला, तेव्हां त्यांस तें सत्य वाटलें, आणि या जाण्यांत कांहीं मोठी मसलत आहे, ती कोणती असेल असा विचार करितां त्यांच्या मनांत आलें कीं, पुण्यांत व हैदराबादेंत इंग्लिशांचें प्राबल्य होईल त्याच्या निवारणार्थ हा जातो. कदाचित् आपण जो हिंदुस्थानांत संपादिलेला मुलूख यांत यांस किमपि भाग न द्यावा, असेंही असेल. ते अशा कल्पना करूं लागले, परंतु वास्तविक पाहिलें असतां पुण्यांतील ब्राह्मणांचा बंदोबस्त राखून पेशव्याजवळ आपण मुख्यत्वें वागावयाच्या मसलतीनें तो निघाला. ते समयीं त्यानें लोकांत असें प्रसिद्ध केलें कीं, पूर्वीं 'वकील-इ-मुतलक' नामें पदवी बादशाहापासून आह्मीं पेशव्यांचे नामें संपादिली, त्याचा अभिषेक पेशवे यांस करावयाकरितां बादशाहाचे आज्ञेनें पुण्यास जातों. त्या सनदेचे बरोबरच त्यानें बादशाहापासून मोंगलांच्या सर्व मुलखांत इतःपर गोवध न व्हावा, अशा बंदोबस्ताची दुसरी सनद घेतली होती. तीही मराठे लोक यांस दाखवावयाकरितां आपल्या बरोबर नेली. तो महादजी शिंदा पुण्यास येतो असें वर्तमान नाना फडनविसास कळलें, तें त्यानें

प्रथम सत्य मानिलें नाहीं. मग जेव्हां खचीत समजलें कीं, तो शिंदा पुण्यास येतो खरा, तेव्हां त्या नानानें लॉर्ड कॉर्नवॉलिसास लिहिलें कीं, 'पूर्वीं लिटल् साहेब आपल्या पलटणांसहित मजपाशीं होता, तो हल्लीं श्रीरंगपट्टणाची मोहीम करून मुंबईस गेला आहे, त्यास त्या पलटणांसहवर्तमान या समयीं जर मजकडे पाठवाल तर मी त्याचा खर्च चालवीन, आणि तो तुमचा मजवर मोठा उपकार होईल.' असें नाना फडनविसाचें लिहिलें गेलें असतां, त्या वेळेस तो लॉर्ड कॉर्नवॉलीस् त्याचे कुमकेस तीं पलटणें पाठवीना. तो नाना फडनवीस आपणास इंग्लिशांपासून कुमक आणील ती आपुणास बाधक होईल असें समजून तो महादजी शिंदा नाना फडनविसास इंग्लिशांपाशीं कुमक मागावयाचें काम न पडावें ह्मणून आपल्याबरोबर एक पलटण मात्र घेऊन पुण्यास गेला. तो तेथें मुळा व मुठा या नद्यांच्या संगमाजवळ सन १७९२ च्या जून महिन्याचे ११ वे तारिखेस डेरे देऊन उतरला.

२. मग तो महादजी शिंदा आपला उद्योग चालवूं लागला तेव्हां तें पद पेशव्यानें न स्वीकारावें याविषयीं नानानें श्रीमंतांस असें समजाविलें कीं, 'या सनदेमध्यें जें 'महाराजाधिराज' असें लिहिलें आहे, हें पद आपल्या पेशवाईस योग्य नव्हे.' याप्रमाणें तो सांगत होता, परंतु शिंदा तो उद्योग टाकीना[1]. शेवटीं त्यानें त्या अभिषेकाविषयीं सातारच्या राजाची आज्ञा घेऊन त्या कार्याची सिद्धता केली.

३. महादजी शिंदा पुण्यास आल्यावर नवां दिवसांनीं नाना फडनवीस त्याच्या भेटीस गेला. तेव्हां तो शिंदा मोठ्या सन्मानानें त्यास भेटून त्यादेखतां आपण गादीवर बसला नाहीं, अशी त्याची मर्यादा रक्षिली. नंतर दुसरे दिवशीं महादजी शिंदा पेशव्यांचे भेटीस गेला, ते समयीं त्यानें हिंदुस्थानचे कितीएक चमत्कारिक पदार्थ श्रीमंतांच्या भेटीस दिले; आणि त्या वेळेसच उद्यां 'वकील-इ-मुतलक' पदवीचा अभिषेक श्रीमंतांस करावा, असा नेम ठरविला. नंतर त्या अभिषेकाच्या थाटास असा समारंभ केला कीं, त्यानें आपल्या तळापासून जवळच फार चांगल्या चांगल्या मोठ्या मोठ्या राजडेऱ्यांची पंगत उभी केली. त्या सर्व डेऱ्यांच्या मागला एक डेरा मुख्य होता, त्यामध्यें मोगलांच्या बादशाहाचे तक्तासारिखें एक आसन करून ठेविलें. त्यावर ती बादशाही सनद व त्या पदवीसंबंधें बादशाहाकडील वस्त्रालंकारादि पदार्थ मांडिले. नंतर पेशवा मोठ्या समारंभाच्या स्वारीनें तेथें येऊन मग त्या डेऱ्यांत त्या गादीसमोर आला असतां त्या आसनास तीन वेळां नमस्कार करून मग त्यावर एकशें एक मोहरा ठेविल्या, आणि तें आसन उजवें घेऊन त्याचे डावे बाजूस बसला. तेव्हां शिंद्याजवळ कोणी फारशी लिहिणारा मुख्य होता, त्यानें ती

---

१. तो उद्योग न सोडण्याचें कारण असें कीं, त्या 'वकील-इ-मुतलकी'च्या सनदेंत पेशव्याचें नांव मात्र होतें, परंतु तत्संबंधें सर्व कारभार महादजी आपण पेशव्याचा हस्तक होऊन करणार.

वकील-इ-मुतलकी अधिकाराची सनद वाचून सर्वांस ऐकविली, आणि गोवध न होण्याविषयीं बंदोबस्ताची जी सनद होती, तीही वाचून दाखविली. नंतर ते वस्त्रालंकारादि पदार्थ पेशव्यानें घेतले; त्यांत वस्त्रें नऊ, आणि जडावाचे अलंकार पांच होते, त्यांत शिरपेंच दोन, व तुरा एक, आणि बाहुभूषणें जोड एक, व पोहोंच्या जोड एक, याशिवाय कंठी, कुडक्या, भिकबाळी, व कडीं, तोडे, असे अलंकार होते; आणि एक कलमदान, व एक दौत, व एक मोर्तब, व दोन मोर्चेलें, आणखी एक ढाल व तरवार; याखेरीज एक घोडा व एक हत्ती; त्याशिवाय बादशाही झेंड्याचे हत्ती सहा, व एक नालखी व एक पालखी, याप्रमाणें होतें. त्यांतील वस्त्रें व अलंकार तेथून दुसऱ्या डेऱ्यांत नेऊन मग ते अलंकार आंगावर घालून आणि तीं वस्त्रें नेसून पेशवा पुनः पहिल्या जाग्यावर येऊन बसला. तेव्हां महादजी शिंदा व नाना फडनवीस वगैरे कारभारी मंडळीपैकीं जे त्या सभेंत होते, त्यांनीं श्रीमंतांस नजरा[१] दिल्या. मग पेशवा तेथून माघारां पुण्यांत येऊं लागला, ते समयीं हरिपंत फडका व महादजी शिंदा हे दोघे तीं दोन मोर्चेलें त्यावर उडवीत त्या नालखीपर्यंत गेले; मग तो त्या नालखींत बसून पुण्यास मोठ्या समारंभानें आला. ती स्वारी पाहावयास नागरिक लोकांची फार दाटी झाली. ते लोक अनेक प्रकारें जयशब्द उच्चारीत असतां सहस्रावधि वाद्यांचा ध्वनि, व बंदुका आणि तोफा यांच्या सरबत्या, हे सर्व ध्वनि मिळून मोठा गजर झाला. तो असा थाट होता कीं, त्यापूर्वीं पुण्यांतील लोक यांनीं कधींही तसा समारंभ पाहिला नाहीं. पेशव्यास बादशाहाकडची वकील-इ-मुतलकी अधिकाराची सनद आली, त्यांतच असें लिहिलें होतें कीं, दिल्लीमध्यें पेशव्यांचा हस्तक महादजी शिंदा व त्याचा कोणी वंश्य असावा, त्यावरून पेशवा महादजी शिंद्याच्या डेऱ्यांत तो अभिषेकसमारंभ होऊन आपल्या वाड्यांत येतांच त्यानें त्यास तो अधिकार दिला. त्या वेळेस शिंदा यास मोठी योग्यता मिळाली असतां तो मोठ्या नांवास[२] चढला असूनही त्या सभेंत बोलिला कीं, 'मी श्रीमंतांचा जोडा उचलणारा चाकर आहें, त्या मला पाटील या नांवापेक्षां दुसरें मोठें नांव योग्य नाहीं.' असें बोलून त्यानें आपली लीनता दाखविली. तेणेंकरून लोक वश व्हावे, परंतु त्या सभेस जे गृहस्थ होते ते त्याच्या हलक्या बोलण्याचा अतिशय

---

१. नजरा दिल्या त्या वेळेस जे कोणी आपणास साताऱ्याच्या राजाचे पुरातन चाकर ह्मणविणारे शिलेदार व मानकरी होते त्यांस ती पदवी पेशव्यास प्राप्त झाल्याचें सहन न होऊन कितीएकांनीं नजरा दिल्या नाहींत, व कितीएक त्या डेऱ्यांत गेले नाहींत. २. ते समयीं व्यवहारांत मागून चालत आलेलीं शिंद्याचीं नामें तीन पडलीं होतीं; तीं अशीं, एक राजमहाराज माधवराव शिंदा, दुसरें मदारउल्महाम, तिसरें अलीजहाबहादर.

झालासा समजून त्यांचीं मनें तादृश प्रसन्न झालीं नाहींत. कां कीं, हा मूळचा कसा होता, आणि या वेळेस किती योग्यतेस चढला आहे, आणखी भाषण तर केवळ दीनासारिखें करितो, तस्मात् हा सरळ पुरुष नव्हे असें त्यांस दिसलें. मग शिंदा आपले तळावर आला, तेव्हां त्याच्या सरदारांनीं त्यास नजरा दिल्या, परंतु दुसरे सर्व मराठे आपणास अनिष्ट आहेत असें त्या महादजीला समजलें; त्यावरून त्यानें मनांत निश्चय केला कीं, इतःपर आपली मसलत परम सावधपणें शेवटास न्यावी. त्यानंतर पेशव्यास आपण नाना फडनविसापेक्षां प्रिय होण्याविषयीं तो महादजी शिंदा त्या श्रीमंतांस गोड गोड गोष्टी सांगून युक्तीनें त्यास शिकारीचें व्यसन लावून आपल्याबरोबर स्वारीस नेऊं लागला. तो त्या शिंद्याचा मतलब समजून नाना फडनविसानें त्याशीं व श्रीमंतांशीं बहुधा एकांत न होण्याविषयीं यत्न चालविला. तो माधवराव पेशवा तर उत्तम स्वभावाचा होता, त्यास वाटे कीं, 'नाना बोलतो तें हितावह, आणि तो विश्वासूही खरा,' परंतु त्याचें वागणें शिंद्यापेक्षां क्रूरतेचें दिसे, आणि तो कधींही आनंदित नसे; शिंदा तर पाहण्यांत व भाषणांत व वागणुकेंतही उत्साहकारक होता, ह्मणून त्या श्रीमंतांचें मन शिंद्याकडे लागे.

४. दरबारांत शिंद्याचें काम बहुधा हिंदुस्थानसंबंधें होतें; तो महादजी शिंदा नाना फडनविसास ह्मणे कीं, 'मीं मोठी खटपट करून पेशव्यांचा मान वाढविला, आणि मराठेही मोठ्या योग्यतेस चढविले, त्यास जो मीं खर्च केला, तो तुह्मीं सरकारांतून द्यावा.' या गोष्टीस नाना फडनवीस किमपि मान्य होईना; तो ह्मणे कीं, 'तुह्मीं जो मुलूख घेतला, त्याचा वसूल होऊन त्यापैकीं जें उरलें असेल तें आह्मांस द्या.' अशी पुण्यांत खटपट होत असतांही नाना व शिंदा हे दोघे एकमेकांचा मान रक्षून वागण्यांत अंतर करीत नव्हते. शेवटीं हिंदुस्थानांत नानाच्या पक्षाचा तुकोजी होळकर याशीं व शिंद्याचा डिबायन नामें सरदार याशीं रजपूत लोकांच्या राज्यांतील कांहीं लुटीचे वांटणीसंबंधें कलह उत्पन्न होऊन मोठें युद्ध झालें; त्यांत होळकराचीं नवीं चार पलटणें ठेविलेलीं होतीं, त्यांचा शिंद्याचे पलटणांनीं अगदीं पराभव केला, व त्यांच्या अडतीस तोफा डिबायनाकडे गेल्या. तो सूड घ्यावयास त्या होळकरानें शिंद्याची राजधानी उज्जनी, तेथें जाऊन तें शहर लुटलें.

५. असें वर्तमान पुण्यास आल्यावर नाना फडनवीस व शिंदे यांच्या परस्पर मर्यादेंत अंतर पडलें; तेव्हां नानानें आपणास कोणे समयीं दगा होईलसें समजून परशुराम भाऊ पटवर्धन यास फौजेसुद्धां आपणाकडे बोलाविलें. तो दोन हजार स्वारांसहित आला, तें पाहून शिंदा आपणास फौज आणावयास निमित्त चांगलें झालें असा हर्ष पावून त्यानें एक ब्रिगेड पलटणें आणविलीं. नंतर त्यानें नानाशीं विपरीत वागणूक केल्यानें, व पेशवा प्रसिद्धपणें आपणाकडे व्हावासा उद्योग केल्यानें,

त्याशीं व नानाशीं असा द्वेष पडला कीं, तो हरिपंत फडक्यानें महाप्रयासेंकरून मिटविला, नाहीं तर मोठा अनर्थ होता. त्यानंतर ते दोघेही आपआपल्याजवळ फौज असतां युद्धापेक्षां पेशव्याच्या मध्यस्थीनें आपआपलें कार्य साधावें असें इच्छीत होते.

६. कोणे एके समयीं शिंदा पेशव्याशीं कांहीं एकांत करीत असतां, तीं भाषणें ऐकून कोणीं नानास कळविलीं; तेव्हां त्यास कांहीं भीति उत्पन्न होऊन त्या नानानें मनांत विचार केला कीं, पेशव्यास एकांतीं स्पष्ट पुसावें कीं, 'तुह्मी त्याजकडे आहांत, किंवा मजकडे आहांत तें सांगा.' याप्रमाणें विचार केल्यावर तो नाना फडनवीस पेशव्याजवळ जाऊन एकांतीं बोलिला कीं, 'आजपर्यंत मीं तुमची सेवा विश्वासूपणें कोणे रीतीची कशी केली, तो अर्थ मनांत आणून शिंद्याचें वागणें कोणे रीतीचें, आणि त्यानें आपल्या लष्करांत परदेशी लोक चाकरीस ठेवून त्यांच्या रीतीप्रमाणें नवेच कायदे केले; आणि तो ब्राह्मणांस अगदीं बुडवून सर्व मराठी राज्यांत आपण मुख्यत्वें वागावें, असा त्याचा मनोरथ आहे; ऐशियास मला तुमची अनुकूळता असल्यावांचून त्याची बरोबरी करतां येत नाहीं, त्यास हा सर्व विचार मनांत आणून माझ्या मसलतीनें वागावयाचें असल्यास तशी आज्ञा व्हावी, नाहीं तर मला काशीस जाण्याचा निरोप द्यावा.' असें बोलतांना त्या नानाच्या नेत्रांस पाणी आलें, आणि श्रीमंत जर शिंद्याचे मसलतीनें वागूं लागले, तर राज्य बुडेल ह्मणून खेद करूं लागला. हें पाहून त्या माधवरावाचें मन फारच द्रवलें, आणि तोही श्रमी होऊन बोलिला कीं, 'तुह्मीं गेल्या गोष्टी मनांत आणूं नये, इतःपर मी विचारेंच वागेन, आपण कां काशीस जातां?' असा नानाचा विचार श्रीमंतांच्या मनांत भरून मात्क्यान त्या नानाची मुख्यता ठरली.

७. असें असतांही त्या शिंद्याच्या युक्तीपुढें थोडक्याच दिवसांत नानाचें कांहीं चालेनासें झालें असतें, परंतु तो शिंदा आपल्या मतलबास फार जपून असतांही थोडक्याच दिवसांत त्यास मोठा ज्वर होऊन तो पुण्याजवळ वानवडी गांव आहे तेथें सन १७९४ च्या फेब्रुवारीचे १२ वे तारिखेस मृत्यु पावला.



महादजी शिंदा.

८. तो महादजी शिंदा फार योग्यतेस चढला होता त्या योगें त्याचा मृत्यु सर्व हिंदूलोकांत कितीएकांस हितावह आणि कितीएकांस दुःखदायक झाला. त्या महादजीच्या मनांत होतें कीं, आपण मुख्यत्वें वागावें, असें असतां त्याची इच्छा

असे कीं, समयविशेषीं बाहेरच्या शत्रूस मारावयाकरितां मानकरी लोक सबळ असावे. ब्राह्मणाची मुख्यता त्यास अगदीं प्रिय नव्हती. तो योग्यतेस चढत असतां दोहों ब्राह्मणांच्या कलहांत शिरून त्यानें त्यांतील एकाचा पक्ष स्वीकारून त्यास वाढविलें; तथापि तो महादजी शिंदा आपण वाढविलेल्या नानास आपणच बुडवावयाचा उद्योग करिता झाला. तो शिंदा ज्या समयीं कांहीं कार्यवशेंकरून पुण्याहून दूर राहूं लागला; आणि माळव्यामध्यें त्याचें लष्कर इंग्लिशांनीं जिंकिलें, तेच समयीं ब्राह्मणांनीं इंग्लिश गाइर्ड साहेब वश केला होता. तेव्हां दिसण्यामध्यें असें झालें कीं, महादजी शिंदा ब्राह्मणांपेक्षां न्यूनबळ आहे, परंतु सालप्याच्या तहांत इंग्लिशांनीं ठरविलें होतें कीं, 'महादजी शिंदा स्वतंत्र;' आणि त्यापुढें तो मराठ्यांस व इंग्लिशांस तहाचें द्वार झाला. तेव्हां ती त्याची न्यूनबळता जाऊन योग्यतेस चढत चढत स्वतंत्रपणा करून आपल्या इच्छेस येईल तसें वागावयाची त्याला शक्ति आली. तो सूक्ष्मबुद्धीचा आणि राजनीतींत कुशळ असे. तसाच कुटिल व स्वराज्यवृद्धीविषयीं उत्कंठित आणि दीर्घद्वेषी होता. त्याचें मुख पाहिलें असतां असें वाटे कीं, हा सदा आनंदी आणि सुबुद्धि पुरुष आहे; तो शरीरानें पुष्ट आणि ढेरपोट्या होता; त्याचा रंग काळा असे; त्याच्या पायांस पानपतचे लढाईत जखम लागल्यामुळें तो लंगडत चालत असे; त्याचे सेवक त्यावर प्रीति करीत होते; तो आपल्या लोकांस परभारां गांवावर देणें द्यावयास तत्पर होता, परंतु खजीन्यांतून किंवा खासगीपैकीं देण्यास जड असे. हा तर मराठ्यांचा प्रायः जातिस्वभावच आहे. मराठे लोकांत कोणी अक्षर वाचणारे व कोणी लिहिणारे असतात, परंतु वाचणें व लिहिणें व जमाबंदीचें कौशल्य व हिशेबीं निपुणता इतके गुण एकत्र असा मराठ्यांत दुर्लभ आहे. असें असतां, महादजी शिंद्यांत हे सर्व गुण होते.

९. तो महादजी शिंदा मेला तेव्हां त्यास पुत्रसंतति नव्हती. त्या महादजीचा सखा भाऊ तुकोजी शिंदा पानपताच्या लढाईत मेला होता; त्याचे तिघे पुत्र, एक केदारजी, व एक खळोजी, व एक आनंदराव. ते महादजी शिंद्यानें आपल्या लष्करांत ठेविले; त्यांतील केदारजी महादजी असतांनाच मृत्यु पावला होता, त्यास संतति नव्हती. खळोजीस दोन पुत्र होते, आणि आनंदरावास एक पुत्र दौलतराव नामें होता; तो त्या तिघां भावांतील कनिष्ठाचा पुत्र, असें असतांही महादजीनें नेम केला होता कीं, 'मी या दौलतरावासच दत्तक घेईन,' परंतु तो प्रकार त्याच्या मृत्युसमयीं शेवटास गेला नाहीं. तरी ती गोष्ट त्याच्या जवळच्या लोकांत प्रसिद्ध होती, ह्मणून तो निवर्तल्यावर त्या दौलतरावाची स्थापना महादजीच्या जागीं होत असतां, लक्ष्मीबाई महादजीची स्त्री आपल्या शक्तीप्रमाणें त्या कार्यास अडथळा करूं लागली, तथापि तें पद दौलतरावास प्राप्त झालें; त्या वेळेस तो पंधरा वर्षांचा होता.

१०. महादजी शिंद्याच्या अंतकाळीं नागपुरीं व बडोद्यांत काय काय वर्तमानें होत आलीं, तीं अशीं; ते समयीं नागपुरामध्यें रघूजी भोंसला राज्य करीत असे, त्याचा बाप सन १७८८ त मेला, ते समयीं रघूजीपेक्षां धाकटे त्याचे पुत्र खंडोजी व व्यंकाजी हे दोघे होते. त्या व्यंकाजीस 'मन्या बापू'ही ह्मणत. त्यांत खंडोजीस बापानें आपल्या राज्याचा उत्तरभाग दिला, आणि व्यंकाजीच्या स्वाधीन दक्षिणभाग केला. रघूजी भोंसला त्याचा ज्येष्ठ पुत्र, त्यास जानोजी भोंसला चुलता याची मराठी राज्यांतील 'सेनासाहेबसुभा'पदवी प्राप्त झाली होती; परंतु त्याचा बाप असतां त्याजकडे वराडची मुख्यता नव्हती. ज्या वेळेस टिपूच्या नाशाविषयीं मराठे व निझाम व इंग्लिश यांचें ऐक्य झालें, ते समयीं पेशव्यांच्या आदराच्या बोलावण्यावरून त्या रघूजी भोंसल्याला पुण्यास जावें लागलें. तो तेथें असतां त्या मोहिमेस न जावेंसें त्याच्या मनांत होतें, यास्तव त्यानें पेशवा स्वयें त्या कामास जात नाहीं, हें निमित्त जमेस धरून मलाही तिकडे जाणें आवश्यक नांहीं, असें युक्तीनें समजाविलें; परंतु तो आपला मनोरथ शेवटास जात नाहींसा समजून श्रीमंतांपाशीं एकांतीं बोलिला कीं, 'जर मी इतका दूर टिपूच्या मुलखीं गेलों, तर माझा भाऊ खंडोजी माझें राज्य आटोपील.' त्यावरून पेशव्यानें त्या मोहिमेच्या खर्चाबद्दल दहा लक्ष रुपये घेऊन त्यास माघारें जावयाची आज्ञा दिली. मग तो नागपुरीं पोंहचल्यावर थोडक्याच दिवसांनीं त्याचा भाऊ खंडोजी मृत्यु पावला. तो त्या रघूजीस मोठें शल्य होतें, तें निवारण झाल्यावर त्यानें आपला दुसरा भाऊ व्यंकाजी यास चांदा व छत्तीसगड यांची जहागीर दिली.

११. बडोद्यामध्यें फत्तेशिंग गाइकवाड राज्य करीत होता, तो सन १७८९ च्या डिसेंबराचे २१ वे तारिखेस माडीवरून पडून मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचा धाकटा भाऊ मानाजीराव यानें सयाजीला आपले स्वाधीन ठेवून राज्य चालविलें. तेव्हां सयाजी व तो मानाजीराव गाइकवाड यांचा मधला भाऊ गोविंदराव तो अधिकारी होत्साता पुण्याजवळ एके खेडेगांवीं रहात होता, त्यानें तो फत्तेशिंग मेल्याचें वर्तमान ऐकून पेशव्यास अर्ज करीत असे कीं, 'तें राज्य माझें मला असावें.' त्याप्रमाणें करण्यास तो अधिकारीच होता, परंतु मानाजीराव यानें पेशव्यास तेहतीस लक्ष तेरा हजार व एक रुपया नजर केला, आणि 'फत्तेशिंगाकडे छत्तीस लक्ष रुपये खंडणीची बाकी राहिलेली होती ती देतों' असें कबूल केलें, त्यावरून नाना फडनविसानें त्या राज्याविषयीं पेशव्याची सनद त्या मानाजीरावास देवविली. तेव्हां गोविंदराव यानें महादजी शिंदा पुण्यास आल्यावर त्याचे द्वारें आपल्यास त्या राज्याची सनद संपादिली. ते समयीं मानाजीराव इंग्लिशांस कुमक मागत असतां

इंग्लिशांनीं त्याची समजूत पाडावयाविषयीं नानाशीं बोलणें लाविलें. इतक्यांत मानाजीराव मृत्यु पावला, तेव्हां तो तंटा सहजच नाहींसा होऊन गोविंदराव गाइकवाड आपल्या अधिकारावर जावयास सिद्ध झाला; परंतु नाना फडनवीस वगैरे कारभारी त्यास पूर्वील देणें जें ठरलें होतें, त्याची कबुलात करून घेतल्यावांचून जाऊं देईनात; आणि तापीचे दक्षिणेकडचा मुलूख त्यानें पेशव्यास द्यावा, याप्रमाणें त्या गोविंदरावास मागत होते, परंतु ती गोष्ट त्यानें इंग्लिशांस कळविली; तेव्हां त्या इंग्लिशांनीं 'सालप्याच्या तहाविपरीत ही गोष्ट करतां,' असें समजाविल्यावर नानानें तें सोडिलें. नंतर तो गोविंदराव सन १७९३ च्या डिसेंबराचे १९ वे तारिखेस आपल्या अधिकारावर जावयास निघाला. असें महादजी शिंद्याच्या मरणसमयीं वराडांत आणि बडोद्यांत वर्तमान झालें.

१२. कोंकणांत तुळाजी आंग्र्या इंग्लिशांशीं फार चांचेपणा करीत असतां, त्यांनीं तो सन १७५६ त अगदीं हीनबळ केला. कुलाबकर मानाजी आंग्र्या सन १७५९ त मृत्यु पावला होता, त्याचा पुत्र रघूजी आंग्र्या तो आपल्या बापाप्रमाणेंच आपणास पेशव्याचा चाकर ह्मणवी, आणि कांहीं त्याची आज्ञा झाली असतां मान्य करावयाचें कारण पडलें तर मानीत असे. तो रघूजी सन १७९३ त मृत्यु पावला, ते समयीं त्याचा कोणी भाऊबंध जयशिंग आंग्र्या यानें पुण्याची आज्ञा न घेतां, त्या रघूजीचा पुत्र मानाजी यास रघुजीच्या जागीं बसवून कारभार चालविला; त्या योगें पुण्याचे दरबारी लोक तो जयशिंग आंग्र्या व तो मूल मानाजी यांचा द्वेष करूं लागले. जंजिऱ्याचा सिद्दी याच्याही राज्यांत कांहीं प्रकार झाला, तो असा; त्या राज्यांत सिद्दी इब्राहीम नामें होता, तो त्या सर्वांत मुख्य असे, तो सन १७६२ त मृत्यु पावला, त्याच्या स्थानीं अबदुल रहीम नामें सिद्दी अधिकारी होता, त्यास तो अधिकार प्राप्त न होतां सिद्दी याकूत नामें होता, त्यानें तो अधिकार मिळविला. तेव्हां तो अबदुल रहीम तें आपलें पद घ्यावयास कांहीं यत्न करीत असतां तो सिद्धीस जाईना. तेव्हां तो पुण्यास जाऊन आश्रय पावला. सिद्दी याकुतानें तर त्यास पेशवा अनुकूळ न होण्याविषयीं पुण्यास लिहून समजूत केली कीं, 'तूर्त दंडाराजपुरी अबदुल रहिमास देतों आणि मी मृत्यु पावल्यावर जंजिराही ह्याचाच आहे.' त्याप्रमाणें मान्यता होऊन पुढें सिद्दी याकूत मेल्यावर सिद्दी अबदुल रहीम यास तें स्थान प्राप्त झालें, परंतु सिद्दी याकूत यानें आपल्या मृत्युसमयीं लेख करून ठेविला होता कीं, 'हें राज्य अबदुल रहीम यानें करावें, आणि याचे मागें याच्या दुसऱ्या पुत्रानें करावें; तो लहान असतां माझा मित्र सिद्दी जोहर यानें तें काम संभाळावें.' यानंतर अबदुल रहीम सन १७८४ मध्यें मृत्यु पावला, त्यानें तें सिद्दी याकुताचें पत्र न

मानितां, आपला वडील पुत्र अबदुल करीम, त्यास 'बाळ मियां' ह्मणत असत, त्याला आपले जागीं स्थापावें, असा आपले मरणसमयीं नेम करून ठेविला. मग तो अबदुल रहीम मेल्यावर याकुताचा मित्र सिद्दी जोहर त्या रहिमाचे दोघे पुत्र आपले स्वाधीन करून घेण्याविषयीं उद्योग करीत असतां, तो बाळ मियां धाकट्या भावास घेऊन पुण्यास जाऊन नाना फडनविसाचे आश्रयानें राहिला. नंतर त्या वादाविषयीं इंग्लिश मराठ्यांशीं सिद्दी जोहर याचे पक्षींचें बोलत असतां नाना फडनविसास फार आशा होती कीं, हें लहानसें राज्य आपणास असावें, त्यास बहुत वेळपर्यंत इंग्लिशांची अनुकूळता होईना; मग ज्या वेळेस टिपूच्या नाशाविषयीं मराठे व निझाम व इंग्लिश यांचें ऐक्य झालें, त्या वेळेस असा नेम ठरला कीं, 'तो बाळ मियां व त्याचा भाऊ यांस सुरतेजवळ पाऊण लक्ष रुपये वर्षास जमा होतसा मुलूख द्यावा, आणि एकदां चाळीस हजार रुपये देऊन तो आंग्र्याचा मुलूख पेशवे यांनीं घ्यावा.' असें करारपत्र सन १७९१ च्या जून महिन्याचे ६ वे तारिखेस सिद्ध झालें; आणि तें राज्य लहान असें असतांही हस्तगत करावयास पेशव्यांना फावलेंच नाहीं; ह्मणून तें अद्यापि राहिलें, आणि पेशव्यांचें गेलें. यास दृष्टांत, जसे नदीच्या कांठीं लव्हाळे असतात, ते मोठें पाणी आलें तरी लवून राहतात, आणि मोठे मोठे वृक्ष त्या पाण्याच्या नेटानें उपटून वाहून जातात.

१३. मालवणाकडील व सावंताचे वाडीकडील वर्तमान असें; मालवणकर व सावंतवाडीकर यांनीं चांचेपणा करून इंग्लिशांस बहुत उपद्रव केला असतां इंग्लिशांनीं लढाऊ जहाजें पाठवून कोल्हापूरकरांचें मालवण व सावंतांचा रेडी किल्ला सन १७६५ त घेतला. नंतर दुसरे वर्षीं कोल्हापूरकरांपासून तीन लक्ष त्र्यायशीं हजार रुपये घेऊन मालवण किल्ला त्यांस माघारां दिला; आणि तेच वर्षीं वाडीकरांपासून दोन लक्ष रुपये घ्यावयाचा करार करून त्यांचा रेडी किल्ला त्यांस माघारां देत होते, ते समयीं वाडीच्या दरबारांत फार अव्यवस्था झाली होती, त्यायोगें तो दोन लक्षांचा भरणा व्हावयास वेंगुर्लें परगण्याचा वसूल तेरा वर्षेंपर्यंत गहाण ठेविल्यावांचून दुसरा कांहीं उपाय दिसेनासा झाला. मग कोणी कुमठे नामें गृहस्थ मध्यस्थ झाल्यावरून त्या वाडीकरांचे दोन जामीन घेऊन त्यांस तेरा वर्षेंपर्यंत वेंगुर्ल्याच्या किल्यामध्यें ठेवून त्यांच्या बंदोबस्तास व वसुलाचे कामास त्यांनीं आपल्याकडील शिपाई त्या वेंगुर्ल्यांत ठेवून तेथें इंग्लिशांनीं आपला झेंडा लाविला. तेव्हां त्या मध्यस्थानें इंग्लिशांस दोन लक्ष रुपये एकदांच दिले, तेसमयीं इंग्लिशांनीं रेडी किल्ला सावंतांस माघारां दिला. त्यानंतर थोडक्याच वेळानें ते दोघेही जामीन पळून गेले, तेव्हां त्या कुमठ्यास वाडीचे लोक वसूल घेऊं देईनात आणि छापा घालून तो वेंगुर्लें

किल्लाही त्यांनीं घेतला. त्याचें पारिपत्य इंग्लिशांनीं करावें, परंतु ते कांहीं देशाच्या कामास गुंतले ह्मणून तें तसेंच राहिलें; त्यावर कोल्हापूरकरही पुनः चांचेपणा करूं लागला. मग कितीएक वर्षें तो उपद्रव सोसून इंग्लिशांनीं शेवटीं त्याच्या पारिपत्यास मुंबईमध्यें लष्कर तयार केलें, तेव्हां त्यांनीं इंग्लिशांस कांहीं पैका देऊन माळव्यांत कोठी करावयास जागा दिली, त्यायोगें तें काम तसेंच राहिलें. असा इंग्लिशांनीं अर्धवट उपाय केल्यामुळें पुढेंही सन १८१२ पर्यंत तो त्या वाडीकरांचा व कोल्हापूरकरांचा व जंजिरेकरांचा व पेशव्यांचाही चांचेपणा कांहीं कांहीं होत होता.

१४. एथपर्यंत ( सन १७९४ सुमारें ) मराठे लोक युद्धाविषयीं कुशळ असून धैर्येंकरून लढत असत; परंतु या समयीं ते लोक पायदळ व तोफखाना यांच्या भरंवशावर लढूं लागले, त्यायोगें पूर्वींसारिखें त्यांच्या स्वारांनीं मोठ्या धटपणें जाऊन छापा घालून एकाएकीं शत्रूंचा नाश करावा, आणि मागें पळावें तें होईना; पायदळ पुढें करून स्वारांनीं त्यांस पाठबळ द्यावें, अशी चाल पडली. याच पद्धतीनें पानपतच्या लढाईंत स्वारांस पायदळ व तोफखाना सोडून पळतां येईना, ह्मणून जय होईल अथवा न होईल असा संशय असतांही त्या मराठे लोकांस ते समयीं युद्ध करावें लागलें. पूर्वीं अशी चाल होती कीं, जय होईलच असा निश्चय असल्यास युद्धास उभें राहावें. त्यानंतर पुढें कधीं मराठे लोकांत पलटणें चाकरीस ठेवावयाची कल्पना निघाली असतां सरदार ह्मणत कीं, 'हें मराठ्यांच्या उपयोगीं नाहीं; कां कीं, जे लोक त्यांपाशीं कवाईत शिकलेले ते त्यांप्रमाणें काय लढतील? त्यांस जर आपला जय झाला पाहिजे तर पूर्वींच्या प्रकारानें लढल्यास होईल, आणि त्या लोकांच्या चालीनें लढल्यास हिंदू अगदीं बुडतील.'

१५. हा अर्थ मनांत धरून होळकरानें बहुत दिवसपर्यंत आपल्या लष्करांत पलटणें बाळगलीं नाहींत, परंतु ज्या वेळेस शिंद्यानें रजपुतांचे किल्ले घेतले, ते वेळेस तो समजला कीं, जर हीं पलटणें याजवळ नसतीं तर हें काम होतेंचना. ह्मणून त्या होळकरानें एक फ्रेंचांचा सरदार चार पलटणांसहित चाकरीस ठेविला. तीं पलटणें लखेरीजवळ शिंद्याच्या पलटणांशीं लढून नाश पावलीं, तथापि त्यांनीं फार चांगलें युद्ध केलें ह्मणून होळकरानें त्या सरदारास 'पुनः तयारी करावी' ह्मणून सांगितलें. अशी मराठे लोकांत पलटणें ठेवून लढाईची चाल पडली होती, परंतु रघूजी भोंसला यानें पलटणें इतके दिवस चाकरीस ठेविलीं नाहींत.

१६. महादजी शिंदा जिवंत असतां मराठ्यांची मसलत होती कीं, निझामअल्लीकडे चौथ व सरदेशमुखी यांबाबद बहुतां दिवसांची बाकी राहिली आहे ती मागून घ्यावी. यावर कोणी कल्पना करील कीं, ते समयीं मराठे लोकांत वैमनस्यें

पडलीं असतां ह्या कामासाठीं सारे एकमत कसे झाले? तर असें समजावें कीं, निझामाकडील कांहीं प्राप्त झालें असतां तें साऱ्यांनीं वांटून घ्यावें असें पूर्वीपासून चालत आलेलें त्या सर्वांस ठाऊक होतें. मग महादजी शिंदा मृत्यु पावल्यावर तो सर्व बंदोबस्त नाना फडनविसास करावा लागला, ते समयीं इंग्लिशांनीं नानास व निझामास सांगितलें कीं, 'या समयीं आह्मी कोणाचाही पक्ष स्वीकारीत नाहीं.' हैदराबादेस पेशव्याकडचे गोविंदराव काळे व गोविंदराव पिंगळे या नामें दोघे वकील नानानें पाठविले, त्यांशीं व निझामाशीं त्या मागण्याप्रकरणीं बोलणें झाल्यानंतर त्यानें त्या वकिलांजवळ 'मराठ्यांनीं बळेंच आमच्या मुलखाचा वसूल घेतला, व जो वसूल आपल्या मुलखांतून आह्मांस द्यावयाचा तो दिला नाहीं, व आह्मांस पेंढाऱ्यांचा फार उपद्रव लागला,' इत्यादि चौतिसां कलमांची याद देऊन ते पेशव्याकडे पाठविले. त्या कलमांचीं उत्तरें नानानें फार चातुर्येंकरून त्वरित लिहिलीं, आणि त्याबरोबरच दुसरी अठ्ठावीस कलमांची याद त्यावर तयार करून पाठविली. त्यांत असें दर्शविलें कीं, दोन कोटि साठ लक्ष रुपये पेशव्यांचे निझामावर आहेत. त्याजवरून निझामाचा मशीरउल्मुल्क नामें कारभारी याचा आणि ते दोघे पेशव्यांचे वकील यांचा बहुत वाद झाला, शेवटीं तो मशीरउल्मुल्क त्या वकिलांस सभेमध्यें बोलिला कीं, 'हिशेबांत निपुण आणि अतिकुटिल असा जो तुमचा धनी त्यानें आंगें येऊन या दरबारांत आपल्या कलमांचा अर्थ सांगितल्यावांचून कोणाच्याही ध्यानांत येणार नाहीं.' त्यावर त्या वकिलांनीं उत्तर केलें कीं, 'आमच्या नानास कामें बहुत आहेत, त्यामुळें त्याचें एथें येणें घडतें कसें?' त्यावर त्या मशीरउल्मुल्कानें प्रतिउत्तर दिलें कीं, 'त्याचें येणें एथें कसें होईल, तें तुह्मांला दाखवावयास उशीर नाहीं.' या धमकीच्या बोलण्यानें मराठ्यांनीं युद्धाचें आकारण मानिलें, आणि उभय पक्षीं लढाईची तयारी होऊं लागली तरी तें वाद मिटवावयाचें बोलणें आरंभिलेलें होतें तें शेवटपर्यंत चालत गेलें. मोगलांच्या रयतेंत ती युद्धाची कल्पना उत्पन्न झाल्यापासून मोठ्या हर्षानें तें घडावेंच असें इच्छीत होते. मग निझामानें बेदरास मोठें लष्कर स्वयें जमा केलें; तेथें अनेक प्रकारें युद्धाचें साहित्य फार मनापासून तयार होत आहे, असें दिसून आलें; परंतु त्या लष्करचे शिपाई अव्यवस्थित असून आपल्या सरदारांचे आळ्यांत नव्हते, आणि युद्धाचे उपयोगी शस्त्रादि पदार्थ व सरंजाम यथास्थित नव्हता. तरी त्या लोकांमध्यें उग्याच पोकळ गोष्टी होत होत्या कीं, 'आतां पुण्यास जाऊन तें शहर लुटून जाळून टाकूं.' अशाच त्या लष्करांतील कळावंतिणीही त्या बोलण्याच्या आकाराप्रमाणेंच त्या लष्कराचें वर्णन व मराठ्यांचें राज्य बुडवावयाच्या गोष्टी गाण्यांत आणून गात होत्या. तो मुख्य कारभारी मशीरउल्मुल्कही त्या दरबारांत सभेमध्यें बोलिला कीं, 'इतःपर

मोगल मराठ्यांच्या तगाद्यांतून मुक्त झाले; आणि विजापूर व खानदेशही आतां मराठ्यांपासून मोगल घेतील; तें कार्य न झालें तर पेशव्याचें सर्वस्व घेऊन त्यास लंगोटी लावून एक भोंपळा पाण्यास हातीं देऊन त्याला स्नानसंध्या करावयाकरितां काशीस लावून दिल्यावांचून सल्ला व्हावयाचा नाहीं.' नाना फडनविसास तें वर्तमान कळतांच त्यानें थोडक्याच वेळांत मोठें लष्कर जमा केलें. ते समयीं दौलतराव शिंदा व तुकोजी होळकर हे दोघे लष्करसुद्धां पुण्यासच होते; आणि गोविंदराव गाइकवाडानेंही कांहीं लष्कर पाठविलें; त्याशिवाय वराडचा राजाही लष्करसुद्धां यावयास निघाला; आणि दक्षिणेकडचे मोठे मोठे जहागीरदार पटवर्धन, व रास्ते, व विंचूरकर, व मालेगांवकर, व प्रतिनिधि, व पंत सचीव; व मराठे मानकरी लोक, निंबाळकर, व घाटगे, व चव्हाण, व डफळे, व पंवार, व थोरात, व पाटणकर वगैरे यांस पेशव्यांचें बोलावणें गेलें, त्यावरून ते सर्व आपआपल्या सेनेसहित पुण्यावर येऊन पोंहचले. मराठ्यांची अशी तयारी होत आहे तों निझामाचें लष्कर आधींच छावणी सोडून डिसेंबर महिन्यांत बाहेर निघालें. तो निझाम बेदराहून निघून मांजरा नदीचे कांठानें हळू हळू मराठ्यांच्या मुलखाचे मर्यादेकडे चालूं लागला. मग एका महिन्यानें सन १७९५ च्या जानेवारींत पेशवा पुण्याहून लष्करसुद्धां निघून मोगलांवर चालिला. तें लष्कर फार मोठें ह्मणून त्यास धान्य तृण इत्यादिकांच्या सोईसाठीं त्या लष्कराचे कांहीं विभाग करून अनेक वाटांनीं चालूं लागला. ते समयीं तें मराठी लष्कर स्वार व पायदळ मिळून एक लक्ष तीस हजारांवर जमलें होतें; आणि त्याखेरीज दहा हजार पेंढारी मिळाले असत. या एवढ्या समुदायांत दौलतराव शिंद्याचा जमाव फार मोठा होता; त्याचें बहुतेक लष्कर माळव्यांत व हिंदुस्थानांत असतांही पंचवीस हजार सैन्यासहित पेशव्याकडे आला. त्यांत दहा हजार पलटणी लोक असत. रघूजी भोंसला याचें लष्कर स्वार व पायदळ मिळून पंधरा हजार होतें. तुकोजी होळकर याचे लोक दहा हजार होते, त्यांत दोन हजार पलटणी लोक असत. परशुराम भाऊ पटवर्धन याचे लोक सात हजार मात्र होते, परंतु त्यास सर्व सरदारांनीं मिळून त्या सर्व लष्कराची मुखत्यारी दिली होती. तेव्हां त्यानें सर्व पेंढारी व त्यांजबरोबर कितीएक स्वार देऊन त्यांना पुढें पाठवून मोंगलांच्या आसमंताद्भागच्या मुलखाचा नाश करावयाविषयीं आज्ञा दिली; नंतर आपण त्या सर्व लष्करासहित दीड्शें तोफा बरोबर घेऊन निझामावर चालिला. तिकडे त्या निझामाचेंही लष्कर एक लक्ष दहा हजार होतें. तो निझाम त्या सैन्यासहित खर्ड्यावर येत होता, तो मोहरीघाट उतरत असतां पेशव्यांच्या लष्कराची जी खासगत फौजेची टोळी होती, तींत हरिपंत फडक्याचा पुत्र बाबूराव फडका मुख्य होता, त्यानें तेथें जाऊन त्या·

मुसलमानांवर एकाएकीं हल्ला केला, ते समयीं त्याचा कांहींसा नाश होऊन त्या फडक्यास मागें हटावें लागलें. त्यावरून तो निझाम अल्ली समजला कीं, आतां आपला जय आहे. ह्मणून ते दिवशीं ( मार्चाचे ११ वे तारिखेस ) अस्तमानीं त्यानें आपलें मोठें दरबार भरवून जय झाला या आनंदाच्या नजरा घेतल्या. मग दुसरे दिवशीं मोगलांचें लष्कर त्या खर्ड्याहून निघून पुरिंड्याकडे जात असतां, उजवे बाजूस फार मोठें मराठ्यांचें लष्कर जमून आलेलें पाहिलें, तेव्हां त्या निझाम अल्लीनें तेथेंच आपला हत्ती उभा करून आधीं आपल्या लष्कराचें सर्व बुणगें डावे बाजूस केलें. मग आसद अल्लीखान नामें आपल्या स्वारांचा सरदार त्याजबरोबर सतरा हजार पलटणी लोक देऊन मराठ्यांवर हल्ला करावयास नेमिला. ते वेळेस परशुराम भाऊनेंही आपल्या लष्कराचा बंदोबस्त केला. तो प्रकार असा; पेशव्याचे व होळकराचे लोक आपल्याजवळ घेऊन आपण त्या लष्कराच्या मध्यभागीं उभा राहून रघूजी भोंसल्याचें लष्कर उजवे बाजूस करून डावे बाजूस दौलतराव शिंदा लष्करसुद्धां उभा केला. याप्रमाणें बंदोबस्त करून आपण हरिपंत फडक्याचा पुत्र बाबूराव, व तुकोजी होळकराचा पुत्र काशीराव, हे दोघे व कांहीं लोक बराबर घेऊन शत्रु कशा बेतानें आपणांवर चालून येतो, तें पहावयास पुढें निघाला. तो थोडकासा दूर गेल्यावर मोगलांच्या लष्करांतील एक पठाणांची टोळी त्या परशुराम भाऊवर पडली, त्यामध्यें उत्तर मुलखींच्या बलुचीस्थानचा लालखान नामें मुख्य सरदार होता, त्यानें मोठा पराक्रम करून आपल्या हातें बहुत शिपाई मारून त्या परशुराम भाऊसही जखमा करून तो घोड्यावरून खालीं पाडिला. ते समयीं त्या भाऊचा ज्येष्ठ पुत्र हरिपंत बाबा पटवर्धन बापाची अशी अवस्था पाहून तत्काळ जाऊन त्या लालखानावर फार झटून पडला, आणि त्यास तेथेंच जिवें मारून टाकिलें; परंतु त्यांचे पठाण होते, ते तो मेला तरी लढतांना राहीनात, आणि त्यांचे मदतीस कर्नोळच्या नबाबाचा पुत्र, व इलिचपुरच्या नबाबाचा पुत्र, हे दोघे आले. ते असे लढले कीं, ते वेळेस मराठ्यांची अव्यवस्था होऊन त्यांस मागें हटावें लागलें. तेव्हां ते आपल्या लष्करांत माघारें येऊन पोंहचत तोंपर्यंत त्यांची अशी घालमेल झाली कीं, कांहीं कारणावाचून त्या लष्कराच्या मोठ्या भागाचेही लोक हजारों भिऊन उगीच पळूं लागले. ते समयीं बाबूराव फडका याचे स्वाधीन जरीपटका होता, तोही शत्रूस पाठ दाखवून पळावयास सिद्ध झाला, तें पाहून जिवबा बक्षी नामें दौलतराव शिंद्याचा मोठा सरदार होता, तो आपला घोडा मोठ्या वेगानें पिटवून त्या बाबूरावाजवळ गेला, आणि त्यास शिव्या देऊन बोलिला कीं, 'अरे भित्र्या, तुला जर निर्भय जागा पाहिजे तर शिंद्याच्या लष्कराचे पाठीमागें जाऊन स्वस्थ रहा.' तेव्हां तो

बाबूराव मोठें धैर्य धरून तेथेंच राहिला. इतक्यांत त्या दोन्ही लष्करांतील पलटणें आपआपल्या गोळीच्या टप्यांत येऊन पोंहचलीं, तेव्हां मोगलांकडील पलटणांचे पाठीवर स्वार बहुत बंदोबस्तानें येताहेतसें दिसलें, ते समयीं रघूजी भोंसल्यानें त्या स्वारांवर बाणांची सरबत्ती केली; याशिवाय पेरन नामें फ्रेंच जातीचा कोणी शिंद्याचा पलटणी लोकांचा मुख्य सरदार होता, त्यानेंही एका टेंकडीवर छत्तीस तोफा चढवून तेच क्षणीं त्या तोफांचा भडिमार त्या स्वारांवर केला, तेव्हां त्यांस ते दोन मार सोसेनातसे होऊन ते मागें पळाले; तेव्हां निझामाचीं पलटणें आपल्या पाठीचे स्वार पळून गेले असें पहात असतांही ते लोक मागें हटले नाहींत. आणि त्यांनीं शिंद्याच्या पलटणांशीं झटून कांहींसा जयही मिळविला; परंतु ते समयीं तो निझाम अली खर्ड्याकडे जावयास मागें हटूं लागला, आणि त्या पलटणी लोकांसही मागें फिरावयाविषयीं वारंवार निकराचे निरोप पाठवूं लागला, ह्मणून त्यांसही तें युद्ध टाकून मागें फिरणें प्राप्त झालें. नंतर तो निझाम मागें फिरल्याचें वर्तमान त्याच्या सर्व लष्करास विदित होतांच ते सारेच लोक मागें हटले. इतक्यांत सूर्य मावळला, त्यायोगें आंधार पडून त्या लष्कराची अशी अव्यवस्था झाली कीं, त्यांतील पलटणी लोक मात्र खेरीजकरून बाकीच्या लोकांस आपआपलीं ठिकाणेंही सांपडेनातशीं झालीं. मग फार रात्र होईतोंपर्यंत त्या दोन्ही लष्करांत जागोजाग राहून राहून बंदुकांचे बार होत होते; शेवटीं त्या उभय पक्षींच्या लष्करांत एकमेकांस हाका मारमारून इकडे तिकडे धांवतां धांवतां ते लोक फार श्रमी होऊन जागोजाग जेथें जेथें पडले तेथें तेथें निजून राहिले. नंतर बहुतेक रात्र गेल्यावर सर्वत्र स्थिरता झाली, तेव्हां मराठ्यांचे दहा बारा स्वार आपल्या घोड्यांस पाणी पाजावयाकरितां पाण्याचें ठिकाण शोधीत दैवगतीनें मोगलांच्या लष्कराची एक टोळी पडली होती तेथेंच पोंहचले, त्यांस पहातांच त्या मोगलांच्या लोकांनीं शत्रु आला, असें जाणून बंदुकांचे बार केले. ते वेळेस त्यांचे पलटणी लोकही त्यांपासून जवळच होते, त्यांच्या पाहरेकऱ्यांनीं तो आवाज ऐकून आपणही बार केले. तेणेंकरून जे पलटणी लोक निजले होते, ते एकाएकीं घाबरे होऊन उठले, आणि त्यांपाशीं बंदुका भरलेल्या होत्या, त्यांचा भडिमार उगाच विचार न करितां मोठ्या त्वरेनें वारंवार करिते झाले, तो मोठा शब्द ऐकून मोगलांचे सर्व लोक जागे होऊन हें काय होतें तें मनास न आणितां घाबरे होऊन बहुतेक पळाले. मग पूर्वदिवशीं संध्याकाळीं जी गर्दी झाली होती, तीपेक्षांही मोठी गर्दी होऊन त्या सर्व लष्कराची अव्यवस्था झाली, आणि त्या पलटणांचीही तारंबळ होऊन त्यांतील कितीएक लोक पळाले. इतक्यांत चंद्रोदय झाला, तेव्हां तो निझाम अली आपल्या लष्कराची अव्यवस्था

झालेली पाहून फार भयभीत होत्साता जाऊन खर्ड्याच्या लहानशा किल्ल्याचे आंत शिरून आश्रय धरून राहिला. ते समयीं त्याच्या रक्षणार्थ त्याबरोबर जे लोक धांवले, ते त्याच्या लष्कराचा दशांश होते, त्या किल्ल्याच्या सभोंवते राहिले, आणि वरकड सर्व आपलेंच बुणगें लुटून आपल्या शक्तीप्रमाणें दूर पळून गेले. हें वर्तमान मराठ्यांचे पेंढारी लोक यांस कळतांच ते त्यांमागून धांवून त्यांनीं नेलेली ती सर्व लूट पाडवून आणिते झाले. मग सूर्योदयानंतर मराठे लोक पुढें चालूं लागले, तों त्यांनीं मोगलांच्या लष्कराच्या तळावर जागोजाग तोफा वगैरे नानाप्रकारचें युद्धसाहित्य पडलेलें पाहून त्यांस मोठा चमत्कार वाटला, आणि ते त्या खर्ड्याच्या किल्ल्याजवळ गेले. तेव्हां निझाम अल्ली त्या किल्ल्यांत आपणच आपणास कोंडून घेऊन राहिला आहे, आणि त्याच्या लाख फौजेंतील दशांश लोक मात्र त्या किल्ल्यासभोंवते आहेत, असें पाहून त्यांस फारच हर्ष झाला. हें हर्षाचें वर्तमान मराठ्यांच्या लष्करी टोळ्या ज्या मागें होत्या, त्यांस लवकर समजून ते लोकही मोगलांस लुटावयाकरितां मोठ्या त्वरेनें धांवून आले, आणि किल्ल्यासभोंवते जे लोक होते, त्यांस त्यांनीं घेरा घातला, मग दुसरे दिवशीं जागोजाग मोर्चे उभे करून त्या मोगलांच्या लोकांवर तोफांचा मार करून तो किल्ला घ्यावयाचा उद्योग चालविला; तेव्हां तो मार निझाम अल्लीनें दोन दिवसपर्यंत सहन करून तिसरे दिवशीं ( मार्चाचे १५ वे तारिखेस ) त्यानें आंतून सांगून पाठविलें कीं, 'आतां मारूं नका, इतःपर तुमचा व आमचा तह असावा.' मग मराठे तें मान्य करून त्या निझामास ह्मणाले कीं, 'तुमचा मशीरउल्मुल्क नामें मुख्य वजीर नानाची दरबारांत निंदा करून फार अमर्याद बोलिला, त्याचा सूड उगवावयास आधीं तो आमचे स्वाधीन करावा, आणि जो मुलूख सदाशिवराव भाऊनें सन १७६० त घेतला होता, तो तुह्मांस पुनः दिला आहे, तो सर्व आह्मांस द्यावा, व तुमच्या मुलखाची मर्यादा पुरिंड्यापासून तापीपर्यंत आहे, त्यांत आमचा कांहीं भाग असून त्यांतच दौलताबाद किल्ला आह्मांस असावा. शिवाय तीन कोटि रुपये आमचे तुह्मांकडे बाकी आहेत ते आह्मांस द्यावे, व आजपर्यंत फौजेचा खर्च झाला तो तुह्मीं द्यावा, याखेरीज आमचा रघूजी भोंसला याचा गंगथडीमध्यें घांसदाण्याबद्दल बाकी ऐवज राहिला आहे, ते एकुणतीस लक्ष रुपये द्यावे, आणि यानें पुनः गंगथडींत घांसदाणा न मागावा; याकरितां त्यास तीन लक्ष अठरा हजार रुपये वर्षास उत्पन्न होत असा मुलूख द्यावा, आणि वराडांत जो तुमचा भाग आहे, त्याचा वसूल पहिल्या चालीप्रमाणें तुह्मीं घेत जावा.' असें त्या मराठ्यांचें मागणें त्या निझामास कठीण वाटलें नाहीं, परंतु तो वजीर मात्र त्यांचे स्वाधीन करावयाचें अवघड पडलें. अशा संकटसमयीं तो मशीरउल्मुल्क

त्या निझामास बोलिला कीं, 'या तहांत मराठ्यांनीं बहुतसें मागितलें नाहीं, आणि मलाही देण्याविषयीं आपण श्रमी होऊं नये. मी त्यास राजी आहें.' तेव्हां निझामानें दोनशें मराठे त्या वजीरास न्यावयाकरितां आले होते, त्यांच्या स्वाधीन तो मशीरउल्मुल्क केला. तेव्हां त्या मराठ्यांनीं तो आपल्या लष्करांत नेला. ते समयीं पेशवा मोठ्या समारंभानें आपल्या तळावरून उठून पुढें जाऊन त्यास भेटला. नंतर मराठे आपल्या लष्करांत मोठ्या आनंदेंकरून उत्साह करिते झाले कीं, 'आज आह्मीं मोठा जय संपादिला.' त्या मशीरउल्मुल्काची व पेशव्याची भेट झाली, ते समयीं पेशव्याचें मुख म्लान झालें, तें पाहून मग त्या उत्साहसमयीं नानानें श्रीमंतांस विचारिलें कीं, 'आपणास त्याचे भेटीसमयीं श्रम होण्याचें कारण काय?' त्यावर पेशव्यानें उत्तर केलें कीं, 'मोगलांनीं भित्रेपणानें आपली एवढी अमर्यादा करून घेतली, आणि आमचे लोक यत्नावांचून जय पावले असतां आपणांस आपणच विजयी असें मानितात, तस्मात् या समयीं उभय पक्षींचे पुरुष अप्रयोजक पाहून माझें मन फार खिन्न झालें.' हें पेशव्याचें उत्तर परम योग्य पडलें. कां कीं, त्या प्रसंगीं उभय पक्षीं लक्ष लक्ष संख्येवर सैन्यें असून केवळ युद्धेंकरूनच पाहिलें असतां दोन्हीं लष्करें मिळून दोनशेंही मनुष्य पडलें असें झालें नाहीं, आणि रात्रीस घाबरेपणानें अव्यवस्था होऊन व त्या किल्ल्यास त्यांनीं घेरा घालून मोरचे बांधून तोफा चालविल्या, त्या योगेंकरून मोगल फार मेले गेले, तरी युद्ध करून पडले असें ह्मणतां येत नाहीं. याप्रमाणें खर्ड्याची लढाई झाली असतां मराठे शिलेदार लोक त्यांत होते, ते त्या दिवसापासून ती गोष्ट निघाल्यास 'आह्मी त्या प्रसंगीं केवढा मान पावलों, त्या युद्धासारिखें यशस्वी युद्धच नाहीं,' अशी प्रशंसा अद्यापि करिताहेत.

१७. नंतर पेशवा पुण्यास आला, आणि नाना फडनवीस त्या संपादिलेल्या मुलखाची व्यवस्था करावयास गुंतला; परशुराम भाऊ पटवर्धन व रघूजी भोंसले हे पुण्याबाहेर डेरे देऊन राहिले; होळकर जेजुरीस उतरला; शिंदा जामगांवापाशीं राहिला, असें असतां पुण्यास वर्तमान आलें कीं, निझाम अलीचा पुत्र अलीजहां हैदराबाद सोडून बाहेर जाऊन आपल्या बापाचें स्थान आपण घ्यावयासाठीं मोठें बंड करून राहिला आहे. हें वर्तमान ऐकून होळकर व शिंदे पुण्यास आले, त्यावरून त्या वेळेचे मुसलमान लोक बोलत कीं, 'हे सर्व मराठे त्या बंडास अनुकूळ आहेत,' परंतु याचा कांहीं ताळा पडत नाहीं. निझामाचा कोणी पलटणी सरदार त्या अलीजहांचे पाठीस लागून त्यास घेरून हैदराबादेस घेऊन जात होता, तेव्हां तो आपल्या वडिलाचे समूर जावयाचे लाजेस्तव वाटेंतच विष खाऊन मृत्यु पावला.

१८. यानंतर दौलतराव हिंदुस्थानांत गेला; परशुराम भाऊ तासगांवास गेला;

होळकर पुण्यांत होता; आणि रघूजी भोंसला दौलतराव गेल्यावर एक महिना पुण्यास राहून मग त्याला नर्मदेचे दक्षिणेकडल्या कितीएक मुलुखांच्या सनदा पेशव्यानें दिल्या त्या घेऊन तेथें मोठा सन्मान पावून आक्टोबर महिन्यांत तेथून आपले मुलखीं जावयास निघाला. इतके दिवस नानानें जें जें कार्य केलें तें तें सिद्धीस गेलें, आणि तो आपल्या पराक्रमाची परम सीमा पावला. कां कीं, त्यास दौलतराव शिंदा आदिकरून सर्व सरदार लोक वश होते, त्यायोगें असें दिसूं लागलें कीं, जसें माधवराव पेशव्याचे वेळेस मराठ्यांचें राज्य योग्यतेस चढलें होतें, तसें आतांही चढेल, परंतु त्या नानास आपली आज्ञा सर्वत्र चालावी, कोठेंही कुंठित न व्हावी, अशी फार आवड होती; आणि दुसरा कोणी आपणास प्रतिपक्षी होईल असें भयही होतें, त्यामुळें शेवटीं त्याचा सर्व पराक्रम नष्ट होऊन त्याच दुःखानें पुढें तो मरण पावला.

---

## भाग अठ्ठाविसावा.

### ( इसवी सन १७९५ पासून सन १७९९ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. नाना फडनवीस माधवराव नारायण पेशवा यास कोणत्या प्रकारच्या बंदोबस्तानें वागवीत होता तें, व सातान्याचा राजा व रघुनाथरावाचें कुटुंब यांस कशा बंदोबस्तांत रक्षिलें तें प्रकरण.—२. रघुनाथरावाच्या औरस पुत्रांत बाजीराव वडील, त्याचे गुण व स्वरूप यांचें वर्णन, व त्या बाजीरावाविषयी नानानें फार मत्सर केला तो प्रकार. माधवराव पेशवा व बाजीराव रघुनाथ हे दोघे नानाच्या बंदोबस्तांत होते यास्तव ते समदुःखी होऊन त्या उभयतांची मैत्री झाली, व तें नानास विदित होऊन त्यानें त्या उभयतांचा विशेष बंदोबस्त केला.—३. तें माधवरावास सहन न होतां त्यानें माडीवरून उडी टाकिली, आणि मृत्यु पावला.—४. नानानें बाजीराव गादीचा अधिकारी न व्हावा म्हणून यत्न केला तो प्रकार.—५. बाजीरावानें बाळोबा तात्या व शिंदा यांस आपल्या पक्षाचे करून नानाची मसलत मोडावी असें केलें तें समजून नाना आपणच बाजीरावाला गादीवर बसवावयास उद्युक्त झाला.—६. तेव्हां बाळोबा तात्यानें बाजीरावाला शिंद्याच्या बंदींत ठेवून चिमणाजी आपास गादीवर बसवून परशुराम भाऊ पटवर्धन तो मुख्य कारभारी केला.—७. नव्या कारभारी मंडळीनें नानास मुख्य कारभारी करितों असें मिष करून त्यास दगा करावयाची मसलत केली. तें कृत्य नानास विदित होऊन तो सावध झाला. त्यांत तो नाना आणि बाजीराव यांचें एकच कार्य पडलें.—८. सर्जेराव घाटगा व बाळोजी कुंजर हे नानाच्या उपयोगीं कसे पडले तें प्रकरण.—९. नंतर बाजीरावास गादीचा धनी करावयाकरितां त्या नानानें शिंदा अनुकूळ केला.—१०. ती गोष्ट सिद्धीस गेली नाहीं तोंच बाळोबा तात्यास विदित होऊन त्यानें बाजीरावास हिंदुस्थानांत पाठवावयाचें योजिलें. तिकडे जाणें न होण्यासाठी बाजीरावानें कांहीं युक्ति केली तो प्रकार.—११. नानानें शिंद्याचे द्वारें बाळोबा तात्यास कैद केलें, व परशुराम भाऊ पुण्याहून पळाला ते समयीं त्याचे पाठीस लोक लागले होते त्यांनीं त्यास धरिलें.—१२. बाजीरावास 'पेशवे' पदवी

प्राप्त झाली, आणि चिमणाजी आपा यास कांहीं प्रायश्चित्त देऊन तो गुजराथचा अधिकारी केला तो प्रकार.—१३. नानानें करार केल्याप्रमाणें शिंदा व रघूजी भोंसला यांस तें तें प्राप्त केलें, परंतु निझामास कबूल केल्याप्रमाणें बाजीराव देईना म्हणून मशीरउल्मुल्क फार रुष्ट होऊन तेथून निघून गेला.—१४. तुकोजी होळकर याच्या मृत्यूनंतर त्याच्या पुत्रांत गादीविषयीं वाद पडला तेव्हां मल्हारराव होळकर युद्ध करून मृत्यु पावला, व काशीराव होळकर यास शिंद्याचे द्वारें बापाचा सर्व अधिकार प्राप्त झाला.—१५. नाना व शिंदा या दोघांस दूर करावयाविषयीं बाजीराव यत्न करूं लागला. त्यांत शिंद्याच्या हातून नानास कैद करून तो नाना व त्याचे पक्षपाती लोक यांचीं घरें लुटावयाची आज्ञा दिली त्यायोगें सर्व शहरांत दंगा झाला.—१६. त्यानंतर बाजीराव पेशवा याचा मुख्य कारभारी अमृतराव झाला.—१७. सखाराम घाडगा यानें आपली कन्या शिंद्यास दिली आणि त्याचा मुख्यत्वें कारभार आपण करूं लागला. आणि तो सर्जेराव घाडगा व बाळोजी कुंजर हे दोघे बाजीरावाच्या अनुकूलतेनें पुण्यांतील कितीएकां मोठमोठ्या गृहस्थांस अत्यंत पीडा करून त्यांपासून पैका घेते झाले.—१८. अमृतरावानें शिंद्यास धरावयाची मसलत केली त्यास बाजीरावाची अनुकूलता होऊन शेवटीं त्या बाजीरावाच्या भित्रेपणामुळें सिद्धीस गेली नाहीं.—१९. साताऱ्याचें काम परशुराम भाऊ पटवर्धनास सांगितलें त्यायोगे तो बंदींतून मुक्त झाला.

१. सवाई माधवराव पेशवा यास नाना फडनविसानें त्याच्या लहानपणापासून आपल्या हातीं फार बेतानें ठेविलें होतें. तो एकवीस वर्षांचा मोठा झाला तरी त्याच्या बंदोबस्तांत किमपि न्यून पडूं दिलें नाहीं, आणि त्या समयीं जे कोणी कांहीं राज्यकारणास्तव बंदीस पडले होते, त्यांस द्वेषबुद्धीनें फारच जपूं लागला. तो प्रकार असा; साताऱ्याचा राजा बंदींत होता, त्याच्या खर्चास जी नेमणूक केलेली होती ती कमी केली, आणि त्याचे भाऊबंद सोयरेधायरे यांस त्याची भेट न होईसें केलें. रघुनाथराव याचें कुटुंब कोपरगांवास सन १७९३ पर्यंत होतें, मग त्या रघुनाथरावाची स्त्री आनंदीबाई हिच्या प्रकृतीस कांहीं आजार झाला, ह्मणून तिच्या परिवारासहवर्तमान नाशिकाजवळ आनंदवल्लीस नेऊन ठेविली. ती तेथें सन १७९३ च्या एप्रिल महिन्यांत मृत्यु पावली; नंतर निझाम अल्लीचा युद्धप्रकार उत्पन्न होई तोंपर्यंत तिचा पुत्र आदिकरून सर्व परिवार तेथेंच होता. मग कांहीं बंड न व्हावें यासाठीं तो परिवार शिवनेरीच्या किल्ल्यांत नेऊन ठेविला; त्यांत अमृतराव नामें रघुनाथरावाचा दत्तपुत्र, व दोघे औरस पुत्र, त्यांत वडील बाजीराव, धाकटा चिमणाजी आपा, हे तिघे होते. मग तें निझाम अल्लीशीं व मराठ्यांशीं युद्ध होऊन तो गवगवा उरकल्यावरही त्यांस मोकळें न सोडितां राघोपंत गोडबोले व बळवंतराव नागनाथ हे दोघे आपले कारकून त्यांजवळ ठेवून पहिल्यापेक्षां विशेष बंदोबस्त केला. ते तिघेही स्वरूपानें चांगले आणि तरुण व उत्तम स्वभावाचे होते. त्यांस नाना

फडनवीस असा उपद्रव देत असे कीं, तें पाहून तो बहुत लोकांचे मनांतून उतरला. कां कीं, त्यांपासून किमपि उपद्रव न होतां त्यांस अतिबंदोबस्तानें ठेवणें, हा त्या नानाचा क्रूरपणा स्पष्ट दिसून आला. याखेरीज जे लोक पहिले रघुनाथरावाच्या पक्षाचे होते, ते त्या नानाचें असें आचरण पाहून त्याची निंदा करीत, आणि तिघे रघुनाथरावाचे पुत्र यांची प्रशंसा करीत. याप्रमाणें त्या गृहस्थमंडळीची वृत्ति जाणून नाना फडनवीस आपल्या वृद्धदशेमुळें अधीरपणें त्यांचा बंदोबस्त अधिकच करूं लागला; त्यांत रघुनाथरावाचा थोरला औरस पुत्र बाजीराव याविषयीं तर भयेंकरून फारच द्वेष करूं लागला.

२. बाजीराव तारुण्येंकरून युक्त होता, आणि त्याचा आंगलोट फार निटस असे, व मुखश्री तर अशी दिव्य होती कीं, ज्याचें तोंड पाहातांच माणसाचें मन त्याकडे लागावें, आणि त्याच्या बोलण्यांत असा कांहीं रस असे कीं, त्याचें भाषण ऐकून मनुष्यानें मोहित व्हावें. ते वेळेस त्याच्या वयास एकोणीस वर्षे होतीं, आणि घोड्यावर बसणें व तलवार धरणें व तिरंदाजी करणें या कामांत तो परमकुशळ असे, त्यासारिखा भाला खेळणारा साऱ्या गंगथडींत दुसरा कोणी नव्हता. याशिवाय तो शास्त्रनिपुण असून याज्ञिक कर्मांतही फार सुज्ञ होता. तो माधवराव नारायण पेशवा याचा चुलतचुलता होय, त्याची प्रशंसा ऐकून माधवराव पेशवा बहुत संतुष्ट होऊन त्याला मोकळें करून त्यास भेटावयाविषयीं फार इच्छित असे. ह्मणून त्याविषयीं माधवरावानें नाना फडनविसाजवळ कधीं ती गोष्ट काढली असतां तो आपल्या अतिसावधपणानें पेशव्यास समजावी कीं, 'तो किती जरी चांगला असला तरी तुमचा शत्रु असें समजा; त्याचा बाप रघुनाथराव, व आनंदीबाई त्याची आई, हें स्मरण धरून असावें.' असें अनेक प्रकारें नाना पेशव्यास समजवीत असतां तें व्यर्थ गेलें; कां कीं, तो जों जों त्यास विपरीत समजावी, तों तों त्यास बाजीरावाच्या भेटीची इच्छा अधिकच उत्पन्न होई, परंतु त्या पेशव्यानें कांहीं एखादी गोष्ट आपले मतें केली, तर तें वर्तमान आपणास कळविणारे आपले चाकर नानानें गुप्तपणें त्याजवळ ठेविले होते, आणि बाजीराव तर त्याचे बंदींत असे, त्यामुळें परस्परें त्या दोघांची मैत्री साधेना. असें असतांही आपणावर पेशवा प्रीति करितो, हें वर्तमान ऐकून त्या बाजीरावानें आपणाजवळ नाना फडनविसानें ठेविलेला कारकून बळवंतराव नागनाथ यास आपलासा करून, त्याचे मुखानें माधवराव पेशव्यास निरोप पाठविला कीं, 'सांप्रत मी शिवनेरी किल्ला एथें नानाचे बंदींत आहें, आणि आपण आपल्या गादीवर असून त्याच्या बंदोबस्तामुळें हल्लीं मजसारिखेच आहांत, ऐशियास त्याचा बंदोबस्त देहापुरताच आहे, मनाचा बंदोबस्त त्याच्या हातीं नाहीं, त्यास तुमचा व आमचा स्नेह मात्र असावा, इतक्यानें जसे आपले उभयतांचे वडील पूर्वीं

नामांकित झाले, तसेच आपणही समयविशेषीं होऊं;' त्यावरून पुढें त्या दोघांमध्यें त्या बळवंतराव नागनाथाचे द्वारें एकमेकांचीं पत्रें एकमेकांस पोहचूं लागलीं. तें वर्तमान कांहीं अवकाशेंकरून नानास कळतांच त्यास असा राग आला कीं, तो पाहून लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. त्या नानानें प्रथम बळवंतराव नागनाथ याच्या पायांत बिडी घालून तो किल्ल्यावर टाकिला, आणि बाजीरावाभोंवता पहिल्यापेक्षां विशेष बंदोबस्त ठेवून माधवराव पेशवा याची बहुत निर्भर्त्सना केली.

३. तो माधवराव पेशवा नाना फडनविसाचे सूत्रानें वागण्यास आधींच कंटाळला होता, आणि त्याचा मित्र बाजीराव यास अधिक उपद्रव झालेला ऐकल्यानें फारच कष्टी झाला. मग त्यानें आपली बसावयाची खोली सोडून बाहेर जाणें अगदीं टाकिलें. तो कधीं दरबारास येईना, त्यावरून लोकांत असें प्रसिद्ध झालें कीं, श्रीमंतांस ज्वर येतो ह्मणून ते दरबारांत येत नाहींत. त्या वर्षीं (सन १७९५ त) दसरा अक्टोबराचे २२ वे तारिखेस पडला, त्याचा समारंभ फार चांगला केला होता. ते दिवशीं माधवराव पेशवा सीमोल्लंघनास बाहेर निघून संध्याकाळीं वाड्यांत आल्यावर त्यानें आपल्या रीतीप्रमाणें सर्व मानकरी लोकांच्या भेटी घेतल्या. ते समयीं तो कोणासही आजारीसा दिसला नाहीं, परंतु त्याचें मन सर्वप्रकारें उदास झालें होतें, इतक्यानेंच त्यानें मरावयाच्या संकल्पानें त्याचे शरीरीं कांहीं विकार नसून एकाएकीं २५ व्या तारिखेस माडीवरून खालीं कारंजावर उडी टाकिली, तेव्हां त्याचे हातपाय मोडून त्या कारंजाच्या नळीची जखम त्याचे मांडीस फार लागून तो तिसरे दिवशीं मृत्यु पावला. त्यानें मरतेसमयीं फार आग्रहेंकरून सांगितलें कीं, 'माझे पाठीमागें गादीवर बाजीरावाची स्थापना करा;' असें बोलून त्याचा परम मित्र हरिपंत फडक्याचा पुत्र बाबूराव फडका याच्या आंगावर पडला, मग बाबूराव यानें त्यास धरून बसविलें असतां तो त्याच्या आंगावर टेंकलेला असतांच मृत्यु पावला.



सवाई माधवराव पेशवे.

४. हें माधवरावाचें मरण नाना फडनवीस ऐकून फार कष्टी व्हावा, परंतु झाला नाहीं. याचें कारण असें; तो पुरें समजला होता कीं, त्याच्या मरणेंकरून आपल्या मोठेपणास धक्का आहे, ह्मणून तें दुःख एकीकडे ठेवून तो आपल्याच दुःखांत

गुंतला. त्यानें प्रथम असा उपाय केला. जें माधवरावानें फार आग्रहेंकरून सांगितलें कीं, 'बाजीराव गादीचा धनी करा', तें गुप्त राखून ठेविलें. कां कीं, बाजीरावास स्थापिलें असतां केवळ आपल्या मोठेपणासच हानि होईल असें नाहीं, कदाचित् प्राणासही धक्का पोंहचेल. हें भय मानून त्यानें माधवराव पेशव्याच्या उडीचें वर्तमान ऐकतांच अगोदर परशुराम भाऊ पटवर्धन यास सांगून पाठविलें कीं, 'ह्या वेळेस तुह्मांजवळ जितकी फौज असेल तितकी व दुसरी लवकर मिळेल तितकी घेऊन त्वरित पुण्यास या.' नंतर पेशव्याच्या मृत्यूचे दुसरे दिवशीं रघूजी भोंसला व दौलतराव शिंदा यांस नाना फडनविसानें पुण्यास माघारें बोलाविलें कीं, 'आतां धनी कोण करावा, तो विचार करावयास लवकर या.' ते वेळेस तुकोजी होळकर पुण्यासच होता, त्यास नानानें बहुत गोष्टी सांगितल्या कीं, 'पहिल्यापासून रघुनाथराव यानें इंग्लिशांशीं संबंध ठेविला. तसाच हल्लीं बाजीराव धनी झाला असतां जर इंग्लिशांशीं स्नेह करील तर फार नाश होईल.' इतकें त्यास समजावून शिंदा व भोंसला यांचें मन आपणाकडे लावून घेतलें, आणि आपला मतलब त्यांस सांगितला कीं, 'यशोदाबाई माधवरावाची स्त्री ती जरी लहान आहे, तरी तिच्या मांडीवर दत्तक बसवून त्याच्या नांवानें राज्य यथास्थित चालवावें.' हें ऐकून सर्व मराठे सरदार मान्य झाले, त्यांत बाळोबा तात्या नामें शिंद्याचा मोठा कारभारी होता, तो मात्र प्रतिकूळ बोलला; तेव्हां जिवबा बक्षी नामें शिंद्याचा मोठा दुसरा सरदार होता, तो बोलला कीं, 'सध्यां आपला धनी शिंदा तो तरुण आहे, यास्तव त्याचें सांगणें उपयोगी नाहीं; वरकड जे भोंसले वगैरे पुरातन वृद्ध मोठे मोठे सरदार आहेत ते सांगतील तें योग्य.' नंतर सन १७९६ च्या जानेवारींत नानाच्या मसलतीप्रमाणें त्या सर्व सरदारांची मान्यता होऊन त्या पत्रावर शिक्का झाला. नंतर ते सारे सरदार आपआपल्या ठिकाणास जाऊन कारभार चालविते झाले.

५. त्यापुढें कोणी दत्तक शोधून आणून स्थापावा, एवढें मात्र राहिलें. परंतु हें सारें वर्तमान बाजीरावास कळलें होतें, आणि तो बाळोबा तात्या आपल्या पक्षाचा आहे, असें समजून त्यानें त्याजकडे कागदपत्राची वहिवाट करून थोडक्याच महिन्यांत तो वश केला. त्याच सुमारें जिवबा बक्षी याचे शरीरीं समाधान नाहींसें होऊन तो केवळ आसन्नमरण झाला असतां, दौलतराव शिंद्यास जवळ बोलावून आपल्या पलंगावर बसवून घेऊन बोलिला कीं, 'बाळाजी विश्वनाथाचा प्रत्यक्ष वंश असतां दत्तक घेण्याविषयीं मीं अनुमोदन दिलें, हें मला मोठें खेदास्पद झालें.' असें त्याचें भाषण झाल्यानंतर तो जिवबा बक्षी मृत्यु पावला. तें वर्तमान बाजीराव यास कळतांच हें आपणांस हितावह आहे, असें जाणून त्यानें दौलतराव शिं-

घाकडे बोलणें लाविलें. तेव्हां असें ठरलें कीं, 'बाजीरावानें चार लक्षांचा मुलूख शिंद्यास द्यावा, आणि शिंद्याला जो बाजीरावास गादीवर बसविण्याबद्दल फौजेस खर्च लागेल, तोही बाजीरावानें द्यावा, ह्मणजे बाजीरावास 'पेशवे'पदवी प्राप्त होईल.' हें वर्तमान तत्काळ नानाला कळलें. तेव्हां तो फार भिऊन त्यानें परशुराम भाऊ पटवर्धन तासगांवास होता, त्यास आपल्याजवळ मोठ्या त्वरेनें बोलाविलें. तो आपले स्वार जमा करून घेऊन तासगांव सोडिल्यापासून दोन दिवसांत पुण्यास येऊन पोंहचला. मग त्याचें व नानाचें बोलणें झालें, तेव्हां असें ठरलें कीं, 'शिंदा जें करणार तें आपणच प्रथम करावें हें उत्तम.' त्यानंतर लागलेंच परशुराम भाऊनें शिवनेरी किल्यास जाऊन ती गोष्ट बाजीरावास विदित केली. तेव्हां त्या बाजीरावाचा भाऊ अमृतराव बाजीरावास ह्मणूं लागला कीं, 'हें काम शिंद्याच्या हातून होऊं द्यावें, याची त्वरा करूं नये.' तेव्हां त्या परशुराम भाऊनें बाजीरावास अनेक प्रकारें ममतेच्या गोष्टी सांगून शेवटीं त्यास विश्वासार्थ गाईचें शेंपूट हातांत धरून शपथ दिली. तेव्हां तो बाजीराव आपला धाकटा भाऊ चिमणाजी आपा यासुद्धां त्या किल्यावरून उतरून पुण्यास गेला, आणि त्याचा वडील भाऊ अमृतराव तेथेंच राहिला. मग बाजीराव व नाना फडनवीस यांची भेट होऊन परस्परें नेम ठरला कीं, 'यापूर्वीं उभयपक्षीं ज्या अनुचित गोष्टी झाल्या असतील त्या कोणींच मनांत आणूं नये; इतःपर जें करणें तें एकविचारें करावें.' असें झाल्यावर त्यांचा बेत ठरला कीं, 'बाजीराव धनी करून त्याचें राज्य नानानें मुख्यत्वेंकरून चालवावें.' याप्रमाणें करारपत्रही झालें. ही झालेली गोष्ट बाळोबा तात्यास कळल्यावर त्यास ती संमत असतांही त्यास सोडून झाली, ह्मणून त्याला मोठा राग येऊन त्यानें मनांत निश्चय धरिला कीं, 'नानाची मसलत शेवटास जाऊं देणार नाहीं, अगदीं पाडून टाकीन.' तो अर्थ सिद्धीस न्यावयाकरितां त्यानें आपला धनी शिंदा त्या वेळेस गोदावरीचे कांठीं होता, तो वश करून त्याचें सैन्य पुण्यावर चालतें केलें.

६. नाना फडनवीस मसलतीविषयीं बळकट होता, परंतु आंगधटाईविषयीं तो तादृश शूर नव्हता. शिंद्याचें लष्कर आपल्या लष्करापेक्षां प्रबळ, आणि बाजीरावाचाही विश्वास येत नाहीं, व आपण जर बाळोबाच्या हातीं सांपडलों तर प्राणासही भय आहे, असें समजून तो नाना बाजीरावास परशुराम भाऊच्या स्वाधीन करून आपण तेथून निघून पुरंदरावरून साताऱ्यास गेला. बाळोबा तात्या व बाजीराव यांची पुण्यांत भेट झाली, ते वेळेस हे दोघे परम स्नेही आहेत असें दाखविलें असतां बाजीरावाचें अविश्वासू आचरण त्या बाळोबा तात्याच्या स्मरणांत आहेसें लोकांस भासलें. नंतर तो बाळोबा तात्या आपल्या मनांत बहुत विचार करून ठरविता झाला

कीं, 'बाजीराव धनी न करावा, जो आपल्या चित्तास येईल तो धनी करावा, आणि नाना फडनविसाखेरीज कारभारीही दुसराच करावा.' मग त्यानें परशुराम भाऊस सुचविलें कीं, 'माधवरावाची स्त्री आहे, तिचे मांडीवर चिमणाजी आपा यास बसवून बाजीरावास बंदींत ठेवून सर्व कारभार तुह्मीं संभाळावा, अशी माझी मसलत आहे, त्यास तुमच्या विचारास कसें येतें?' ते वेळेस परशुराम भाऊ नाना आंगघटाईपणांत कमीसा जाणून त्याची कांहींशी अवगणना करीत असे; तथापि तो नाना फार शहाणा मसलती आहेसें समजून याचा विचार पक्का ध्यानास आणि-ल्यावांचून त्यानें त्यास उत्तर दिलें नाहीं. नानाची मसलत झाली कीं, 'या गोष्टीस अनुमोदन द्यावें, परंतु बाजीराव आपल्या बंदींत ठेवावा.' नंतर त्याप्रमाणें ठरलें; मग बाळोबानें त्या नानास दर्शविलें कीं, 'तुमची व आमची मैत्री असावी.' त्याप्रमाणें नानाही मान्य झाला.

७. बाजीराव आपल्या बंदींत असावा ही हितकारक नानानें दिलेली मसलत परशुराम भाऊला उपयोगीं नाहींशी वाटून तो उत्तर देतेसमयीं त्याविषयीं कांहींच बोलिला नाहीं. त्यावरून बाजीराव शिंद्याचे स्वाधीन राहिला. हें वर्तमान नानाला वांईहून पुण्यास जावयास निघतेसमयीं समजलें. तेव्हां तत्काळ त्याचे ध्यानांत आलें कीं, 'हें सर्व कृत्य माझा दगा करावयाचें आहे. त्यास ह्या समयीं पुण्यास जाऊं नये.' मग तो नाना वांईस राहून त्यानें अगोदरच साताऱ्याच्या राजापासून नव्या पेशव्याचीं वस्त्रें आपल्याजवळ घेऊन ठेविलीं होतीं, तीं पुण्यास पाठवून दिलीं. त्या वेळेस परशुराम भाऊ व शिंदा आपला केव्हां तरी घात करतील, असें बाजीरावाचे मनांत आलें नाहीं; परंतु त्याचा प्रत्यय कोणे प्रकारें त्यास आला, तें समजलें पाहिजे, ह्मणजे ते वेळेस पुण्याचे दरबारची रीत कशी होती, ती त्यावरून समजेल, आणि त्यापुढेंही चाल तशीच पडत आली, तें ध्यानांत येईल. प्रथम शिंद्यानें बाजीराव आपल्या लष्करांत यावा, ह्मणून अशी युक्ति केली कीं, त्यास गादीचा धनी करावयाच्या कामाबद्दल कांहीं खर्च लागल्याचें निमित्त करून त्यास पैका मागितला. तेव्हां तो बाजीराव बोलिला कीं, 'आह्मांस देववत नाहीं.' त्यावर शिंदा आग्रहाचें बोलणें करीत असतां कांहींसा वाद होतां होतां शिंद्यानें दर्शविलें कीं, बाजीरावाच्या कठोर शब्देंकरून आपलें मन दुखावलें, ह्मणून त्यास निरोप पाठविला कीं, 'मी माघारी हिंदुस्थानांत जातों. त्यास कृपा करून मला आज्ञा झाली पाहिजे.' त्यावरून बाजीराव शिंद्याच्या कल्पनेप्रमाणेंच तत्काळ त्याच्या लष्करांत जाऊन त्याशीं एकांत करूं लागला, तेव्हां शिंद्यानें अस्तमान होई तोंपर्यंत युक्तीनें त्या गोष्टी लांबविल्या. इतक्यांत एकाएकीं असें वर्तमान आलें कीं, 'परशुराम भाऊ चिमणाजी

आपास घेऊन पळाला, परंतु कोठें घेऊन गेला तें कळत नाहीं; त्याला सातार्‍यास घेऊन गेले अशी शहरांत वदंता मात्र आहे.' तेव्हां बाजीराव अत्यंत भयभीत होऊन शिंद्यास ह्मणूं लागला कीं, 'तूं पाठीमागून जाऊन त्यास धरून आण.' त्यावर त्यानें उत्तर दिलें कीं, 'तो कोठें गेला तें पक्कें कळत नाहीं, व रात्रीचें धांवणेंही उपयोगी नाहीं.' असें त्याचें बोलणें ऐकून बाजीराव बोलिला कीं, 'असें आहे त्यापक्षीं मी आजची रात्र एथेंच रहातों.' असें ऐकतांच शिंद्यानें तें अवश्य मानून त्यास ठेवून घेतलें. मग दुसरे दिवशीं शिंद्याचे लोक त्या बाजीरावास ह्मणूं लागले कीं, 'आपण एथेंच स्वस्थ रहावें, एथून दुसरे जागीं गेलां असतां नाश आहे.' त्यावरून तो समजला कीं, 'घात झाला.' चिमणाजी आपाला परशुराम भाऊ व बाबूराव फडके यांनीं पळविलें खरें, परंतु त्यास पुण्यांतच लपवून ठेविलें. नंतर त्याला ते सांगूं लागले कीं, 'तुला आह्मी गादीचा अधिकारी करितों.' परंतु तो आपल्या भावाखेरीज आपण धनी होईना. शेवटीं त्यांनीं बळेंच त्याला पेशवा करून चिमणाजी माधवराव असें त्याचें नांव ठेविलें. ही गोष्ट सन १७९६ च्या मे महिन्याचे २६ व्या तारिखेस घडली. दुसरे दिवशीं परशुराम भाऊनें नानास लिहून पाठविलें कीं, 'तुह्मीं पुण्यास येऊन बाळोबा तात्याच्या स्नेहांत अंतर पडलें आहे, तें नीट करून मुलखाचे कामावर राहावें; आह्मी लष्कराचें काम संभाळितों.' त्यावर नानानें परशुराम भाऊस उत्तर लिहिलें कीं, 'कांहीं बोलणें व्हावयाचें आहे, त्यास तुमचा पुत्र हरिपंत यास आधीं इकडे पाठवून द्यावें.' त्याप्रमाणें हरिपंतही नानाकडे गेला, परंतु केवळ वकिलासारिखा एकटा गेला नाहीं; त्याजबरोबर चारपांच हजार निवडक स्वार होते; आणि ते समयीं बाबूराव फडके यांचें नानास गुप्त पत्र आलें कीं, आपण क्षणमात्र विलंब न करितां आपल्या रक्षणाचा उपाय करावा; त्यावरून नाना वांई सोडून प्रतापगड किल्ल्यामध्यें शिबंदी नवी वाढवून कोंकणांत महाडास गेला; तेथेंही त्यानें रायगडाची बंदोबस्ती फार चांगली केली. बाळोबा तात्याच्या मनांत होतें कीं, अकस्मात् जाऊन नानास धरावें, यास्तव आपला धनी शिंदा याचे पलटणी लोक त्या कामास नेमणार होता; परंतु नानाच्या पक्षाचे कोणी लोक होते, ते परशुराम भाऊशीं कांहीं बोलल्यावरून परशुराम भाऊही बोलिला कीं, 'बळात्काराचा उपाय ह्या समयीं करूं नये.' तेव्हां तें तसेंच राहिलें. परंतु परशुराम भाऊ त्या नानास प्रतिकूळ नव्हता असें न समजावें; कां कीं, थोडके दिवस झाल्यानंतर त्यानें नानाच्या जहागिरीचा मुलूख होता तो शिंद्यास दिला, आणि त्याचा वाडा पुण्यांत होता, तेथें आपण राहून जें त्याचें द्रव्य सांपडलें त्याचा व्यय करूं लागला. त्या समयीं नानाचें द्रव्य अपार आहे, अशी लोकांत आवाई होती;

व कोणी ह्मणत कीं, पेशव्यांच्या बहुतां पिढ्यांचें द्रव्य जमलेलें होतें, तें सर्व नाना बरोबर घेऊन गेला. त्यांत नानानें द्रव्य बहुत नेलें हें खरें, परंतु तें पेशव्याचें नसेल; कां कीं, सवाई माधवराव पेशवा होई तोंपर्यंत पेशवे कर्जभरू होते. त्यानें त्या नेलेल्या द्रव्याचा बंदोबस्त कोणे प्रकारें केला, व कोणकोणत्या सावकारांकडे ठेविलें, त्याचा अद्यापि ठिकाणा नाहीं, ह्मणून सर्व मराठे लोक आश्चर्य करितात. परशुराम भाऊ पुण्यांत पेशव्याचा कारभारी झाला, ते समयीं शिंदा यास लष्करी खर्चाचा फार तोटा पडला होता, ह्मणून परशुराम भाऊनें त्यास वचन दिलें कीं, 'मी पुष्कळ द्रव्य उत्पन्न करून देतों.' यास्तव तो परशुराम भाऊ मशीरउलमुलकास बोलिला कीं, 'तुमच्या धन्याकडे आमचे सरकारी रुपये तीन कोटि येणें आहेत, त्यांपैकीं त्यापासून या वेळेस कांहीं अंश देवविल्यावर तुह्मांस त्याकडे जावयाची मुक्तता केली जाईल.' त्यावर त्या मशीरउल्मुल्कानें उत्तर दिलें कीं, 'मी या कामाचा उद्योग यथाशक्ति करीन.' असें त्याचें वचन झाल्यावर तो पुण्याजवळ डेरा देऊन रहावयाची आज्ञा पावला. नंतर थोडक्याच वेळानें तो आपल्या त्या तळावर पुष्कळ लोक घेऊन तेथें मोठ्या समारंभानें राहिला.

८. या प्रकारें पुण्याच्या दरबारांत कारभारीमंडळ नवें झाल्यानें बाजीराव व नाना फडनवीस यांचा परस्परें स्नेह वृद्धिंगत होऊं लागला, मग ते एकमेकांस कागदपत्रें पाठवूं लागले. त्या कामांत कोणी शूद्र बाळोजी कुंजर नामें शिलेदार मध्यस्थ होता, तो महाडास जाऊन नानास बाजीरावाच्या हिताविषयीं आग्रहानें कितीएक गोष्टी सांगता झाला; त्या योगे नानाचें मन पहिले बाजीरावाकडे होतें, तें अधिकच झालें. मग त्या नानानें कांहीं युक्ति करून पेशव्याची खासगी फौज बाबूराव फडका याचे स्वाधीन होती, ती त्या फडक्यासुद्धां वश केली, आणि तुकोजी होळकरही आपल्या सर्व लोकांसुद्धां वश होऊन त्या नानाच्या खुणेची मात्र वाट पाहत होता. याखेरीज त्या नानानें रायाजी पाटील नामें कोणी शूद्र बाळोबा तात्याचा द्वेषी होता, त्याचे द्वारें शिंद्याशीं बाजीरावाच्या कार्याचें बोलणें केलें. तो प्रकार असा. नानानें शिंद्यास निरोप पाठविला कीं, 'जर तुह्मी बाळोबा तात्यास बंदींत घालून बाजीरावास गादीवर बसवाल तर तुह्मांस हिंदुस्थानांत जातेसमयीं परशुराम भाऊची सर्व जहागीर व अहमदनगर किल्ला व दहा लक्ष रुपये वर्षास उत्पन्न होतसा मुलूख देऊं.' याशिवाय नानानें तें कार्य सिद्धीस न्यावयाकरितां आणीक एक मसलत योजिली. तो प्रकार असा. सखाराम घाटगा नामें कोणी शूद्र कागलकरांच्या वंशींचा होता, तो माठा चतुर आणि उमेदवार असे, यामुळें रायाजी पाटिलाची त्यावर प्रीति बसला होती, आणि दौलतराव शिंदाही त्यावर प्रसन्न होता, का कीं,

त्याची कन्या अतिसुंदर असे, ती आपली स्त्री करावी, असें तो शिंदा इच्छीत असे. यास्तव नानानें तो सखाराम घाटगा वश करून शिंदा आपणास अनुकूळ व्हावयाविषयी तेंही एक साधन करून ठेविलें.

९. असे दोघे सहाय करून नानानें त्यांचे द्वारें तो शिंदा वश केला. हें वर्तमान बाबूराव फडके वगैरे जे नानाचे पक्षपाती होते, त्यांस कळलें. तें त्यांना तादृश गुप्त रक्षितां आलें नाहीं, त्यामुळें बाळोबा तात्यास तो सर्व वृत्तांत विदित होऊन त्यानें तत्काळ बाबूराव फडक्यास बंदींत घातलें; आणि नीलकंठराव परभू व मालोजी घोरपडे यांस धरावयाकरितां लोक पाठविले; परंतु ते अगोदरच सावध होऊन त्यांनीं बाजीरावाच्या कार्याकरितां लोक ठेविले होते, त्यांस घेऊन त्या धरणारांशीं लढून वांईकडे निघून गेले. तेथें मानाजी फांकडा होता, तो त्यांच्या कुमकेस देऊन नानानें त्यांस कांहीं द्रव्य दिलें, आणि ते साल्प्याच्या घांटास पाठविले. तेथें नानाचा कोणी इष्ट बजाबा शिरोळकर होता, त्याचीही त्यास कुमक मिळून दहा हजार फौज जमा झाली. मग त्यांनीं आपण बाजीरावाचे पक्षपाती असें प्रसिद्ध केलें.

१०. नानानें एवढे लांब लांब पल्ले बांधलेले पुण्यांत बाळोबा तात्यास कळले नाहींत. त्यास हें दहा हजार फौजेचें मात्र बाजीरावाचें कृत्यसें वाटलें. त्यावरून त्या बाळोबा तात्यानें कल्पना केली कीं, बाजीरावासच हिंदुस्थानांत पाठविलें म्हणजे त्याची मसलत मोडेल, असें मनांत ठरवून त्यानें सखाराम घाटगा यास कांहीं फौजेसहित बाजीरावाबरोबर देऊन तो हिंदुस्थानाकडे लाविला. तो प्रवरा नदीचे कांठीं जाई तोंपर्यंत बाजीरावानें तो घाटगा वश केला, तेव्हां त्यानें निश्चित सांगितलें कीं, 'तुमचें हिंदुस्थानांत जाणेंच न व्हावें, आणि शिंद्यानें तुम्हांस गादीवर बसवावें, या कार्यासाठीं मी आपली कन्या दौलतरावास देऊन आणीकही यथाशक्ति उद्योग करीन, परंतु हें काम झालें असतां कागल गांव मला इनाम करून द्यावें; आणि शिंद्याचा कारभार मुख्यत्वें माझे स्वाधीन असावा; याशिवाय सद्यः दोन कोटि रुपये शिंद्यास देऊं केले पाहिजेत. इतक्याही गोष्टी बाजीरावानें मान्य केल्या. नंतर आपल्या शरीरप्रकृतीस बरें नाहींसें निमित्त करून त्या प्रवरा नदीचे तीरींच मुक्काम केला. इतकें होई तोंपर्यंत नानानें आपल्या नव्या नव्या मसलती मोठ्या दक्षतेनें चालविल्या होत्या. तो प्रकार असा. मशीरउल्मुल्काचे द्वारें नानानें गुप्तपणें निझाम अल्ली वश केला, तसाच रघूजी भोंसलाही कांहीं बोलणें करून अनुकूळ करून घेतला, आणि परशुराम भाऊचा मुलूख लुटावयाविषयीं कोल्हापुरकरांस बुद्धि दिली. असें असतां पुण्यांत वर्तमान उठलें कीं, साल्प्याच्या घांटाजवळ बाजीरावाची दहा हजार फौज जमा झाली आहे, तें बंड मोडावयाचें मिष करून परशुराम भाऊची आज्ञा घेऊन मशीरउल्मुल्क नानाच्या हितार्थ फौज जमा करूं लागला.

११. याप्रमाणेंच ते वेळेस शिंदा व होळकर यांनीं बाळोबा तात्या व परशुराम भाऊ यांस ठकवावयाचे मसलतीनें तें बंड मोडावयाचेंच मिष करून कांहीं लोक साल्प्याकडे पाठवून कांहीं नाना फडनविसास धरावयाचें निमित्त करून रायगडाकडे योजिले. मग ती बाजीरावाची गोष्ट नानाच्या पक्षपाती लोकांनीं इंग्लिशांस कळविली असतां तेही मान्य झाले. याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर अक्टोबराचे २७ वे तारिखेस शिंद्यानें बाळोबा तात्यास कैद केलें, आणि मशीरउल्मुल्काची व आपली फौज एकत्र करून परशुराम भाऊ पटवर्धनास धरावयाकरितां पाठविली. तेव्हां तो परशुराम भाऊ सावध होऊन बरोबर चिमणाजी आपास घेऊन कांहीं लोकांनिशीं शिवनेरी किल्ल्यास गेला, परंतु त्याचे पाठीस लोक लागले होते, त्यांस थोडक्या दिवसांतच सांपडला, तो आनंदराव रास्त्याच्या स्वाधीन ठेविला.

१२. इतक्यांत बाजीरावास भीमेच्या कांठीं कोरेगांवीं आणिलें आणि अमृतराव व बाबूराव फडके हे दोघे कैदेंत होते ते मुक्त केले. ते समयीं नाना फडनवीस साल्प्याच्या लष्करांत मिळून पुण्यास जात होता, त्यास वाटेंत कांहीं बाजीरावाकडचें लिहिलें आलें, त्यावरून त्यास कांहीं भीति उत्पन्न होऊन तो तेथेंच राहून त्यानें बाजीरावास लिहिलें कीं, 'जर तुमचें मला अभय असेल तर मी एथून पुढें पुण्यास येईन, नाहीं तर असाच माघारा जाईन.' त्यावरून बाजीरावानें त्या नानाला अभय देऊन आज्ञा दिली कीं, 'तुमच्या मर्जीस आलें तर चाकरी करावी; नाहीं तर न करावी.' ते समयीं शिंदा व निझाम अल्ली यांमध्येंही बाजीरावास आसनावर बसवावयाचा बेत होऊन मुख्य कारभारी नाना असावा असें ठरलें. नंतर नाना फडनवीस पुण्यास जाऊन नवेंबराचे २५ वे तारिखेस पुनः आपलें काम करूं लागला. त्यापुढें डिसेंबराचे ४ थे तारिखेस साताऱ्याकडून वस्त्रें येऊन बाजीरावाची गादीवर स्थापना झाली. ते समयीं सभेमध्यें मोठे मोठे पंडित बसवून त्यांकडून बोलविलें कीं, 'माधवराव नारायण मृत्यु पावला, आणि रघुनाथरावाचे पुत्र आहेत, असें असतां केवळ भाऊबंदकीसंबंधें माधवरावाचे स्त्रीनें दत्तक घ्यावा, हें अशास्त्र ह्मणून होणार नाहीं; आणि चिमणाजी आपा याचा वडील भाऊ असतां याला बलात्कारें राज्यावर बसविलें, तेंही अयोग्य कर्म झालें, यास्तव त्यास कांहीं प्रायश्चित्त पाहिजे.' असें ह्मणून त्याला कांहीं हलकेंसें प्रायश्चित्त देऊन तो गुजराथचा अधिकारी केला; परंतु तो तिकडे न जातां नांव मात्र त्याचें केलें, आणि आंबा शेलूकर नामें त्या कामावर कारभारी पाठविला.

१३. नाना फडनवीस आपलें काम पुनः चालवूं लागला तेव्हां त्यानें आपल्या साहाय्यास त्रिंबकराव परचुरा यास घेतलें, आणि नारोपंत चक्रदेव यास सेनेचें काम

सांगितलें. शिंद्यास अहमदनगर किल्ला देऊं केला होता, त्याप्रमाणें त्याच्या स्वाधीन करून परशुराम भाऊ पटवर्धन याची जहागीर हातीं लागेल तशी घ्यावी ह्मणून आज्ञा देवविली. रघूजी भोंसलाही नानानें कबूल केल्याप्रमाणें सर्व पावून सन १७९७ च्या जुलै महिन्यांत नागपुरास गेला. परंतु नानानें निझाम अलीशीं तह केला होता त्याप्रमाणें बाजीराव ऐकेना, त्यावरून मशीरउलमुल्कास राग येऊन तो पेशव्यांची आज्ञा न घेतां हैद्राबादेस रुसून गेला. त्यामुळें नाना फडनवीस आपण मोठ्या यत्नेंकरून संपूर्ण बंदोबस्ताविषयीं मसलत केली होती, तींत अंतर पडलें असें समजला. त्या वेळेस निझामाचे दरबारीं पेशव्याचा कोणी वकील नव्हता; गोविंदराव पिंगळा पुण्यास होता, परंतु त्याचा कारभारी सदाशिव माणकेश्वर नामें तेथें अकबरनविशीचें काम करून राहिला असे, तो मशीरउलमुल्काचें वैमनस्य नीट करण्याविषयीं उपयोगीं पडला.

१४. बाजीरावास तर त्या बंदोबस्ताच्या न्यूनतेकरून अवघड वाटलें नाहीं; कां कीं, त्याच्या मनांत नानाचें तेज कमी पडावेंसें होतें; आणि ते समयीं ( आगस्ट महिन्याचे १५ वे तारिखेस ) तुकोजी होळकर मृत्यु पावला, तेंही बाजीरावाच्या मनोदयानुरूप झालें. तो प्रकार असा. तुकोजी निवर्तला ते समयीं त्याचे दोघे औरस पुत्र, काशीराव व मल्हारराव, आणि दोघे दासीपुत्र, यशवंतराव व विठोजी असे चौघे होते; त्यांत काशीराव बुद्धीनें आणि शरीरेंकरून अप्रयोजक होता. मल्हारराव शूर आणि सुज्ञ असे. मग थोडक्याच दिवसांत त्या दोघां भावांमध्यें कलह उत्पन्न झाला, तेव्हां ते दोघे दासीपुत्र मल्हाररावाचे पक्षपाती झाले. नंतर मल्हारराव आपल्या बापाचा तळ सोडून पुण्याजवळ भांबुरडें गांव आहे, तेथें थोडक्याशा लोकांनिशीं जाऊन राहिला, त्यास गुप्तपणें नाना अनुकूळ होता. काशीराव आपल्या भावास जिंकावयाकरितां शिंद्यास शरण जाऊन कुमक मागूं लागला. तो शिंदा तर त्या गोष्टीची वाटच पहात होता, त्यास हें समजतांच मोठ्या हर्षानें तो मल्हारराव होळकर यास धरावयाकरितां फौज देता झाला. तेव्हां मल्हारराव होळकर आपल्या भावाचे स्वाधीन न होतां युद्ध करून मृत्यु पावला. तेव्हां यशवंतराव व विठोजी हे दोघे राहिले, त्यांत यशवंतराव तर नागपुरास गेला, आणि विठोजी कोल्हापुरास गेला, तेव्हां बापाचा सर्व अधिकार काशीरावास प्राप्त झाला. ते वेळेस मल्हाररावाचे लोक बहुतेक त्या युद्धांत मृत्यु पावले, त्यांत एक लोणीकर रविराव शिंदा नामें मोठा शूर होता तो मेला. त्याच्या मृत्यूचें वर्तमान त्याच्या स्त्रीचे कानीं पडतांच ती उभी होती तशीच पडून प्राण सोडिती झाली. असा अप्रयोजक काशीराव होळकर शिंद्याच्या बगलेंत शिरल्यामुळें होळकराचें कूळ ग्रस्त

शिंद्याच्या हाताखालीं वागावें लागलें; तेणेंकरून नानास होळकराचें बळ होतें, तें शिंद्यास जाऊन नानाचे योग्यतेचा समूळ नाश झाला, आणि शिंदा पुण्याच्या कारभारांत शिरून स्वतंत्रपणें धन्यासारिखा वागूं लागला. तेव्हां कांहीं वेळां त्यानें असा जुलूम केला कीं, त्यापूर्वीं पेशव्याचे दरबारीं कधींही तसें घडलें नव्हतें. त्यांत कुलाबकर मानाजी आंग्र्या यास बंदींत घालून कुलाबा किल्ला बलात्कारें घेऊन बाबूराव आंग्र्या नामें कोणी आपला आप्त यास दिला. इतकें झालें तरी बाजीरावास तत्संबंधें कोणीं दूषण लाविलें नाहीं. कां कीं, त्यावर पूर्वीपासून लोकांची प्रीति बसली होती.

१५. बाजीराव तर आपल्या कार्यासाठीं शिंद्यास स्वतंत्रपणें वागावयाकरितां गुप्तरूपें अनुकूळ होता, परंतु त्याच्या मनांत असें कीं, शिंदा व होळकर या दोघांतून एकासही न लागतां आपण निराळें असावें. दुसरें त्याच्या मनांत होतें कीं, शिंदा कोणे समयीं तरी आपल्या हिंदुस्थानांत जाईल, तेव्हां सहज त्याचा उपद्रव नाहींसा होईल, परंतु नानाजवळचे जे राहणारे त्यांच्या उपद्रवाचा आधीं बंदोबस्त केला पाहिजे. ही मनांतील गोष्ट बाजीरावानें अमृतराव आपला बंधु व गोविंदराव काळे आदिकरून स्वपक्षपाती मंडळीस विदित केली; परंतु त्याचा परम विश्वास घाटग्यावर होता. ज्या घाटग्यानें बाजीरावाच्या कार्यासाठीं दौलतरावास आपली कन्या देऊं केली होती, त्याच्या नांवास 'सर्जेराव' असें पद जोडिलें होतें, त्यास बाजीरावानें समजाविलें कीं, 'तुह्मी मुख्यत्वें शिंद्याचा कारभार करणार त्यास नाना अडथळा करितो, यास काय करावें?' अशा युक्ति करून त्याशीं व नानाशीं द्वेष पाडिला. नंतर बाजीराव आणि तो घाटगा यांची मसलत झाली कीं, आधीं नानाला अवश्य बंदींत घातलें पाहिजे. मग डिसेंबराचे ३१ वे तारिखेस नाना शिंद्यास परतभेट करावयाकरितां कांहींशा बंदोबस्तानें शिंद्याकडे गेला. तेव्हां तेथें शिंद्याच्या पलटणी लोकांचा कोणी सरदार होता त्यानें नानास कैद केलें. ते समयीं त्याबरोबर सुमारें हजार स्वारीचे लोक होते, त्यांतून कितीएक मारून पिटून लावून दिले. त्या वेळेस नानाबरोबर आबा शेलूकर व बजाबा शिरोळकर व नारोपंत वैद्य वगैरे बंदींत सांपडले. तेच वेळेस सर्जेराव घाटगा यानें आपले शिपाई नाना फडनवीस व त्याचे पक्षपाती गृहस्थ यांचीं घरें लुटावयास पाठविले. ते समयीं जसा कोणी शत्रु एखाद्या किल्ल्यास घेरा घालून फार लढून मग त्या किल्ल्यांत शिरला ह्मणजे मोठा अनर्थ करितो, तशी त्यांनीं पुण्यांत गर्दी केली. तो प्रकार असा. एकदांच चहुंकडे सर्व शहरांत नाकेबंदी होऊन लुटालूट होऊं लागली, आणि मोठी गलबल होऊन कितीएक ठिकाणीं तोडातोडीही झाली; तसेंच एक रात्र एक दिवस

बंदुकांचे बार होत राहिले. ते समयीं शहरचे लोक आपआपले दरवाजे लावून माडीवर चढून खिडक्यांतून बंदुकांचे बार करून त्या लुटारू लोकांशीं लढत होते; आणि कोणास बाहेर पडणें तर दहा वीस जमून ढालतरवारा हातीं घेऊन बाहेर पडत. अशी ते वेळीं पुण्यांत मोठी धामधूम झाली.

१६. जे समयीं शिंद्याच्या तळावर नाना धरला गेला, ते वेळेस बाजीरावानें नानाच्या पक्षींचे जे कारभारी होते, ते कांहीं कामाच्या निमित्तें बोलावून आणून कैद करून बंदीस घातले. त्यांत मुख्य बाबूराव फडके व आपा बळवंत व नारोपंत चक्रदेव व नारो नीलकंठ मुजुमदार व गोविंदराव पिंगळे इतके होते. शिंद्यानें नाना फडनवीस कैद केला, तो अहमदनगरच्या किल्ल्यांत पाठविला. नंतर बाजीरावानें आपला भाऊ अमृतराव मुख्य कारभारी करून गोविंदराव काळे व शिवराम नारायण थत्ते हे दोघे त्याचे हस्तक केले, आणि बाळाजीपंत पटवर्धन लष्करी कामांत केवळ अनाडी असें असतांही मर्जीस्तव लष्करचा मुखत्यार केला. याप्रमाणें बाजीरावानें आपल्या मतें नाना अगदीं नष्ट केलासा जाणून मग शिंद्यास आपणापासून दूर करावयाची योजना आरंभिली. तेव्हां त्याच्या मनांत आलें कीं, शिंदा व घाटगा यांशीं जो पहिला करार केला आहे, त्याप्रमाणें दिल्यावांचून हे दूर जाणार नाहींत, परंतु सांप्रत तदनुसार वागावयाची शक्ति नाहीं, त्यास सावकाशपणें तें काम करितां करितां कांहीं युक्तीनें तो उद्योग सिद्धीस न्यावा, असें मनांत आणिलें.

१७. शिंद्यानें त्या घाटग्याची कन्या ( सन १७९८ चे मार्च महिन्यांत ) वरिली. तो मोठाच समारंभ केला. त्यास खर्चेही बहुत लागला; आणि त्याचें लष्कर पुण्यांत होतें, त्यास दरमहा वीस लक्षांवर खर्च लागत असे, त्यामुळें खर्चास तोटा पडून थोडक्याच दिवसांत शिंद्याजवळ द्रव्याविषयीं फारच अडचण पडली. त्या समयीं तो बाजीरावास पहिले घाटग्यानें गुप्त कबूल केलेले दोन कोटि रुपये मोठ्या निकडीनें मागूं लागला. तेव्हां बाजीरावानें त्यास उत्तर केलें कीं, 'सांप्रत आह्मांस एवढी शक्ति नाहीं, परंतु तुह्मी जर घाटग्यास आपला मुख्य कारभारी कराल, तर तो आणि बाळोजी कुंजर मिळून माहितगारीनें पुण्यांतील द्रव्य उत्पन्न करून तुह्मांस देतील.' त्यास शिंद्यानेंही अनुमोदन दिलें. नंतर ते उभयतां बाजीरावाचे वाड्यांत जे नानाचे पक्षींचे बंदींत घातले होते, ते बाहेर काढून त्यांस द्रव्यासाठीं मारूं लागले. नंतर मोठमोठे पुण्यांतील सावकार व कोणी द्रव्यवंत गृहस्थ होते, त्यांस धरून नाना प्रकारें दुःख देते झाले. त्यांतून कितीएकांनीं द्रव्यही देऊन त्या दुःखानें प्राण सोडिले. त्यांत गंगाधरपंत भानू नामें कोणी नानाचा भाऊबंद होता, त्यास तापविलेल्या तोफेवर बांधिलें, ते समयीं तो तसा तेथेंच मृत्यु पावला. याप्रमाणें सर्जेराव घाटगा

आपल्या जांवयाचा दिवाण होऊन लोकांस नाना प्रकारें दुःख देता झाला; आणि बाजीरावही त्यास अनुकूळ होऊन आपली प्रजा फार कष्टविता झाला. तो सर्जेराव घाटगा एवढा दुष्टपणा करीलसें बाजीरावाचे कल्पनेंत आलें नसेल, परंतु त्या अनर्थाचें कारण तो बाजीरावच झाला. मग त्या सर्जेरावाच्या क्रूरपणाविषयीं बाजीराव शिंद्या-जवळ बोलून त्याच्या उपद्रवाची मनाई करीत असतां शिंदा तें कांहीं ऐकेना. त्यास वाटलें कीं, बाजीराव केवळ लौकिकार्थ दांभिकपणें बोलतो.

१८. बाजीरावानें पूर्वीं शिंद्याशीं गुप्त बोलणें करून दोन कोटि रुपये त्यास देऊं केले होते, व पुढें लोकांस मारून पैका घ्यावयाची मसलत झाली, तें अमृतरावास किमपि ठाऊक नव्हतें. ह्मणून तो सर्जेराव घाटग्याविषयीं फार क्रुद्ध झाला, आणि त्यानें असें पाहिलें कीं, 'सर्व प्रजा शिंद्यास कंटाळली.' त्यावरून तो बाजीरावाजवळ बोलिला कीं, 'एकाएकीं शिंद्यास धरून कैद करावें.' त्या गोष्टीसही बाजीराव अनुकूळ होऊन तो अर्थ सिद्धीस न्यावयाविषयीं संधि पाहूं लागला. असें असतां अमृतराव यानें आबा काळे नामें कोणी पेशव्याच्या पलटणी लोकांचा सरदार होता, त्यास सांगितलें कीं, 'शिंदा आमचे भेटीस आला ह्मणजे आह्मी तुला कांहीं खूण करूं, ते वेळेस तुह्मी गर्दी करून शिंदा धरून कैद करावा.' मग बाजीराव पेशवा यानें 'कांहीं कामासाठीं अवश्य यावें' ह्मणून शिंद्यास आज्ञा पाठविली. मग तो आल्यावर त्यास बाजीराव बोलिला कीं, 'तुमच्या आचरणाचा शोध करावयाविषयीं तुह्मांस बोलाविलें.' इतकें ह्मणून एकाएकीं धनीपणाचे नात्यानें डोळे वटारून शिंद्यास स्पष्ट विचारिता झाला कीं, 'या राज्याचा धनी मी किंवा तूं तें सांग.' तेव्हां शिंदा बाजीरावाचें असें भाषण ऐकून अत्यंत विस्मित होत्साता नम्रतेनें उत्तर करिता झाला कीं, 'मी पेश-व्यांचा चाकर; पेशवे आज्ञा करितील त्याप्रमाणें वागणुकेंत अंतर करणार नाहीं.' त्यावर बाजीराव बोलिला कीं, 'तूं माझ्या रयतेस व माझ्या चाकरलोकांस केवढी पीडा केली, आणि माझ्या शहरांत व माझ्या वाड्यांत माझा फार अनादर केला. यापुढें मला हें सहन होणार नाहीं. यास्तव तूं या वेळेस एथून निघून जांबगांवास जा.' त्यावरही दौलतरावानें शांतपणें उत्तर दिलें कीं, 'मी तुमच्या आज्ञेप्रमाणेंच वागाव-यास इच्छितों. परंतु मला माझ्या फौजेचें देणें फार झालें आहे, त्यामुळें माझें एथून जाणें कसें होईल? मला तुह्मांस गादीवर बसवावयाकरितां बहुत खर्च लागून मी लोकांचा ऋणी झालों, तें द्रव्य मला कृपा करून द्या, ह्मणजे हे वेळेसच मी पुणें सोडून जातों.' असें त्या शिंद्याचें उत्तर होतांच अमृतरावानें भावास खुणेनें विचारिलें कीं, 'मी आतां आबा काळ्यास खूण करूं कीं काय?' तेव्हां बाजीराव भित्रेपणानें त्यास 'खूण कर' असें ह्मणेना. हें त्याचें स्वाभाविक अधीरपण त्याच्या पक्षपाती

लोकांस प्रथम समजून आलें. त्यापुढें त्याचा तो दुर्गुण बहुत वेळां प्रसिद्धीस आला. मग शिंदा त्यापासून उठून दिसण्यांत केवळ गरीबपणानें आपल्या ठिकाणीं गेला, परंतु त्याच्या मनांत बाजीरावाचा अविश्वास आणि राग भरला होता. यावरूनच बाजीरावाचा केवढा अप्रयोजकपणा होता तो विदित होतो. परंतु त्यानंतर कोणीएके वेळेस बाजीरावाची व शिंद्याची गांठ पडली, तेव्हां अमृतरावानें शिंद्यास धरून काय काय करावयाची मसलत केली होती, ती संपूर्ण बाजीरावानें शिंद्यास कळवून 'यापुढें तुह्मी सावध रहा' असें समजाविलें.

१९. त्या वेळेस शिंद्यास लष्कराच्या खर्चाचें जसें संकट पडलें होतें, तसेंच पेशव्यासही पडलें. असें असतां साताऱ्यास कांहीं कामानिमित्त लष्करास जाणें प्राप्त झालें. परंतु रोजमुरा थकल्यामुळें ते सरदार पुणें सोडीनात, त्या योगें पुण्यांत मोठी धामधूम झाली. तिचें निवारण बाळाजीपंत पटवर्धनास करतां येईना. ते समयीं बाळोजी कुंजर पेशव्यांच्या प्रीतींतला ह्मणून फार गर्वास चढून त्यास वाटलें कीं, आपण या गोष्टीचा बंदोबस्त सहज करूं; यास्तव तो शिपाई लोकांत जाऊन कांहीं अमर्याद बोलूं लागला, तेव्हां त्यांनीं त्याचा उपहास करून त्याची अनेक प्रकारें अमर्यादा करून शेवटीं त्याच्या पागोट्यावर धबला मारून पागोटें रस्त्यांत पाडून शिपाई लोक लाथांलाथांनीं तें एकमेकांच्या आंगावर उडवूं लागले. अशी पुण्यांत धुंदाई झाली. ते समयीं गोविंदराव पिंगळा बंदींत असतां त्यानें बाजीरावास निरोप पाठविला कीं, 'या वेळेस जर नारोपंत चक्रदेव यास मुक्त केलें, तर हा सर्व बंदोबस्त होईल, नाहीं तर फारच अनर्थ पडेल.' ती गोष्ट बाजीरावाच्या मनास येऊन त्यानें नारोपंत चक्रदेव यास मुक्त करून गोविंदरावासही सोडिलें. त्या नारोपंत चक्रदेवाची शिपाई लोकांत मोठी मान्यता होती, त्यानें बंदींतून मुक्त होतांच एका दिवसांत संपूर्ण बंदोबस्त केला, परंतु तें लष्कर साताऱ्यास गेलें नाहीं; कां कीं, नारोपंत चक्रदेवास बाजीरावाचा विश्वास वाटेना; यास्तव तो फौजेस आपणापासून दूर करावयास इच्छीत नव्हता; आणि पुण्यांतही शिपाई लोकांची गरज होती, यामुळें लष्कराची योजना साताऱ्यास झाली नाहीं. त्यावरून पुढें परशुराम भाऊ पटवर्धनाच्या सुटकेचाही योग घडला. तें प्रकरण असें. बाजीराव ज्या वेळेस गादीवर बसावयाच्या योजनेंत होता त्या वेळेस त्यानें साताऱ्याच्या राजाशीं मसलत केली कीं, 'नानाचा ठेवणाईत तुह्मांजवळ बाबूराव कृष्ण आहे, तो बंदीस घालून किल्ला आपले स्वाधीन ठेवावा, आणि मला पुण्याच्या गादीचा अधिकार प्राप्त झाला असतां मी पहिल्या बाजीरावाप्रमाणें वागेन.' तें तत्काळ मान्य करून राजानें तो बाबूराव कैद करून किल्ला आपले स्वाधीन रक्षिला. नंतर नाना फडनवीस भ्रष्ट झाल्यावर बाजीरावानें शिवराम नारायण

थत्ते यास सातान्याच्या राजाकडे किल्ला मागावयास पाठविलें. तेव्हां राजानें उत्तर दिलें कीं, 'मी किल्ला संभाळितों; आणि पेशव्यानें आपल्या वचनाप्रमाणें वागावें.' हें वर्तमान ऐकून बाजीराव आपल्या कृत्रिमाचा परिणाम नीट न झाला, असें समजून भययुक्त होत्साता माधवराव रास्ता यास बोलिला कीं, 'सातान्याच्या राजापासून किल्ला माझे सत्तेंत येईसा करा.' तेव्हां तो माधवराव सातान्यास गेला, ते वेळेस राजा आपल्या सख्या सोयन्यांच्या मसलतीनें रास्त्याची नम्रतेची गोष्ट व धमकीची गोष्टही मानीना. असें बाजीरावाचें आचरण शिंद्यास विदित होऊन तो समजला कीं, 'बाजीराव मजशींही कुटिल मार्गानें वागतो;' ह्मणून त्यानें सातान्याच्या राजास गुप्त मसलत दिली कीं, 'तुह्मी किल्ला देऊं नका; आह्मी आपलीं पांच पलटणें तोफांसुद्धां तुह्मांस पाठवून देऊं; तुह्मी ब्राह्मणांच्या उपद्रवापासून मुक्त असावें हेंच योग्य.' असें झाल्यावर तो राजा फौज ठेवूं लागला. त्यास माधवराव रास्ता अडथळा करावयास उद्युक्त झाला असतां राजाच्या लोकांनीं सातान्यांतून पिटून तो माधवराव माले-गांवापर्यंत घालविला. असें असतां त्या माधवरावाचा बाप आनंदराव रास्ता याचे स्वाधीन परशुराम भाऊ पटवर्धन होता, त्यानें आनंदरावास सुचविलें कीं, 'मला जर आज्ञा होईल तर मी लोक ठेवून सातान्याचे धामधुमीचा बंदोबस्त करीन.' ती गोष्ट आनंदरावानें बाजीरावास कळवून परशुराम भाऊस सोडवून त्याचे आज्ञेनें आनंदराव रास्ता व परशुराम भाऊ या दोघांनीं वांईजवळ फौज जमा केली. इतकं होई तों सातान्याच्या राजाचे लोक त्या शहरांत स्वस्थ राहिले होते; कां कीं, ते समयीं पर्जन्य प्रबळ होता, ह्मणून ते समजले कीं, या वेळेस वेणानदी उतरून लष्कर येणार नाहीं, परंतु परशुराम भाऊला एक उताराची जागा सांपडली, तेव्हां तो कोणास कळूं न देतां दहा हजार फौजेसहित वेणानदी उतरून अकस्मात् सातान्याजवळ जाऊन पोहों-चला. ते समयीं ते राजाचे लोक असे असावध होते कीं, त्यांनीं कोणी येईल, तें वर्तमान कळावयास नाक्यानाक्यांनीं टोळ्या ठेवाव्या त्याही ठेविल्या नव्हत्या. मग ते परशुराम भाऊचे लोक शहराजवळ भिडले असतां राजाची फौज ते वेळेस अडीच हजार सुमारें शहरांत होती, ते लोक पळूं लागले. तेव्हां राजाचा भाऊ चतुरसिंग ह्मणून होता, तो राजाच्या मसलतदारांत मुख्य होता, तो व त्याचे सोयरेधायरे एलोजी मोहिते, सेनाजी मोहिते, वगैरे होते ते त्या पळणारांची थोपाथोपी करून परशुराम भाऊच्या लष्कराचे तोंडावर गेले. इतक्यांत राजाला आपल्या माणसांसुद्धां किल्ल्यावर चढावयाकरितां अवसर सांपडला. तो वर गेला. इकडे जे लोक परशुराम भाऊच्या तोंडावर गेले होते, ते वेगेंकरून कांहींसे पुढें जाऊन युद्ध करिते झाले, परंतु त्यांचा उपाय चालेना. त्यांतील एलोजी मोहिता ठार

पडला, आणि कुशाबा राजा महाडीक व दुर्गाजी राजा महाडीक हे फार जखमी झाले. तेव्हां चतुरशिंगाच्या आज्ञेनें राजाचे लोक मागें फिरले, तरी सेनाजी मोहिता शत्रूस पाठ दाखवीना. त्यानें चहुंकडे पाहिलें तों माधवराव रास्ता त्याचे दृष्टीस पडला. त्यासभोंवते त्याचे लोक असतांही तो त्यावर एकटाच धांवला, तेव्हां त्या रास्त्याच्या लोकांनीं त्याचे तोडतोडून तुकडे तुकडे केले. यानंतर परशुराम भाऊचे लोक सातार्‍यांत शिरून लुटालूट करूं लागले, तेव्हां चतुरशिंग आपल्या बरोबर कांहींसे लोक घेऊन सातारा सोडून निघाला. ते समयीं परशुराम भाऊचे कांहीं लोक त्याचे पाठीस लागले असतांही तो कोल्हापुरच्या राजास जाऊन मिळाला. इकडे राजाला सातार्‍यास खावयास मिळेनासें होऊन तो परशुराम भाऊच्या स्वाधीन झाला. याप्रमाणें तें कार्य सिद्धीस गेल्यावर परशुराम भाऊला आज्ञा झाली कीं, 'आतां फौजेस निरोप द्यावा.' त्यावर परशुराम भाऊनें उत्तर केलें कीं, 'ही गोष्ट सांप्रत होत नाहीं; कां कीं, या लोकांचें मला बहुत देणें झालें आहे; मजविषयीं स्वामींनीं शंका धरूं नये. मी सरकारचा विश्वासू चाकर आहें.' त्यावरून बाजीरावानें त्यापासून दहा लक्ष रुपये गुन्हेगारी घेऊन त्याच्या पहिल्या अन्यायांची क्षमा केली.

---

## भाग एकुणतिसावा.

### ( इसवी सन १७९८ पासून सन १८०० पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. शिंद्याच्या बायांचें वर्तमान.—२. त्या बायांनीं दंगा उत्पन्न केला आणि अमृतरावाच्या लष्करांत आश्रय पावल्या.—३. पेशवे व शिंदे यांचें वैमनस्य पडलें व शिंद्यानें नानास मुक्त केलें.—४. नंतर शिंदा आणि पेशवा यांचें पुनः ऐक्य झालें व सर्जेराव घाटगा यास शिंद्याच्या आज्ञेनें प्रतिबंध झाला.—५. इंग्लिशांनीं निझाम अल्ली व पेशवे यांशीं तह केला.—६. नाना फडनवीस व बाजीराव यांच्या कांहीं गोष्टी व बाजीरावाचें कुटिल वृत्त.—७. इंग्लिशांनीं श्रीरंगपट्टण घेतल्याचें वर्तमान.—८. त्या मुलुखाची वांटणी केली तें प्रकरण.—९. इंग्लिश आणि निझाम अल्ली यांमध्यें नवा तह झाला.—१०. बायांचें फार वाढलेलें बंड तें मोडावयास शिंद्यानें बाळोबा तात्यास बंदीतून मुक्त केलें.—११. कोल्हापुरचें कांहीं वर्तमान. चतुरशिंग राजा यानें युद्ध केलें तो प्रकार.—१२. परशुराम भाऊ पटवर्धन युद्धांत पराजय पावून मृत्यु पावला.

१. पुण्यामध्यें शिंद्याची दुर्दशा होत गेली तिच्या वृद्धीचें कारण असें उद्भवलें कीं, तें शिंद्याचे कल्पनेंतच आलें नव्हतें. महादजी शिंदा मेला ते समयीं त्याच्या तिघी स्त्रिया होत्या; त्यांत धाकटी भागीरथीबाई, ती रूपवती आणि तरुण असे. पुढें दौलतराव शिंदा त्या गादीचा अधिकारी झाला, तेव्हां त्यानें निश्चय केला कीं, 'मी या तिघी बायांचा मान चांगला रक्षीन.' नंतर त्या दौलतरावानें त्या तिघींस आपल्याजवळ ठेवून त्यांचा खर्च चालविला; परंतु त्या खर्चाचा नेम बांधिला नव्हता. त्यावरून थोडक्याच वेळानें असें झालें कीं, त्या बायांस कांहीं पदार्थांचें अगत्य पडलें

असतां तो त्यांना प्राप्त झाला नाहीं. तेव्हां त्या बायांनीं तो बोभाट शिंद्यापर्यंत जाऊं न देतां, त्यांत वडील जी होती तिनें लोकांत असें उठविलें कीं, 'हा दौलतराव शिंदा आह्मांपेक्षां जी धाकटी बाई तिशीं बलात्कारें संग करूं इच्छितो;' आणि दुसरें बोलूं लागली कीं, 'जो असा मात्रागमनी पुरुष तो उत्पन्न होण्यास शुद्ध बीज नसतें.' तेव्हां सर्जेराव घाटग्यानें दौलतराव शिंद्याचा पक्ष स्वीकारून त्या बायांशीं बोलणें करावयास इच्छिलें, परंतु त्या बाया त्यास आपले जवळ येऊं देईनात. तेव्हां तो दुष्ट बळेंच त्यांच्या रावटींत शिरून त्या बायांस हातीं धरून बाहेर ओढून कोरड्यांचा मार देता झाला. या प्रकारें त्या बायांचा त्यानें अपमान केला.

२. त्या महादजी शिंद्याच्या राज्यांत मुख्य कारभारी शेणवी होते, ते व त्यांचे कितीएक सोयरेधायरे यांनीं त्या सर्जेरावाची योग्यता वृद्धिंगत झालेली पाहून आधींच त्याशीं द्वेष आरंभिला होता. त्यावर त्याचें हें अनुचित कर्म पाहून त्या बायांचे पक्षांत शिरून त्या सर्जेरावाशीं बहुत वादविवाद केला, आणि शेवटीं ठरविलें कीं, शिंद्यानें बायांच्या खर्चाचा बंदोबस्त त्यांच्या मानाप्रमाणें करून द्यावा, आणि बायांनीं एथून जाऊन बऱ्हाणपुरीं स्वस्थ असावें. याप्रमाणें नेम ठरल्यावर त्या बायांचे बरोबर कांहींसे स्वार देऊन सन १७९८ च्या मे महिन्याचे १४ वे तारिखेस त्या बाया पुण्याहून शिंद्यानें रवाना केल्या. त्या भीमेचे कांठीं कोरेगांवीं पोंहचतात तों पुण्यामध्यें त्या शेणवीमंडळीस वर्तमान कळलें कीं, 'शिंद्यानें एथून त्या बाया बऱ्हाणपुरीं पोंहचवावयाचें निमित्त करून काढिल्या; त्या अहमदनगरच्या किल्ल्यांत बंदीस घालावयाकरितां नेल्या.' तेव्हां त्यांनीं तत्काळ एक आपला पक्षपाती केलेला शिंद्याजवळ हिंदुस्थानी स्वारांचा सरदार मुजफरखान नामें पठाण होता, तो त्या बायांना सोडवून आणावयाकरितां पाठविला. तो तेथें त्वरेनें जाऊन त्यानें त्या बाया सोडवून पुण्याजवळ माघाऱ्या आणिल्या. नंतर त्या मुजफरखानच्या पारिपत्याविषयीं सर्जेरावानें शिंद्याजवळ फार आग्रह धरिला, तेव्हां त्या घाटग्यास त्या पठाणावर जावयाची आज्ञा झाली. हें वर्तमान समजून त्यानें बाजीरावाचा भाऊ अमृतराव याचा तळ जुन्नराचे वाटेस भीमेचे कांठीं होता, तेथें त्या बाया नेऊन मोठ्या बंदोबस्तांत ठेविल्या. ते समयीं तो घाटगा स्वयें त्या पठाणांचे पाठीस लागलेला होता, त्यावर तो पठाण माघारा उलटून त्याचा पराभव करून मोठ्या मानानें त्या बायांकडे पुनः गेला. त्या दिवसापासून पुढें जून महिन्याचे ७ वे तारिखेपर्यंत त्या बाया व तो मुजफरखान स्वस्थ तेथेंच होतीं. त्या रात्रीं अमृतरावाच्या तळावर छापा घालावयाकरितां शिंद्याचीं पांच पलटणें येऊन पोंहचलीं, परंतु ते लष्करी लोक सावध होऊन त्यांनीं त्या पलटणी लोकांस मागें फिरविलें.

३. त्यानंतर शिंदा यानें पुनः त्या शेणवीमंडळीशीं कबूल केलें कीं, 'त्या बायांच्या मर्जीस येईल तेथें त्यांनीं राहावें; मी त्यांच्या मानाप्रमाणें त्यांचा खर्च चालवितों.' असें दुसऱ्यानें त्या बायांचें आणि शिंद्याचें ऐक्य झालें. तेव्हां तो शिंदा पुनः घात करील, असें न जाणून अमृतराव त्या बायांस घेऊन लष्करसुद्धां खडकीच्या पुलाजवळ येऊन राहिला. तो कितीएक दिवस तेथें होता. त्यास शिंद्याचा पुरता भरंवसा वाटल्यावर ज्या दिवशीं त्या अमृतरावाच्या लष्करचे मुसलमान लोक ताबूत पाण्यांत बुडवावयास सिद्ध झाले, त्या दिवशीं सर्जेराव घाटगा शिंद्याचें व अमृतरावाचें लष्कर यांचा तंटा न व्हावा, ह्मणून त्यांच्या बंदोबस्ताच्या मिषेंकरून आपल्याबरोबर तोफा व पलटणी लोकांचे दोन ब्रिगेड घेऊन त्या लष्कराजवळ नदीचे कांठीं जाऊन पोंहोचला. तेव्हां अमृतरावाचे लष्करी लोक यांस त्या शिंद्याचें कृत्य किमपि विदित नव्हतें ह्मणून ते विश्वासेंकरून स्वस्थ राहिले असतां एकाएकीं त्या घाटग्यानें त्यांवर पंचवीस तोफांचा मार चालविला, आणि पलटणी लोक पुढें घालवून हल्ला करून त्यांची अगदीं उधळाउधळी होऊन त्यांचा तळ लुटला. त्या वेळेस त्या बाया अमृतरावाचें लष्कर सोडून अगोदरच विठ्ठलवाडी गांवीं जाऊन राहिल्या होत्या. त्या योगें तें युद्ध बायांसंबंधें झालेंसें दिसलें नाहीं; पेशवे व शिंदे हे आपापल्याच आकसानें लढले असा अर्थ झाला. त्या दिवसापासून शिंदे व पेशवे यांचीं युद्धें निःसंशयपणें चालू झालीं, असें दिसण्यांत आलें. तेव्हां काशीराव होळकर अमृतराव यास मिळाला, आणि मोठे मोठे मानकरीही त्या अमृतरावाच्या पक्षासच अनुसरले. नंतर पेशवे व निझाम यांचें ऐक्य झालें. असें असतां शिंदा यास मोठी भीति उत्पन्न होऊन त्यास वाटलें कीं, 'आतां कसेंहीकरून आपल्या हिंदुस्थानांत जावें; परंतु शिपाई लोकांचें देणें त्यास फार झालें होतें, त्यामुळें पुण्याहून त्याचें निघणें होईना; ह्मणून पेशव्यांनीं जसा निझामाशीं स्नेह केला, तसाच त्या शिंद्यानेंही बाजीरावास भय उत्पन्न व्हावयाकरितां टिपूशीं स्नेह करावा ह्मणून वकील पाठविला. तें समजून बाजीरावानेंही त्या टिपूकडे आपला वकील पाठविला. नंतर दौलतरावानें बाजीरावास भय व्हावयासाठीं नाना फडनविसास सोडावें हेंच उत्तम, असें जाणून नानाशीं बोलणें लाविलें. शेवटीं ठरलें कीं, दहा लक्ष रुपये नानानें दिले असतां त्याची मुक्तता होईल. तें मान्य करून नाना त्या अहमदनगराहून सुटून निघाला. ही गोष्ट बाजीरावास अनिष्ट तथापि अगोदरच त्यास समजलें होतें कीं, नाना फडनविसास शिंदा सोडील.

४. तो नाना सुटतांच बाजीराव पेशवा यानें निझामाशीं तह केलेला टाकून शिंद्याशीं व नानाशीं तहाचें बोलणें लाविलें. त्या दिवसापासून बाजीराव व शिंदा

यांची मैत्री वाढूं लागली. त्या मैत्रीचे वृद्धीस एक कारण उपयोगीं पडलें. तें असें; सर्जेराव घाटगा फकीरजी गाढवे नामें कोणी एक मराठा अनुकूळ करून प्रजेस अनेक प्रकारें उपद्रव देत होता, त्याचें निवारण शिंद्यासही होईना. तो घाटगा क्रूरपणा करितां करितां त्यास दुष्कर्मांचा असा अभ्यास झाला होता कीं, त्याच्या निर्दयपणास अंतच नाहीं; त्यानें कोणेएके वेळेस शिंद्याच्या लष्करचे चार सरदार धरून त्यांतील तिघे बायांचे पक्षपाती असें निमित्त करून तोफांचे तोंडीं देऊन उडविले, आणि चवथ्याच्या डोकीवर मेख ठोकून त्यास जिवें मारिलें. असा त्याचा निःसीम दुष्टपणा पाहून शिंदा त्यावर कोपला; आणि त्या घाटग्याला फकीरजी गाढव्यासुद्धां बंदींत घालावयाची आज्ञा देता झाला. त्याप्रमाणें ते कैद झाल्यावर शिंद्याशीं व बाजीरावाशीं स्नेह होण्यास पूर्वींचें तें एक द्वेषाचें कारण नाहींसें झालें.

५. याखेरीज त्या वेळेस कलकत्त्याच्या मुख्याची बदली होऊन त्याचे जागीं लॉर्ड मॉर्निंग्टन् नामें साहेब आला, त्यास 'मार्किस् वेलेस्ली' असेंही ह्मणत. त्या लॉर्डानें पहिल्या इंग्लिशांच्या रीतींत कांहीं अंतर केलें. तें असें. त्यांची अगोदरच चाल होती कीं, तादृश अडचण पडल्यावांचून परक्याच्या मसलतींत शिरूं नये. तें सोडून त्या साहेबानें हैदराबाद व पुणें या दोहों दरबारांशीं स्नेह करावयाचा उद्योग पुनः आरंभिला. कां कीं, त्यास असें भय होतें कीं, टिपू फ्रेंचांचें साहाय्य संपादून निझाम व शिंदा यांशीं स्नेह करून इंग्लिशांस बाधक होईल. त्यावरून त्या साहेबाची मसलत होती कीं, शिंद्यास निझाम अली व टिपू यांपासून दूर हिंदुस्थानांत घालवावें, ह्मणून त्या शिंद्यास असें समजाविलें कीं, 'आफगाण लोक हिंदुस्थानांत तुह्मांवर येताहेत;' आणि बाजीरावास कळविलें कीं, 'शिंदा हिंदुस्थानांत गेला ह्मणजे तुमच्या राज्याच्या बंदोबस्ताकरितां आह्मी आपली फौज तुमचे चाकरीस पाठवून देऊं.'

६. हें काम बाजीराव यापूर्वीं इंग्लिशांस सांगत होता, तेव्हां ते त्यास अनुकूळ होईनात; त्यावरून त्या बाजीरावाच्या मनांत आलें कीं, एकाएकीं आपणास इंग्लिश अनुकूळ झाला, यांत कांहीं नानानें दग्याची मसलत केली असेल. तो असें समजला नाहीं कीं, विलायतेहून नवा साहेब येऊन पहिल्या चालींत अंतर पडलें. बाजीराव असा नानाविषयीं शंकित होऊन शिंद्यास हिंदुस्थानांत जावयाचा निरोप झाल्यावर तो तिकडे जातो असें ठरलें, आणि बाजीरावाचा व नानाचा स्नेह झाला, असें लोकांत प्रसिद्ध झालें असतांही शिंद्यास हिंदुस्थानीं न जाण्याविषयीं बाजीरावानें गुप्त सांगून पाठविलें कीं, 'या समयीं तुह्मीं पुणें सोडून जाऊं नये. कां कीं, नाना इंग्लिशांस आणून दगा करील.' असें शिंद्याशीं बोलणें होत असतां बाजीराव नाना फडनविसास ह्मणत असे कीं, 'तुह्मी शिंद्याचा तळ सोडून शहरांत येऊन आपलें काम

संभाळाल तर मोठा उपकार होईल.' त्यावरून नाना पुण्यांत येऊन राहिला, परंतु त्यानें असा आग्रह धरिला कीं, 'तुह्मापासून माझ्या शरीरास आणि द्रव्यास भय होणार नाहीं, असें निझाम आणि इंग्लिश यांचें खातरीचें सांगणें पाहिजे; तेव्हां मी तुमच्या कारभारांत शिरेन; आणि हें घडलें असतां मला आधीं शिंदा हिंदुस्थानांत लावून द्यावा लागेल.' नंतर नानानें शिंदा हिंदुस्थानांत जावयासाठीं आपल्या जवळचे पंधरालक्ष रुपये त्यास दिले, व दाहालक्ष रुपये आपल्या मुक्ततेविषयीं देऊं केले होते, ते त्या शिंद्यास पूर्वीं दिलेच होते. नंतर बाजीराव पेशवा समजला कीं, 'शिंदा खचित जाणार आहे,' यास्तव त्याच्या मनांत आलें कीं, कोणास न कळतां एकांतीं नानाची गांठ घालून त्यास समजवावें कीं, 'मीं तुमचें कांहीं वांकडें केलें नाहीं,' अशा युक्तीनें तो वश करावा. त्यावरून त्यानें आपल्या बरोबर एक मनुष्य घेऊन मध्यरात्रीं नानाचे घरीं जाऊन त्याची भेट घेतली. तो बाजीराव बोलण्यामध्यें पक्का मायावी होता, त्यानें शिंद्यास सांगून नानास उपद्रव दिला होता, तें नानाचे मनांतलें जावें ह्मणून 'जें केलें तें शिंद्यानें केलें, त्यांत माझी कृति किमपि नाहीं,' असें समजावून बोलिला कीं, 'तुमचे कारभारी यांस मीं आपल्या बंदींत ठेविलें, हेंही त्यांच्या हितार्थच केलें; कां कीं, त्यांस शिंद्याचा उपद्रव न लागावा.' शेवटीं आपलें सांगणें नानास खरें वाटलें असें निश्चित जाणून तो बाजीराव नानाच्या पायांवर डोकें ठेवून बोलिला कीं, 'तुमच्या पायांचीच शपथ, मी इतःपर तुह्मास आपल्या बापाप्रमाणें मानीन, आणि तुमच्या सांगण्यावांचून कांहीं करणार नाहीं.' इतकें बोलून तात्काळ डोळ्यांत पाणी आणून ह्मणूं लागला कीं, 'या समयीं ब्राह्मणांच्या राज्यास अपायकारक दोन कारणें झालीं आहेत; त्यांत एक तर आमच्या मराठ्यांत परस्परें वैमनस्यें पडलीं, आणि दुसरें इंग्लिश लोकांस या राज्याविषयीं लोभ उत्पन्न झाला; यास्तव या वेळेस तुह्मीं आपल्या बुद्धिकौशल्येंकरून या सर्व गोष्टींचा बंदोबस्त केला पाहिजे.' असें बाजीराव पेशव्याचें कृत्रिम असतां नाना फडनविसास सत्य वाटून तो प्रथम निझाम अल्ली व इंग्लिश यांची जामीनकी मागत होता, तें सोडून सन १७९९ च्या अक्टोबराचे १५ वे तारिखेस निःसंशयपणें कारभार चालवूं लागला. त्यांतच त्याची बुद्धि चकली. कां कीं, तो आपलें काम करूं लागतांच त्यास यशवंतराव घोरपडा यानें जाऊन सांगितलें कीं, 'हल्लीं तुह्मास बंदींत घालावयाविषयीं बाजीराव पुनः शिंद्याकडे आग्रहाचे निरोप पाठवितो.' ही गोष्ट नानानें शिंद्यास विचारून खरीशी मानिली. तेव्हां तो नाना फडनवीस लागलाच बाजीरावाकडे जाऊन त्यास बोलिला कीं, 'तुह्मी मला मोठा विश्वास देऊन दगा करावयास कसे प्रवृत्त झालां? मी आपल्या वृद्धपणानें व दुर्दशेनें मृतप्राय झालों, त्या माझ्या प्राणाचा नाश कां चिंति-

तां? मी तुमच्या कारभारांत आपल्या महत्त्वासाठीं शिरलों नाहीं; केवळ सरकारचे हिता-साठीं या कामाचा स्वीकार मीं केला. त्यास जर तुह्माला माझें भय वाटत असेल तर अगदीं जेथें दरबारी कारभार नाहीं, असे रिकामे जागीं जावयास मला सांगा; मी तेथें स्वस्थ राहीन.' त्यावर बाजीरावानें उत्तर केलें कीं, 'यांतील कांहींएक मला ठाऊक नाहीं, आणि मजपासून कदापि असें घडावयाचें नाहीं, असें असतां ज्यानें तुह्मास माझें नांव सांगितलें असेल तो मला दाखवा.' हें वर्तमान शिंद्यास कळतांच त्यानें बाजीरावाचे मुख्य कारभारी गोविंदराव काळे व शिवराम नारायण थत्ते हे उभयतां धरून कैद केले. कां कीं बाजीरावानें आपल्यावरला शब्द उडविला तो त्यांवर आला, त्यायोगें ते बंदींत पडून त्यांचें सर्वस्व गेलें. तथापि त्यांनीं बाजीरावाचें नांव सांगितलें नाहीं. हा एक मराठे लोकांचा जातिस्वभावच आहे कीं, कसेंही संकट प्राप्त झालें असतां तें सहन करून आपल्या स्वामीवर शब्द येऊं देऊं नये. तें बाजीरावाचें कृत्य त्या दोघां कारभाऱ्यांनीं आपणावर घेतलें, यास्तव नाना फडनविसास कांहींसा विश्वास वाटून त्यानें कारभार चालविला. यापूर्वी सन १७९८ च्या सप्टेंबर महिन्यांत निझामाशीं आणि इंग्लिशांशीं असा तह झाला होता कीं, निझामानें आपल्या जवळचीं फ्रेंच लोकांनीं शिकविलेलीं पलटणें दूर करावीं, आणि फ्रेंच लोक चाकरीस न ठेवावे. याबद्दल एकएका पलटणास हजार हजार लोक अशीं इंग्लिशांकडचीं सहा पलटणें चाकरीस ठेवावीं. यामध्येंच इंग्लिशानीं सुचविलें कीं, 'पेशव्यांशीं व तुह्मांशीं कांहींएकसंबंधें वाद पडला असतां आह्मी तो कलह तोडावयाचा उद्योग करूं.' या प्रकारेंच तह इंग्लिशांनीं पेशव्यास दर्शविला. परंतु बाजीरावास त्यांचा विश्वास वाटेना, ह्मणून तो तह त्याच्या मनास आला नाहीं. असें असतां नानाची मसलत ऐकून त्यानें उत्तर दिलें कीं, 'तह माझ्या मनोदयानुरूप झाला नाहीं, तथापि आजपर्यंत तुह्मांशीं व आह्मांशीं जो तह झाला आहे, त्यांत मजकडून अंतर पडावयाचें नाहीं. कदाचित् टिपूशीं आणि तुह्मांशीं युद्ध झालें तर मी तुमचें साहाय्य करीन.' असें बाजीरावानें इंग्लिशांस उत्तर दिलें, तें योग्य दिसलें, परंतु त्याचे अंगीं एवढें धैर्य व प्रामाण्य नव्हतें. नानानें त्या वेळेसही बाजीरावास सांगितलें कीं, 'इंग्लिशांशीं प्रामाणिकपणेंच वागावें, तें न केल्यास नाशच होईल.'

७. यानंतर इंग्लिशांनीं टिपूशीं युद्ध आरंभिलें असतां नानानें इंग्लिशांच्या कुमकेस मराठी लष्कर पाठवावयाची योजना केली. परंतु बाजीराव दौलतराव शिंद्याच्या मसलतीनें चाले, ह्मणून तें घडलें नाहीं. बाजीराव यानें आपले मनांत कल्पना केली कीं, टिपू व इंग्लिश या दोघांत एकाचा जय होईतोंपर्यंत दोघांशीं समान स्नेह ठेवून शेवटीं जो जयवंत होईल त्यास आपण मिळावें; परंतु त्याचें लक्ष

इंग्लिशांपेक्षां टिपूकडे विशेष असे. त्यानें नाना फडनविसास न कळतां टिपूपासून तेरालक्ष रुपये घेतले होते; याशिवाय त्यानें शिंद्याशीं मसलत केली होती कीं, समयविशेषीं आपण दोघांनीं मिळून निझामाचे मुलखीं जाऊन त्याचा पराभव करून लोकांत असें प्रसिद्ध करावें कीं, आपण टिपूचेच सहाय, इंग्लिशांचे नव्होंत. अशी पुण्यांत बाजीराव पेशवा व दौलतराव शिंदा हे दोघे मसलत करीत असतां अकस्मात् वर्तमान आलें कीं, इंग्लिश व टिपू यांचें युद्ध होऊन टिपूची राजधानी श्रीरंगपट्टणसुद्धां तें सर्व राज्य इंग्लिशांचे हातीं लागलें. त्या प्रसंगीं टिपूही मृत्यु पावला. हें वर्तमान मोठें आश्चर्यकारक ऐकून शिंदा आणि बाजीराव हे तात्काळ मोठा हर्ष पावल्याप्रमाणें दर्शवूं लागले, व आपण आपले लोक इंग्लिशांच्या साहाय्यास न पाठविले, तो दोष नानाकडून घडला, असें ठरवून तात्काळ धोंडोपंत गोखला कर्नाटकचा सरसुभेदार इंग्लिशांचे साहाय्यास पाठविला. तो तिकडे जाऊन पोहोंचतांच त्यानें टिपूचा मुलूख इंग्लिशांकडे गेला होता, तो कांहीं कांहीं लुटला. याशिवाय कांहीं उपयोगी असें त्यानें एक काम केलें तें असें; कोणी धोंडी वाघ नामें त्या मुलखींचा लुटारू श्रीरंगपट्टणाहून पळालेला असे, तो रयतेस फार उपद्रव देत होता, त्यावर धोंडोपंतानें छापा घालून त्याच्या लोकांचा बेत विसकटून दाणादाण केली. त्यानंतर तो धोंडी वाघ तेथून निघून कोल्हापुरचा राजा पेशव्याशीं लढत असतां त्याचे चाकरीस जाऊन राहिला. दौलतराव शिंदा यानें टिपूच्या नाशाचें वर्तमान ऐकून तात्काळ श्रीरंगपट्टणास लोक पाठवून त्यांस आज्ञा दिली कीं, 'कोणी टिपूचे पक्षपाती असतील त्यांस अभय देऊन पुनः युद्धाची तयारी करवावी.' असें असतां, कर्नल पामर नामें साहेब इंग्लिशांचा वकील पुण्यांत होता, त्यास शिंद्यानें निरोप पाठविला कीं, 'तुम्ही मोठे जयवंत झालां, त्या योगें आम्ही अत्यंत हर्ष पावलों.'



टिपू सुलतान.

८. टिपूचा मुलूख इंग्लिश आणि निझाम अली या दोघांनीं मिळून घेतला असतां त्याच्या वांटणीविषयीं निझाम अलीनें किमपि चौकशी न करितां केवळ इंग्लिशांच्याच कृतीवर विश्वास ठेविला, तेव्हां मार्किस् वेलस्ली साहेब यानें त्या वांटणीप्रकरणीं बंदोबस्त केला. तो प्रकार असा; म्हैसूरचा राजा हैदर अलीनें

जिंकिला होता, त्याच्या वंशींच्या पुरुषाचा शोध करून त्यास त्याचे गादीवर बसविलें. ते समयीं टिपूच्या मुलखाचा वसूल तीसलक्ष चाळीसहजार होन उत्पन्न होत होता, त्यांपैकीं त्या राजास तेरालक्ष साठहजार होन नेमिले, आणि निझाम अल्लीस पांचलक्ष तीसहजार देऊन आपणांस पांचलक्ष सदतीसहजार ठेविले; आणि हैदर व टिपू यांच्या परिवारास दोनलक्ष चाळीसहजार देऊन ते दोघे आपले स्वाधीन ठेविले होते; आणि टिपूचा कोणी सरदार कमरुद्दिन नामें होता, तो व त्याचा परिवार निझाम अल्लीचे स्वाधीन असे, त्यास सत्तरहजार होन नेमिले. सर्व मिळून सत्तावीसलक्ष सदतीसहजार होन झाले. बाकी तीनलक्ष तीनहजार होन राहिले, तेव्हां निझाम अल्ली आणि इंग्लिश या दोघांचे मतें ठरलें कीं, पेशवा आपल्या कराराप्रमाणें कामास आला नाहीं, तथापि तुमच्या व आमच्या तहामध्यें या समयीं मिळत असल्यास तें उरलेलें द्रव्य त्यास द्यावें, नाहीं तर त्याचे तीन भाग करून त्यांतील दोन निझामानें घ्यावे, व तिसरा इंग्लिशांनीं घ्यावा.

९. नंतर बहुतेक वादविवाद होऊन पेशवे व इंग्लिश यांचा तह होईना, तेव्हां तो उरलेला भाग पहिल्या नेमाप्रमाणें इंग्लिश व निझाम यांनीं वांटून घेतला. ते समयीं निझाम व इंग्लिश यांचा दुसरा कांहीं तह झाला, त्यांत असें झालें कीं, इंग्लिशांनीं निझामाचे मुलखाचे रक्षणार्थ आणीक दोन पलटणें दिलीं, आणि नेम केला कीं, 'जो कोणी निझामाच्या राज्यास अन्यायेंकरून उपद्रव करील, तो इंग्लिशांनीं आपला शत्रूसा जाणून त्यास जिंकावें. या लष्कराच्या खर्चास निझाम अल्लीनें म्हैसूर प्रांताचा सर्व आपले वांटणीचा विभाग इंग्लिशांस लावून दिला असे.'

१०. याप्रमाणें निझामाकडचें व इंग्लिशांचें वर्तमान असतां शिंद्याच्या राज्यांत फार अव्यवस्था होऊं लागली. ती अशी; सर्जेराव घाटगा यानें दुष्टपणें दग्याचा छापा अमृतरायावर घातल्यानंतर त्या बाया विठ्ठलवाडीहून निघून कोल्हापुरच्या राजाचे आश्रयास गेल्या; त्या वेळेस तो राजा पेशव्यांशीं लढत होता. त्यापाशीं त्या बाया जाऊन राहिल्या. नंतर शिंद्याजवळचा नारायणराव बक्षी व कितीएक शेणवीब्राह्मणमंडळ त्या शिंद्याचें लष्कर सोडून कोल्हापुरकरास जाऊन मिळालें, त्यामागून कितीएक स्वारही जाऊन मिळाले. मग त्याजवळ फार फौज जमा झाल्यावर तो तेथून निघून कृष्णेच्या उत्तरेस गोदावरीपर्यंत शिंद्याचे गांव लुटीत गेला; मग पुण्यासही येऊन कितीएक वाटा बंद करून तेथें शिंद्याच्या तळारा उपद्रव देऊं लागला. ते वेळेस शिंद्याचे स्वार त्याशीं लढावयास अशक्त होते, पण त्याचे पलटणी लोक मात्र त्या राजास अडथळा करीत. त्यापासून मुलखांत फार अव्यवस्था होऊन सर्वत्र हत्यारबंद स्वार जमा होऊन रयतेस उपद्रव होतां

होतां तो दंगा हिंदुस्थानपर्यंत पोंहचला. तेथें लखबा दादा ह्मणून कोणी शेणवी-ब्राह्मण होता, तो बाळोबा तात्याचा इष्ट ह्मणून शिंद्यानें तो विश्वासास योग्य नव्हेसें जाणून त्यास घालविलें होतें, तो शिंद्याच्या शत्रूस मिळून त्यानें कितीएक वेळां आपणास धरावयाकरितां शिंद्याचे लोक आलेले जिंकून उज्जनीपासून सरोंजपर्यंत मुलूख हस्तगत केला. याशिवाय यशवंतराव होळकर नागपुरास गेला होता, त्यास नागपूरकरांनीं शिंद्याच्या सांगण्यावरून बंदींत घातलें होतें, तो त्या बंदींतून पळून जाऊन माळव्यांत शिरून लुटालूट करूं लागला. ते वेळेस शिंद्याच्या पलटणींचा मुख्य सरदार डिबायन विलायतेस गेला. त्याचे जागीं मुखत्यार पेरन नामें फ्रेंच असे, तो आग्रें नामें किल्ला घ्यावयाकरितां युद्ध करीत होता. त्या आग्र्यामध्यें लखबा दादा आश्रय करून राहिला होता, ह्मणून तो पेरन फ्रेंच शिंद्याजवळ कुमक मागत असे. असें असतां शिंद्यानें त्या बायांशीं पुनः तह करावयाचा बेत केला, परंतु त्या बाया आपण मुख्यत्वें राज्य करणार, आणि त्या शिंद्यास कारभाऱ्याच्या नात्यानें वागविणार, याशिवाय दुसरें कांहीं ऐकेनात; अशा संकटसमयीं शिंद्यानें आपले दोघे नवे मुख्य कारभारी केलेले रायाजी पाटील व आबा चिटणीस यांस मसलत विचारिली असतां त्यांनीं फार चातुर्येंकरून प्रामाणिकपणें स्वहित न पाहतां त्यास उत्तर दिलें कीं, 'बाळोबा तात्यास सोडून जर तो मुख्य कारभारी केला तरच हा बंदोबस्त होईल.' तेव्हां त्या शिंद्यानें त्याप्रमाणें तें शेवटास नेतांच तें बंड करणारे बंड सोडून त्या बाळोबा तात्यास जाऊन मिळाले, आणि त्या बायाही त्या बाळोबाच्याच द्वारें बऱ्हाणपूर व अकरालक्षांची जहागीर घेऊन स्वस्थ राहावयास सिद्ध झाल्या. तो लखबा दादा त्या आग्र्यामध्यें युद्ध करीत असे, तोही न लढावा असें सिद्ध झालें. इकडे त्या बाया विश्वासानें पुण्यास जातांना जेजूरीस पोंहचल्या, इतक्यांत त्या बायांच्या पक्षाचा कोणी होता, तो शिंद्याच्या लोकांनीं मारिला. हें वर्तमान त्या बायांनीं ऐकून त्या तेथूनच फिरल्या. त्या माघाऱ्या पंढरपुरास गेल्या, आणि तो सर्व बंदोबस्त मोडून तो तंटा पुनः उत्पन्न झाला.

११. पेशवे व कोल्हापूरकर हे युद्ध करीत असतां कोल्हापूरकरांस चतुरशिंगाची कुमक मिळाल्यानें तें युद्ध वाढलें. त्या चतुरशिंगास पूर्वीं साताऱ्याचे लढाईच्या समयीं रास्ते व प्रतिनिधि यांच्या शिपाईलोकांनीं कोल्हापूरकराच्या मुलखांत हांकून लाविलें, आणि ते लोक वारणानदीचे कांठीं उतरले. ते समयीं साताऱ्याहून पळालेले सुमारें पांचशें लोक एके जागीं जमून त्यांनीं चतुरशिंगास तें वारणानदीचे कांठीं शत्रूचे लोक उतरल्याचें वर्तमान कळविलें. तेव्हां त्या

चतुरशिंगानें तें वर्तमान कळविणारे लोक यांस लपून राहावयास सांगून आपण कोल्हापूरकराकडून रास्ते व प्रतिनिधि यांच्या लोकांवर एकाएकीं छापा घातला कीं, त्यांतील एखादा दुसरा वांचला असेल. त्यानंतर परशुराम भाऊचेही लोक असावध पाहून त्या चतुरशिंगाचे लोकांनीं त्यांवर जाऊन त्यांस हांकून दिलें. त्यापुढें त्या चतुरशिंगास वर्तमान कळलें कीं, 'रास्त्याची दोनतीनहजार फौज तोफांसुद्धां साताऱ्याजवळ डेरे देऊन उतरली आहे;' तेव्हां तो आपल्याबरोबर सहाशें पायदळ घेऊन डोंगरचे वाटेनें पालीस गेला. त्या रात्रीं तेथें राहून त्या देवाची पूजा केली, आणि त्या देवाचा भंडार कपाळीं लावून तेथून मोठ्या वेगानें धांवला. तो वेग असा कीं, त्या रास्त्याचे लोक सावध असतांही त्यानें त्यांच्या तोफा घेऊन नासून टाकिल्या, आणि त्यांचे कितीएक लोकही मारून निघाला, तो दुसरा कोणी त्यावर आला नाहीं तों मोठी त्वरा करून तो चतुरशिंग वारणानदीस जाऊन पोंहचला. त्यानें अशी मर्दुमी करून लढतां लढतां आपल्याजवळ बहुतलोक जमा केले. मग रास्त्याची फौज सहाहजार होती. तिला वारणा व नीरा या दोहों नद्यांमध्यें कधींही एके ठिकाणीं स्वस्थ राहूं दिलें नाहीं. असें असतां कोणे एके समयीं त्या चतुरशिंगाजवळ पांचशें मनुष्य असतां त्यावर रास्त्याचे पांचहजार शिपाई लोक चालून गेले, आणि याची गांठ पडली; तेव्हां त्या लोकांनीं त्यास आसमंतात् वेष्टिलें असतांही तो परम शौर्येंकरून त्या वेढ्यांतून पार झाला. तेच समयीं त्याचे लोक अर्धे अधिक मेले गेले. असे रास्ते व चतुरशिंग राजा यांचे युद्धप्रसंग होत असतां कोल्हापुरचा राजा यानें परशुराम भाऊचें मुख्य ठिकाण तासगांव, तें लुटून तेथें बहुत द्रव्य खर्चून नवा बांधलेला त्या परशुराम भाऊचा वाडा होता तो जाळून टाकिला. याखेरीज त्या राजानें कर्नाटकांत कितीएक ठिकाणची खंडणी घेतली. तेथें सरसुभेदार धोंडोपंत गोखला होता, तो मोठ्या शौर्यानें मुलूख संभाळीत असतांही त्याचा कितीएक वेळां पराभव केला. याप्रमाणें कोल्हापूर व तत्संबंधें मुलूख यामध्यें वर्तमान नाना फडनवीस कारभार करूं लागे तोंपर्यंत झालें. बाळोबा तात्या व नाना फडनवीस यांची पुनः मैत्री होऊन ते आपआपल्या धन्यांच्या बोलण्यावरून इंग्लिश आणि निझाम यांशीं कसें वागावें, ती मसलत एकांतीं करूं लागले. ते वेळेस त्यांच्या मतें ठरलें कीं, 'प्रथम दक्षिणेचा बंदोबस्त अगत्य केला पाहिजे; त्यास पेशवे व शिंदे व जहागीरदार मिळून तीसहजार फौज जमा झाली ह्मणजे दसरा होतांच परशुराम भाऊला त्या कामास योजावें.'

१२. ते समयीं तो परशुराम भाऊ कोल्हापूरकरांच्या द्वेषास्तव त्यांशीं पर्जन्यांतही युद्ध करीत होता. त्यानें घटप्रभा मलप्रभा नदीपर्यंत कोल्हापूरकरांचीं किती-

एक ठाणीं लुटविलीं, आणि आपण नानाकडील फौजेची वाट न पाहतां एकटेंच कोल्हापुरास जाऊन तें युद्ध शेवटास न्यावें, असा नेम बांधून तो परशुराम भाऊ गोकाकेहून कोल्हापुरावर जाऊं लागला, त्यास वाटेनें पटनकुंडी गांवाजवळ कोल्हापुरचा राजा व चतुरशिंग या दोघांची गांठ पडली, तेव्हां त्यांचें व यांचें मोठें युद्ध होऊन त्या परशुराम भाऊचा अगदीं पराभव होऊन त्यास मोठमोठ्या जखमा लागून तो परशुराम भाऊ शत्रूच्या हातीं सांपडून मृत्यु पावला. असें झाल्यावर नाना फडनवीस व बाळोबा तात्या यांनीं त्या परशुराम भाऊचा पुत्र आपासाहेब याजबरोबर पांच पलटणें आणि विंचूरकर व प्रतिनिधि यांचे लोक देऊन त्या राजास जिंकावयाकरितां कोल्हापुरास नेमिला. तेव्हां तो राजा पन्हाळा किल्ला याचे खालीं डेरे देऊन राहिला होता, तेथेंही आपासाहेबाचे लोक त्यावर जाऊन पडले, तेव्हां कितीएक पन्हाळ्यावर चढले, आणि बहुतेक कोल्हापुरांत शिरले. ह्मणून आपासाहेबानें कोल्हापुरास घेरा घालून कितीएक वेळां युद्ध केलें, तेव्हां तो किल्ला त्या आपासाहेबाचे हातीं लागत होता; परंतु ते वेळेसच पुण्यांत असें नवेंच कांहीं कार्य उद्भवलें कीं, तें कोल्हापुरचें काम सोडून त्या आपासाहेबाला पुण्यास जावें लागलें. तेणेंकरून कोल्हापुरचें राज्य राहिलें, तें अद्यापि त्या राजाचे स्वाधीन आहे.

---

## भाग तिसावा.

### ( इसवी सन १८०० पासून सन १८०२ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. नाना फडनविसाचा मृत्यु व त्याच्या स्वभावाचें वर्णन.—२. बाळोबा तात्या याचा मृत्यु व धोंडीबा व नारायणराव बक्षी यांस निर्दयपणें पेशव्यानें मारिलें तें प्रकरण.—३. दक्षिणेंत धामधूम झाली तो प्रकार.—४. धोंडी वाघाचें बंड व त्याचें पारिपत्य इंग्लिशांनीं केलें तें. पुण्यांतील कांहीं वर्तमानें.—५. शिंद्याची माळव्यांतील कांहीं गोष्ट व यशवंतराव होळकराचा प्रादुर्भाव.—६. शिंदा पुणें सोडून हिंदुस्थानांत चालिला.—७. नंतर त्याशीं व होळकराशीं युद्ध झालें तो विस्तार.—८. सर्जेराव घाटगा पुणें सोडून शिंद्यास मिळून इंदुरावर जाऊन तेथें यशवंतराव होळकराचा पराभव करता झाला.—९. यशवंतराव होळकर यानें दक्षिणेंत संचार केला.—१०. नंतर तो पुण्याजवळचे लढाईत जय पावला.—११. बाजीराव पेशवा सिंहगडाहून निघून कोंकणांत जाऊन तेथें इंग्लिशांच्या जहाजांत बसून वसईस गेला.—१२. सन १७९२ पासून १८०२ पर्यंत बडोद्यांत काय काय वर्तमानें झालीं तो प्रकार.

१. पुण्यास मोठें कांहीं कार्य उत्पन्न झालें, असें मागल्या भागांत लिहिलें, त्यांत प्रथम नाना फडनविसाचा मृत्यु; दुसरें शिंद्यानें मसलत केली कीं, 'सर्व पटवर्धनांची जहागीर आपणास घ्यावी.' हें वर्तमान ऐकून आपासाहेब पटवर्धन यानें कोल्हापुरचा घेरा उठवून आपल्याबरोबर धोंडोपंत गोखल्यास घेऊन आपण कर्नो-

टकांत गेला. या गोष्टींचा विस्तार लिहिण्याचे पूर्वी नाना फडनविसाच्या कांहीं एक दोन गोष्टी समजल्या पाहिजेत त्या लिहितों. तो नाना सन १८०० च्या मार्चाचे १३ वे तारिखेस मृत्यु पावला. त्याबरोबरच मराठी लोकांचें राज्यकारणी कौशल्य गेलें. तो नाना राजनीतींत परम दक्ष होता. त्याचें बाळपणापासून सर्व वय राजकारभारांत गेलें. तो आपल्या प्रजेची वहिवाट व मुलखाचा वसूल घेणें आदिकरून सर्व कामें माधवराव बल्लाळ पेशवा याचे रीतीप्रमाणें चालविणार होता, परंतु मोठमोठ्या कामांचे अडचणीमुळें त्यास अवसर सांपडला नाहीं; आणि तादृश मुलखाची पाहणीही होत नसे; त्या योगें चौकशीची मंदी फार पडली होती. याविषयीं एक गोष्ट आहे ती अशी; पुण्यामध्यें त्या वेळेस घाशीराम नामें कन्होजा ब्राह्मण हिंदुस्थानचा राहणारा कोतवाल होता. त्यास मोठी योग्यता प्राप्त झाली असतां तो अंतःकरणास भयकारक असें हत्याकर्म करी. असें असतां कितीएक गृहस्थ अकस्मात् कांहीं कारणावांचून नाहींसे झाल्यावर त्यांच्या घाताचा संशय त्या घाशीरामाविषयीं उत्पन्न झाला. मग ती गोष्ट नाना फडनविसाच्या कानावर पडली असतां तो ह्मणे कीं, 'असें दुष्कर्म करणारा या पृथ्वीवर कोणी नसेल.' त्यानंतर असें एके दिवशीं वर्तमान उठलें कीं, 'घाशीराम कोतवाल कोणाएका गृहस्थास कोंडून ठेवून त्यास अन्नोदकावांचून उपाशीं मारितो आहे.' तेव्हां मानाजी फांकडा यानें आपल्याबरोबर कांहीं शहरचे लोक घेऊन तेथें जाऊन तें बंद केलेलें दार फोडून तेथून उपोषणांनीं मृतप्राय झालेला एक ब्राह्मण होता तो मुक्त केला. त्या दिवसापासून त्या कोतवालाचें पापकर्म असें प्रसिद्धीस येत गेलें कीं, शेवटीं त्यास शहरच्या लोकांनीं त्याच्या घरांतून त्याला बाहेर काढून दगडमार करून जिवें मारून टाकिलें. नाना फडनवीस याची आकृति उंच आणि सडपातळ असे, आणि त्याचा वर्ण काळसर होता, व तो प्रकृतीनें सर्वदा रुष्टासारिखा दिसे, परंतु त्याचे नेत्र पाहिले असतां तो मोठा धूर्तसा भासे; आणखी तो आपल्या कुळांत प्रामाणिकपणें व सदयअंतःकरणेंकरून वागे. तो राज्याची आशा ठेवी, परंतु आपल्या मंडळींत सर्व पदार्थांविषयीं थोडक्यानेंच तृप्त असे. तो दिवसामध्यें असा कारभार आटोपी कीं, ती गोष्ट कोणासही सांगितली असतां आश्चर्य वाटेल. तो स्मरणाचा फार धड होता. तो नाना



नाना फडनवीस.

मेला ते समयीं त्याची एक स्त्री फार लहान होती, आणि त्यास संतति नव्हती. तो नाना फडनवीस मरण पावल्यानंतर पेशवा व शिंदा यांमध्यें कलह उत्पन्न होण्याचें एक कारण असें झालें कीं, त्या दोघांसही नानाचें द्रव्य बहुत असेल, तें आपणास असावें अशी इच्छा उत्पन्न झाली. त्यावरून शिंदा यानें नानाकडे आपले कोटि रुपये येणें आहेत, असें निमित्त करून त्याची सर्व जहागीर जप्त केली, आणि बाजीरावाच्या द्वेषास्तव त्या शिंद्यानें नाना फडनविसाचे स्त्रीस दत्तपुत्र घ्यावयास अनुमोदन दिलें. असा शिंदा बाजीरावाविषयीं विपरीत वर्तन करूं लागला. त्यानें तेंच कृत्य विशेष न करितां बाळोबा तात्याचे द्वारें लखबा दादाचें बंड मोडिलें, तो त्या आपल्या कारभाऱ्याच्या नाशास प्रवृत्त झाला. तो असा; त्यानें आपला सासरा सखाराम घाटगा याचे मसलतीनें त्या बाळोबास धरून अहमदनगरच्या किल्ल्यांत कैद केलें. तो तेथें थोडक्याच दिवसांत आपल्या मृत्यूनेंच मरण पावला. त्याबरोबरच बंदींत घातलेले त्याचे दोघे भाऊ होते, त्यांचें तसें प्रारब्ध नव्हतें कीं, त्यांनीं आपल्या मृत्यूनेंच मरावें. त्यांत एक धोंडीबा नामें होता, तो तर तोफेच्या तोंडीं देऊन उडविला; दुसरा नारायणराव बक्षी होता, तो त्या दुष्ट घाटग्याचे कल्पनेप्रमाणें त्याच्या हातांपायांस बाण बांधून आग लावून उडविला. तेव्हां तो त्या बाणांच्या नेटानें इकडेतिकडे उलथापालथा वांकडातिकडा होऊन बहुत पीडा पावून मेला. यानंतर बाजीराव पेशवा नाना फडनविसाचे पक्षपाती लोक यांच्या नाशाविषयीं आणि परशुराम भाऊ पटवर्धन यांची जहागीर घ्यावयाविषयीं उद्युक्त झाला. यासाठीं 'नाना फडनविसाचे स्त्रीस दत्तक घ्यावयाचें अनुमोदन देतों,' असें मिष करून त्यानें त्या मंडळीस तो विचार करावयाचे निमित्तें आपल्या वाड्यांत बोलाविलें. नंतर ते सारे एके जागीं जमा झाल्यावर त्या सर्वांस असा दोष ठेविला कीं, 'तुह्मी नाना फडनविसास दत्तक देऊन तो मला प्रतिबंध करणार, यास्तव त्या तुह्मांस शिक्षा असावी.' असा त्या मंडळीस दोष लावून ते सारे कैद करून किल्ल्यावर टाकिले त्या गोष्टीस शिंदाही अनुकूळ झाला. कां कीं, पेशवा पूर्वी शिंद्याच्या हितार्थ शेणवीब्राह्मणांच्या नाशास प्रवृत्त झाला होता.

३. याप्रमाणेंच पटवर्धनाच्या नाशाविषयीं शिंदा पेशव्यास अनुकूळ झाला. त्या शिंद्याचा कारभारी सर्जेराव घाटगा त्यानें कोल्हापुरच्या राजाकडे जाऊन तो राजा पटवर्धनाच्या नाशाविषयीं शिंद्यास अनुकूळ होय असें केलें. तेव्हां त्या शिंद्याचीं कितीएक पलटणें शिधोजीराव निंबाळकर, निपाणीचा देसाई, याचे स्वाधीन होऊन पटवर्धनाचा मुलूख घ्यावयास निघालीं; तीं पलटणें फार वेळ त्याजवळ राहिलीं नाहींत. परंतु त्या शिधोजीच्या स्वारांनीं मिरजेपासून विजापुरपर्यंत मुलूख उद्ध्वस्त केला. अशी दक्षिणेंत धामधूम झाली.

४. ते समयीं संपूर्ण दक्षिणेंत धामधूम झाली, त्यांत धोंडी वाघ कोल्हापुरच्या राजाची चाकरी सोडून निघाला, तो इंग्लिशांनीं संपादिलेल्या मुलुखीं जाऊन लुटा-लूट करून पेशव्याच्याही कर्नाटक मुलखीं कितीएक ठिकाणची खंडणी घेता झाला. त्यावरून इंग्लिशांनीं पेशव्याची आज्ञा घेऊन त्याच्या पारिपत्यास आपली फौज नेमिली. त्यापूर्वींच त्या धोंडी वाघानें कर्नाटकांत धोंडोपंत गोखला आपला शत्रु आला आहे, असें समजून शपथ केली कीं, 'त्या धोंडोपंताच्या काळजाचें रक्त काढून त्या रक्तानें आपल्या मिशा रंगवीन.' त्या वाघानें तो धोंडोपंत गोखला जेथें होता तेथून जवळच कोणेएके झाडीमध्यें लपून राहून त्याच्या प्राणहरणार्थ छापा घालावयाचा बेत करून त्या धोंडोपंताजवळ अगदीं थोडे लोक आहेत, अशी संधि पाहून त्यावर अकस्मात् छापा घालून त्या धोंडोपंत गोखल्यास ठार मारिलें; आणि आपल्या शपथेप्रमाणें त्याच्या काळजाचें रक्त काढून आपल्या मिशांस लाविलें. त्या छाप्यामध्येंच धोंडोपंत गोखल्याजवळ त्याचे दोघे पुतणे होते, त्यांमध्यें थोरला मारिला गेला, आणि धाकटा तो बापू गोखला, त्याच्या डाव्या डोळ्यास मोठी जखम लागली. त्यानंतर इंग्लिशांनीं त्या धोंडी वाघाच्या पारिपत्यास फौज पाठविली, ती त्यावर पडून त्याच्या लोकांचा अगदीं पराभव होऊन तो धोंडी वाघही मेला गेला. हें वर्तमान सन १८०० च्या सप्टेंबर महिन्याचे १० वे तारिखेस घडलें.

५. शिंदा पुण्यामध्यें राहिला असतां त्याच्या मुलखीं माळवा व हिंदुस्थान यांच्या बंदोबस्तांत अव्यवस्था झाली होती, ती अशी; यशवंतराव होळकर नागपुराहून पळून धारेस जाऊन तेथें आनंदराव पंवार याच्या आश्रयास कांहीं दिवस राहिला. नंतर त्या आनंदरावानें शिंद्याच्या भयास्तव त्या होळकरास कांहीं द्रव्य व कितीएक घोडे देऊन त्याला तेथून पुढें मार्गस्थ केलें. तो होळकर तितक्याच द्रव्यसाधनानें आपल्याजवळ कांहीं लोक जमा करून मग कोणीएक अमीरखान नामें पठाण मुलखांत स्वाऱ्या घालीत होता, त्याला जाऊन मिळाला. आणि त्या योगें मोठी योग्यता पावून लोकांत असें प्रसिद्ध केलें कीं, आपण खंडेराव होळकराचा पुतण्या. नंतर जितकें होळकरपक्षाचें मंडळ होतें तितकें बोलाविलें. तें कितीएक जमा झाल्यावर होळकराच्या कुळास शिंद्याच्या हातून सोडवावयाकरितां त्यासहित निघाला. नंतर शिंद्याचे मुलखीं नर्मदातीरीं जाऊन कितीएक शिंद्याचे गांव लुटूं लागला. तेव्हां काशीराव होळकराचें पलटण कोणीएक फ्रेंच जातीच्या सरदाराचे स्वाधीन असे, तो त्यानें त्यांवर पाठविला, त्याचा त्या यशवंतरावानें पराभव केला. मग तो फ्रेंच यशवंतरावाचा पक्षपाती होऊन आपले पलटणी लोक व तोफा घेऊन त्यास मिळाला. तेव्हां त्या यशवंतरावास हा खंडेरावाचा ठेवणाईत असें लोक मानूं लागले; आणि तो मोठ्या राजाप्रमाणें वागूं लागला.

६. असें झाल्यावर शिंद्यानें लष्करसुद्धां तात्काळ तिकडे जाऊन आपल्या मुलखाचा बंदोबस्त करावा, परंतु ते समयीं त्याचे कारभारी मंडळींत वैमनस्यें पडलीं होतीं, त्यामुळें तो प्रकार घडेना; कां कीं, त्या कारभारी मंडळीनें होळकरास कोणे एके वेळीं धमकीची गोष्ट सांगावी, व कोणे एके समयीं प्रार्थनाही करावी, असें होऊं लागलें. नंतर ते कारभारी लोक काशीरावाच्या नाशाविषयीं होळकरास मिळाले. त्या यशवंतरावानें काशीरावापासून आपणास भय न व्हावें, यासाठीं शिंदा अनुकूळ करून घेतला, आणि त्याबद्दल शिंद्याच्या बायांस धरून कैद करावयाचा नेम केला. त्यापूर्वी होळकरानें त्या बायांशीं मैत्रीचें बोलणें लावून समजाविलें होतें कीं, 'मी तुमचा पक्षपाती आहें.' तथापि या समयीं तो नेम सोडून होळकर त्या बायांच्या लष्करावर पडून त्या बायांना तेथून पिटून बऱ्हाणपुरीं लावून दिलें, आणि त्या शहरासभोंवता घेरा घातला, परंतु त्या बाया तेथून सुटून पळाल्या असतां त्या शिंद्यास वाटलें कीं, 'होळकराच्या कृत्रिमानेंच पळाल्या, त्यास आपण हिंदुस्थानीं जाऊन बंदोबस्त केल्यावांचून राज्य टिकणार नाहीं.' असा त्या शिंद्यानें मनांत निश्चय करून पुणें मुक्कामीं पांच पलटणें व दहाहजार स्वार तयार केले, आणि त्यांस सर्जेराव घाटगा याचे स्वाधीन करून पेशव्याचे चाकरीस ठेविलें; आणि आपण तेथून निघाला. ते समयीं त्यानें बाजीराव पेशव्यापासून सत्तेचाळीसलक्षांच्या हुंड्या घेतल्या.

७. तो शिंदा हळू हळू तेथून बऱ्हाणपुरीं जाऊन राहिला, तोंपर्यंत होळकर माळव्यामध्यें स्वाऱ्या घालून तेथची खंडणी घेत असे आणि कुठें कुठें लुटीतही असे. त्या शिंद्याचें सैन्य फार मोठें आणि तो केवळ समीप आला, असें समजून त्या होळकरानें आपले सर्व लोक उज्जनीपाशीं मोठ्या त्वरेनें जमा केले. कां कीं, त्याचा मनसोबा असा होता कीं, शिंदा येऊन पोंहचला नाहीं तोंच उज्जनी लुटावी. हें वर्तमान त्या शिंद्यास कळलें, तेव्हां त्यानें आपलीं चार पलटणें कोणीएक कर्नेल हेसिंग नामें आपला सरदार याचे स्वाधीन करून त्यास बऱ्हाणपुराहून पुढें त्वरित पाठविलें. नंतर त्याचे मदतीस दुसरा एक सरदार व दोन पलटणांवर अधिक कांहीं पायदळ लोक पाठविले. तेव्हां होळकरानें उज्जनीजवळ पुढें आलेल्या लोकांशीं युद्धाचा आरंभ आपल्या थोडक्याशा लोकांनिशीं केला, आणि त्यास नकळतां त्याचे पाठीमागें आपल्या लष्कराचा मोठा भाग नेऊन जे लोक त्याच्या मदतीस मागून येत होते, ते जिंकून ते लोक पुनः युद्धास उभे न राहतील असें केलें. नंतर आपले लोक त्यांशीं लढून धैर्यवंत झालेले माघारे आणून त्या हेसिंगाच्या चार पलटणांवर एकाएकीं हल्ला केला. ते समयीं तें युद्ध फार निकराचें झालें, त्यांत त्या पलटणी लोकांतून एक वांटा राहिले, व चार वांटे जखमी व मेलेले मिळून पडले. त्यांत

त्याचे सरदार दहा साहेब लोक होते त्यांतून सात मेले गेले, व तीन साहेब त्या शत्रूच्या हातीं सांपडले, आणि एकटा हेसिंग मात्र राहिला. असा त्या होळकराचा जय सन १८०१ च्या जून महिन्यांत झाल्यावर त्यानें त्या उज्जनीची मोठी खंडणी घेतली. नंतर त्या शिंद्याचा तोफखाना नर्मदा उतरून पलीकडे गेला होता, त्याचे रक्षणार्थ शिंद्याचे कितीएक स्वार व चार पलटणें होतीं, त्यांवर जाऊन तो तोफखाना पाडाव करून घ्यावयास होळकरानें मोठा उद्योग केला; परंतु त्याचा उपाय चालेना. तेव्हां त्या शिंद्यास कांहीं धैर्य उत्पन्न होऊन तो आपलें लष्कर बऱ्हाणपुराहून उठवून नर्मदापार जावयास फार प्रयत्न करूं लागला. इकडे पुण्यामध्यें शिंदा निघून गेल्यावर बाजीराव, जे कोणी मोठमोठे थोर कुलीन लोक, ज्यांनीं आपणाविषयीं किंवा आपला बाप रघुनाथराव याविषयीं विपरीत आचरण केलें होतें, त्यांचा सूड उगवावयास उद्युक्त झाला. तेव्हां प्रथम त्यानें रास्त्याच्या कुळांतील माधवराव रास्ता यास स्नेहानें भेटीस बोलावून तो आपल्या वाड्यांत आल्यावर त्यास धरून तो रायगडास पाठविला. याशिवाय जे कोणी त्याचे हातीं सांपडले ते अनेक प्रकारें नागविले. त्यानें इतकी रास्त्याची अमर्यादा अन्यायाविणें केली, त्यावरून तो बाजीराव लोकांचे मनांतून उतरला. त्या योगें त्याचा कोणासही विश्वास येईना, आणि मुलखांत जागोजाग बंडें उत्पन्न झालीं. त्या बंडाच्या एके टोळींत बाळकृष्ण गंगाधर मुख्य होता, आणि विठोजी होळकरही त्यास मिळाला असे; त्या टोळीचा पराभव गणपतराव पानशा यानें केला. तेव्हां तो विठोजी होळकर यशवंतराव होळकराचा भाऊ तो धरिला गेला; त्या वेळेस बाजीराव पेशवा यानें त्यास जिवें मारून टाकावयाचा नेम केला; कां कीं, तो बंडांत सांपडला, तस्मात् तो प्राणांत दंड करावयाचा अपराधी खरा. परंतु ते वेळेस मराठे लोकांत चाल होती कीं, जो अत्यंत क्रूरपणें हिंसाकर्मच करील त्यास मात्र प्राणांत दंड करावा; केवळ स्वाऱ्या घालून लूट करणारास तसा दंड नाहीं. असें असतां आणि त्याचा बाप तुकोजी होळकर त्या एवढ्या थोराचा तो पुत्र त्यास मारावें हेंही योग्य दिसत नव्हतें; परंतु बाजीरावाच्या मनांत आलें कीं, हा नानाच्या परम मित्राचा पुत्र ह्मणून त्यानें त्यास जिवें मारविलें. तो प्रकार असा; आपण ( बाजीराव पेशवा ) व आपला मित्र ( बाळोजी कुंजर ) हे दोघे खिडकींत बसून आपल्या समोर अंगणामध्यें हत्ती आणून त्या विठोजी होळकराला हत्तीच्या पायांस बांधविलें. ते समयीं त्यानें आपल्या प्राणरक्षणाविषयीं बाजीरावाची प्रार्थना केली, परंतु त्या बाजीरावास त्या विठोजीविषयीं किमपि दया न येतां तो स्वस्थ बसून पाहूं लागला. मग तो हत्ती तें सारें अंगणभर फिरला, तितक्यानें त्याचा प्राण गेला नाहीं; तेव्हां तो हत्ती तेथून बाहेर नेव-

विला. नंतर त्या बाहेरच्या मैदानांत तो हत्ती फिरतांना त्या विठोजीचे प्राण निघून गेले.

८. दौलतराव शिंदा आपल्या लष्कराचें सामर्थ्य न्यून असें समजून पुण्यांत सर्जेराव घाटगा पूर्वी पेशव्याच्या चाकरीस ठेविलेला असतांही त्याला हिंदुस्थानांत आपल्याजवळ बोलाविलें. तो तिकडे जाऊन त्या शिंद्याजवळच पोंहचल्यावर त्या दौलतरावानें त्याजबरोबर दहाहजार स्वार व चवदा पलटणें देऊन आपली राजधानी उज्जनी होळकरानें लुटली होती, तो सूड उगवावयास इंदूर नामें जी त्या होळकराची राजधानी, ती लुटावयास तो पाठविला. त्या वेळेस त्या होळकराबरोबर गोरे सरदारांवांचून कांहीं पलटणें व पंचवीसहजार स्वार व पलटणी लोकांखेरीज पांचहजार पायदळ इतकें सैन्य होतें, त्यासहित तो यशवंतराव त्या आपल्या इंदुराच्या संरक्षणास आला. नंतर कांहीं दिवस त्या दोन्ही लष्करांचें युद्ध हलकें हलकें होत होतें. मग त्या होळकरानें एकाएकीं त्या शिंद्याच्या लष्करावर हल्ला करावयाची कांहींएक चांगली कल्पना काढली होती, परंतु त्यांतील कांहीं बेत विसकटून शेवटीं तो होळकर त्या युद्धांत पराभव पावला. ते समयीं त्याच्या अठ्ठ्याण्णव तोफा सर्जेराव घाटग्याच्या हातीं लागल्या, आणि त्याची राजधानी इंदूर तेंही त्या घाटग्यानें अगदीं लुटून टाकिलें. ते समयीं त्या दुष्टानें आपल्या क्रूरपणाची पराकाष्ठा केली. पुणें सोडून गेल्याचे पूर्वींची त्याच्या धूर्तपणाविषयीं त्याची कांहीं गोष्ट आहे, ती अशी; त्या सर्जेराव घाटग्यानें बाजीराव पेशवा याचा मित्र बाळोजी कुंजर याचे घरीं द्रव्यानिमित्त धरणें बसवून वरकड जे दरबारी लोक होते त्यांचा फार अनादर आरंभिला; तेव्हां बाळोजी कुंजर यानें आपल्या मनांत विचार केला कीं, ‘तो घाटगा आपणाकडे आला असतां त्याचा मोठा सन्मान करून तो जें ह्मणेल त्यास राजी झाल्यासारिखा आकार दाखवून मग त्यास युक्तीनें धरून बंदींत ठेवावें, अथवा जिवें मारून टाकावें.’ अशी योजना करून आपल्या लोकांस सांगून ठेविलें कीं, ‘तो सर्जेराव घाटगा आणि मी एकांतीं बोलत बसलों असतां जेव्हां मी तेथून उठून बाहेर येईन तेव्हां तुह्मी त्यास युक्तीनें धरा अथवा मारून टाका.’ अशी तयारी करून ठेविल्यावर तो सर्जेराव आपले घरीं आला असतां तो आणि आपण उभयतां खोलींत एकांतीं बोलत बसले, तेव्हां बोलतां बोलतां तो बाळोजी कुंजर तेथून उठून बोलिला कीं, ‘मी पैक्याच्या हुंड्या आणवितों.’ इतकें ह्मणून त्या खोलींतून बाहेर निघूं लागला; तेव्हांच तो सर्जेराव मनांत समजला कीं, ही कांहीं आपणास दग्याची खूण आहे. त्यावरून तो सर्जेराव घाटगा आपण एक हात त्या बाळोजी कुंजराच्या मानेवर टाकून दुसऱ्या हातांत तरवार घेऊन त्यास गचांड्या देत त्या खोलींतून

बाहेर काढून तेथून तसाच दरवाज्यापर्यंत धक्के देत नेऊन मग दरवाज्याबाहेर रस्त्यांत जातांच तेथें आपल्या घोड्यावर पटकर उडी मारून बसला, आणि तेथून त्वरेनें पळत पळत आपल्या लोकांत जाऊन मिळाला.

९. हिंदुस्थानांत होळकर पराभव पावल्यानंतर त्यांस बंडावांचून दुसरा उपाय दिसेनासा झाला. असें असतांही धूर्तपण व स्वाभाविक शौर्य पाहून शिपाईलोकांचें मन त्याकडे लागे, ह्मणून त्या शिंद्याचे कितीएक शिपाईलोक त्या यशवंतराव होळकरास मिळाले. असें झाल्यावर त्या होळकरानें मसलत केली कीं, 'हा मुलूख सोडून पुण्याचे आसमंतात् संचार करावा.' तेव्हां शिंद्यास तिकडे गुंतवावयासाठीं आपलीं पलटणें महेश्वरास ठेवून आपण उत्तरेचा मार्ग धरिला; कां कीं, त्या शिंद्यास ती आपली दक्षिणेस जाण्याची मसलत कळूं नये; याकरितांच फत्तेशिंग मान्याबरोबर मात्र कांहीं स्वार देऊन पुण्याकडे पाठविला, तो मान्या गोदावरीचे तीरीं येऊन कितीएक गांव लुटून त्या मुलुखीं कितीएका ठिकाणची खंडणी घेऊं लागला. इतक्यांत तो होळकर स्वयें महेश्वरास येऊन तेथून आपलीं पलटणें बरोबर घेऊन शिंद्याचा मुलूख खानदेश यांत जाऊन मोठ्या क्रोधानें तो मुलूख उद्ध्वस्त करूं लागला. इतकें होईतोंपर्यंत त्यानें शहा अहमदखान नामें कोणी त्याचा सरदार होता, तो पुण्याच्या आसमंतात् लुटालूट करावयास पुढें नेमिला. त्याच्या पारिपत्याकरितां पेशव्याचा सरदार नरसिंह खंडेराव नामें विंचूरचा जहागीरदार, तो पंधराशें स्वारांनिशीं त्यावर चालून गेला; त्याचा त्या शाह अहमदखानानें असा परभव केला कीं, त्या विंचूरकरांच्या पंधराशें स्वारांतील थोडकेच वांचले असतील. हें वर्तमान बाजीराव पेशवा यास कळतांच तो फार भ्याला, आणि त्यानें इंग्लिशांच्या सरकाराशीं आपल्या कुमकेविषयीं बोलणें लाविलें; परंतु तेवेळेस तो बाजीराव इंग्लिशांस आपल्या मुलखांत फौजेसहित रहावयास अनुमोदन देईना, आणि इंग्लिश व निजाम अल्ली यांची मैत्री झाली होती, त्यांतीलही कितीएक गोष्टी स्वीकारीना, ह्मणून तो अर्थ शेवटास गेला नाहीं. नंतर पेशव्यानें होळकर गोदावरी उतरून आलीकडे न यावा, ह्मणून त्याशीं बहुत प्रकारें तहाचें बोलणें लाविलें. तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं, 'माझा भाऊ तुह्मीं मारिला, तो तर तुमच्यानें मला देववत नाहीं; परंतु त्याचा पुत्र खंडेराव तो बंदींत घातला आहे तो सोडून द्यावा, आणि जितका आमच्या होळकरमंडळीचा मुलूख आपणाकडे आहे तो सर्व सोडावा; इतकें झालें असतां आपण ह्मणतां ही गोष्ट कदाचित् घडेल.' त्या गोष्टीस बाजीराव यानें मान्य केल्याप्रमाणें दाखविलें, आणि होळकरास निश्चित सांगून पाठविलें कीं, 'आह्मी तुमच्या खंडेरावास सोडावयाची आज्ञा दिली.' असें असतां इकडे 'त्या

खंडेरावाला अशीरगडावर पक्क्या बंदोबस्तांत ठेवावें' असें सांगून पाठविलें; आणि तेच वेळेस दौलतराव शिंदा याकडून सदाशिवराव भास्कर नामें सरदार, दहा पलटणें व कांहीं स्वार घेऊन येत होता, त्यास निरोप पाठविला कीं, 'या समयीं आह्मी होळकराशीं कांहीं तहाचें बोलणें करून तो स्थिर केला आहे. अशा संधीस तुह्मी त्वरा करून आपला अर्थ साधावा.'

१०. यानंतर बाजीराव पेशव्याकडून पांडोजी कुंजर निघाला, तो कांहीं लोकांसहित गारदौंडेस जाऊन होळकराकडचा फत्तेशिंग मान्या यावर हल्ला करिता झाला. त्यांत तो पांडोजी पराभव पावला. ते समयीं त्या मान्यानें मोठी त्वरा करून बारामतीस जाऊन तेथें पेशव्याच्या फौजेचा तळ होता, त्यांत नाना पुरंदरे व गणपतराव पानशे मुख्यत्वें असत, त्यांवर पडून त्यानें त्यांचाही पराभव केला, व तेथचा तोफखानही त्या मान्यानें घेतला. बाजीरावानें पूर्वीं आपले सरदार रास्ते यांचा अपमान केला, यास्तव पटवर्धन व वरकड जे दक्षिणेंतील जहागीरदार यांनीं त्या पांडोजी कुंजराचे व फत्तेशिंग मान्याचे लढाईंत मन घातलें नाहीं; जर ते मनावर घेते तर एवढा अनर्थ न होता. त्या वेळेस सर्व पटवर्धनांपैकीं एकटा चिंतामणराव मात्र बाजीरावाचा पक्षपाती होता, परंतु तोही थोडक्याच वेळांत श्रीमंतांचा पक्ष सोडिता झाला. होळकर लष्करसुद्धां अह्लीबेला खिंडेकडे चालिला असतां शिंद्याकडचा सदाशिवराव भास्कर लष्करासहित त्या होळकराची वाट सोडून जालनें व भीर या वाटेनें पुण्यास येऊन पेशव्याच्या लोकांत मिळाला. नंतर ते पेशव्याचे लोक व शिंद्याचे लोक मिळून अह्लीबेल्यापाशीं त्या होळकराच्या तोंडावर गेले. तें वर्तमान समजून होळकर अहमदनगरचे वाटेनें जेजुरीस जाऊन फत्तेशिंग मान्यास मिळून तेथून सन १८०२ च्या अक्टोबर महिन्याचे २३ वे तारिखेस राजवाडीचा घाट उतरून पुण्याजवळ लोणी व हडपसर या दोहों-मध्यें उतरला. ते वेळेस पेशवे व शिंदे यांचें लष्कर त्या अह्लीबेल्या-हून निघून माघारें पुण्यास येऊन गारपिरावर राहिलें. असें असतां उभय-पक्षीं दोन दिवस तहाचें बोलणें झालें. त्यांत पेशवे बाजीराव ते होळकरास ह्मणत कीं, 'तुला आमच्या राजधानीवर शत्रूसारिखें फौज घेऊन चालून येण्याचें प्रयोजन नाहीं; त्यास तूं एथून निघून जा.' त्यावर त्या होळकरानें उत्तर केलें कीं, 'मी स्वामीच्या आज्ञेंत अंतर करावयाचा मनुष्य नव्हे; परंतु आमच्या धन्याची आज्ञा शिंदा मानीत नाहीं; त्याला स्वामींनीं खंडेरावास सोडावयाची आज्ञा दिली असतां त्यानें त्याचा बंदोबस्त पहिल्यापेक्षां अधिक केला; याशिवाय मी व माझे धनी पेशवे तुह्मी हे आपण उभयता एकमतेंच वागणार होतों, परंतु शिंदा मजबरोबर युद्धास

सिद्ध झाला; यास्तव या समयीं मी शिंद्याचें पारिपत्य करून आपल्या स्वामीचा मान रक्षीन.' याप्रमाणें त्या होळकराचें व बाजीरावाचें बोलणें दोन दिवस होऊन अक्टोबराचे २५ वे तारिखेस प्रातःकाळीं उभयपक्षीं लष्करें तयार झालीं. त्या वेळेस त्या होळकराकडे चवदा पलटणें होतीं, त्यांत एक कर्नल व दोन मेजर असे तिघे मुख्य साहेब लोक होते, व त्या पलटणांखेरीज पांच हजार पायदळ होतें, व पंचवीसहजार स्वार होते. शिंद्याकडे पलटणें होतीं, परंतु त्यांचा बंदोबस्त होळकराच्या पलटणांपेक्षां कमी व त्यांची संख्याही कमी असे. वरकड स्वार व पायदळ त्या होळकराच्या बरोबरीनें होतें. याप्रमाणें त्या दोहींकडची सेना उभी राहिली असतां एक प्रहर दिवसानंतर उभयपक्षीं तोफांचा मार चालू झाला, तो सहा घटिकापर्यंत एकसारिखा चालत होता. नंतर त्या होळकराच्या पठाणी स्वारांची टोळी पेशव्याकडचा सरदार विंचूरकर याच्या स्वारांवर पडून यश पावली, परंतु तेच वेळेस फत्तेशिंग मान्यानें पेशव्याचे हुजूरपागेवर हल्ला केला असतां त्या मान्याचा बहुत नाश होऊन त्या पाग्यांचा जय झाला, हें पाहून शिंद्याचे वरकड जे स्वार होते, त्यांस विशेष अवसान येऊन त्यांनीं होळकराच्या स्वारांवर हल्ला केला. तेव्हां होळकराच्या स्वारांचा पराभव होईलसा दिसून आला. ते समयीं होळकर आपल्या सर्व सैन्यापाठीमागें होता, त्यानें तो सुमार पाहिला, आणि तात्काळ आपल्या घोड्यावर बसून मोठा शब्द करून बोलिला कीं, 'या समयीं जे कोणी माझे असतील त्यांनीं मजबरोबर यावें, यापुढें उपयोग नाहीं.' असें सांगून जे तेथून पळणारे लोक होते, त्यांस मोठें धैर्य देऊन निवडक स्वारांसहित स्वयें पुढें सरून त्या शिंद्याचे स्वार मागें हटविले. इतकें होई तोंपर्यंत ज्यांत इंग्लिश सरदार नाहींत, अशीं शिंद्याचीं सहा पलटणें होतीं, त्यांच्यानें त्या होळकराच्या पलटणांसमोर उभें राहावेना; परंतु त्याशिवाय त्या शिंद्याचीं चार पलटणें डिबायन साहेब यांच्या हातचीं तयार झालेलीं पुरातन होतीं, त्यांत मुख्य सरदार चवघे साहेब असत, त्या पलटणांनीं मात्र आपली जागा न सोडितां परम शौर्येंकरून युद्ध केलें. शेवटीं त्या होळकरानें त्या शिंद्याच्या सर्व स्वारांचा पराभव करून त्यांतील तोफांचे सर्व गोलंदाज मारून मग त्या आपल्या संपूर्ण लष्करी समुदायासुद्धां त्या चार पलटणांवर मोठ्या वेगानें कितीएक वेळां हल्ला केला. त्या योगेंकरून त्यांतील कोणी साहेब न उरतां त्या पलटणांचा बहुत नाश होऊन तें युद्ध समाप्त झालें. तेव्हां त्या शिंद्याच्या साऱ्या तोफा व बुणगें होळकराच्या हातीं लागलें. त्याचा असा जय झाल्यावर त्या यशवंतरावानें पुणें शहरचा नाश न व्हावा, ह्मणून आपल्या सर्व लष्करास तेथून मागें फिरावयाची आज्ञा दिली. त्यांतील कोणासही तो शहरांत

जाऊं देईना. तेव्हां त्यांतील कोणी लोक त्या होळकराची आज्ञा न मानितां त्या शहरांत शिरूं लागले. त्यांवर त्यानें तोफांचा मार चालू करून त्यांस मागें फिरविलें. असे पेशव्याकडचे सरदार त्या होळकराशीं युद्ध करीत असतां बाजीराव पेशवा निःसंशय आपला जय होईलसा समजून जिकडे युद्धसमारंभ होता, तिकडे जावयास आपल्या वाड्यांतून बाहेर निघाला; परंतु तोफांच्या आवाजास भिऊन शहराबाहेर दक्षिणेच्या आंगीं दूर उभा राहून तेथूनच त्या युद्धाचे परिणामाची वाट पाहत राहिला; मग आपला पराभव झालासा समजून सात हजार लोकांसहित तेथून निघून सिंहगडास गेला. नंतर त्यानें तेथून कर्नल क्लोज् नामें साहेब इंग्लिशांचा वकील ते समयीं पुण्यांत होता, त्यास निरोप पाठविला कीं, 'इंग्लिशांनीं या समयीं आमचें साहाय्य केल्यास सहा पलटणांसहित त्यांनीं आमच्या मुलखीं राहावें.' पुण्याच्या लढाईंत यशवंतराव होळकर जय पावल्यावर त्यानें तेथें संगमावर कर्नल क्लोज् साहेब इंग्लिशांचा वकील राहात होता, त्यास दुसरे दिवशीं आपल्या भेटीस बोलाविलें. त्या युद्धांत होळकर व पेशवे या उभयपक्षींच्या लष्करचे स्वार त्या कर्नल क्लोज् साहेब याच्या बंगल्याजवळच लढले, तथापि त्यास कांहीं उपद्रव लागला नाहीं. मग दुसरे दिवशीं तो साहेब होळकराचे भेटीस गेला, तेव्हां त्यानें त्या होळकराचा जसा डौल पाहिला, त्याप्रमाणें लिहिलें आहे. तें असें; तो यशवंतराव होळकर विजयी झाला असून घोंट्याइतक्या चिखलांत एक लहानशी राहुटी उभारलेली होती, त्यांत त्या साहेबानें त्यास पाहिलें. त्या होळकराच्या आंगास एक भाल्याची जखम लागलेली होती, आणि त्याचे मस्तकीं एक तरवारेचा वार लागलेला असे. त्यास भेटावयाचे वेळेस तो होळकर त्या साहेबाशीं बहुत नम्रतेनें वागला, आणि त्याचें बोलणें केवळ मोकळ्या मनाचें होतें. त्यास त्या साहेबानें त्याच्या जखमांची गोष्ट काढिली असतां तें दुःख त्याच्या गणनेंतच नाहींसें दिसलें, आणि शिंदे व पेशवे यांशीं व त्या होळकरांशीं जें वैमनस्य होतें, तें मिटावयाविषयीं यशवंतराव इंग्लिशांची मध्यस्थी इच्छीत होता. आणि ते वेळेस त्या साहेबापाशीं तशा गोष्टीही निघाल्या.

११. होळकर प्रथम पेशव्याशीं बहुत नम्रतेनें वागे, व त्यास पुण्यांत बोलावीत असतां तो बाजीराव ऐकेना. मग तो पेशवा तीन दिवस त्या सिंहगडीं राहून तेथून पुढें रायगडीं[१] गेला. तेथेंही कितीएक दिवस राहून मग पुढें महाडास जाऊन तेथून त्यानें मुंबईसरकारास पत्र पाठविलें कीं, 'तुम्ही कांहीं गलबतें पाठवून

---

१. रायगडीं माधवराव रास्ता बंदींत होता; त्यास मुक्त करून त्याची जहागीर त्यास माघारीं देऊन आपल्याकडे नवे लोक ठेवावयाचे कामावर बाजीरावानें त्यास नेमिलें.

मी व माझे बरोबरचे लोक यांस आपल्याकंडे घेऊन जावें.' असें लिहिलें असतां त्याचें उत्तर यावयाचे पूर्वीं वसईचा सरसुभेदार खंडेराव रास्ता महाडामध्यें बाजीरावास येऊन मिळाला. त्याच्या पाठीस लागलेले यशवंतराव होळकराचे लोक जवळ आले, असें बाजीरावास कळतांच तो तेथून पळून सुवर्णदुर्गास गेला; तेथेंही आपला टिकाव निघणार नाहीं, असें समजून तें स्थळ टाकून रेवदंड्यास गेला. त्या ठिकाणीं इंग्लिशांचीं जहाजें येऊन त्या खंडेराव रास्त्यासुद्धां बाजीरावास डिसेंबराचे ६ व्या तारिखेस वसईंत नेऊन पोंहचविलें. त्यापुढें त्या वसईमध्यें इंग्लिश व बाजीराव यांचा विशेष तह झाला, त्याचें मूळ तेंच. तो विस्तार लिहावयाचे पूर्वीं बडोद्यामध्यें सन १७९३ पासून जीं वर्तमानें झालीं, तो प्रकार समजला पाहिजे, तो लिहितों.

१२. सन १७९३ त गोविंदराव गाइकवाड यास बडोद्याचा अधिकार प्राप्त झाला, असें पूर्वींचे भागीं लिहिलें आहे; आणि आबा शेलूकर नाना फडनविसाबरोबर बंदींत पडला, असें लिहिलें आहे. त्या आबा शेलूकरानें पुढें सन १७९८ त दौलतराव शिंद्यास दहा लक्ष रुपयांचें करारपत्र देऊन आपली मुक्तता करून घेतली, आणि तेथून अहमदाबादेस जाऊन तेथचा कारभार चालविला, परंतु तो आबा नानाचा पक्षपाती यास्तव बाजीरावानें गोविंदराव गाइकवाड यास गुप्तपणें अनेक प्रकारें शिकवून त्याशीं व आबा शेलूकराशीं वैमनस्य पाडिलें. त्यापासून लवकरच त्या दोघांचा युद्धप्रसंग होऊन ते उभयतां एकमेकांच्या नाशाविषयीं अनेक प्रकारें एकमेकांस उपद्रव देऊं लागले. त्यांत प्रथम आबा शेलूकराचें प्राबल्य दिसलें. मग दुसरें वर्षीं ( सन १७९९ त ) सुरतेचा नबाब मृत्यु पावला, ते समयीं त्याच्या भावास तो अधिकार व्हावयाचा; तत्संबंधें कांहीं बंदोबस्ताविषयीं डंकन साहेब नामें मुंबईचा गव्हर्नर सुरतेस गेला. ते वेळेस गोविंदराव गाइकवाड याचे दोघे वकील त्या साहेबाच्या बहुमानास्तव सामोरे गेले. तेव्हां तो समय आपल्या कार्यसाधनांच्या उपयोगीसा जाणून त्या साहेबानें सुरतेंत चौथाई भाग गाइकवाडाचा होता, तो व त्यालगत चवऱ्यासी नामें एक परगणा आहे, तो मागितला; तेव्हां ती गोष्ट गोविंदरावानें तात्काळ कबूल केली. त्यावरून असें दिसून आलें कीं, या समयीं इंग्लिशांस गाइकवाडानें इतका मुलूख उगाच दिला, परंतु असें समजलें नाहीं कीं, त्यानें थोडक्याच दिवसांनीं त्या आबा शेलूकराच्या नाशाविषयीं कुमक मागावयाच्या मसलतीनें दिला. सन १८०० त तो गोविंदराव गाइकवाड मृत्यु पावला, ते समयीं त्याचे औरस पुत्र चौघे व दासीपुत्र सात होते; यांशिवाय कांहीं कन्याही होत्या. त्या चौघां पुत्रांत वडील आनंदराव

त्यास मुख्य मानकरी आपला धनी असें मानीत, परंतु त्या आनंदरावाच्या ज्ञानात कांहीं कमीपणा होता ह्मणून कितीएक त्या राज्यांतील मंडळ आपलें महत्व स्थापावयाविषयीं उद्युक्त झालें. त्या गोविंदरावाचा दुसरा पुत्र कान्होजी, तो कांहीं बंड करील अशा अटकळीनें गोविंदरावानें त्यास बंदींत ठेविलें होतें. मग तो गोविंदराव मेल्यावर त्या कान्होजीनें आनंदरावास बहुत नम्रतेच्या गोष्टी सांगून आणि लष्करी लोक यांस मध्यस्थ करून आपली बंदींतून सुटका केली. नंतर तो तेथचा मुख्य कारभारी झाला, परंतु इतक्यानेंच त्यास तृप्ति नसे; यास्तव तो सर्वत्र अनेक प्रकारें राजाप्रमाणें सत्ता करूं लागला. असे चार महिने गेल्यावर कोणीएक रावजी आपाजी नामें गोविंदराव गाइकवाडाचा मुख्य कारभारी होता, तो प्रबळ होऊन त्यानें त्या कान्होजीला पदच्युत केलें. तेव्हां तो कान्होजी व तो रावजी आपाजी परभू आपणांस इंग्लिशांची कुमक मागत होते; त्यांत रावजी परभू इंग्लिशांस अशी आशा दाखवी कीं, 'गोविंदराव यानें तुह्माशीं जो करार केला तो मी शेवटास नेईन'; आणि कान्होजीही इंग्लिशांस तेंच सांगून त्याखेरीज चिखली परगणा देतों ह्मणून कबूल करिता झाला. त्या रावजी परभूचा भाऊ बाबाजी परभू बडोद्यांतील संपूर्ण स्वारांचा सरदार असे, त्याचे मदतीस त्या बडोदे शहरांत सात हजार आरब होते, ते त्यास अनुकूळ असत. त्या कान्होजी गाइकवाडाचें साहाय्य करणारा मल्हारराव गाइकवाड, जो कडीच्या जहागीरदाराचा पुत्र, तो शूर आणि मोठा दक्ष होता; त्यानें लष्कर जमा करून त्या आनंदरावाचे कितीएक किल्ले व जितकीं ठाणीं होतीं तितकीं घेतलीं. तेव्हां त्या आनंदरावाचा मुख्य कारभारी रावजी यानें विलंब न करितां मुंबईसरकारास अर्जी केली, 'आह्मास या समयीं मल्हाररावाच्या उपद्रवाचे नाशार्थ पांच पलटणें पाठविलीं पाहिजेत. आह्मी त्यांची चाकरी घेऊन रोजमुरा देत जाऊं.' ते समयीं मुंबईसरकारास ती गोष्ट उत्तमशी वाटली, आणि त्यांत आपलें हित आहेसें समजलें. परंतु कलकत्त्याचा मुख्य साहेब याची आज्ञा झाल्यावांचून त्या मुंबईच्या साहेबास त्या गाइकवाडाला तादृश अनुकूळ होतां येईना; ह्मणून तें पत्र येतांच त्यांनीं सोळाशें लोक मात्र त्या कुमकेस पाठविले; त्यांत मेजर वाकर साहेब नामें मुख्य केला होता, तो सन १८०० च्या फेब्रुआरीचे अखेरीस त्या लोकांसहित गाइकवाडाच्या लष्करांत मिळून तो कडीवर चालिला. तेव्हां तो मल्हारराव गाइकवाड यानें 'आह्मापासून चूक झाली,' असें बोलून 'जीं ठाणीं घेतलीं आहेत तीं माघारीं देतों,' असें कबूल करून त्यांशीं तह करावयाचा आकार घातला; परंतु त्याची मसलत समय पाहून घात करावयाची होती. त्याप्रमाणें त्यानें कोणे एके समयीं त्यावर छापा घातला, तो इंग्लिशांच्या बंदोबस्तामुळें शेवटास गेला.

नाहीं, परंतु थोडक्याच दिवसांत असें दिसून आलें कीं, त्यानें गाइकवाडाचे बहु-
तेक लोक वश केले. असें असतां मेजर वाकर साहेब याचा कांहीं उपाय चालेना;
त्यानें कडीपाशीं राहून आपलें संरक्षण मात्र केलें, आणि आपल्या पुष्टीकरितां मुंबई-
सरकारास फौज मागून तिची मार्गप्रतीक्षा करीत राहिला. मग एप्रिलाचे २०
व्या तारिखेस मुंबईहून नवे लोक येऊन त्या कडीकिल्ल्याच्या तटाखालीं उतरून
आपल्यासमोर खंदक करून त्याच मातीचे जागोजाग तटाप्रमाणें ढीग करून तेथें
बळ धरून राहिले होते. नंतर गाइकवाडाचे व इंग्लिशांचे लोक त्यावर जाऊन
जय पावले. त्या युद्धांत इंग्लिशांचे लोक मेले व जखमी मिळून एकशें त्रेसष्ट
पडले. यानंतर मल्हारराव तें युद्ध टाकून इंग्लिशांच्या स्वाधीन झाला, ते समयीं
तो कडीचा किल्ला गाइकवाडाचे स्वाधीन झाला. तेव्हां मल्हाररावास प्रतिवर्षी
सवा लक्ष रुपये नडियादाच्या वसुलापैकीं देऊं करून तेथें त्यानें राहावेंसें केलें. हें
काम झाल्यावर कोणी गणपतराव नामें गाइकवाडाचा भाऊबंद होता, तो बडो-
द्यापाशीं संकेरा नामें किल्ला आहे, तेथें मल्हाररावाच्या पक्षानें लढत असून तो
किल्ला देईना, तेव्हां तें स्थान इंग्लिशांनीं बलात्कारेंकरून घेतलें. ते समयीं त्या
गणपतरावाजवळ मुरारराव नामें आनंदरावाचा दासीपुत्र होता. ते दोघे तेथून
निघून धारेस जाऊन तेथच्या पंवाराचा आश्रय पावले. त्यापुढें आणीक एक मोठें
काम राहिलें होतें, तें थोडक्याच वेळांत शेवटास गेलें. तें असें; बडोद्यामध्यें
आरब लोक होते ते आपला रोजमुरा थकल्याचे निमित्तें आनंदराव गाइकवाड यास
कैद करून त्या शहरांत सत्ता करूं लागले, आणि कान्होजीस बंदींतून सोडून देते
झाले. ही अव्यवस्था वृद्धिंगत न व्हावी, ह्मणून त्या लोकांस मेजर वाकर साहेब
यानें बहुतप्रकारें सांगितलें, परंतु त्या सांगण्याचा उपयोग नाहींसा पाहून त्या
साहेबानें बडोद्यासभोंवता घेरा घातला. तेव्हां ते आरब आंतून दहा दिवसपर्यंत लढले.
त्या लढाईत कितीएक साहेब सरदार मेले गेले. नंतर तसेंच युद्ध चाललें असतां
इंग्लिशांचा मोर्चा लागू होऊन त्या किल्ल्याची भिंत ढांसळून मोठें खेंडार पडतांच
ते आरब लोक युद्ध टाकून तहाचें बोलणें करूं लागले. तेव्हां गाइकवाडानें त्या
आरब लोकांची वाजवी बाकी साडेसत्रालाख रुपये राहिली होती, ती देऊन
'त्यांनीं आपल्या राज्याचे मर्यादेबाहेर जावें' असें कबूल करवून त्यांस तेथून बाहेर
घालविलें. ते बहुतेक आपल्या बोलीप्रमाणें निघून गेले. त्यांतील एक आबूद जम-
दार नामें होता, तो मात्र त्या करारप्रमाणें न चालतां आपले बहुतेक लोक बरोबर
घेऊन राजपिंपळीस जाऊन कान्होजीला मिळाला. तो कान्होजी कितीएक लोक
जमा करून जागोजाग मुलूख लुटीत असे, आणि खंडणीही घेत असे. तेव्हां

( सन १८०३ मध्यें ) मेजर होम्स्नामें साहेब एक टोळी घेऊन आला; त्याची व त्या कान्होजीची लढाई होऊन इंग्लिश जय पावल्यावर त्यांनीं कान्होजीच्या पाठीस लागून कपडवंजेस त्याला गांठून त्याच्या सर्व लोकांची दाणादाण केली. तेव्हां तो कान्होजी तेथून पळून उज्जनीस जाऊन राहिला.

---

## भाग एकतिसावा.

### ( इसवी सन १८०२ पासून सन १८०८ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. होळकर पुणें मुक्कामीं जय पावल्यानंतर तेथच्या लोकांस उपद्रव न देतां नम्रतेनें वागल्याचें कारण.—२. त्यानें बाजीराव पेशवा याच्या गादीवर अमृतरावाचा पुत्र विनायकराव बसविला व पुणें शहरचे लोकांपासून खंडणी घेतली.—३. वसईंत पेशवा व इंग्लिश यांचा तह झाला तो प्रकार.—४. त्या तहास विघ्न करावयाविषयीं शिंदे व रघुजी भोंसले एकमत होऊन त्यांनीं गुप्तपणें सैन्य जमा केलें.—५. इंग्लिशांच्या बळानें बाजीराव पेशवा आपल्या गादीवर पुनः बसला.—६. रघूजी भोंसला व शिंदा यांशीं तहाचें बोलणें लाविलें तें सिद्धीस न जातां उभयपक्षीं मैत्री तुटली.—७. अहमदनगर किल्ला इंग्लिशांनीं घेतला.—८. असईजवळची मोठी लढाई —९. अशीरगड व भडोच व पावनगड हे किल्ले इंग्लिशांनीं घेतले.—१०. हिंदुस्थानांतील युद्धप्रकार.—११. दिल्ली व आग्रें व लासवाडी यांजवळच्या लढाईची गोष्ट.—१२. दक्षिणेंत आरगांवाजवळ लढाई झाली तें प्रकरण.—१३. देवगांवचा व सर्जी अंजनगांवचा तह.—१४. होळकर व इंग्लिश यांचें वैमनस्य पडून जनरल लेक साहेबामें सैन्यासुद्धां त्याचे पाठीस लागून त्यास त्याचे मुलुखीं घालविलें.—१५. त्यानंतर तो होळकर पुनः येऊन त्यानें कर्नल मॉन्सन् साहेब याच्या हाताखालचे एके टोळीचा पराभव केला.—१६. मग तो होळकर मोठ्या सैन्यासहित हिंदुस्थानांत शिरला. व त्या होळकराचें लष्कर दिल्लीजवळ पराभव पावलें. व दिगाजवळची लढाई, व तो किल्ला इंग्लिशांनीं घेतला.—१७. होळकराचे दक्षिणेंतील किल्ले व त्याची राजधानी इंदूर इंग्लिशांचे हातीं लागलें.—१८. जनरल लेक साहेबानें भरतपूर किल्ला घ्यावयाचा उद्योग केला, तो शेवटास न गेला; तथापि त्या राजानें वकील पाठवून इंग्लिशांशीं तह केला.—१९. शिंद्यानें होळकराचा पक्ष स्वीकारिला यास्तव त्याशीं व इंग्लिशांशीं वैमनस्य पडलें.—२०. होळकर पंजाबाकडे पळाला, त्याचे पाठीस लेक साहेब लागल्यामुळें त्या उभयतांचा तह झाला.—२१. तेच समयीं शिंद्यानेंही इंग्लिशांशीं तह केला.—२२. होळकर पंजाबांतून आल्यावर त्यास वेड लागून तो मृत्यु पावला.—२३. त्याच्या स्वाभावादिकांचें वर्णन.

१. बाजीराव बसईंत आश्रय पावला, इतक्यांत पुण्यामध्यें काय काय वर्तमान झालें, तें प्रकरण असें; होळकरानें आपल्या लोकांपासून पुणें शहरास उपद्रव न लागावा, म्हणून फार बंदोबस्त ठेविला, तो केवळ तेथील लोकांच्याच हितासाठीं केला नव्हता. त्यांत अशी मसलत होती कीं, आपला भलेपणा पाहून बाजीराव आपल्या हातीं सांपडावा. नंतर ती मसलत सिद्धीस जात नाहीं, असें समजून

त्यानें अमृतराव पेशवा जुन्नरास होता, त्यास पुण्याचें राज्य चालवावयाकरितां बोलाविलें, तेव्हां तो कितीएक दिवस मान्य होईना. शेवटीं सन १८०२ च्या नवेंबराचे १२ वे तारिखेस पुण्यांत येऊन आपला डेरा भांबवडीस देऊन तेथेंच त्यानें राज्यकारभार मोरोबा फडनवीस व बाबूराव फडके वगैरे नाना फडनवीसाचे पक्षपाती होते, त्यांच्या साहाय्येंकरून चालविला.

२. नंतर होळकर यानें त्या अमृतरावास गादीवर बसवून राज्य करावयाची मसलत दिली असतां तो ऐकेना, ह्मणून त्याच्या पुत्रास तो गादीवर बसविणार होता, तेंही त्यानें ऐकिलें नाहीं. परंतु त्यास जेव्हां समजलें कीं, बाजीराव पेशवा यानें इंग्लिशांचा आश्रय धरिला, तेणेंकरूनच तो पेशवेपणास मुकला, तेव्हां त्या अमृतरावानें होळकराचें बोलणें मान्य केलें. नंतर त्या अमृतरावाचा पुत्र विनायकराव यास 'पेशवे'पदवीचीं वस्त्रें प्राप्त झालीं. तीं वस्त्रें साताऱ्याचा राजा त्यास प्रथम देत नव्हता; मग त्या राजाचा भाऊ चतुरशिंग राजा त्या होळकराचा पक्षपाती झाला असे, त्याच्या सांगण्यावरून राजानें विनायकरावास तें पद दिलें. याप्रमाणें त्या होळकराची मसलत सिद्धीस गेल्यानंतर त्यानें आपल्या दुष्ट स्वभावासारिखें कृत्य आरंभिलें. त्यांत प्रथमतः दोघे बाजीरावाचे कारभारी चिंतोपंत देशमुख व वैजनाथपंत मामा यांस हाताखालीं घेतलें. तेव्हां त्यांनीं त्यास लष्करी खर्चासाठीं शहरच्या लोकांस पुढें होळकराचा उपद्रव न लागावा ह्मणून त्या सर्वांकडून खंडणीसारिखें द्रव्य देवविलें. नंतर ते असें उत्तम कार्य करणारे जे पुरुष त्यांसच कैद करून आपल्याजवळचे अत्यंत क्रूर हरिपंत भावे व हरिनाथ या नामें दोघे ब्राह्मण होते, त्यांचे स्वाधीन त्या दोघांजणांस करून सांगितलें कीं, 'तुह्मांस कळेल तसें यांस छळून द्रव्य घ्यावें.' तेव्हां त्यांनीं त्या दोघांस व त्याशिवाय दुसरेही कितीएक त्या शहरचे थोर कुलीन लोक होते, त्यांस अनिर्वाच्य दुःख देऊन त्यांचें सर्वस्व हरण केलें. बाजीराव पेशवा ज्या दिवशीं वसईत पोंहचला, तेच दिवशीं कर्नल क्लोज् साहेब तेथें अगोदरच पुण्याहून जाऊन राहिला होता; त्याची व बाजीरावाची डिसेंबराचे ६ वे तारिखेस भेट झाली. तेव्हां त्या कर्नल क्लोज् साहेबानें बाजीरावास पूर्वींच तहाचा प्रकार लिहून पाठविला होता. ती गोष्ट तो साहेब बोलतांच बाजीराव त्यास मान्य झाला. नंतर आणखी कांहीं त्या उभयतांचें बोलणें होऊन ३१ वे तारिखेस तो तह ठरला. तो असा कीं, पेशवे व इंग्लिश यांनीं परस्परें एकमेकांच्या व जे आपले सहाय असतील त्यांच्या संरक्षणाकरितां बाहेरचा शत्रु जिंकावा; त्या कामास इंग्लिशांचे सहाहजार पलटणी लोक व त्या बेताप्रमाणें गोरे गोलंदाजांसहित तोफखाना आपल्या राज्यांत पेशव्यानीं राहूं द्यावा; त्यांतील दोनहजार लोक नेहमीं पेशव्यांजवळ असावे;

याखेरीज पेशव्यांकडचे दहा हजार स्वार व सहा हजार पायदळ लोक याप्रमाणें कुठेंही युद्धप्रसंग पडल्यास हजर असावें; आणि विलायतेंत ज्या कोणी मुलखीं इंग्लिशांचे द्वेष्टे राहतात, त्या मुलखाचा कोणी पेशव्यानें आपल्या चाकरीस ठेवूं नये. याशिवाय इंग्लिशांच्या लष्करी खर्चास बाजीरावानें सव्वीस लक्षांचा मुलूख द्यावा, आणि पेशवे पूर्वीं सुरतेंत आपला कांहीं हक्क घेत होते तो न मागावा; आणि निझाम व गाइकवाड यांपासून पेशवे बाकी ऐवज घेणार होते, तो इंग्लिशांच्या द्वारें घ्यावा. याप्रमाणें बाजीरावानें मान्य करून दुसरेंही कबूल केलें कीं, 'पूर्वीं निझामाशीं महाडचा तह ठरला होता, त्यास आह्मी मान्य आहों; आणखी नुकताच आनंदराव गाइकवाडानें इंग्लिशांशीं तह केला आहे, त्यासही कबूल आहों; याखेरीज दुसऱ्या कोणाशीं तह करणें तर तोही इंग्लिशांचे मसलतीवांचून करणार नाहीं.'

४. याप्रमाणें वसईंत बाजीराव मोठ्या अडचणीमुळें इंग्लिशांनीं ह्मटल्याप्रमाणें तह करून पुरतेपणें इंग्लिशांस मिळाला असें झालें; परंतु तो एका बुद्धीचा मनुष्य नव्हे. त्याचा स्वभाव असा होता कीं, कोणाशींही निष्कपटपणें स्नेह न करितां दुसऱ्यास फसवावें. वास्तव नुकताच तो तह ठरून तें करारपत्र होऊन त्यावर मोर्तब होत आहे, तोंच त्याच्या मनांत आलें कीं, 'शिंदा व रघूजी भोंसला यांस होळकराच्या पारिपत्याचे मिषेंकरून पुण्यास बोलावून आणून मग त्यांकडून इंग्लिशांस घालवून द्यावें.' त्यांतच दुसरें त्याच्या मनांत आलें कीं, 'तें युद्ध होऊन कदाचित् इंग्लिश जय पावले तर आपण यांशीं स्नेह केला आहे हाच वृद्धिंगत करूं.' असें मनांत आणून त्यानें शिंद्याकडे बाळोजी कुंजर आणि रघूजी भोंसला याकडे नारायणराव वैद्य पाठविला. तो प्रकार दिसण्यांत असा केला होता कीं, इंग्लिशांशीं व आपणांशीं तह झाल्याचें वर्तमान कळवावयाकरितां हे दोघे वकील त्या उभयतांकडे पाठविले; परंतु आंतून सूचनार्थ असा कीं, 'मी बहुत अडचणीमुळें इंग्लिशांशीं तह केला, या गोष्टीचा राग मनांत न धरितां लवकर माझ्या कार्यास यावें.' हें वर्तमान त्या उभयतांस कळतांच ते दोघे एकमत होऊन त्यांचे विचारें ठरलें कीं, 'हा तह आह्मां सर्व मराठ्यांस बाधक होईल, त्यास तो सिद्धीस जाऊं देऊं नये.'

५. नंतर कलकत्याचा गव्हर्नर जनरल साहेब यानें बाजीरावानें केलेला तह शिंदे व रघूजी भोंसले यांच्या मनास कदाचित् येणार नाहीं, असें समजून आपले वकील त्यांकडे पाठविले कीं, 'बाजीराव पेशवा याचा व आमचा परस्परें एकमेकांचीं राज्यें संभाळावयाकरितां तह झाला आहे, तसेंच तुमचें व आमचें ऐक्य एकमेकांच्या राज्यरक्षणार्थ मात्र असावें.' त्या वेळेस शिंदा मोठी फौज घेऊन

बऱ्हाणपुरीं होता, त्यानें इंग्लिशांच्या वकिलाचें बोलणें ऐकून उत्तर केलें कीं, 'यासमयीं ही गोष्ट माझ्या मनास येत नाहीं, तथापि मजकडून इंग्लिशांशीं किमपि द्वेष नाहीं, असें निश्चित समजावें.' याप्रमाणें त्याचें बोलणें होऊन पुढें समजण्यांत आलें कीं, त्यानें व रघूजी भोंसल्यानें इंग्लिशांशीं युद्धाविषयीं मोठी तयारी आरंभिली; आणि दुसरेंही विदित झालें कीं, या समयीं बाजीराव व शिंदा व रघूजी भोंसला यांचें ह्याविषयीं अन्योन्य पत्रद्वारें ऐक्य झालें आहे. त्यापुढें इंग्लिशांनीं बाजीराव पेशवा याजबरोबर ज्यामध्यें बाराशें गोरे लोक होते असें दोन हजार तीनशें सैन्य देऊन त्यास पुण्यांत आणवून सन १८०३ च्या मे महिन्याचे १३ वे तारिखेस मोठ्या समारंभानें गादीवर बसविलें. त्यापूर्वीं कलकत्त्याच्या गव्हर्नर जनरलानें आपली फौज हैदराबादेस होती ती, आणि मद्रासेची आणून निझामाची व दक्षिणेंतील जहागीरदार यांजकडची सेना घेऊन होळकरास दक्षिणेंतून घालवून राज्याचा बंदोबस्त केला होता; तसा अगोदरच अमृतरावही पुणें सोडून गेला असे. तेव्हां त्यानें जातांना प्रथम संगमनेर गांव लुटून तेथून ती वाट सोडून वांकडा नाशिकास जाऊन तेथेंही पुण्याप्रमाणेंच लोकांस बहुत दुःख देऊन तें क्षेत्र लुटलें. तसेंच वाटेनें सर्व गांव लुटीत गेला. त्यानंतर त्यानें लिहावयाजोगें कृत्य केलें नाहीं. आणखी त्याशीं व बाजीरावाशीं ऐक्य होईना ह्मणून तो कितीएक स्वारासहित कांहीं वर्षें इंग्लिशांच्या चाकरीस जाऊन राहिला; त्यानंतर इंग्लिशांनीं प्रतिवर्षीं त्यास आठ लक्ष रुपये देऊन काशींत ठेविलें. त्याचा पुत्र विनायकराव तो अद्यापि तेथें आहे.

६. रघूजी भोंसले व शिंदे यांनीं इंग्लिशांस दक्षिणेंतून घालवावयाच्या मसलतींत होळकरास घ्यावें, याविषयीं त्याशीं फार बोलणें लाविलें. तेव्हां त्यानें प्रथम 'मी तुह्मास अनुकूळ होत नाहीं' असें त्यांस न भासवितां त्यांकडे आपला माळवा मुलूख पुरातन जहागीर जप्त होता तो सोडवून घेतला; आणि बाजीराव पेशवा याच्या कैदेंत खंडेराव होळकर नामें आपला पुतण्या असे, तोही मुक्त करून घेतला. मग आपणास अवश्य हिंदुस्थानांत जावयाचें कांहीं काम आहे असें निमित्त करून त्यांस न मिळतां माळव्यास जाऊन राहिला. यानंतर इंग्लिशांचा मुख्य गव्हर्नर जनरल साहेब यास, शिंदे व भोंसले हे दोघे मोठमोठीं सैन्यें घेऊन निझामाच्या मुलखाचे मर्यादेसमीप एकमेकाचे जवळ जवळ राहिले, असें विदित झालें. तेव्हां त्यानें त्या उभयतांस विचारिलें कीं, 'तुमच्या मनांत काय असेल तें स्पष्ट सांगा.' त्या वेळेसच त्या साहेबानें आपली फौज अहमदनगरापाशीं आणून ठेविली होती. तेव्हां त्यांनीं कालहरणार्थ मात्र 'तुह्मांशीं आमचें कांहीं वांकडें नाहीं,' असें बहुत वेळ उत्तर दिलें असतां शेवटीं त्या साहेबाचे फौजेचा मुख्य जनरल-

वेलेस्ली नामें साहेब होता, त्यानें त्या उभयतांस सांगितलें कीं, 'जर तुह्मी ह्मणतां हें सत्य आहे, तर तुह्मी दोघे आपआपली फौज घेऊन एथून जा. आह्मीही आपली फौज माघारी नेऊं.' असें बोलतां बोलतां कितीएक दिवस गेल्यावर त्या दोघांनीं इंग्लिशांच्या वकिलास विपरीत उत्तर केलें; तेव्हां तो वकील त्यांपासून निघून गेला. तीच उभयपक्षीं युद्धाची तयारी करावयास खूण झाली. असें सन १८०३ च्या आगष्ठाचे ३ ऱ्या तारिखेस घडलें.

७. ते समयीं त्या युद्धाविषयीं इंग्लिशांजवळ सुमारें पन्नासहजार फौजेची तयारी झाली होती. त्यांतील साडेदहाहजार लोक हिंदुस्थानांत नेमिले, त्यांचा मुख्य जनरल लेक साहेब केला. बाकी फौज गुजराथेंत व दक्षिणेंत होती. त्या सर्वांचा एक मुख्य जनरल वेलेस्ली साहेब होता, त्यानें सुमारें साडेसातहजार लोक गुजराथेंत ठेवून कितीएक पुण्याच्या रक्षणास व हैदराबादच्या बंदोबस्तास नेमून एक भाग कृष्णा व तुंगभद्रानदी या दोहींच्या मध्यभागीं ठेवून सुमारें सत्राहजार फौज आपल्याबरोबर सर्वत्र फिरण्यासाठीं घेतली. दौलतराव शिंदा व रघूजी भोंसला या उभयतांची मिळून एकलक्ष सुमारें सेना होती. त्यांत शिंद्याचे गोरे सरदारांसहित पलटणी लोक तीसहजारांवर असत, आणि स्वार सुमारें पन्नासहजार होते; बाकी कितीएक तोड्याचे बंदुकवाले व कितीएक बाणदार आणि गोरे सरदारांविरहित अर्धवट कवाईत शिकविलेले रघूजी भोंसल्याचे पलटणी लोक असत. त्या दोहीं लष्करांचा तोफखाना मिळून दोनतीनशें तोफा होत्या, त्यांत शिंद्याचे गोलंदाज फार चतुर होते. त्या शिंद्याच्या पलटणांतील सत्राहजार सुमारें पायदळ व आठहजार सुमारें स्वार हिंदुस्थानांत शिंद्याचा मुलूख रक्षींत असत. याशिवाय इंग्लिशांस प्रतिकूळ असा आपणास पेशव्यांचा पक्षपाती ह्मणविणारा कोणीएक समशेर बहादर नामे बाराहजार लष्करांसहित बुंदेलखंडांत होता. इंग्लिशांचा मुख्य सरदार वेलेस्ली साहेब समजला कीं, 'या समयीं युद्धाशिवाय दुसरा उपाय नाहीं,' तेव्हां त्यानें अहमदनगर घ्यावयास कांहीं लष्कर पाठविलें. त्या अहमदनगरच्या किल्ल्याची बांधणी चिरेबंदी आणि त्यासभोंवता मोठा खंदक आहे; त्यावरून पूर्वीं चांद बिबी नामें बादशाहाची स्त्री होती, तिच्या वहिवाटीपासून तें स्थळ मोठें अजिंक्य असें लोक मानीत होते. त्या किल्ल्यापासून पेंठ निराळी आहे, तिच्या सभोंवता मातीचा तट आहे. त्या पेंठेंत ते वेळेस आरब लोक यांचा एक समुदाय व शिंद्याचें एक पलटण होतें, आणि त्या किल्ल्यांत सुमारें पंधराशांवर शिपाई लोक असत. याशिवाय तो किल्ला व ती पेंठ यांच्या मध्यभागीं एक स्वारांचा जमाव होता. असें असतां इंग्लिशांचे लोक त्या पेंठेजवळ जाऊन त्यांनीं विलंब न करितां तत्काळ शिड्या लावून त्या भिंतीवर चढून आंत उत-

रून ती पेंठ हस्तगत केली. नंतर मोठमोठे मोर्चे लावून किल्ल्याच्या तटास खंडार पाडिलें. तें पाहतांच तेथचा किल्लेदार भयभीत होऊन आपल्या लोकांसुद्धां निघून जावयास मार्ग मात्र मागून किल्ला त्यांस देता झाला.

८. त्यानंतर जनरल वेलेस्ली साहेब आपल्या लष्करचे लोक त्या किल्ल्यांत ठेवून आपल्या बरोबरचे लोक आठहजार सुमारें मुलखांत फिरावयाच्या बेतानें दुसऱ्या कोणा सरदाराच्या स्वाधीन करून बाकी लोकांसहित आपण आगष्ट महिन्याचे २९ वे तारिखेस औरंगाबादेस गेला. इतक्यांत मराठ्यांचें लष्कर अजिंठ्याच्या घाटानें जाऊन जालन्यास उतरलें; मग तेथून उठून आग्नेयी दिशेस चालिलें, त्यावरून तें हैदरबादेस जाईल अशी वदंता उठली, यास्तव वेलेस्ली साहेब औरंगाबाद सोडून गोदावरीकडे चालिला. तें वर्तमान ऐकून मराठे ती वाट सोडून तेथून उत्तरेस निघाले. त्या लष्करांत युद्धाविषयीं बंदोबस्त ठीक नव्हता, कां कीं, दौलतराव शिंदे व रघूजी भोंसले हे दोघेही युद्धाविषयीं निपुण नसून दोघांचें वागणें एकमताचें नव्हतें. यानंतर जनरल वेलेस्ली साहेब यानें मुलखांत संचार करावयाकरितां जो आपल्या लष्कराचा भाग वेगळा केला होता, तो व त्याबरोबरचें लष्कर सप्टेंबरचे २१ वे तारिखेस एकत्र मिळालें. ते समयीं वर्तमान आलें कीं, मराठ्यांचें लष्कर जाफराबादेपाशीं बोकरदन नामें गांव आहे, तेथें येऊन उतरलें, त्यावरून त्या साहेबाच्या विचारास आलें कीं, पुनः दोन्ही भाग निरनिराळे करून वेगळ्या वेगळ्या वाटांनीं जाऊन एकाएकीं त्यावर हल्ला करावा. मग २३ वे तारिखेस तो साहेब तेथून उठला. नंतर दुसरे दिवशीं मुकाम करते वेळेस त्या साहेबास कळलें कीं, आपणापासून जवळ तीन कोसांवर शत्रूचें लष्कर आहे. तेव्हां त्यानें आपल्या लष्करचें बुणगें तेथेंच ठेविलें, आणि त्याच्या रक्षणास एक पलटण ठेवून बाकीचे लोक बरोबर घेऊन आपल्या लष्कराच्या दुसऱ्या भागाची वाट न पाहतां त्वरेनें आपण शत्रूवर चालिला. तो कांहींसा तिकडे गेला असतां शत्रूचें लष्कर सुमारें पन्नासहजार शंभर तोफांसहित खेळणानदीच्या पलीकडच्या कांठीं जुवानदीचे संगमाजवळ उतरलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. तेथें त्या लष्कराचे डावे बाजूस असई नामें एक मुद्दकोटाचा गांव पाहिला. ते समयीं त्या साहेबाजवळ सुमारें साडेचारहजार सैन्य होतें, आणि त्याबरोबर पेशवे व म्हैसूरचा राजा यांकडचे कांहीं स्वारही होते, परंतु इंग्लिशांस त्यांचा विश्वास येईना; म्हणून त्यांपासून युद्धाचा उपयोग विशेष होऊं दिला नाहीं, आणि आपली टोळी तर शत्रूच्या सैन्यापेक्षां फार लहान म्हणून, व शत्रूचा तोफखाना प्रथम हातीं लागल्यास मोठा उपयोग होईल असें म्हणून, त्याच्या तोंडावर समूर न जातां डावे बाजूस जेथें त्याचा तोफखाना होता, त्यावर त्यांनीं चाल

केली, तेव्हां मराठ्यांनीं आपला तोफखाना सुरू करून प्रथम इंग्लिशांच्या पायदळाचा नाश बहुत केला. शेवटीं इंग्लिशांचे गोरे स्वार वेगेंकरून त्यांवर चालून गेले, ते वेळेस मराठ्यांचे स्वार व पायदळ यांस त्यांपुढें उभें राहवेना, आणि इतक्यांत त्या गोरे लोकांचे कुमकेस मद्रासचे पलटणी स्वार येऊन पोंहचले, तेव्हां मराठ्यांचें पायदळ मागें हटलें. त्यांस जाग्याच्या संकोचामुळें ते लोक एकीमागें एक अशा दोन ओळी धरून उभे होते, त्यांतील पुढची ओळ इंग्लिशांच्या नेटानें मागचे ओळीस मिळून त्याचा बंदोबस्त विसकटलेला पाहून इंग्लिश त्यांवर जाऊन पडले, तेव्हां मराठ्यांच्या लोकांस इंग्लिशांनीं जुवानदींत घालविलें. त्यांतून जे नदी उतरून पळं लागले, त्यांतल्या कितीएक लोकांस इंग्लिशांच्या स्वारांनीं मारिलें. रघूजी भोंसला तर त्या युद्धाच्या आरंभींच पळाला, आणि शिंदाही थोडक्या वेळानें तसेंच करिता झाला. त्या युद्धास सर्व मराठी सैन्यापैकीं शिंद्याचीं कितीएक पलटणें व त्यांचे गोलंदाज यांनीं मात्र उत्तम प्रकारें युद्ध केलें. तेव्हां मराठ्यांचे लोक बहुतेक जखमी झाले, आणि बाराशें ठार पडले; त्यांत शिंद्याचा प्रधान यादवराव भास्कर नामें होता तोही मेला गेला. असा मराठ्यांचा मोड होऊन त्यांच्या अठ्याणव तोफा इंग्लिशांच्या हातीं लागल्या. याप्रमाणें असईजवळच्या युद्धांत इंग्लिशांनीं विजयी होऊन मोठा मान संपादिला. ते समयीं इंग्लिशांच्या समुदायांतील लोक मेले व जखमी झाले मिळून तिसऱ्या वांट्यावर सुमारें पडले. त्या युद्धांत एक विशेष झाला तो असा; मराठ्यांनीं आपल्याजवळ इंग्लिश येऊन भिडले, असें पाहतांच भूमीवर वेडीं वांकडीं आंगें टाकून अगदीं मृतप्राय पडून त्यांस आपल्या आंगावरून पुढें जाऊं दिलें, आणि एकाएकीं उठून त्यांच्या मागून तोफांचा मार केला.

९. त्या साहेबानें आपल्या लष्कराचा भाग वेगळा केला होता, त्यास वाटेनें कांहीं अडचण पडल्यामुळें तो दुसरे दिवशीं संध्याकाळपर्यंत येऊन पोंहचला नाहीं. मग तो येऊन मिळाल्यावर वेलेस्ली साहेबानें नर्मदेकडे शिंद्याचे पाठीस लाविला. तेव्हां शिंद्याचीं पलटणें त्याशीं लढायास उभीं राहीनात, यास्तव त्यामागून नर्मदा पार जाऊन त्या लोकांच्या सरदारानें त्यांची पाठ सोडून शिंद्याचें बऱ्हाणपूर व अशीरगड नामें किल्ला घेतला. असें दक्षिणेंत वर्तमान असतां आगष्ट महिन्याचे २९ वे तारिखेस इंग्लिशांनीं गुजराथेंतील भडोच घेतली. नंतर पावनगड नामें किल्ला आहे, तेथें जाऊन तोही हल्ला करून घेतला.

१०. हिंदुस्थानांत शिंद्याचा अलीगड नामें मोठा बळकट किल्ला आहे, तोही जनरल लेक साहेबानें मोठें युद्ध करून हस्तगत केला; त्या युद्धांत इंग्लिशांचे लोक मेले व जखमी झाले मिळून पावणेतीनशें सुमारें पडले, आणि मराठ्यांचे लोक

खंदकांत पडून बुडाले व मेले व जखमी मिळून दोनहजार सुमारें पडले. मग लेक साहेबानें तो किल्ला सोडून दिल्लीपासून तीन कोसांच्या अंतरानें मुक्काम केला. तेथें नुकते डेरे उभे करतात तोंच शत्रू समूर दृष्टीस पडला. त्याचा शोध करितां असा ठिकाण लागला कीं, शिंद्याकडचा कोणी पुरातन फ्रेंच सरदार सुमारें नऊहजार पलटणी लोक व सुमारें पांचहजार स्वार व सत्तर तोफा इतका सरंजाम जमवून घेऊन त्या लेक साहेबास जिंकावयाकरितां आला. तेव्हां त्या साहेबानें तेथें आपल्या बुणग्याच्या रक्षणापुरते लोक ठेवून बाकी उरलेले साडेचारहजार सुमारें होते, तितक्यांसहित शत्रूशीं युद्ध करून जय मिळविला. त्यांत मराठ्यांचे सुमारें तीन-हजार लोक पडले, आणि इंग्लिशांचे सहाशें पडले. तेव्हां दिल्लीशहर इंग्लिशांस सहज प्राप्त होऊन तेथचा बादशाहही त्यांच्या हातीं लागला.

११. यानंतर लेक साहेब आग्रा किल्ला यावर चालून गेला. त्या किल्ल्यासभों-वतीं शिंद्याचीं कितीएक पलटणें होतीं, त्यांस तेथच्या किल्लेकऱ्यास त्यांचा विश्वास येईना; यास्तव त्यानें आंत घेतलें नाहीं. मग इंग्लिशांनीं त्यांस जिंकतांच त्या किल्ले-दारानें इंग्लिशांस तो किल्ला दिला. पुनः इंग्लिशांचीं व शिंद्याचीं पलटणें यांची लढाई लासवाडी गांवाजवळ झाली, तो प्रकार असा; इंग्लिश शत्रूच्या पाठीस लागून रात्रींत बारा तेरा कोसांची मजल करून गेले, तों सूर्योदयसमयीं शत्रूची सेना त्यांच्या दृष्टीस पडली; तेव्हां त्यांस वाटलें कीं, शत्रु वाटेनें चालतो आहे. ह्मणून जे स्वार तेथें पोंहचले होते, ते पाठीमागच्या लोकांची वाट न पाहतां त्वरा करून त्यावर जाऊं लागले. ते केवळ त्यांच्या समीप गेले, तेव्हां त्या इंग्लिशांस असें समजलें कीं, ते शत्रूचे लोक सुदृढ स्थान धरून राहिले आहेत; आणि असें दृष्टीस पडलें कीं, पुढें एक तोफांची ओळ उभी केली आहे, व त्या तोफा सांखळीनें गुंतविलेल्या आहेत; तेव्हां ते स्वार तो तोफखाना घ्यावयास उद्युक्त झाले, परंतु त्या तोफांच्या मारापुढें त्यांचा उपाय चालेना, यास्तव त्यांस आपल्या मागल्या स्वारांची व पाय-दळाची वाट पाहावी लागली. ते येऊन पोंहचल्यावर इंग्लिशांनीं त्या तोफा घेऊन मराठ्यांचा पराभव केला. त्या युद्धांत शिंद्याकडे बहुतेक फ्रेंच जातीचे सरदार असत, ते आणि कितीएक डिबायनानें शिकविलेले पुरातन पलटणी लोक होते, ते फार ह्मटून लढले, व मागें न सरतां जेथें उभे होते तेथेंच पडले; नंतर थोडके राहिले तेव्हां त्यांनीं युद्ध टाकिलें. असें झालें ह्मणून इंग्लिशांचे लोक सव्वाआ-ठशें पडले, त्यांत बहुतेक सरदार नाश पावले. इंग्लिशांचा असा जय झाल्यावरून शिंद्याचीं हिंदुस्थानांतील सर्व पलटणें हीनबळ झालीं, आणि त्याचा चंबळानदीचे उत्तरेचा मुलूख होता, तो इंग्लिशांच्या हातीं लागला.

१२. असें हिंदुस्थानाचें वर्तमान असतां कटक व बुंदेलखंड या मुलखीं इंग्लिशांचें सैन्य जाऊन तीं ठिकाणेंही त्यांनीं हस्तगत केलीं. ते समयीं दक्षिणेंत काय काय वर्तमान झालें, तो प्रकार असा; शिंदे व रघूजी भोंसले यांस वर्तमान कळलें कीं, जनरल वेलेस्ली साहेब दक्षिणेंत औरंगाबादेवर चालिला, आणि त्याच्या लष्कराचा एक भाग बऱ्हाणपुरास गेला. त्यावरून त्यांनीं त्यास अडथळा करावयाची सिद्धता केली; तेव्हां जनरल वेलेस्ली साहेब फिरून उत्तरेस जाऊं लागला; हें समजून शिंदा आपल्या लोकांसहित ठिकाण धरून राहिला, आणि रघूजी भोंसला उत्तरेस अनकाईटनकाईच्या घाटाकडे चालिला. तेव्हां तो रघूजी भोंसला निझामाचा मुलूख उद्वस्त करील, या शंकेनें जनरल वेलेस्ली साहेब पुनः दक्षिणेस त्यामागें निघाला. तो त्याजवळ पोंहचल्यावर रात्रीस इंग्लिशांचा छापा आपणावर पडेल, अशा भयास्तव आपल्या तळाची बदली दोहों दिवसांत पांचां जागीं केली. ते समयीं त्या दोन्ही लष्करांचा युद्धप्रसंग पडला नाहीं; इतकें मात्र झालें कीं, रघूजी भोंसल्यानें पांचहजार स्वार इंग्लिशांचे चौदाहजार बैल दाणा भरून जात होते, ते पाडून आणावयास पाठविले. त्या बैलांबरोबर इंग्लिशांचे पलटणी लोकांच्या तीन कंपनी व पायदळ व म्हैसूरच्या राजाचे कांहीं स्वार होते. त्यांची व यांची आंबरे गांवापाशीं गांठ पडली, तेव्हां त्या उभयतांचें बहुत युद्ध होऊन त्यांतील दोनशें बैल मात्र नेले; वरकड त्यांनीं संभाळून इंग्लिशांच्या लष्करांत पोंहचविले. रघूजी भोंसला आपल्या मुलखाकडे जाऊं लागला, तेव्हां वेलेस्ली साहेब आपल्या दुसऱ्या भागाचा सरदार गाविलगडास घेरा घालून लढत होता त्याचे कुमकेस गेला.

१३. इतकीं कामें होत तोंपर्यंत शिंद्यानें कितीएक वेळां त्या साहेबाकडे वकील पाठविले. नंतर नवेंबराचे २३ वे तारिखेस ( सन १८०३ यांत ) शिंद्याचें व वेलेस्ली साहेबाचें युद्ध तहाच्या बोलण्यासाठीं कांहीं दिवस मना झालें; परंतु भोंसल्याचा कोणी वकील न आला म्हणून वेलेस्ली साहेब यानें आरगांवाजवळ भोंसल्याचें लष्कर होतें, तेथें जाऊन त्यावर पडून त्याचा पराभव केला. नंतर भोंसल्यानें इंग्लिशांशीं डिसेंबराचे १७ वे तारिखेस तह ठरविला, तो प्रकार असा. वर्धा नदीचे पश्चिमेस रघूजी भोंसल्याचा कांहीं हक्क व मुलूख होता तो, आणि नरनाला व गाविलगड हे दोन किल्ले ज्या डोंगराचे धारेवर दोहों जागीं आहेत, त्या सगळ्या पर्वताचे दक्षिणेच्या मुलखांतील प्रतिवर्षीं चारलक्ष रुपये उत्पन्न होत असा मुलूख, व दोन्ही किल्ले खेरीजकरून बाकी सर्व मुलूख इंग्लिश व त्यांचे पक्षपाती यांजकडे असावा. याशिवाय कटक प्रांत व बालासोरही इंग्लिशांकडेसच असावा; आणि निझामाचे मुलखीं रघूजी भोंसला चौथ व घांसदाणा वगैरे जें घेत होता तें त्यानें इतःपर न

मागावें, आणखी निझाम व सेनासाहेबसुभा व भोंसला व पेशवे यांत कांहीं कलह उत्पन्न झाल्यास त्याचें निवारण इंग्लिशांच्या मध्यस्थीनें व्हावें. यावरही दुसरें ठरलें कीं, इंग्लिश व भोंसले यांच्या दरबारांत परस्परांचे वकील असावे. तेव्हां इंग्लिशांनीं आपला वकील एल्फिन्स्टन् साहेब नामें पाठविला, तो नागपुरीं जाऊन राहिला. हा तह देवगांवीं झाला ह्मणून त्याचें देवगांवचा तह असें नांव पडलें. नंतर थोडक्याच दिवसांनीं सर्जी अंजनगांवीं शिंद्याचाही तह ठरला. त्यानें भागीरथी व यमुना या दोहींमध्यें जो मुलूख आहे तो, व जयपूर, जोतपूर हे रजपुतांचे मुलूख, आणि गोहद्चा राणा याच्या उत्तरेस जो मुलूख आहे तोही, आणखी अहमदनगर व भडोच किल्ला व तत्संबंधी मुलूख इतकें इंग्लिशांचे स्वाधीन करून अजिंट्याचा घाट व गोदावरी यामध्यें जो मुलूख त्याचा होता, तोही त्यांस देऊन कबूल केलें कीं, 'मोगलांच्या बादशाहाकडे आह्मी बाकी मागणार नाहीं, व जयपूर व जोतपूर व बुंदी व माचेरी एथचे राजे वगैरे ज्यांनीं इंग्लिशांचा पक्ष स्वीकारिला असेल त्यांस आमचा उपसर्ग लागणार नाहीं; त्यांनीं स्वतंत्रपणें वागावें.' असा करार झाल्यावर इंग्लिशांनीं घेतलेलें बऱ्हाणपूर व आशीरगड व पवनगड व गोहद व तत्संबंधें मुलूख, आणि पूर्वीं दिल्लीच्या बादशाहानें महादजी शिंद्यास धोलपूरबारी व राजखेडा हे परगणे इनाम करून दिलेले होते ते सोडून दिले. याप्रमाणें तह झाल्यावर मेजर मालकम साहेब हा शिंद्याजवळ वकील नेमिला, तो जाऊन त्याच्या लष्करांत राहिला. असा इंग्लिश व निझाम व पेशवे यांनीं एकमतें मुलूख संपादिला, त्यांतील वर्धानदीचे पश्चिमेचा व नरनालागड व गाविलगड यांच्या डोंगराचे दक्षिणेस जो मुलूख तो निझामाचा भाग ठरला. पेशवा आपल्या शक्तीप्रमाणें युद्धास झटला नाहीं, व त्या युद्धेंकरून त्यांस नानाप्रकारें उपयोग झाला होता, ह्मणून अहमदनगर किल्ला व तत्संबंधीं मुलूख मात्र त्याचा भाग ठरून बाकी इंग्लिशांकडे राहिला. याप्रमाणें वांटणी ठरल्यानंतर इंग्लिशांचे दक्षिणेंतील लष्कराचा एक भाग जाफराबादेस गेला, दुसरा पुण्यांत पेशव्याच्या रक्षणास राहिला. ते वेळेस त्या मुलखीं लुटारूंचा दंगा बहुत होता.

१४. इंग्लिशांचें हिंदुस्थानांतील लष्कर यास होळकराचा विश्वास नव्हता, ह्मणून त्याचे चौकशींत तें तयार राहिलें. त्यानेंही पूर्वीं सांगितलेलीं युद्धें होत असतां माळव्यामध्यें शत्रूची व आपली प्रजा समान मानिली, आणि त्या सर्वांपासून अतिशयित खंडणी घेतली. मग इंग्लिशांनीं शिंदे व भोंसले यांस विलंब न लावितां जिंकिलें, त्या योगें तो होळकर परम विस्मय पावला, आणि त्यास ऱ्हासकाळही प्राप्त झाला, तथापि त्याच्या मनांत पहिल्यापासून इंग्लिशांस घालवावयाचा जो बेत होता तो सोडीना.

यासाठीं त्यानें उत्तरेस जाऊन भरतपुरचा राजा व रजपूत राजे व रोहिले व शीख लोक हे आपणास मिळवावयाचा उद्योग आरंभिला. याशिवाय इंग्लिशांचा व शिंद्याचा तह झाला होता तो मोडून शिंद्यासही आपल्याकडे घ्यावयास वकील पाठविला. याप्रमाणें आचरण करीत असतांही होळकर इंग्लिशांस मित्रत्व दाखवीत असे. परंतु पुढें थोडक्याच दिवसांनीं गव्हर्नर जनरल साहेबास त्याचें कापट्य स्पष्ट कळून इंग्लिशांच्या पक्षपाती लोकांचे देशमर्यादेजवळ त्या होळकराचें लष्कर होतें, त्यास तेथून दूर जावयास त्यानें जनरल लेक साहेबाकडून पत्र पाठविलें. त्यांतच सूचना केली कीं, 'जें तुमचें बोलणें असेल त्यास वकील पाठवावा.' नंतर तो येऊन असें मागणें करूं लागला कीं, त्याप्रमाणें साहेबास कबूल करवेना; मग तें बहुतेक बोलणें होऊन होळकरानें दाबाची गोष्ट सांगितली असतां त्या जनरल लेक साहेबानें उत्तर केलें कीं, 'तुह्मी जशी युद्धाची गोष्ट फुशारकीनें सांगतां तशी आमची चाल नाहीं; कदाचित् तुह्मी युद्ध करूं लागलां तर आपल्या कल्पनेपेक्षां आपण अशक्त आहों असें ध्यानांत येईल.' यानंतर सन १८०४ च्या एप्रिलांत होळकर देवदर्शनाचें मिष करून शिंद्याचें शहर अजमीर तेथें जाऊन तो किल्ला घ्यावयास उद्युक्त झाला; परंतु तें साध्य झालें नाहीं. तेव्हां त्या गोष्टीचा राग शिंद्यास न यावा ह्मणून त्याच्या वकीलाजवळ बोलिला कीं, 'आह्मी किल्ला घ्यावयाचा यत्न केला, तो केवळ स्वहितार्थच असा नव्हे; सर्व मराठ्यांनीं स्वतंत्रपणें वागावयाकरितां आरंभिला.' यावरून इंग्लिशांच्या मतें ठरलें कीं, 'अवश्य युद्धाचा उपाय चालवावा.' तेव्हां एप्रिलाच्या महिन्यांत गुजराथेमध्यें कर्नेल मरे साहेब याजवळ इंग्लिशांची कांहीं फौज होती, तीस होळकराचे मुलखीं स्वारी घालवावयाची आज्ञा झाली; ते वेळेसच जनरल लेक साहेबही होळकराचे पाठीस लागला, आणि शिंदाही कबूल झाला कीं, 'होळकरास बुडवावयाविषयीं मी साहाय्य करीन.'

१५. जनरल लेक साहेब होळकराचे पाठीस लागला असतां त्यानें पुनः तहाचें बोलणें लाविलें, परंतु साहेब ऐकेना, यास्तव तो मागें हटत हटत चंबळा नदी उतरून आपल्या मुलखीं गेला. तेव्हां तो साहेब पुढें पर्जन्यकाळ जवळ आला ह्मणून त्याची पाठ सोडून तेथून माघारा आपल्या छावणीस गेला; आणि पांच पलटणें व तीनहजार मराठे स्वार इतकें सैन्य मुलखांत त्या होळकराचा उपसर्ग आपल्या कोणास लागूं देऊं नये ह्मणून नेमिलें; त्याचा मुख्य कर्नेल मॉन्सन् साहेब केला. नंतर मुंबईचें लष्कर गुजराथेंतून येतें, असें त्या साहेबास कळून त्यानें नेम केला कीं, तो मरे साहेब आणि आपण एकत्र मिळून होळकराशीं स्पर्धा चालवावी; अशी कल्पना करून तो मुकेंद्रघाटाचे वाटेनें होळकराच्या मुलखांत

शिरून चंबळानदीकडे चालिला. त्यास जुलई महिन्याचे ७ वे तारिखेस वर्तमान कळलें कीं, होळकर आपलें पायदळ व स्वार व तोफांसुद्धां सर्व सैन्य घेऊन इंग्लिशांच्या नाशास येतो; आणि दुसरें वर्तमान आलें कीं, कर्नल मरे साहेब गुजराथेंतून लष्करासुद्धां निघाला, त्यानें कांहीं कारणामुळें इकडे येण्याची मसलत टाकिली. अशा समयीं त्या साहेबाजवळ अन्नाची सामग्री दोन दिवस पुरेशी मात्र होती, ह्या सर्व कारणांमुळें त्यास पुढें जावयाचा मोठा विचार पडला. तेव्हां त्यानें तसेंच धैर्य करून पुढें होऊन होळकराचें लष्कर चंबळा नदी उतरतेसमयीं त्यावर हल्ला करावा, तें न होतां त्याच्या दुर्दैवानें त्यास बुद्धि सुचली कीं, या वेळेस आल्यावाटेनें मागें फिरावें; मग तसेंच केलें. तेव्हां तो तेथून निघून मुकेंद्रघाटास पोंहचला; तों त्याच्या पाठीमागें होळकराची फौज जवळ येऊन त्यास पत्र आलें कीं, 'तुह्मी युद्ध टाकून आमचे स्वाधीन व्हावें, याखेरीज तुह्मास दुसरा उपाय नाहीं.' तेव्हां तें त्यानें न मानिलें असतां होळकरानें आपल्या स्वारांच्या तीन टोळ्या करून एक त्याच्या समूर व दोहों बाजूंस दोन योजून हल्ला केला; तें युद्ध प्रातःकाळापासून अस्तमानपर्यंत झालें. तथापि त्या इंग्लिशांचा बंदोबस्त त्या स्वारांच्यानें मोडवला नाहीं. मग ते होळकराचे लोक युद्ध सोडून दोन कोसांवर मागें जाऊन उतरले. तेथें त्यांचें पायदळ व तोफा मागून येऊन पोंहचल्या ह्मणजे तें सर्व सैन्य त्या मॉन्सन् साहेबाच्या लष्करावर पडून त्याचा अगदीं नाश करावा, असा त्याचा बेत होता; तें इंग्लिशांच्या सरदारास समजून दुसरे दिवशीं उजेडतां तेथूनही तो मागें जाऊं लागला. त्यास शत्रूचा असा उपद्रव असून पर्जन्यही बहुत लागत असतां तो गामच नामें चंबळेचा उतार आहे तेथपर्यंत पोंहचला. ते समयीं मोठ्या पर्जन्यामुळें तो उतार मोडला होता. नंतर तें पाणी उतरल्यावर तो मॉन्सन् साहेब नदीपार गेला; त्यास तेथपावेतों जावयास विलंब लागला, आणि त्यांच्या आसमंतात् गांवांतून अन्न सांपडेना, ह्मणून तो फार हैराण झाला; आणि मार्गांतील चिखलामुळें त्याच्या तोफा चालेनात. तेव्हां त्या तशाच टाकून पुढें चंबेली नामें ओढा आहे तेथें पोंहचला; तों ओढाही पाण्यानें भरला होता, तेथून पार जावयास दहा दिवस खोळंबा झाला. इतकें होई तोंपर्यंत होळकराचे स्वार निरंतर हल्ला करीत होते, आणि त्या साहेबाच्या लष्करास धान्यादिकांचा फार तोटा, त्या योगें त्याची मोठी दुर्दशा झाली, आणि तो ओढा पार होतांना त्याचे कितीएक शिपाई वाहून गेले, व बुणग्यांतील लोक तो ओढा उतरून पलीकडे जाण्याची आपली पाळी येईल ह्मणून वाट पाहात असतां मागें राहिले, ते होळकराकडील भिल्ल यांनीं मारिले. इतकें झालें तरी त्या पलटणांचा बंदोबस्त होळकराच्या स्वारांस मोडवेना.

आणखी ते पलटणी लोक त्या ओढ्याचे कांठीं असतां जुलईचे २१ वे तारिखेस संध्याकाळीं होळकराच्या सैन्यांत शिरून त्यांच्या कितीएक लोकांस मारून माघारे आपल्या ठिकाणास आले. नंतर आठां दिवसांनीं रामपुरा नामें किल्ला पूर्वीं लेक साहेबानें होळकराचे पाठीस लागतांना घेतला होता त्या ठिकाणास ते पोंहचले. तेथें जनरल लेक साहेबाकडून त्यांच्या कुमकेस दोन पलटणें व त्यांबरोबर कांहीं दाणा आला तो त्यांस प्राप्त झाला; मग त्या जागीं दीड पलटण ठेवून तेथून पुढें बनासनामक नदीजवळ पोंहचले. तेथेंही उतार नाहींसा झाला होता, यास्तव ती नदी उतरून पलीकडे जावयास उशीर लागला, तितक्यांत मराठ्यांच्या तोफा व पायदळ येऊन पोंहचलें, इतक्यांत इंग्लिशांचे बहुतेक लोक नदी उतरून पलीकडे गेले, आणि बुणग्याच्या रक्षणास जे एक पलटणावर कांहींसे लोक राहिले त्यांवर त्यांनीं तोफांचा मार चालवून हल्ला केला. ते समयीं त्या पलटणांच्या साहेबानें वेगेंकरून त्यांवर चालून येऊन एक क्षणभर त्या तोफा हस्तगत केल्या; परंतु होळकर आंगें मोठ्या सेनेसहित येऊन त्यानें त्या बहुतेकांस मारून टाकिलें. त्यांत बारा गोरे साहेब सरदार पडले, बाकी जे त्या पलटणीचे शिपाई व सरदार राहिले ते नदी उतरून पलीकडे गेलेल्या आपल्या लोकांचा तिकडून मार चालू झाल्यानें वांचले. यापुढें मॉन्सन् साहेब यानें शिंद्याचीं सहा पलटणें व एकवीस तोफा आपल्या कुमकेस खुशालगड नामें जयपुरच्या राज्याचें ठिकाण आहे तेथें येऊन त्यांची व आपली गांठ पडावयाचा नेम केला होता. ह्मणून तो तेथें गेला, परंतु त्या जागीं पोंहचतांच ती कुमक नाहींसें समजलें, तेव्हां आग्र्यापर्यंत जावयाची मसलत ठरली. मग तें ठिकाण सोडून निघाल्यावर वाटेंत मराठे स्वार तोफांसुद्धां येऊन त्यांनीं त्या पलटणांचा नाश आरंभिला; परंतु त्यांचें बळ चालेना, कां कीं, ते स्वार जोंपर्यंत त्या पलटणी लोकांचे बंदुकांच्या तोंडासरसे येऊन भिडत तोंपर्यंत त्यांनीं बार न केले, मग ती सरबत्ती होतांच ते चहूंकडे उधळले, असें बहुत वेळां झालें. परंतु शेवटीं मराठ्यांच्या तोफांच्या मारानें व ते शिपाई निरंतर वाट चालून थकलेले होते त्या योगें एके रात्रीस फार अंधारामुळें त्या पलटणींत बुणगें शिरून बयाना नामें पर्वतांतील वाटेच्या अडचणीमुळें त्यांचा सर्व बेत विसकटला. तेव्हां ते सारे शिपाई आपआपल्या सामर्थ्याप्रमाणें आग्र्यास जाऊन पोंहचले, तोंपर्यंत त्यांतून कितीएक मराठ्यांनीं मारिले, परंतु त्यांच्या पाठीस लागलेले मराठे थोडके होते, ह्मणून ते बहुतेक वांचले.

१६. त्यावरून होळकर साठ हजार स्वार व पंधरा हजार पायदळ व एकशेंब्याण्णव तोफा यांसहित वाटेनें फार धामधूम करीत मथुरेस आला, परंतु जनरल लेक साहेबानें या गोष्टीचा बंदोबस्त अगोदरच केला होता, त्या योगें इंग्लिशांनीं एका महि-

न्यांत मराठ्यांस तेथून पिटून आपण त्या मथुरेंत मुकाम केला. तेव्हां होळकर तें स्थान सोडून गेला, तो दिल्ली घ्यावयाचा उद्योग करूं लागला. त्यानें तेथें सहा दिवस युद्ध करून तें काम सिद्धीस न नेतां जनरल लेक साहेब येतो असें त्यास समजतांच तो भरतपुरचा राजा यास मिळावयाकरितां त्या राजाचा दीग नामें किल्ला आहे तेथें गेला. तेव्हां त्याचे पाठीस लागलेले इंग्लिश येऊन पोंहचले, त्यांनीं त्यावर हल्ला केला. ते समयीं मराठ्यांचा पराभव होऊन त्यांच्या सत्यायशीं तोफा इंग्लिशांच्या हातीं लागल्या, आणि ते होळकराचे लोक त्या किल्ल्यांत आश्रय पावले. मग त्या लेक साहेबानें भिंती पाडावयाजोग्या मोठ्या मोठ्या तोफा आग्र्याहून आणून तो किल्ला घ्यावयास आरंभ केला. त्या दिवसापासून दहावे दिवशीं त्या किल्ल्याचे बाहेरचा धाकटा तट ढांसळून खेंडार पाडून मध्यरात्रीं इंग्लिशांनीं हल्ला करून तें ठिकाण हस्तगत केलें, तेव्हां दुसऱ्या दिवसाची रात्री उजाडतां त्या किल्ल्यांतील शिबंदी व होळकराचे लोक तो किल्ला सोडून तेथून भरतपुरास जाऊन आश्रय पावले. ते वेळेस होळकराचे स्वार भरतपुरीं न जातां फरकाबादेस जाऊन पोंहचत तोंपर्यंत लेक साहेबानें त्यांचे पाठीस लागून त्यांतील तीन हजार स्वार मारिले.

१७. इतकें होई तोंपर्यंत मुंबईच्या फौजेंतील एके टोळीनें गुजराथेंतून माळव्यांत जाऊन होळकराची राजधानी इंदूर हस्तगत केलें, आणि त्या माळवे प्रांतीं जे होळकराचे मोठे मोठे किल्ले होते ते सारे घेतले; याशिवाय दक्षिणेंतीलही त्याचे चांदोर व जालने वगैरे किल्ले आणि त्याचा मुलूख हस्तगत केला. असें झालें असतां त्या होळकरास भरतपूर मात्र आश्रय उरला, तोही घ्यावयाची मसलत ठरली; ह्मणून मुंबईच्या सेनेचा भाग हिंदुस्थानांत पाठविला तो कोट्यापर्यंत पोंहचला होता. त्यास आज्ञा गेली कीं, 'बंगाल्याच्या लष्करास येऊन मिळावें.'

१८. जनरल लेक साहेब यानें यापूर्वीं जीं जीं कामें आरंभिलीं तीं तीं सहज सिद्धीस गेलीं, ह्मणून भरतपूर घ्यावयाचा बेत झाला. ते वेळेस त्याजवळ तोफखाना वगैरे किल्ला घ्यावयाचें साहित्य यथास्थित नसतांही तो त्वरेंकरून त्या कामास लागला. त्या भरतपुरचा घेरा साडेतीन चार कोसांचा आणि त्यास फार बळकट असा मातीचा तट, व त्यासभोंवता मोठा खंदक पाण्यानें भरलेला; तें पाणी पुरतें भरल्यास एका पुरुषावर अधिक व्हावें. असें असतां त्या किल्ल्यास घेरा न घालितां एके जागीं मात्र ठाणें बसवून तो लढूं लागला. लढतां लढतां त्या कोटास एक लहानसें खेंडार पडतांच हल्ला केला, तो सिद्धीस गेला नाहीं. नंतर आणीकही तीन वेळां तशीच गर्दी केली, तरी कार्यसिद्धि झाली नाहीं. नंतर त्या साहेबानें तसाच दम धरून आणीक सरंजाम आणविण्याचा बेत केला असतां, तेथच्या राजानें होळकराची मसलत

शेवटास जात नाहीं, असें समजून आपल्या हितार्थ त्याचा पक्ष सोडून इंग्लिशांशीं तह केला. त्यांत असें ठरलें कीं, वीस लक्ष रुपये त्या राजानें इंग्लिशांस द्यावे, आणि जे कोणी इंग्लिशांचे द्वेषी असतील, त्यांचा पक्ष टाकावा; याशिवाय पूर्वी लेक साहेबानें त्या भरतपूरकराशीं तह केला होता, त्यांत कांहीं त्याच्या हिताचीं कलमें होतीं, तीं इतःपर नाहींत असें समजावें; आणि इंग्लिशांनीं वचन दिलें कीं, 'तुह्मी कबुलातीप्रमाणें शुद्ध मार्गानें वागतां असें आमच्या मनांत येईल, तेव्हां तुमचा दीग किल्ला तुह्मांस माघारा देऊं.'

१९. असा तह झाल्यानंतर शिंद्यानें आपल्या वकीलाबरोबर कांहीं स्वार व सर्व पेंढारीमंडळ त्या राजाचे कुमकेस पाठविलें, ते समयीं त्यानें त्या वकिलाची भेट न घेतां त्याबरोबर आलेल्या लोकांसहित त्याला माघारें फिरविलें. त्याबरोबरच होळकर आपले राहिलेले स्वार[1] व बुंदेलखंडांतून आलेला अमीरखान यांस आपल्याबरोबर घेऊन शिंद्याच्या लष्करांत गेला. तेथें शिंद्यानें त्याचा मोठा सन्मान केला, आणि इंग्लिशांच्या वकिलाची समजूत केली कीं, 'यानें तुमचे मुलखीं जाऊन उपद्रव न करावा, यासाठीं आह्मी याचा मान रक्षितों.' तें साहेबाचे मनास न आलें. (त्या जनरल लेक साहेबास ते समयीं विलायतेहून 'लॉर्ड' असें नवें पद प्राप्त झालें होतें.) तेव्हां तो साहेब भरतपुराहून शिंद्याकडे चालिला. ते वेळेस शिंदा व होळकर हे तो लॉर्ड जवळ आला, असें समजून कोट्यापर्यंत गेले. ते समयीं पर्जन्यकाळ समीप आला होता ह्मणून त्या साहेबानें नियम केला कीं, या वेळेस यांचे पाठीस न लागतां छावणी करून राहावें. तेव्हां आपल्या बंगाल्याच्या लष्कराचा जो मोठा भाग तो आग्रें व मथुरा एथें ठेवून मुंबईच्या लष्कराची टोळी रामपुरीं ठेविली. असें सन १८०५ त पर्जन्याच्या आरंभापर्यंत झालें.

२०. नंतर शिंदे व होळकर कोटा सोडून अजमीरच्या वाटेनें चालिले, ते समयीं शिंद्याचा मुख्य कारभारी सर्जेराव घाटगा आणि होळकर एकमत होऊन इंग्लिशांशीं युद्ध करावें, अशी त्यांची मसलत होत होती, परंतु तो सर्जेराव घाटगा थोडक्याच दिवसांत पदच्युत होऊन अंबाजी इंगळ्यास तें मुख्यत्व प्राप्त झालें. त्याची मसलत युक्तीनें काळहरण करावयाची होती, व शिंद्याच्या मनांत येऊं लागलें कीं, आह्मी व होळकर दोघे मिळूनही इंग्लिशांस घालवून देऊं ह्मटलें तरी तें घडत नाहीं. याशिवाय ते शिंदे व होळकर यांमध्येंच कांहीं ईर्ष्या उत्पन्न

---

१. भरतपुरच्या किल्ल्याची लढाई होत असतां होळकराच्या व इंग्लिशांच्या स्वारांचीं युद्धें बाहेर होत असत, तेव्हां कोणेएके समयीं इंग्लिश जाऊन होळकराच्या स्वारांवर छापा घालून आपलें एकही मनुष्य न पडूं देतां त्याचें एक हजार मनुष्य मारून आपल्या ठिकाणास गेले.

होऊन दोघांनीं आपआपले लष्कराचे तळ निरनिराळे केले. नंतर शिंद्यानें आपल्या हितार्थ मात्र इंग्लिशांशीं तह करावयाची मसलत आरंभिली असतां होळकर अजमीर सोडून आपल्याबरोबर बारा हजार स्वार व तीन हजार पायदळ व तीस तोफा घेऊन शीख व अफगाण लोक यांची कुमक संपादन करावयास पंजाबमुलखीं गेला. नंतर लॉर्ड लेक साहेब त्याचे पाठीस लागला, आणि त्यास शीख लोकांची कुमक मिळाली नाहीं, यामुळें तो होळकर फार संकटांत पडला. तेव्हां त्यानें बिया नदीचे कांठीं लॉर्डाचें लष्कर होतें, तेथें आपला वकील तहाचें बोलणें करावयास पाठविला.

२१. इतक्यांत शिंदा यानें तहाचें बोलणें आरंभिलें होतें, तें नवेंबराचे २२ वे तारिखेस कर्नल् माल्कम् साहेब व शिंद्याकडचा मुनशी काविल नैन या उभयतांचे विद्यमानें शेवटास गेलें. या तहांतील मुख्य प्रकार इतकाच कीं, शिंद्याचे इनाम परगणे ढोळपूरबारी व राजखेडा हे इंग्लिशांनीं घ्यावे, आणि सर्जी अंजणगांवच्या तहासंबंधें इंग्लिश प्रतिवर्षी शिंद्याचे कितीएक मानकरी व सरदार यांस पंधरा लक्ष रुपये देत असत ते न द्यावे; व कंपनी आणि शिंदा यांच्या मुलखाची मर्यादा नवी असावी, ती अशी; त्या दोहों मुलखांमध्यें चंबळानदी मर्यादा, पश्चिमेस कोट्यापर्यंत, तशीच पूर्वेस गोहदच्या राण्याचे मुलखाचे पलीकडचे सीमेपर्यंत मर्यादा. इंग्लिशांनीं शिंद्याच्या खासगी खजिन्यास प्रतिवर्षी साडेचार लक्ष रुपये द्यावे, आणि त्याचे स्त्रीस व कन्येस आपल्या मुलुखीं जहागीर द्यावी, त्यांत दोन लक्षांचा मुलूख स्त्रीस आणि एक लक्षाचा कन्येस द्यावा. त्याशिवाय गोहदच्या राण्यास कांहीं मुलूख देऊन त्याकडून ग्वाल्हेर किल्ला इंग्लिशांनीं शिंद्यास देववावा, असा एक ठराव झाला. होळकराशीं व इंग्लिशांशीं तह झाला तो प्रकार असा; 'टोंकरामपुरा व बुंदी व त्या बुंदीच्या डोंगराचे धारेच्या उत्तरेस जो मुलूख आहे, तेथें होळकराची सत्ता नसावी, आणि इंग्लिश व त्यांचे सहाय यांपाशीं त्यानें बाकी मागूं नये, व आपले चाकरीस गोरे लोक ठेवूं नये; याशिवाय सर्जेराव घाटगा हा इंग्लिशांचा द्वेष्टा यास्तव त्याला आपल्या कारभारांत शिरूं देऊं नये; याखेरीज लॉर्ड लेक साहेबानें सांगितले वाटेनें माळव्यास जावें. इंग्लिशांनीं कबूल केलें कीं, 'चंबळेच्या दक्षिणेस होळकराचा मुलूख आहे, तेथच्या कारभारांत आह्मी शिरणार नाहीं; याखेरीज चांदोर किल्ला व आंबेर[1] व शिवगांव इतके खेरीजकरून वरकड दक्षिणेंतील जितके होळकराचे किल्ले व प्रांत असतील तितके आह्मी त्यास माघारे देऊं.

---

१. आंबेर वगैरे ठिकाणें खेरीज केलीं, तीं पुढें होळकराची वर्तणूक नीट असल्यास माघारीं द्यावी असें ठरलें होतें.

२२. त्यानंतर होळकर पंजाबाहून आल्यावर कोणी उदेपुरचा राजा त्याचे कन्येनिमित्त जयपूरकर व जोधपूरकर या दोघां राजांचा कलह लागला होता; तेव्हां त्या दोघांचे वकील शिंदा व होळकर यांकडे कुमक मागावयास आले, ते समयीं शिंद्यानें त्या दोघांकडे सर्जेराव घाटगा व बापूजी शिंदा यांजबरोबर पंधरा हजार फौज देऊन पाठविले. होळकरानें अमीरखान यांस पठाणांसुद्धां जयपुरच्या राजाकडे नेमिलें. नंतर कितीएक वेळापर्यंत जयपुरच्या राजाचें प्राबल्य होतें, परंतु तो अमीरखान त्या राजाचा पक्ष सोडून केवळ स्वहितार्थ त्या दोघांच्याही मुलखांत लुटालूट करूं लागला. नंतर त्यानें जोधपुरच्या राजाचा अभिमान धरिला. शेवटीं त्या दोघां भांडणारांत आपण मध्यस्थ होऊन कितीएक मारेकरी घालून उभयपक्षीं दगे करून तो कलह शमविला. इतकें होई तोंपर्यंत होळकराचे बुद्धीस चळ झाल्यामुळें त्याचे मुत्सद्दी लोकांस त्याला प्रतिबंधांत ठेवावें लागलें. त्यास वेड लागल्याचे पूर्वीं त्याचा पुतण्या खंडेराव होळकर यास कोणी फितुरी लोक मिळून तो मुख्यसा मानून त्यांनीं त्याचा झेंडा उभा केला. तेव्हां त्या यशवंतरावानें तो फितूर मोडून त्या खंडेरावास मारेकरी घालवून मारून टाकिलें, परंतु त्या एकासच मारिल्यानें त्याचा राग शमेना; ह्मणून त्यानें आपला भाऊ काशीराव त्याच क्रोधानें तसाच मारिला. तेणेंकरून त्याचा राग शांत होऊन तो निर्भय झाला. त्या होळकरास खूळ लागल्यावर तो सन १८०८ पासून सन १८११ पर्यंत बंदोबस्तींत होता, मग त्या वर्षीं अक्टोबराचे २२ वे तारिखेस त्या वेडांतच तो मृत्यु पावला.

२३. तो होळकर मनाचा धीट आणि शरीरेंकरून सुदृढ असे; त्याचा जय झाला असतां तो आपल्या जातीच्या मराठ्यांप्रमाणें उत्संखळ होई, परंतु विपत्तिसमयीं घाबरा न होतां धैर्येंकरून आपल्या अर्थसाधनाचा उपाय चालवीत असे. तो बोलण्यांत व आचरणांत केवळ साबडा होता, असें असून समयानुसार राजाप्रमाणें वागणें आणि दुसऱ्यापासून आपली मर्यादा ठेवविणें, याविषयीं परम सुज्ञ आणि विनोदी असे; यास्तव शिपाई लोक त्यावर प्रीति करीत. तो पुरुष इतरां मराठ्यांपेक्षां मोठा उद्योगी, त्यानें फारशी व मराठी या दोन्ही लिहिण्यांचा अभ्यास केला होता. त्याचे आंगीं असे गुण असून कितीएक गोष्टींविषयीं त्याचें वागणें, लोभीपणा व निर्दयता व क्रूरपणा इहींकरून युक्त होतें; याशिवाय तो समयविशेषीं मोठा उग्रस्वभावीही होता. त्याची आकृति ठेंगणी आणि शरीर पुष्ट व रंग काळसर असे, व मुखश्री चांगली होती, त्यायोगें तो कांहींसा हास्यमुख दिसे. त्याच्या हातांत बंदूक फुटून त्याचा एक डोळा गेला होता, तथापि त्याचें तोंड विशोभित दिस्त नव्हतें.

# भाग बत्तिसावा.

## ( इसवी सन १८०३ पासून सन १८१७ पर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. यशवंतराव होळकर मेल्यानंतर त्याचा कारभार अमीरखानानें मुख्यत्वें केला तें प्रकरण.—२. शिंदे व नागपूरकर भोंसले यांचें वर्तमान.—३. पेंढारी लोकांची कांहीं गोष्ट.—४. बाजीराव पेशवा पुनः गादीवर बसल्यानंतर कसकसा वागला तें.—५. प्रतिनिधीचें बंड.—६. बाजीराव पेशवा यानें माधवराव रास्त्याशीं व वरकड जहागीरदार यांशीं कोणे प्रकारें कृत्रिम ठेविलें तो विस्तार.—७. सदाशिव माणकेश्वर व कुसुरुजी मोदी यांच्या वहिवाटीचा प्रकार.—८. त्रिंबकजी डेंगळा योग्यतेस चढल्याचा प्रकार.—९. बाजीरावानें आपल्याजवळ द्रव्य जमा केलें तें.—१०. त्यानें इंग्लिशांस बुडवावयाविषयीं कशी मसलत केली तें प्रकरण.—११. त्या बाजीरावाशीं व बडोदकराशीं वहिवाट झाली तें.—१२. गंगाधरशास्त्री पटवर्धन याचा वध.—१३. त्यापुढें त्रिंबकजी डेंगळा इंग्लिशांच्या बंदींत पडलेला असतां पळून गेला. त्यास बाजीराव पेशव्यानें गुप्तपणें आश्रय दिला.—१४. त्यावर इंग्लिशांनीं काय काय केलें तें प्रकरण.

१. रजपुत राजांचा कलह शांत झाल्यावर अमीरखान मोठ्या त्वरेनें रामपुऱ्यास आला, तेथें ठरलें कीं, राज्यकारभार चालवावयास मंडळी नवी करावी, त्यांत मुख्यत्वें अमीरखान असावा, परंतु बाह्यात्कारें यशवंतरावाची आवडती स्त्री तुळसी बाई नामें होती ती मुख्य केली. ती दुर्व्यसनी आणि मोठी खुनशी असे, यास्तव त्या एवढ्या कारभारास ती केवळ अयोग्य होती. तिनें यशवंतराव मृत्यु पावल्यावर आपल्या सवतीचा दौलतराव नामें चहूं वर्षांचा मूल आणून तो गादीवर बसवून त्याचे नांवें कारभार चालविला. त्यानंतर थोडक्याच दिवसांनीं त्या अमीरखानानें बाईजवळ गफूरखान नामें कोणी आपला भाऊबंद ठेवून आपण आपल्या पठाणांच्या हितार्थ रजपुतांचे मुलखीं गेला. त्यापुढें होळकराच्या राज्यकारभाराची अशी अव्यवस्था झाली कीं, त्या योगें प्रतिवर्षीं मुलुखाचा वसूल नियमाप्रमाणें उत्पन्न होईना; आणि त्या कारभारीमंडळांत कोणास अशी शक्ति नव्हती कीं, फौजेस फांटा देऊन खर्च तोडावा. याशिवाय सरकारखजिन्यांत शिबंदीच्या खर्चास पुरेसें द्रव्य नव्हतें, ह्मणून त्या लष्कराच्या वेगळ्या वेगळ्या टोळ्या करून त्यांस सरदार देऊन कोणत्याही प्रकारें त्याचा खर्च चालवावयाचे बेतानें त्यांस आपल्या मुलखांत जागोजाग पोट भरावयास पाठविलें. त्यांतील कितीएक बंडास मिळाले, त्यांत एक महंमद अल्लीखान बंगष नामें होता, तो खानदेशचे बहुतेक परगणे लुटून निझामाच्या मुलखांतून होळकराच्या अंबेर परगण्यांत जाऊं लागला, परंतु पुणें व हैदराबाद यांमध्यें इंग्लिशांचीं पलटणें होतीं, त्यांनीं त्यावर जाऊन त्याला धरून कैद करून तो मुंबईस पाठविला, तो तेथें बंदींत ठेविला.

२. शिंद्याचे मुलखीं होळकरापेक्षां काहींसा बंदोबस्त विशेष होता. तेथेंही

खर्चाच्या तोट्यामुळें त्यास होळकराप्रमाणेंच मुलखांत फौज पाठवावी लागली. त्यापूर्वीं त्या फौजा मुलूखभर पसरून युद्धादिकांच्या कामास गुंतल्या असत, त्या योगें प्रजेस बहुत उपद्रव होत नसे, मग जेव्हां त्या रिकाम्या होऊन एके जागीं फार जमूं लागल्या, तेव्हां रयतेस असें दुःसह दुःख प्राप्त होऊं लागलें कीं, ते लोक चांगल्या पेरण्या झालेलीं स्थळें टाकटाकून निघून गेले. एवढी अनीति चालू झाली असतांही शिंदे व होळकर यांच्या सैन्यांत शत्रूचा उपाय चालेना, कां कीं, ते लोक युद्धाविषयीं कुशळ होते. असाच रघूजी भोंसल्याच्या राज्याचाही बेत कांहींसा विसकटला, आणि त्याचे लोक तादृश युद्धांत निपुण नव्हते, ह्मणून अमीरखान यानें रजपुतांच्या मुलखांत आपली सत्ता स्थापून सन १८०९ मध्यें वराडांत स्वारी केली; त्याबरोबर त्याच्या पठाणांखेरीज पेंढारी फार आले, मग त्या सर्वांनीं मुलूख लुटावयाचा आरंभ केला; परंतु इंग्लिशांचे लोक त्या मुलुखासमीप होते, त्यांनीं ते लोक निर्भयपणें यथेच्छ लूट करितात, हें नीट नव्हे, असें समजून त्यांशीं युद्ध करून त्यांस नर्मदापार घालविलें.

३. पेंढारी लोकांच्या निर्दयपणास अंत नाहीं; ते पहिल्यापासून मराठी लष्कराच्या संगतीस असत; पुढें पहिला बाजीराव पेशवा हिंदुस्थानांतून पुण्यास येऊं लागला, ते समयीं ते माळव्यांत येऊन राहिले; नंतर कांहीं दिवसांनीं होळकर व शिंदे हे मोगलांच्या मुलखांत जाऊं लागले असतां त्यांजबरोबर जात; आणि त्या दोघांत ज्याचा पक्ष ते धरीत, त्याप्रमाणें आपणांस शिंदेशाई किंवा होळकरशाई असें ह्मणवीत. मग सन १७९४ त शिंद्यानें त्या पेंढाऱ्यांस नर्मदेजवळ कांहीं मुलूख दिला. त्यापुढें कोणी मोठा धूर्त करीमखान होता, ज्यानें खर्ड्याचे लढाईत निझामास लुटून बहुत द्रव्य मिळविलें, तो त्या पेंढाऱ्यांचा मुख्य होऊन त्यानें अमीरखान पठाणाची सुप्रसन्नता संपादून सुजावलपूर नामें परगणा त्यापासून मिळविला; याशिवाय त्यानें शिंद्याचे जहागीरदार यांचा माळव्यांतील मुलूख कांहीं युक्तीनें हाताखालीं घातला. अशी सर्व मिळून त्यास प्रतिवर्षीं पंधरा लक्ष रुपये जमाबंदी होऊं लागली. तेव्हां शिंद्यास त्याविषयीं शंका उत्पन्न होऊन त्यानें कांहीं भुलथापीनें त्याला धरून ग्वाल्हेर किल्ल्यांत बंदीस घातलें. तो सन १८१० पर्यंत तेथेंच होता, मग शिंद्यास बहुत द्रव्य देऊन त्या प्रतिबंधांतून सुटला. नंतर कोणी मध्येंच चितू व दोस्त महंमद व नामदारखान व शेख दल्लू या नामें चौघे पेंढाऱ्यांचे मुख्य झाले होते, ते येऊन त्यास मिळाले, तेव्हां त्याचे पंचवीस हजार स्वार जमले. ते समयीं त्याची मसलत होती कीं, कांहीं पायदळ चाकरीस ठेवून पुनः वराडांत जाऊन लुटालूट करावी, परंतु रघूजी भोंसला यानें त्या चौघांतील चितू

नामें मुख्य आपल्याकडे करून घेऊन त्या सर्वांस तेथून काढून दिलें. ते वेळेस तो करीमखान आपला पुरातन आश्रयभूत जो अमीरखान त्याजपाशीं आश्रयास गेला, तेथें त्यानें शिंद्याच्या मसलतीवरून त्यांस बंदींत ठेविलें. तो सन १८१६ पर्यंत तसाच होता. पेंढारी लोकांची अशी चाल होती कीं, प्रतिवर्षी दसऱ्याचे सुमारें आपला जो कोणी मुख्य असेल, त्याचे मसलतीनें एखादे ठिकाणीं बंदोबस्त ठीक नाहीं, असें पाहून त्या जागीं चोरवाटांनीं जाऊन मिळावें, मग तेथें पोंहचल्या-वर जसा पर्जन्यकाळीं नदीस लोंढा येतो, त्यासारिख्या वेगानें एकाएकीं त्या मुलखा-वर पडावें, आणि तेथें वेगळ्या वेगळ्या टोळ्या करून त्या देशांतील सारीं ठिकाणें लुटून सर्व प्रकारें अनर्थ करावा, मग ती लूट घेऊन जेथें आपण लूट केली, त्या ठिकाणापासून दूर दुसऱ्या एखाद्या संकेतस्थळीं जाऊन सर्वांनीं एकत्र मिळून आपल्या ठिकाणास जावें. ते पेंढारी, प्रथम माळवा व मारवाड व मेवाड व रज-पुताना व वराड इतक्या मुलखीं उपद्रव करीत होते, मग कधीं कधीं निझाम व पेशवे यांच्या मुलखांत शिरूं लागले.

४. इकडे पुण्यामध्यें बाजीराव यास इंग्लिशांनीं गादीवर बसविल्यानंतर थोड-क्याच दिवसांनीं त्याची कृतघ्नता व कुटिलवृत्ति इत्यादि दुर्गुण दिसून आले. तो इंग्लिशांच्या द्वेषी मंडळीशीं पत्रादिद्वारें गुप्त स्नेह ठेवूं लागला, त्यांस अनुकूळ करून घेण्याविषयीं अशी समजूत करी कीं, 'तुह्मी सारे दूर गेलां, आणि दक्षिणसी-मेचे जहागीरदार सारे फितलेले, यामुळें मी एकटा पडलों ह्मणून अडचणीकरितां इंग्लिशांशीं तह केला.' याशिवाय त्यानें असें केलें कीं, जेव्हां पटवर्धन सरदार जनरल वेलेस्ली साहेबास मिळून त्याचे बरोबर फौजेसुद्धां युद्धास जाणार होता, तेव्हां त्यानें कोल्हापुरच्या राजास त्याचे मुलुखीं स्वारी घालावयाची मसलत गुप्तपणें दिली, कां कीं, त्यानें त्या भयानें आपला मुलूख सोडून इंग्लिशांचे साहाय्यास न जावें. या कृत्यापासून त्या बाजीरावानें आपलीं दोन हितें कल्पिलीं होतीं, त्यांत एक तर शिंद्याचे शत्रु इंग्लिश यांच्या साहाय्यास पटवर्धन जाईनासा केल्यानें शिंद्याची आपणाविषयीं सुप्रसन्नता होईल. दुसरें असें; परशुराम भाऊ यांचें आणि आपलें वांकडें पडलें आहे, यास्तव इंग्लिशांच्या साहाय्यास तो न गेला, हेंच निमित्त करून साहेब लोकांस समजावें कीं, तुमचा व आमचा तह झाला, यास पटवर्धन अनुकूळ नाहीं असें करून त्याची जहागीर आपण जप्त करावी. बाजीराव यास राज्यकारभार चालवावयाविषयीं कोणाएकाचाही विश्वास नसे, ह्मणून तो आपणच तीं सारीं कामें वहिवाटीत असे. तो आपणास सर्व गोष्टींत प्रवीण असें मानी, परंतु इंग्लिशांचा वकील व आपण समक्ष भाषण करीत असतां त्याच्या

व आपल्या विचारांत अंतर पडून कदाचित् बोलण्याचा बेत चुकून कलह उत्पन्न होईल, ह्मणून तें काम दुसऱ्याचे हातून घ्यावें असा निश्चय करून कोणी इंग्लिशांचा द्वेषी असा सदाशिव माणकेश्वर इंग्लिशांच्या वकिलाशीं बोलण्याचे कामास नेमिला. तो सदाशिव माणकेश्वर टेंभुर्णी गांवचा देशपांड्या, त्यानें प्रथम पुण्यामध्यें कांहीं दिवस कीर्तन करून निर्वाह केला; त्याचे आंगीं कविताशक्ति चांगली, आणि तो वाद्यें वाजविण्याविषयीं कुशळ होता; पुढें हैदराबादेंत पेशव्याचा वकील गोविंदराव पिंगळा याची त्यानें चाकरी धरिली, मग बाजीराव पेशवा व दौलतराव शिंदा हे ज्या समयीं एकमत होऊन इंग्लिशांस अगदीं बुडविणार होते, तेव्हां त्या मसलतींत निझामालाही घ्यावें, याकरितां तो सदाशिव माणकेश्वर त्याकडे पाठविला. त्या बाजीरावाची अनीति कशी होती, ती ध्यानांत यावयास एक दोन गोष्टी आहेत, त्यांत खंडेराव रास्ता यानें बाजीरावास विपत्तिसमयांतही सोडिलें नाहीं, आणि तो बाजीराव पुनः पुढें गादीवर बसल्यानंतर दुसऱ्या वर्षीं बाबूराव फडक्यानें मोठें बंड केलें होतें, तें बहुत युक्तीनें खंडेराव रास्त्यानें मोडिलें, असा तो परम विश्वासू चाकर त्यानें इंग्लिशांचा पक्ष धरून माणकेश्वराशीं वाद केला, असें ऐकून त्याची चौकशी न करितां एवढ्याच निमित्तानें त्यास पदच्युत करून त्याची जहागीरही बाजीरावानें जप्त केली. असेच जे बहुत दिवस सेवा केलेले जुने चाकर होते, त्यांच्या उपजीविकेचा विचार न ठेवितां त्यांचें स्मरणही टाकिलें. तो बाजीराव असा दुर्वृत्त असतां इंग्लिशांच्या साहाय्यामुळें त्याच्या राज्यांतील संपूर्ण बंडें मोडून लोक सुखीसे दिसूं लागले, आणि त्याची आज्ञा त्या राज्याच्या मर्यादेंत सर्वत्र अकुंठित चालती झाली, त्यांत प्रतिनिधीच्या बंडापर्यंत अंतर पडलें नाहीं.

५. त्या प्रतिनिधीच्या बंडाचा प्रकार असा; इंग्लिश व बाजीराव पेशवे यांचा स्नेह झाल्याचे पूर्वीं पुण्यांत परशुराम श्रीनिवास या नामें भवानराव प्रतिनिधीचा पुत्र होता, त्यास बाजीरावानें धरून कैद करावयाची मसलत केली, ती सिद्धीस न जातां तो प्रतिनिधी तेथून निघून आपली जहागीर कऱ्हाड तेथें जाऊन राहिला. ते समयीं त्या जहागिरीची वहिवाट त्याची मातुश्री व बळवंतराव फडनवीस नामें त्याचा मुतालीक या दोघांनीं चालविली होती. त्या प्रतिनिधीस ती वहिवाट आपण चालवावी, अशी इच्छा होऊन तो वाद बाजीरावाकडे गेला. बाजीरावास पूर्वींच प्रतिनिधीला बळहीन करावें, अशी वासना झाली होती; त्यावरून तो वाद उत्पन्न होतांच हा समय उत्तम असें जाणून तें काम बळवंतराव फडनविसानें वहिवाटावें, असा ठराव केला, आणि त्याबरोबरच कांहीं फौजेसहित बापू गोखला यास पाठवून त्या प्रतिनिधीला धरून बंदीस घातलें. मग तो कलह

मिटून त्या मुलखांत स्थिरता झाली, असें पाहून तो गोखला पुण्यास आला, तेव्हां लोकांनीं अटकळ केली कीं, इतःपर प्रतिनिधि जन्मभर बंदींतच राहील, परंतु त्याचा योग तसा नव्हता. पूर्वीं त्यां प्रतिनिधीची स्त्री महासाध्वी असतां तिजबरोबर त्याचा कांहीं कलह होऊन तिला दूर ठेवून त्यानें आपल्याजवळ एक तेलीण बाळगिली होती, तिनें त्या संकटसमयीं कांहीं युक्तीनें वासोटा किल्ला हस्तगत करून कितीएक लोक चाकरीस ठेवून, किल्ला मसूर या नामें लहानशा गढींत प्रतिनिधि बंदीस होता, त्या ठिकाणीं जाऊन हल्ला करून त्यास तेथून मुक्त केलें. नंतर त्या प्रतिनिधीनें आपला झेंडा उभा करून लोकांत प्रसिद्ध केलें कीं, 'मी पंतप्रधानाचा अंकित नव्हे. माझा धनी साताऱ्याचा महाराज.' त्यावरून त्याच्या मुलखांतील शिपाईलोक व त्याचे कितीएक संबंधी मोठे कुलीन गृहस्थ त्याजकडे जाऊन राहिले. त्या योगें कदाचित् त्याचा मनोरथ सिद्धीस गेला असता, परंतु तो प्रतिनिधि कांहींसा शूर असून त्याचा स्वभाव उग्र आणि अत्यंत तामसी असे, यामुळें त्यास त्याच्या आईच्या पक्षाचा अथवा त्या मुतालिकाकडचा कोणी सांपडला असतां त्यावर दया न करितां त्याविषयीं अत्यंत क्रूरपणा करी; त्यावरून तो लोकांच्या मनांतून उतरला, आणि खर्चास द्रव्य जमा करावयासाठीं प्रजेस पेंढाऱ्यांप्रमाणें उपद्रव करूं लागला. असें झाल्यानंतर बापू गोखला पुनः फौजेसहित त्यावर जाऊन युद्ध व्हावें असें ठरलें. ते समयीं त्याचे कोणी पुरातन विश्वासू चाकर लोक यांची मसलत होती कीं, या समयीं गोखल्यासमोर युद्धास उभें न राहतां डोंगरांत जाऊन तेथें रामोशी सहाय करून जे वेळेस आपला हात चालेल ते वेळेस युद्धप्रसंग करावा; ती मसलत न ऐकतां त्यानें वसंतगडाजवळ गोखल्याची वाट पाहिली. नंतर तो गोखला येऊन युद्ध होऊं लागलें असतां पहिल्याच हल्ल्यामध्यें प्रतिनिधीचे बहुतेक लोक पळून गेले. बाकी थोडकेसे उरले, त्यांसहवर्तमान तो प्रतिनिधि जातीनें लढला. ते समयीं त्याचा उजवा हात तुटून तो शत्रूच्या हातीं लागला; मग बाजीरावाच्या राज्याचे समाप्तीपर्यंत त्यास प्रतिबंध होता. त्याचा सर्व मुलूख बापू गोखल्यानें वासोटा किल्ला खेरीजकरून तात्काळ घेतला. नंतर त्या वासोट्यामध्यें तेलीण होती, ती आठ महिने लढून शेवटीं तेथच्या दाण्याचे कोठीस आग लागल्यामुळें निरुपाय होऊन आपण तो किल्ला देती झाली.

६. याप्रमाणें बाजीरावानें प्रतिनिधि अगदीं बुडविला असतां त्याविषयीं लोकांचे मनांत आपण केवळ स्वहितार्थच प्रतिनिधीचें सर्वस्व हरण केलें, असें विषम न वाटावें, यासाठीं त्याचा मुलूख व त्याची वस्तवानी गोखल्याचे हातीं लागली होती, ती सरकारांत न घेतां त्याकडेसच राहूं दिली, त्या योगें व त्या मुलखाची अमर्याद

खंडणी घेतल्यानें तो बापू गोखला इतर सरदारांपेक्षां थोडक्याच दिवसांत मोठा धनवंत झाला. असें सन १८०८ त घडलें. बाजीराव आपली निर्बाध सत्ता झाली असें समजून मग प्रतिनिधीचा मुलूख बापू गोखल्याकडे होता, तो सरकारांत मागूं लागला, आणि पूर्वीपासून त्याचे मनांत संपूर्ण जहागीरदार यांचा सूड उगवावयाविषयीं फार मनीषा होती, तें कृत्य यथास्थित साधावयास उद्युक्त झाला. तेव्हां कितीएक लहान लहान जहागीरदार होते, त्यांनीं आपली आज्ञा न मानिली, असें निमित्त ठेवून त्यांचीं संस्थानें आपल्याकडे जप्त ठेविलीं. याप्रमाणें सर्वांस बुडवावयाची त्यास वासना झाली, परंतु तें इंग्लिशांच्या मतावांचून घडेना; असें असतांही तो आपल्या मनांतील अर्थ अनेक प्रकारें गोड बोलून लोकांस फसवून कधीं कधीं शेवटास नेत असे. त्यांत माधवराव रास्ता यास इंग्लिशांनीं आपल्या कांहीं कामाकरितां फौज पाठवावी ह्मणून आज्ञा केली, ती त्यानें मानिली नाहीं, त्या योगें तो अपराधीसा ठरवून त्यास शिक्षा व्हावी, असें इंग्लिशांचे मतें झालें. तेव्हां बाजीरावानें त्यास मसलत दिली कीं, 'इंग्लिशांस सांगून तुझें पारिपत्य करणें मजकडे येऊं दे, ह्मणजे तुला तसा दंड होणार नाहीं.' या गोष्टीस तो माधवराव मान्य झाला. नंतर बाजीरावानें त्याचा सर्व मुलूख घेऊन त्यास कांहीं उरूं दिलें नाहीं. असेंच आपा देसाई यास इंग्लिशांनीं कांहीं आज्ञा केली असतां त्यांत अंतर करावयाविषयीं त्या बाजीरावानें गुप्त मसलत दिली, आणि त्याचेंही पारिपत्य करावयाचें आपल्याकडे घेऊन त्याच्या जहागिरीचा चतुर्थांश घेतला.

७. सदाशिव माणकेश्वर श्रीमंताच्या पक्षेंकरून इंग्लिशांशीं वागत असतां त्यानें ते वेळेस कर्नल् क्लोज साहेब याचा वकील पारशी जातीचा खुसरूजी नामें होता, त्यासच 'मोदी'ही ह्मणत, त्याला वश करून आपल्याकडे घेतला. तो व सदाशिव माणकेश्वर हे दोघे निरंतर एकविचारें वागत असतां बहुत वेळां त्यांनीं आपल्या कार्यसाधनासाठीं भलतीच गोष्ट साहेबाच्या मनांत आणून देऊन स्वहित संपादावें. असें कितीएक दिवस चालिलें, मग सन १८१० त त्या कामावर एल्फिन्स्टन् साहेब गेले. तेव्हांपासून त्या मोदीचें तेज बहुत कमी पडलें, आणि तेच समयीं सदाशिव माणकेश्वर व तो मोदी यांच्याही स्नेहामध्यें कांहीं अंतर आलें. इकडे त्या दोघांचें ऐक्य पाहून बाजीरावाच्या मनांत आलें कीं, हे दोघे आपल्या ऐक्यामुळें कदाचित् माझ्या उपयोगास पडले असतील, परंतु तेच जर विपरीत झाले तर त्यांचें तेंच ऐक्य माझ्या समूळ नाशास कारण होईल; यास्तव हीच मसलत कीं, या दोघांत वांकडें पाडून मोदी आपणाकडे घ्यावा, असें मनांत ठरवून त्यानें मोदीस उत्तम पदवी कर्नाटकची सरसुभेदारी दिली. तेव्हां त्यानें बापू साने या नामें गृहस्थ आपल्या

हाताखालीं घेऊन तो पेशव्याकडील अधिकार व इंग्लिशांची चाकरी हीं दोन्हीं कामें चालविलीं. असे कांहीं दिवस गेल्यावर सदाशिव माणकेश्वराकडून मोदीचा त्या अधिकारसंबंधें अन्यायें वर्तन केल्याप्रकरणीं बोभाट श्रीमंताजवळ आला, तो ऐकून त्यास पुरतें समजलें कीं, त्या दोघांत पक्कें वितुष्ट पडलें. याशिवाय त्या बाजीरावानें आपणास दुसरा एक लाभ कल्पिला कीं, 'मी मोदीस मोठा अधिकार देऊन तो आपलासा केला, परंतु त्या एल्फिन्स्टन् साहेबानें तो अर्थ सिद्धीस जाऊं दिला नाहीं. कां कीं, साहेबाची चाकरी व बाजीरावाकडचा अधिकार हीं दोन्हीं कामें एकानेंच करावीं हे योग्य नव्हे;' असें त्याच्या मनांत येऊन त्या मोदीचें दुसरें कांहीं अयोग्य आचरण पाहून त्यानें त्यास दोहों कामांतून एक काम टाकावयास सांगितलें असतां मोदीनें श्रीमंताकडचा अधिकार टाकिला. नंतर तो मोदी पुण्याहून दूर घालवावा, असें त्याचें कृत्य साहेबाच्या दृष्टीस येऊन त्याला गुजराथेंत वेतन देऊन स्वस्थ बसावें, असें त्या साहेबानें केलें होतें; तेव्हां तो तेथून निघून तिकडे जावयास सिद्ध झाला, त्याच संधींत रात्रीमध्यें तो विषप्रयोगानें मेला गेला. तें विष त्यानें स्वयें घेतलें किंवा दुसऱ्याचे हातून घात झाला, याचा शोध बहुत केला असतांही सिद्धांत झाला नाहीं.

८. कर्नाटक सरसुभा त्या मोदीनें टाकिल्यावर बाजीरावानें तें काम त्रिंबकजी डेंगळ्यास सांगितलें. नंतर तो मोदी मृत्यु पावल्यावर कांहीं दिवसांनीं इंग्लिशांशीं बोलण्याचालण्याचे वहिवाटीचें कामही श्रीमंतानें त्या त्रिंबकजीसच दिलें. तो त्रिंबकजी पूर्वीं श्रीमंत महाडास पळून गेले, ते वेळेस जासूदगिरी करीत असे. त्यानें पुढें बाजीरावाचें मन आपणाकडे किती लावून घेतलें, तें पुढें एक गोष्ट लिहिली आहे त्यावरून समजण्यांत येईल. शेवटीं तो अशी प्रतिष्ठा पावला कीं, पेशव्याच्या घरीं त्यावांचून कोणतेंही काम होऊंच नये. असें असतां एके समयीं कोणी सराफ मखतेदारास जामीन झाला होता, त्या मखतेदारापासून सरकारकामांत अंतर पडल्यामुळें त्या त्रिंबकजी डेंगळ्यास मोठा राग येऊन त्या सराफास ओढून आणिलें. तो येतांच त्याच्या डोक्यावर त्रिंबकजीनें स्वयें ठोंसरा मारिला, तेव्हां त्याच्या मोठमोठ्या सोन्याच्या आंगठ्या व जोडवीं होतीं त्यांचा तडाखा मर्मीं लागून तो ब्राह्मण तेथेंच मृत्यु पावला. असा त्या दुष्टापासून अपराध झाला, तरी बाजीरावानें त्याविषयीं मनांत कांहींच खेद मानिला नाहीं. तो बाजीराव आपलीं अनेक प्रकारच्या खर्चाचीं कामें मखत्यानें करवी, तशाच मामलतीही मखत्यानेंच देत असे; त्यावरून त्रिंबकजी तर मखत्यांत अंतर पडल्यास जसें शासन करीत असे, तसें चोरीस किंवा हत्येस करीत नव्हता.

९. असा कारभार चालत असतां बाजीरावानें पांच कोटि रुपये आपल्याजवळ जमा केले होते. त्यास प्रतिवर्षीं राज्यांत उत्पन्न एक कोटि वीस लक्ष रुपये जमा होत

असत, त्यांतील पन्नास लक्ष रुपये मागें ठेवून बाकी खर्च करी. तो याज्ञिक कर्मांत बहुत प्रीति ठेवून आपण आंगें त्या कृत्यांत शिरून आपल्यास विद्वान् ह्मणवी, आणि त्याच्या बापानें नारायणरावास मारिलें, ह्मणून त्या उपद्रवाच्या शमनार्थ त्यानें पुण्या-सभोंवतीं कितीएक लक्ष आंब्यांचीं झाडें लाविलीं, व पंढरपुरच्या देवास बहुत द्रव्य दिलें. याशिवाय त्याच्या गुरूनें त्यास सांगितलें कीं, 'माझ्या स्वप्नांत नारायणराव प्रत्यक्ष येऊन बोलिला कीं, बाजीरावानें लक्ष ब्राह्मण जेवूं घालावे.' तें ऐकतांच तसें त्यानें केलें.

१०. बाजीराव राज्य करीत असतां त्यानें सन १८१४ मध्यें त्रिंबकजीच्या मस-लतीवरून शिंदे व रघूजी भोंसले यांजकडे वकील पाठवून गुप्तरूपें तह केला कीं, 'तुह्मी व आह्मी एकमत असून समयविशेषीं इंग्लिशांस काढून देऊं.' असाच पेंढाऱ्यांच्या मुख्याकडेही आपला वकील निरंतर रहावयास पाठविला. नंतर आपण कोंपरगांवीं जाऊन पेंढाऱ्यांच्या कितीएकां मुख्यांशीं एकांत केला. ही गोष्ट दुसरे वर्षीं साहेबाच्या समजण्यांत आली, परंतु त्याचा पुरतेपणें शोध करण्याविषयीं उद्योग झाला नाहीं, ह्मणून त्या बाजीरावास गादीवरून उठविलें नाहीं.

११. त्या वेळेस इंग्लिशांस घालवून द्यावयाच्या बेताखेरीज दुसरी एक त्याची मसलत होती; ती अशी कीं, गुजराथेंत आपलें मुख्यत्व असावें. त्या ठिकाणीं गोविंदराव गाइकवाड अधिकारी झाल्यापासून त्या वेळेपावेतों गाइकवाड व पेशवे या दोघांच्या देण्याघेण्यासंबंधी हिशेब झाले नव्हते; नंतर बापू मैराळ यास त्या कामा-करितां गाइकवाडानें पुण्यास पाठविलें असतां त्यास बाजीरावानें 'सुमारें एक कोटि द्रव्य गाइकवाड सरकारांतून आमचें यावयाचें आहे,' असें समजाविलें. तें देणें तितकेंही असेल, कां कीं, सन १८०० च्या वर्षीं अहमदाबादचा मखता ठरला; त्याखेरीज सन १८०४ मध्यें गुजराथेंतील दुसऱ्या कांहीं मुलुखांचा मखता साडेपांच लक्ष रुपये ठर-ण्यांत आला होता, परंतु बाजीरावाचा बाप रघुनाथराव याचा पक्ष स्वीकारल्यानें बडोदेकरास विशेष ऋण झालें होतें, ह्मणून त्या कोटींतून साठ लक्ष रुपये पेशव्यानें स्वसंतोषेंकरून त्यांस सोडावे असें कबूल केलें. तो एवढ्या धार्मिकपणानें वागत असतां त्याचा उपकार मनांत न आणितां बडोदेकर त्याच्या मागणीस उत्तरेकडील भडोचेचें उत्पन्न पेशवे घेत आले, त्यापैकीं आमचा भाग राहिला तो, व आबा शेलू-करानें बंड मोडिलें, त्या कामास खर्च लागला तो, आणि गुजराथेंतील पेशव्याच्या मुलखाच्या बंदोबस्तास नवी शिबंदी ठेविली, त्या खर्चाचा आकार झाला असेल तो, असे हे तिन्ही प्रकार मनांत आणून जें तुह्मांकडे फिरेल तें आमचें द्या, असें ह्मणूं लागले. त्यावरून ज्याचा उलगडा होऊंच नये असा उभयतांचा वाद वाढला,

आणखी बाजीरावाच्या मनांत होतें कीं, हा कज्जा लवकर संपवूं नये. कां कीं, युक्तीनें इंग्लिशांशीं विपरीत वर्तन करावयाचें, त्यांत गाइकवाडास घ्यावयाचें, त्या कामास वादावांचून जर वकिलाचें जाणें येणें घडलें तर इंग्लिशांस संशय वाटेल.

१२. अशीच हैदराबादच्या निझामाकडेही बाकी राहिली होती, त्या निमित्तें-करून तोही वाद त्याअर्थीं लांबविला. त्याविषयीं इंग्लिश समजूत पाडीत असतां पेशवा ऐकेना. अशी बाजीरावाची कपटी वृत्ति बापू मैराळ नामें महाकुलीन यास कळतांच पेशव्यानें बडोदेकरास लिहिलें कीं, 'हा वकील या कामास अयोग्य आहे, यास्तव दुसरा कोणी गृहस्थ लवकर पाठवून द्यावा.' ते समयीं बडोद्यांत धनी असून राज्यकारभार चालविणारा फत्तेशिंग होता. त्यानें आपल्याजवळ खास-गीच्या कामावर गंगाधर शास्त्री पटवर्धन नामें कारकून ठेविला होता. तो योग्य-तेस चढत चढत त्याचें नाम मात्र मुख्यत्वें झालें नव्हतें, बाकी सर्व कामाची वहि-वाट तो करीत असे; त्याला पुण्यास पाठवावयाचा निश्चय ठरला. त्या फत्तेशिं-गाच्या मनांत हिशेबाच्या गोष्टीखेरीज दुसरें काम करून घ्यावयाचें होतें कीं, गुज-राथेंतील पेशव्याचे महाल जे आपण मखत्यानें घेतले आहेत त्यांची मुदत भरली, यासाठीं पुनः कांहीं वर्षांचा मखता कबूल करावा, याप्रमाणें नेम होऊन गंगाधर शास्त्री यावर त्रिंबकजी डेंगळ्याकडून एखादा अनर्थ न पडावा, अशा अर्थें त्या गाइकवाडानें इंग्लिशांचें अभय वचन घेऊन शास्त्रीबावाला पुण्यास पाठविलें. नंतर त्या दोन्ही गोष्टींतून एकही सिद्धीस जात नाहीं, असें पाहून शास्त्रीबावांनीं मनांत ठरविलें कीं, हीं दोन्हीं कार्यें साहेबास सोंपवून आपण माघारें जावें. त्याव-रून पेशवा व त्रिंबकजी डेंगळा या उभयतांनीं शास्त्रीबावाचा विशेष मान आरं-भिला, कां कीं, तीं कामें जर साहेबाकडे जातील तर बडोदेकराशीं व आह्मांशीं बोलण्याचा प्रकार चालतो आहे तो बंद होईल. असें समजून शास्त्रीबावा वश करावयाचे मसलतीनें प्रथम त्यांनीं तो माघारा जावयास जो मुहूर्त योजीत होता, तो टाकवून दुसऱ्या मुहुर्तावर त्याचें जाणें व्हावें, असें करून त्यास राहून घेतलें. मग ती वेळा येई तोंपर्यंत त्रिंबकजी डेंगळ्यानें त्याची अशी स्तुति केली कीं, 'तुह्मी या कामास बहुत योग्य आहांत, आणि श्रीमंतही तुमची योग्यता जाणून तुह्मांस मुख्यत्वें कारभार द्यावयास इच्छितात.' असें त्रिंबकजीचें बोलणें त्याला सत्य वाटावें, ह्मणून बाजीरावही त्यास बोलूं लागला कीं, 'तुमच्या पुत्रास आमची मेहुणी पुंडलीक नाईक रास्ते यांची नात देणार.' अशा युक्तीनें शास्त्री याचें मन मोहित करून आपण पंढरीचे यात्रेला जातेसमयीं त्यासही बरोबर नेलें. ते वेळेस पुण्यामध्यें बापू मैराळ होता, त्यानें त्यास नानाप्रकारें समजाविलें कीं, 'या समयीं

तुह्मी श्रीमंतांबरोबर यात्रेस जाऊं नका; ही माझी मसलत ऐकावी, नाहीं तर मला आपल्याबराबर न्यावें.' असें त्या बाबू मैराळानें ह्मटलें असतां तो शास्त्री कालपाशानें बद्ध झाला होत्साता, त्याचें तें हिताचें वाक्य एकही मानीना; शेवटीं तो श्रीमंताबरोबर पंढरपुरास गेला. नंतर जुलैचे १४ वे तारिखेस (सन १८१५ चे) त्या गंगाधर शास्त्र्यानें त्रिंबकजी डेंगळ्याशीं संकेत केला कीं, 'आज रात्रीस आह्मी भोजन केल्यानंतर तुह्मांसहित देवदर्शनास जाऊं.' याप्रमाणें सांगून पाठविल्यावर त्याच रात्रीस श्रीमंताचे पंगतीस त्याचें भोजन होऊन तो देवदर्शनास जाणार होता; मग तो संकेतसमय जवळ आला, तों त्याच्या शरीरास कांहींसें असमाधान होऊन त्रिंबकजी डेंगळ्यास सांगून पाठविलें कीं, 'या समयीं माझ्यानें येववत नाहीं.' परंतु त्यास त्रिंबकजीनें अत्याग्रहेंकरून बोलाविलें, ह्मणून त्याच्या भिडेस्तव बरोबर हत्याररहित, ह्मणजे हत्यारबंध नव्हत असे, थोडकेसे लोक घेऊन देवास गेला. नंतर देवदर्शन करून त्रिंबकजीशीं कांहीं गोष्टी बोलून तेथेंच माडीवर श्रीमंत बसले होते, त्यांजपाशीं गेला. जातांच त्यांची सुप्रसन्नता पाहून तो शास्त्री आणि तो पेशवा या उभयतांचीं आनंदाचीं भाषणें होऊन मोठ्या संतोषानें श्रीमंताची आज्ञा घेऊन तो गंगाधर शास्त्री तेथून निघून आपले घरीं जात असतां तीनशें साडेतीनशें पावलें चालून गेल्यावर रस्त्यामध्यें अकस्मात् कोणी हत्यारबंध असे मारेकरी येऊन त्यांनीं त्याचे तुकडे तुकडे केले.

१३. असें दुष्कर्म कोणीं केलें, तो शोध इंग्लिशांचा वकील करूं लागला असतां, बाजीराव व त्रिंबकजी डेंगळा हे दोघेही आपल्या आंगीं लागूं देईनात, परंतु सर्व लोकांच्या मतें असें ठरलें कीं, हें त्रिंबकजीचें कृत्य, आणि त्या मारेकऱ्यांनींही त्याचेंच नांव सांगितलें. नंतर तो त्रिंबकजी निःसंशय अन्यायीसा समजून साहेब बाजीरावास ह्मणूं लागला कीं, 'त्या त्रिंबकजीला धरून आमच्या स्वाधीन करा.' तें त्यानें बहुत वेळपर्यंत ऐकिलें नाहीं. शेवटीं त्यास न दिलें तर युद्ध करावें लागेल, असें समजून सप्टेंबराचे २५ वे तारिखेस तो इंग्लिशाचे स्वाधीन केला. मग त्यांनीं तो मुंबईजवळ ठाण्याच्या किल्ल्यांत ठेविला. तो दुसऱ्या वर्षाचे सप्टेंबराचे १२ वे तारिखेपर्यंत त्या बंदींतच राहिला. नंतर ते दिवशीं चार पांच घटिका रात्र झाली असतां तो आपला वेष बदलून बाहेर त्याचे सोबती आले होते,

---

१. बाजीरावानें गंगाधर शास्त्री मारविला, असें पुरतेपणें त्याकडे लागू झालें नाहीं, परंतु तें कर्म झाल्यावर त्याच्या मनास वाईट वाटले नाही, चांगलेंच वाटलें; आणि त्रिंबकजी डेंगळा ठाण्यांत बंदीस असतां तेथें पहाऱ्यास जे साहेब असत, त्यांशी भाषण करितां करितां त्यानें कितीएक वेळां सांगितलें कीं, 'मी आपल्या धन्याचे आज्ञेप्रमाणें वागलों.'

त्यांत मिसळून त्यांबरोबर पळून जाऊन नासिक व संगमनेर एथचे भिल्ल व रामोशी यांस मिळून आश्रय पावला. मग खानदेश व बागलाण व सातान्याजवळ शंभुमहादेवाच्या डोंगरांच्या आसमंतात् राहिला असे, परंतु ज्या ज्या ठिकाणीं शिवाजी महाराज यानें महत्व संपादिलें होतें, तेथें जावयास भीत असे. तिकडच्या लोकांस तेव्हांही शिवाजीच्या गुणांचें फार स्मरण असून त्याच्या वंशींचा चतुरशिंग तो त्रिंबकजीनें धरून कैद केला, तेंही ठावकें होतें; यास्तव जर तो तेथें जाता तर तात्काळ मारिला गेला असता. तो चतुरशिंग पुण्याची लढाई झाल्यानंतर होळकर व अमीरखान व रजपूत यांच्या आश्रयानें मुलखांत स्वाऱ्या घालीत असे, मग सन १८१२ त तो खानदेशांतून आपल्या मुलखास येत असतां त्रिंबकजीनें त्याला भेटीस बोलावून कपटानें कैद करून कांगोरी किल्ल्यावर ठेविलें, तो सन १८१८ च्या एप्रिलांत मृत्यु पावला. त्याचा भाऊ शाहू नामें असे, तो त्याचे अगोदरच सन १८०८ च्या मे महिन्याचे ३ रे तारिखेस सातान्यांत मेला. त्याचे जागीं त्याचा पुत्र प्रतापसिंह नामें स्थापिला.

१४. त्रिंबकजी डेंगळा गेल्यावर पेशव्याचा कारभार सदाशिव भाऊ माणकेश्वर पुनः चालवूं लागला, त्यास मोरो दीक्षित वसईकर व चिमणाजी नारायण हे दोघे सहाय होते. ते वेळेस पेशव्यांचे दरबारी लोक व इंग्लिशांचा वकील यांशीं अतिस्नेह आहे, असें लोकांस दिसून आलें, परंतु निश्चितार्थ पाहतां बाजीरावाच्या मनांत अनेक प्रकारें दगे करावयाची मसलत होती, त्यांत त्यानें होळकर व शिंदे व नागपूरकर भोंसले व पेंढारी यांशीं पत्रद्वारें ऐक्य ठेवून गुप्तपणें त्रिंबकजीला पैका पाठवून अनेक ठिकाणीं लोक ठेवावयाची आज्ञा दिली असे; आणि पुण्यामध्येंही आपण कांहीं नवी फौज ठेवूं लागला. हें वर्तमान साहेबास कळून तो कारभारी लोकांस ह्मणे कीं, 'तुमची दग्याची मसलत आहे.' त्यावर ते उत्तर करीत कीं, 'दगा करणें ही गोष्ट किमपि नाहीं' आणि बाजीराव पेशव्यास नुकताच फुलशहर मुक्कामीं त्रिंबकजी येऊन भेटला असतां तो सांगे कीं, 'आह्मास त्रिंबकजीचा ठिकाणा नाहीं.' असें त्याचें कुटिल वर्तन बहुत वेळ चालिल्यानें ती मसलत सिद्धीस जाऊन कदाचित् अनर्थ होईल, असें पाहून साहेबानें बाजीरावास स्पष्ट सांगितलें, 'आजपासून एका महिन्यांत त्रिंबकजी डेंगळ्यास आणून घाल, तर तुमचा स्नेह राहील.' असें होऊन इंग्लिशांचें लष्कर जमूं लागलें, तें भय मानून बाजीरावानें त्रिंबकजी डेंगळ्यास धरून आणावयाविषयीं जाहीरनामे लावून सिंव्हगड व पुरंदरगड व रायगड, हे तीन किल्ले डेंगळ्या येई तोंपर्यंत इंग्लिशांच्या स्वाधीन त्यांनीं मागितल्याप्रमाणें ठेविले. याशिवाय पेशव्याचा व इंग्लिशाचा ते

समयीं नवा तह झाला; त्यांत विशेष इतकाच कीं, पेशव्यानें इतःपर गाइकवाडास कांहीं मागूं नये, आणि जी बाकी राहिली आहे, तीबद्दल साडेचार लाख रुपये गाइकवाड प्रतिवर्षी देतील ते घेत जावे, व अहमदाबादेच्या मखत्याचे साडेचार लक्ष रुपये पेशव्यानें गाइकवाडापासून घ्यावे, व वसईच्या तहांत असें ठरलें होतें कीं, पांच हजार स्वार व तीन हजार पायदळ इंग्लिशांच्या कामास बाजीरावानें ठेवावें, त्याबद्दल चौतीस लक्षांचा मुलूख पेशव्यानें इंग्लिशांस द्यावा. याखेरीज अहमदनगर किल्ला व नर्मदेच्या पलीकडची जितकी पेशव्याची प्राप्ति असेल, तितकी इंग्लिशांनीं द्यावी, आणि माधवराव रास्त्याची जहागीर बाजीरावानें उगीच जप्त केली होती, ती त्यास माघारी द्यावी. असें पुण्यांत ठरल्यावर बडोद्याच्या गाइकवाडास पहिल्यापेक्षां विशेष लाभ झाला. त्याशीं इंग्लिशांकडील वाकर साहेब यानें तह करून सन १८०५ त ठरविलें होतें कीं, त्यानें इंग्लिशांचीं तीन पलटणें व एक गोलंदाजांची कंपनी आपल्याजवळ बाळगून त्यांचा खर्च आपण चालवावा, त्याशिवाय या समयीं आणखी एक पलटण पायदळाचें व दोन पलटणें स्वारांचीं नवीं ठेवावीं असें ठरलें. सन १८१५ पर्यंत पेंढारी लोकांचा बहुत उपद्रव झाला[१]. व अमीरखानाचे पठाणही मुलखांत मोठा दंगा करीत असत. तेव्हां कलकत्त्याचा गव्हर्नर जनरल साहेब यानें निश्चय केला कीं, हा सर्व अनर्थाचा उपशम करून दक्षिणमुलखीं बंदोबस्त नीट राखावा. यासाठीं शिंदे व होळकर व नागपूरकर वगैरे हिंदूंच्या मुलखांतील सर्व मोठे मोठे संस्थानी यांस कळवावें कीं, 'आह्मीं हें कार्य करितों यास तुमची मदत असावी, याप्रमाणें केल्यास जो मदतीस सिद्ध न होईल, तोच या अनर्थाचा घटक व शत्रु असें जाणावें. मग ही गोष्ट प्रसिद्ध करीत असतां मुंबईचें व मद्रासेचें व कलकत्त्याचें या तिन्हीं लष्करांची तयारी होऊन त्यांतील कितीएकांनीं जाऊन ते बहुतेक पेंढारी मारिले. वरकड लष्कर त्या साहेबानें कार्याचे उपयोगी कल्पिलेलीं ठिकाणें धरून त्याचे आज्ञेची मार्गप्रतीक्षा करीत राहिले. पुढें या उद्योगाचें असें सार्थक झालें कीं, नागपुरांत रघूजी भोंसला मृत्यु पावल्यावर तेथच्या कारभाराची वहिवाट व्यंकाजी मन्या बापूचा पुत्र मुधोजी यानें

१. पेंढारी यांचा उपद्रव इंग्लिश व निझाम यांचे मुलखीं विशेष होता; ह्मणून बाजीरावाचें व पेंढारी यांचें ऐक्य आहे, असा इंग्लिशांस संशय न व्हावा, याकरितां त्यानें आपल्या लष्कराचा एक भाग कोंकणांत पाठवून त्यांनीं आपणास पेंढारी असें ह्मणून आपलाही मुलख उडावयाची आज्ञा दिली, त्यावरून त्या लोकांनीं तसेंच केलें.

२. रघूजी भोंसला सन १८१६ चे मार्च महिन्याचे २२ वे तारिखेस मृत्यु पावला. त्याचें पद त्याचा पुत्र परसाजी भोंसला यास प्राप्त झालें, परंतु तो अल्पबुद्धि यास्तव मन्या बापूचा पुत्र मुधोजी यानें तेथच्या कारभाराची वहिवाट मुख्यत्वें चालविली, यास 'आपासाहेब' ह्मणत.

मुख्यत्वें चालविली, आणि इंग्लिशांस अनुसरून त्यानें आपल्या मुलखीं त्यांचीं पलटणें बाळगावयाचें कबूल केलें. तसाच भोपाळचा नबाबही इंग्लिशांचा सहाय झाला. शिंदा व अमीरखान हेही कलकत्त्याचा गव्हर्नर जनरल साहेब याचे आज्ञेप्रमाणें वागूं लागले. तेव्हां बाह्यात्कारें दिसण्यांत आलें कीं, हा बंदोबस्त सिद्धीस जाईल, परंतु नागपूरकर व शिंदा यांचीं चित्तें आंतून बाजीरावाकडे होतीं, तें कपट साहेबास विदित झालें असतां त्यानें त्या चौकशींत अंतर केलें.

---

## भाग तेहतिसावा.

### ( इसवी सन १८१७ च्या आरंभापासून समाप्तीपर्यंत झालेलीं वर्तमानें. )

१. बाजीराव पेशवा व बापू गोखला यांनीं एकमतें इंग्लिशांच्या नाशाविषयीं मसलत केली.—२. इंग्लिश व पेशवे यांचा स्नेह तुटून पुण्याजवळ युद्ध झालें.—३. बाजीराव पेशवा युद्ध टाकून पळाला.—४. कोरेगांवची लढाई.—५. बापू गोखला अष्ट्याजवळ इंग्लिशांवर हल्ला करून मृत्यु पावला.—६. नागपूरकराचें कृत्य.—७. सिताबळदीजवळची लढाई.—८. नागपूरकर आपासाहेब तो इंग्लिशांशीं स्नेह करून आपल्या गादीवर बसला.—९. चितू पेंढारी यास होळकरानें आश्रय दिला यास्तव मेहिद्‌पुरापाशी होळकराची व इंग्लिशांची लढाई झाली.—१०. मग तो होळकर शरण येऊन त्याचा व इंग्लिशांचा तह झाला.—११. पेंढारी यांचे मुख्य सरदार इंग्लिशांनीं धरिले.—१२. आपासाहेब पुनः गादीवर बसल्यानंतर कसकसा वर्तला तें.—१३. सेवनीपाशीं बाजीरावाची व इंग्लिशांची गांठ पडली.—१४. बाजीराव पेशवा इंग्लिशांचे हस्तगत होऊन त्यांनी त्यास ब्रह्मावर्तीं ठेविलें.—१५. मराठी राज्य इंग्लिशांनीं घेतल्यानंतर कसकसा बंदोबस्त केला तें प्रकरण.

१. सन १८१७ च्या जुलै महिन्यांत बाजीराव पेशवा पंढरपुरचे यात्रेस गेला, तो तेथून निघून कृष्णेचे कांठीं माहुलीक्षेत्रीं येऊन त्या जागीं सप्टेंबराचे समाप्तीपर्यंत राहिला. त्यानें इंग्लिशांशीं विपरीत वागणूक करण्याविषयीं ज्या ज्या कल्पना केल्या होत्या, त्या त्या सिद्धीस न्यावयाचा विचार त्या अवसरीं तो करीत होता. त्याचे मसलतींत बापू गोखला मुख्य झाला असे. त्यास बाजीरावानें लिहून दिलें कीं, 'मी तुझ्या मसलतीबाहेर चालणार नाहीं,' आणि त्याच्या मनोदयानुरूप त्याचीं सर्व कामें शेवटास न्यावयाचेंही कबूल केलें. नंतर त्या उभयतांच्या मतें विचार ठरला कीं; 'आपली सर्व तयारी झाली म्हणजे प्रसिद्धपणें एकाएकीं इंग्लिशांवर हल्ला करावा.' ही गोष्ट सातान्याचा राजा यास विदित करून त्याच्या परिवारासुद्धां त्याला वांसोट्या किल्ल्यावर ठेविलें. इतकें होई तोंपर्यंत त्यानें आपल्या राज्यांतील बहुतेकां किल्ल्यांवरून संपूर्ण युद्धाचें साहित्य यथास्थित भरून सिद्धता केली. याखेरीज शिंदे व होळकर व नागपूरवाले भोंसले यांजकडे वकील पाठविले, त्यानंतर त्या वर्षीं

अक्टोबराचे १९ वे तारिखेस दसरा पडला, त्याचा समारंभ फार चांगला झाला. त्या दिवसापासून पुण्यामध्यें पेशव्याची फौज पुष्कळ जमा होऊं लागली. ते लोक गारपिरावर इंग्लिशांची छावणी होती तिच्या सभोंवतें अगदीं जवळ जवळ उतरले. ते वेळेस इंग्लिशांच्या लष्कराचा मोठा भाग घोडनदीहून कोठें दूर गेला होता, ह्मणून पुणें मुक्कामीं इंग्लिशांचे लोक होते, ते फार थोडे असें दिसून आलें; परंतु त्यांचे कुमकेस मुंबईहून एक गोरे लोकांचें पलटण पुण्यावर जावयास सिद्ध झालें होतें, तें वर्तमान पेशव्यास कळलें, त्या काळीं त्याची मसलत होती कीं, तें पलटण येऊन पोंहचलें नाहीं तोंच कोणेएके रात्रीस त्या इंग्लिशांच्या पलटणांवर अकस्मात् छापा घालावा. मग २८ वे तारिखेस तोफांस बैल जुंपून स्वार व पायदळ सिद्ध होऊन मध्यरात्रीस पेशव्याचे आज्ञेनें पुण्याचे दक्षिणेस उभे राहिले होते, ते समयीं इंग्लिशांच्या छावणींतील कोणाएकासही तें वर्तमान कळलें नाहीं, ह्मणून ते सर्व लोक गाढ निद्रेंत निमग्न झाले होते; परंतु संगमावर एलिफन्स्टन साहेब होता त्यास तो सगळा वृत्तांत कळला. तेव्हां त्यानें आपल्या माडीवरून कानवसा घेतला, तों त्यास त्या लोकांची मोठी गडबड आहे असें समजलें; तेव्हां प्रथम त्याच्या मनांत आलें कीं, आपले लोक सावध करून आपणच त्यांवर एकाएकीं चालून जावें; मग दुसरें त्याच्या मनांत आलें कीं, युद्धाचा उपक्रम आधीं बाजीरावाकडून व्हावा. इतक्यांत त्याच्या जासुदांनीं येऊन सांगितलें कीं, 'ते लोक कांहीं मसलतीस गुंतले आहेत,' आणि ती गडबडही कांहींशी कमी झाली, असें त्या साहेबास वाटलें, ह्मणून त्यानें आपल्या छावणीच्या लोकांस सावध न करितां ती रात्र तशीच जाऊं दिली. नंतर दुसरे दिवशीं ते छावणीचे लोक सावध झालेसें समजून बापू गोखला तत्काळ छापा घालणार होता; परंतु बाजीरावानें पूर्वींपासून केलेली मसलत चालत आली होती कीं, ते छावणीचे पलटणी लोकही कांहीं द्रव्य देऊन वश करावे, तो अर्थ पुरतेपणें सिद्धीस न्यावयाकरितां त्यानें गोखल्यास आज्ञा द्यावयाविषयीं विलंब केला, असें होतां ती दुसरीही रात्र गेली. मग तिसरे दिवशीं मुंबईहून निघालेले गोरे लोक (ते पेशव्याच्या मतें अजून दूर असतील) त्यांनीं मोठमोठ्या मजला करून ते दिवशीं तिसरे प्रहरीं छावणीचें ठिकाण आटपलें. नंतर ती जागा शहराच्या जवळ अडचणीची यास्तव आपल्या लोकांस सोईची नव्हे, असें समजून ते लोक तें स्थान टाकून खडकीच्या पुलाजवळ मोकळे जागीं जाऊन प्रशस्तपणें उतरले. असें नवेंबराचे १ ले तारिखेस वर्तमान झालें.

२. नंतर एलिफन्स्टन् साहेबानें एक पलटण व कितीएक मराठे स्वार घोडनदीवर होते त्यांस बोलाविलें, तें वर्तमान ऐकून इतःपर विलंब कामाचा नाहीं,

असें पेशव्याकडे ठरलें. त्यावरून त्याच महिन्याचे ५ वे तारिखेस तिसरे प्रहरीं पेशव्याचे लोक शहरांतून बाहेर निघून युद्धास येऊं लागले तेव्हां त्या शहराजवळ जितक्या उंच जागा तितक्यांवरून पायदळाचा थाट जमला, आणि मैदानांत जिकडे तिकडे स्वारांची दाटी झाली; ते समयीं त्या शहराकडे पाहिलें तों पाण्याचे धारेसारखी तिकडून येणाऱ्या स्वारांची अतूट रव पडली होती. तें सर्व वर्तमान इंग्लिशांस विदित झालें. त्या वेळेस त्याजवळ सवातीन हजार[1] पायदळ मात्र असतां, त्याची मसलत ठरली कीं, 'मराठे आपणावर येऊन पडले नाहींत तोंच आपण पुढें होऊन हल्ला करावा.' तेव्हां ते आपल्या तळाच्या रक्षणार्थ सुमारें पांचशें लोक ठेवून बाकीचे सर्व तें ठिकाण सोडून पुढें पाऊण कोस सरल्यावर दोहींकडून युद्धास आरंभ झाला. ते समयीं प्रथम मराठ्यांचा तोफखाना व बाणांचा मार चालू झाला, मग गोखल्यानें आपले सहा हजार निवडक स्वार जरीपटक्याबरोबर ठेविलेले होते, त्यांस इंग्लिश उभे होते त्यांच्या डाव्या बाजूच्या पलटणावर जावयास आज्ञा दिली. ते वेळेस ते पलटणी लोक यांनीं पेशव्याचे कोणी कवाईत शिकलेले पायदळ लोक होते, त्यांवर जाऊन त्यांस पिटून लाविलें. तेव्हां त्यांच्या बंदोबस्तांत कांहीं न्यूनता झाली होती, तथापि ते आपणांवर शत्रु मोठ्या वेगानें येतो असें पाहून तत्काळ कांहींशा बंदोबस्तानें उभे राहिले. मग ती मराठ्यांची निवडक स्वारांची टोळी त्या इंग्लिशांचे उजवे बाजूकडून वेगानें त्यांवर तिरकस चालून येतांना त्यांचा व इंग्लिशांचा परस्परें भडिमार होत असतां ते स्वार केवळ समीप आले, तेव्हां त्या पलटणी लोकांनीं त्यांवर एकदांच भडिमार केला, व त्या जागीं दैवयोगेंकरून मोठा चिखलही होता, त्यामुळें घोड्यांस आंतून जावयाचें मोठें अवघड पडून एकमेकांवर पडत पडत त्यांतील थोडकेसे मात्र त्या पलटणापर्यंत पोंहचले, व वरकड स्वारांची उधळाउधळी झाली. त्यांतील कितीएक स्वार इंग्लिशांच्या पाठीमागून जाऊन त्यांच्या छावणीकडे वळले; परंतु तेथें त्यांच्या मोठमोठ्या दोन तोफा होत्या, त्यांचा मार पाहतांच त्यांनीं तो बेत टाकिला. नंतर इंग्लिश त्याहून पुढें सरले असतां पेशव्याचे लोक जें ठिकाण धरून उभे होते त्यांनीं तें युद्ध सोडून आपल्या तोफांस बैल जुंपून शहराकडे चाल केली, त्यामागें इंग्लिश कांहींसे त्यांस घालवीत जाऊन मग रात्रीचा अंधार पडूं लागला ह्मणून त्यांची पाठ सोडून माघारें आपल्या छावणीस आले. तें युद्ध अगदीं हलकें झालें,

---

१. पूर्वी पेशव्यानें एका पलटणासहित फोर्ड साहेब नामें इंग्लिश आपले चाकरीस ठेविला, तो खडकीच्या पुलाजवळ छावणी करून राहिला असे. तो युद्धप्रसंगीं इंग्लिशांस मिळाला तेव्हां सवातीन हजार इंग्लिशांचें पायदळ जमलें.

याचें कारण असें असेल कीं, बाजीराव पेशवा व बापू गोखला यांनीं इंग्लिशांचे पलटणी लोक आपणास अनुकूळ आहेत ते एकही गोळी न मारितां मुकाट्यानें त्या युद्धसमयीं आह्मांमध्यें येऊन मिळतील, असें आपल्या सर्व लोकांस सांगितलें होतें, मग त्यांचें विपरीत वर्तन पाहून ते परम विस्मय पावले. याखेरीज ते लोक युद्धास पुण्यांतून बाहेर पडतांना त्यांच्या जरीपटक्याची काठी कांहीं धक्का लागून मोडली, तो त्यांस मुळींच अपशकुन झाला. त्या प्रसंगीं पुण्यांत बाजीरावाजवळ राहिलेल्या लोकांखेरीज मराठी लष्कर अठरा हजार स्वार व आठ हजार पायदळ होतें, त्यापैकीं मेले व जखमी झाले मिळून सुमोरें पांचशें पडले, आणि इंग्लिशांचे मेले व जखमी मिळून शायशीं निरुपयोगी झाले.

३. नंतर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं घोडनदीहून इंग्लिशांचें एक पलटण व कितीएक स्वार येऊन पोंहचले, तेव्हां गोखला युद्धास पुनः उभा राहीनासा झाला. त्यावर आठां दिवसांनीं इंग्लिशांचें लष्कर जें जनरल स्मिथ साहेबाबरोबर दूर गेलें होतें तेंही येऊन मिळालें. नंतर तो साहेब दुसरे दिवशीं हल्ला करणार होता, त्यावरून बाजीराव पेशवा पुणें सोडून साताऱ्याकडे पळाला, त्याचे पाठीस स्मिथ साहेब लागला असतां तो तेथून निघून पंढरपुराकडे गेला. तेव्हां त्यानें वांसोट्याहून साताऱ्याचा राजाही आपल्याबरोबर पळावयास आणविला, तो त्या वाटेंतच येऊन त्यास मिळाला. नंतर पेशवा जुन्नराकडे जाऊन ब्राह्मणवाड्यांत कांहीं दिवस राहिला असतां तेथें कितीएक लोकांसहित त्रिंबकजी डेंगळाही येऊन दाखल झाला. इतक्यांत उत्तरेकडे स्मिथ साहेब आला, असें समजून तो पेशवा आपल्या मंडळासुद्धां तेथून दक्षिणेकडे पळाला.

४. त्यावरून वर्तमान उठलें कीं, बाजीराव पुण्यावर हल्ला करावयास येणार; ह्मणून कर्नल बर साहेब ते समयीं पुण्यांत मुख्य होता, त्यानें घोडनदीहून पहिल्या रेजमिटाचें दुसरें पलटण आपल्या कुमकेस बोलाविलें ( त्या पलटणास हल्लीं 'सेकंड ग्रेनेडियर' असें ह्मणतात. ) तें पलटण पांचशें बंदुकांचें व त्यांजबरोबर पंचवीस गोरे गोलंदाजसुद्धां दोन तोफा व नवे ठेविलेले तीनशें मराठे स्वार होते, तितक्यांसहित तें सन १८१७ च्या डिसेंबराचे शेवटल्या दिवशीं रात्रीस आठ वाजतां निघून सारी रात्र चालून सकाळीं दहा वाजतां भीमेचे कांठीं कोरेगांवावर पोंहचलें. तेथें नदीपलीकडे पंचवीस हजार स्वार व पांच हजार पायदळ इतक्यांसहित पेशवा उतरला होता, त्यास पाहून त्या पलटणांचा मुख्य क्याप्टन् स्टॉन्टन् साहेब यानें त्या ओसाड पडलेल्या कोरेगांवामध्यें आश्रय धरिला. तोंपर्यंत बापू गोखला व आपा देसाई निपाणकर व त्रिंबकजी डेंगळा यांच्या मसलतीनें आरब

व गोसावी यांच्या तीन टोळ्या नदी उतरून तिहींकडून इंग्लिशांच्या नाशास त्या गांवावर जाऊं लागल्या. तो उद्योग शेवटास न्यावयाकरितां त्यांच्या कुमकेस दोन तोफा सुरू करून बाणांचाही मार चालविला. नंतर त्या गांवच्या रस्त्यांत उभयपक्षीं लोकांनीं झटून मोठ्या निकरानें युद्ध केलें, ते समयीं त्या कितीएका रस्त्यांतून आरबांनीं इंग्लिशांचे लोकांस बाहेर घालविलें. तेव्हां त्या त्या वाटांनीं इंग्लिशांनीं नेटानें आंत शिरून त्या आरबांसही बाहेर काढिलें. असें त्या गांवांत जागोजाग बहुत वेळां झालें. शेवटीं त्या गांवचे मध्यभागीं एक गढीसारखी जागा होती, ती त्या साहेबास न कळतां रिकामी राहिली, तींत कितीएक आरब शिरले ते त्यास बाहेर काढतां येईना. इतकें होई तोंपर्यंत मराठ्यांचे स्वारही येऊन त्या गांवासभोंवतें जमले, त्यामुळें नदीची वाट बंद होऊन इंग्लिशांच्या लोकांस पाणी मिळेनासें होऊन ते फार हैराण झाले. तोंपर्यंत इंग्लिशांच्या दोन तोफा एके टेंकडीवर ठेविल्या होत्या त्या मोठ्या उपयोगीं पडल्या; परंतु त्यांचे साहेब सरदार व बहुतेक गोरे गोलंदाज मेले गेले, असें पाहून त्या आरबांनीं वेगानें चाल करून त्यांतील एक तोफ घेतली. ते समयीं त्या पलटणाचा मुख्य पाटिन्सन् नामें साहेब असे, त्यानें फार शौर्य केलें. त्याच्या उरास गोळी लागून पाठींतून पार गेली, त्या जखमेनें तो मूर्छित पडला असतां त्यानें तें वर्तमान ऐकतांच आपल्या जवळचे लोक होते ते त्वरित जमा करून आपल्या हातीं उफराटी बंदूक घेऊन त्या आरबां-मध्यें घुसून कितीएकांस बंदुकेच्या दस्त्यानेंच ठार मारीत मारीत त्यानें ती तोफ माघारी घेतली. त्या संधींतच त्याचे छातींतून दुसरी गोळी पार होऊन तो निरुप-युक्त होत्साता भूमीवर पडला. याप्रमाणें तें युद्ध अस्तमानपर्यंत झालें असतां रात्रीच्या आरंभीं मराठ्यांकडून कांहींसें हलकें पडलें, तेव्हां इंग्लिशांकडील लोकांस पाणी मिळावयाजोगा अवसर सांपडला, मग नऊ वाजतां मराठे अगदीं युद्ध सोडून गेले. दुसरे दिवशीं उजाडतांना मराठ्यांचें लष्कर दक्षिणेकडे निघून जातें असें दृष्टीस पडलें. ते समयीं स्टॉन्टन् साहेबानें त्यांवर आपल्या दोहों तोफांचा मार चालविला असतां त्यांतील कोणी माघारां न फिरतां ते सर्व निघून गेले. तेव्हां तो साहेब आपले पडलेले जखमी लोक आपल्या सामर्थ्याप्रमाणें नेववले तितके घेऊन त्या दोहीं तोफांसुद्धां माघारा घोडनदीस गेला. त्या लढाईंत इंग्लिशांचे मेले व जखमी झाले मिळून एकशेंछपन्न शिपाई व वीस गोरे गोलंदाज पडले. इतकें होऊन ज्याच्या उरांतून दोन गोळ्या पार झाल्या, तो पाटिन्सन् साहेब आपल्या तळा-वर पोंहचल्यानंतर मरण पावला. त्याशिवाय दुसरे दोघे साहेब त्या लढाईंत मृत्यु पावले, व दोन जखमी झाले; आणि नवे ठेविलेले तीनशें मराठे स्वार होते

पैकीं दीडशें उरले, वरकड कांहीं मेले, व कांहीं जखमी झाले, कांहीं पळाले. मराठ्यांकडील सुमारें पांच सहाशें लोक पडले. बाजीराव पेशवा याजवळ इतका बंदोबस्त असतां तो कोरेगांव सोडून गेला, याचें कारण काय? असें कोणी ह्मणेल तर समजावें कीं, जनरल स्मिथ साहेब जाऊन त्याजवळ पोंहचला ह्मणून तो निघून गेला. मग तो पेशवा तेथून दक्षिणेस गेल्यावर तिकडचाही मुलूख मद्रासेच्या लोकांनीं घेतला, असें त्यास कळतांच तो सालप्याच्या घाटानें सोलापुरास जाऊन राहिला, आणि तेथची कांहीं खंडणीही घेतली, नंतर नागपुरकराचा गणपतराव सुभेदारही त्यास मिळाल्यावर पंढरपुरास जावयाचा बेत झाला, तेव्हां पेशव्याबरोबर बापू गोखलाही होता.

५. असें असतां फेब्रुआरीचे १९ वे तारिखेस त्या गोखल्यासुद्धां बाजीराव अष्टेगांवीं जाऊन उतरला असतां जनरल स्मिथ साहेब एकाएकीं येऊन पोंहचला, असें वर्तमान त्यास समजलें. तेव्हां त्यानें गोखल्यास रोषेंकरून निरोप पाठविला कीं, 'तुह्मी आमचें रक्षण कोणे प्रकारें करितां? व आह्मांवर छापा कसा आला तें सांगा. तेव्हां गोखल्यानें उत्तर दिलें कीं, 'या समयीं तुमची पाठ संभाळण्यांत चुकणार नाहीं.' असें सांगितल्यावर त्यानें आपा देसाई निपाणकर याचे चार हजार लोक आपल्या पाठीमागें रक्षणास ठेवून आपण पांचशें स्वारांनिशीं इंग्लिशांची वाट पाहत राहिला. ते समयीं त्या स्मिथ साहेबाजवळ तुरुकस्वारांचीं काळीं पलटणें दोन व गोरें पलटण एक व घोडे जुंपिलेल्या कांहीं तोफा इतकें मात्र होतें, आणि पायदळ होतें तें मागें राहिलें होतें. मग त्या उभयपक्षीं लष्करांची गांठ पडली असतां मराठ्यांनीं बंदुकांचा मार चालविला, आणि त्या गोखल्याचे दृष्टीस पडलें कीं, ओढ्याचे अडचणीनें इंग्लिशांचें पलटण बंदोबस्तावांचून येत आहे, ह्मणून



बापू गोखला.

तो तीनशें लोकांनिशीं वेगेंकरून त्यांवर चालिला, त्यामुळें त्या पलटणाची कांहीं अव्यवस्था झाली, परंतु तेच वेळेस गोरे पलटणाचे टोळीनें त्या उभ्या पलटणांचे पाठीमागून मोठ्या वेगानें जाऊन एकीकडून त्या मराठ्यांमध्यें शिरून गोखल्यास ठार मारिलें. नंतर इंग्लिश त्या लोकांचे पाठीस लागले असतां त्यांचें कितीएक सामान व किती-

एक हत्ती व घोडेही त्यांस सांपडले. त्यांत विशेष इतकाच कीं, सातान्याचा राजा त्याच्या परिवारासुद्धां इंग्लिशांच्या हातीं लागला.

६. पुण्यांत बाजीराव पेशवा यानें इंग्लिशांशीं कृत्रिमयुक्त स्नेह ठेवून शेवटीं त्यांशीं युद्धही केलें; तें वर्तमान ऐकून नागपूरकर इंग्लिशांजवळ त्या पेशव्याची निंदा करूं लागला, परंतु त्याच महिन्याचे २७ वे तारिखेस तेथें इंग्लिशांचे लोक होते, त्यांवर एकाएकीं सेना पाठविली. तें त्याचें लष्कर नऊ हजार स्वार व सुमारें नऊ हजार पायदळ इतकें होतें, त्यांत तीनचार हजार आरब कितीएकां तोफांसहित होते. ते समयीं तेथें इंग्लिशांचे चौदाशें[1] पायदळ व गोरे गोलंदाजांसहित चार तोफा होत्या, आणि सुमारें दोनशें बंगाली पलटणाचे स्वार असत.

७. तें युद्ध सिताबळदीनामक एक टेंकडी नागपूर शहराजवळ आहे, तिच्या आसमंतात् घडलें; त्याचा आरंभ अस्तमानीं होऊन दुसरे दिवशीं दोन प्रहरपर्यंत मोठ्या निकरानें तें चालिलें. त्यांत आरब व इंग्लिश यांनीं कोरेगांवचे लढाई-प्रमाणेंच परम शौर्य केलें. तसेंच इंग्लिशांकडे बंगालखात्यांतील सहाव्या रेजमिंटाचे स्वार होते ते तर बहुतच उपयोगीं पडले, त्यांनीं नागपूरकरांच्यां स्वारांचे मोठ्या समुदायांत वेगानें प्रवेश करून त्यांची उधळाउधळी करून त्यांतील कितीएक पायदळही मारून त्यांच्या दोन तोफा हिरून आणिल्या, तोंपर्यंत इंग्लिशांच्या पाय-दळास जयाविषयीं संशय होता, मग हें कृत्य त्यांनीं टेंकडीवरून पाहतांच त्यांस विशेष धैर्य उत्पन्न होऊन ते जयजयकारपुरःसर मोठा शब्द करून वेगानें पुढें सर-तांच मराठ्यांचा मोड झाला. त्या प्रसंगीं इंग्लिशांचे मेले व जखमी मिळून सवा-तीनशें पडले, तितकेच मराठ्यांचेही निरुपयुक्त झाले.

८. तो आपासाहेब नागपूरकर यानें दग्याचें आचरण केलें, तें सिद्धीस न गेलें ह्मणून आपल्यावरचा अनर्थ टाळावा याकरितां इंग्लिशांस सांगून पाठविलें कीं, 'ही गोष्ट माझे आज्ञेनें झाली नाहीं.' त्यावर साहेबानें उत्तर केलें कीं, 'तुमच्याजवळचे सर्व लोक दूर केल्याशिवाय तुमचा व आमचा व्यवहार चालणार नाहीं.' नंतर चहूंकडून त्या साहेबाच्या साहाय्यार्थ आणखी आणखी फौजा येऊं लागल्यावर डिसेंबराच्या १५ वे तारिखेस त्यानें त्या आपासाहेबास निरोप पाठविला कीं, 'तुह्मांस आमचा स्नेह पाहिजे असल्यास आपली सर्व फौज दूर करून मुलखाच्या रक्षणाचें काम आह्मांकडे ठेवावें; आणि तुमच्या दुसऱ्या कोणापासून दगा न होण्यास तुह्मीं आमचे जवळ येऊन रहावें; या गोष्टीचें उत्तर करावयास तुह्मांला या वेळेपासून

---

१. चौदाशें पायदळांत दोन कंपनी तेथें इंग्लिशांचा वकील त्याचे खासगीच्या असत, बाकी सर्व मद्रासचे होते,

पहांटेची दोन घटिका रात्र उरे तोंपर्यंत अवकाश दिला आहे.' असें होऊन ती वेळ गेल्यानंतर इंग्लिशांचें लष्कर त्या नागपूरकरांवर चालिलें. तें समजून तो आपासाहेब स्वयें निघून साहेबाचे भेटीस आला, तेव्हां इंग्लिशांचें लष्कर तेथेंच उभें राहिलें असतां त्यानें आपल्या तोफखान्यांतील संपूर्ण तोफा त्यांस आणवून दिल्या, परंतु त्याच्या ज्या तोफा बाहेर होत्या, त्या जेव्हां इंग्लिश हस्तगत करूं लागले, तेव्हां त्याचे मराठे लोक तयार होऊन इंग्लिशांवर चालिले, ते समयीं इंग्लिशांची फौज पुनः त्यांवर चालू होऊन मोठ्या बलात्कारानें त्या तोफा घेतल्या. शेवटीं त्या बाहेरच्या तोफा इंग्लिशांस न देणारे असे त्या नागपूरकराचे गणपतराव सुभेदार व मनभट्ट नामें दोघे सरदार होते, त्यांतील गणपतराव बाजीरावास जाऊन मिळाला, आणि मनभट्ट आपल्या आरबांसहित नागपूरच्या किल्यांत बळ धरून राहिला. तें ठिकाण इंग्लिश शिडी लावून एकदांच घेणार होते, तें सिद्धीस न जाऊन थोडक्याच दिवसांनीं ते आरब आपल्या परिवारासुद्धां इंग्लिशांच्या अभयवचनानें निघून गेले असतां तो मनभट्ट त्यांचे स्वाधीन झाला. त्यापुढें नागपूरकर व इंग्लिश यांचा तह ठरला कीं, 'इंग्लिशांनीं नागपूरकराचा संपूर्ण मुलूख संभाळावा, त्याबद्दल त्यांना चोवीस लक्ष रुपये प्रतिवर्षीं उत्पन्न होतसा मुलूख त्या खर्चास द्यावा.'

९. याप्रमाणें दक्षिणेंत व पूर्वेस दंगा होत असतां माळव्यांत व हिंदुस्थानांत बंगाल व मद्रास यांच्या फौजा एकत्र मिळतांना त्यांनीं कितीएक जागीं पेंढाऱ्यांचा मोड केला होता, त्यांतील एक चितू नामें त्या पेंढाऱ्यांचा मुख्य असे, त्याच्या पाठीस जनरल माल्कम् साहेब लागला, तेव्हां त्या चितूला होळकरानें आपल्या लष्करांत घेतलें. याशिवाय आणखी कितीएक प्रकारांनीं होळकर आपला दुसमान झाला, असें त्या माल्कम् साहेबास विदित झालें. तेव्हां तो त्या चितूची पाठ सोडून माघारां मद्रासेच्या मुख्याची फौज होती तींत जाऊन मिळाला. नंतर तेथून होळकरास कांहीं वागणुकीचे प्रकार गव्हर्नर जनरलच्या कल्पनेप्रमाणें सांगून पाठविले, त्याचें उत्तर अर्धांगीकारासदृश होळकराकडचे गफूरखान वगैरे पठाणांचे सरदार यांनीं मल्हारराव होळकराचे नांवें देऊन ऐक्य होईलसें कितीएक वेळां दर्शविलें. परंतु तेच वेळेस त्यांचे स्वारांनीं जाऊन इंग्लिशांच्या कितीएक बुणग्याचा नाश करून हैसूरचा राजा तत्पक्षीय ह्मणून त्याच्याही स्वारांवर हल्ला केला; त्यावरून तेथें जो इंग्लिशांचा मुख्य होता, त्यानें निश्चय केला कीं, आतां ह्या अनर्थाचा उपशम केलाच पाहिजे. ते समयीं त्या पठाणांनीं आपल्या मंडळांत फितुराच्या शंकेनें यशवंतराव होळकराची स्त्री तुळसाबाई तिला मारून टाकून तिचा मुख्य

कारभारी गणपतराव नामें होता, त्यास बंदींत घातलें. असें झालें असतां शिप्रा नदीपलीकडे होळकराचा तळ होता त्यावर इंग्लिश चालिला. ते समयीं होळ-कराचें लष्कर दहा हजार स्वार व दहा हजार पायदळ इतकें होतें. तें लष्कर त्या शिप्रा नदीच्या वळणानें कोंपऱ्यासारखी झालेली जागा निर्भय अशी पाहून तेथें स्थान धरून राहिलें होतें, त्या लष्कराचे डावे बाजूस नदीची मोठी दरड आणि उजवे बाजूनें मोठा ओढा असे; आणखी त्या लोकांनीं आपल्या लष्कराचें तोंड नदीकडे करून त्या आंगीं आपल्या पुढून मोठमोठ्या सुमारें सत्तर तोफा ओळीनें ठेविल्या होत्या, तेथें इंग्लिश त्यांवर जाऊन पडल्याचे पूर्वीं त्यांस ती नदी उतरावी लागली, तिच्या प्रवाहापासून आठशें साडेआठशें पाउलें होळकराच्या लष्करास अंतर होतें. तें स्थान असें दुर्गम आणि होळकराचे स्वारही आपल्या समुदायांतून बाहेर निघून जिकडे तिकडे पसरून उत्तम प्रकारें लढत होते. तथापि इंग्लिश मोठ्या नेटानें त्या नदीचा उतार पार झाले, तेव्हांच शत्रूवर जाऊन पडावयाचे पूर्वीं आपल्या कवायती लोकांचा बंदोबस्त राखणें त्यांस आवश्यक व त्यांस कांहीं वेळ पाहिजे, आणि आपल्या तोफा होळकराच्या मोठमोठ्या तोफांपुढें निरुपयोगी ह्मणून ते त्याच ठिकाणीं उभे राहिले असतां शत्रूकडील तोफांच्या भडिमारानें त्यांतील कितीएक मेले गेले. त्यांची तयारी झाल्यावर जनरल माल्कम् साहेबानें आपल्या लोकांसही मोठ्या वेगानें त्यांवर चाल केली असतां त्यांपुढें शत्रूच्या पक्षाचें पायदळ व स्वार यांतील कोणीएकही टिकला नाहीं. त्याचे गोलंदाज मात्र आप-आपल्या तोफांस टाकून जाईनात, तेणेंकरून ते बहुतेक त्या ठिकाणींच मेले गेले. इतर जे उधळून गेले होते, त्यांचे पाठीस इंग्लिशांचे स्वार व पायदळही लागून त्यांचे तीन हजार लोक मारिले. तेव्हां शत्रूनें आपल्या तोफांतील लहान लहान तोफा सहा मात्र नेल्या, वरकड इंग्लिशांस प्राप्त झाल्या, त्या युद्धांत इंग्लिशांचें सैन्य पाय-दळ एक पलटण गोरे लोक व सात पलटणें काळे लोक आणि काळे स्वार चार पलटणें व गोरे स्वार सुमारें दोनशें व कितीएक साधे बारगीर, या इतक्यांतून पावणे-आठशें घायाळ होऊन निरुपयुक्त झाले. तें युद्ध मेहिदपूर नामक गांवाजवळ झालें, ह्मणून त्यास 'मेहिदपूरची लढाई' असें नांव पडलें. त्या युद्धांतून होळकराचें एक पलटण आपल्या बंदोबस्तानें रामपुरापर्यंत गेलें होतें, तेथें बंगाल्याच्या लष्कराचे एके टोळीची गांठ पडून त्यांची उधळाउधळी झाली.

१०. असा जय झाल्यानंतर तो माल्कम् साहेब त्या शत्रूच्या पाठीस लागला असतां मंडेश्वरावर होळकराचा पुत्र मल्हारराव इंग्लिशांच्या स्वाधीन झाला. ते समयीं इंग्लिशांचें व त्याचें ऐक्य होऊन ठरलें कीं, अमीरखानानें पूर्वीं जो तह

होळकराच्या नांवानें केला होता, तो मान्य. त्याखेरीज त्या होळकरानें इंग्लिशांचा पक्षीय कोट्याचा राणा यासही कितीएक परगणे दिले. व पूर्वी होळकर रजपुतांपासून खंडणी घेत होता, ती इंग्लिशांनीं घ्यावी, आणि बुंदी पर्वताचे उत्तरेकडे व सातपुड्याचे दक्षिणेकडे जेथें जेथें त्याची सत्ता होती, तो मुलूखही इंग्लिशांनीं घ्यावा. याखेरीज इंग्लिशांनीं होळकराच्या मुलखाचें रक्षण करावें, त्याबरोबर त्याची तीन हजार फौज असावी. मराठ्यांनीं मेहिद्पुरचे लढाईनंतर आपला अर्थ सिद्धीस जात नाहीं असें समजून तो उद्योग टाकिला. बाजीरावाजवळ मात्र थोडकेसे लोक उरले असतां त्यास कर्तव्यार्थ सुचेना; ह्मणून तो मुलखोमुलखीं पळत सुटला, त्यावर चहूंकडून इंग्लिशांच्या टोळ्या जात होत्या. शिंद्यास मेहिद्पुरचें वर्तमान कळतांच तो इंग्लिशांच्या सूत्रानें वागूं लागला. त्याच्या कोणी सरदारांनीं बळ धरून इंग्लिशांस किल्ले द्यावयाचा अडथळा केला, त्यांवर फौजा पाठवून थोडक्याच वेळानें इंग्लिशांनीं त्यांस जिंकिलें. अमीरखान व पठाण लोक पूर्वींच सिताबळदीचे लढाईपासून मराठ्यांचें बळ चालणार नाहीं असें समजून साहेबानें ठरविल्या तहाप्रमाणें वर्तूं लागले.

११. पेंढारी लोकांवर बंगाला व मद्रास व मुंबई येथील सेनेच्या टोळ्या जाऊन त्यांतील कितीएका पेंढाऱ्यांस मारून त्या लोकांनीं जे जे मुलूख घेतले होते, ते ते सोडवून ज्यांचे त्यांस माघारे देऊन त्या पेंढाऱ्यांचे मोठे मोठे सरदार धरून आणिले. त्यांपैकीं नामदारखान व करीमखान सन १८१८ च्या फेब्रुआरींत माल्कम् साहेबाचे स्वाधीन झाले. तिसरा वासिल महंमद शिंद्याचें स्थान ग्वालेर येथें आश्रय पावला होता, तो इंग्लिशांच्या सांगण्यावरून शिंद्यानें त्यांचे स्वाधीन केला. आणखी चितू यास बहुत संकटें प्राप्त होऊन शेवटीं अशीरगड किल्ला येथें त्यानें आश्रय धरिला, तेंही स्थान इंग्लिश लढून घेऊं लागले असतां, तेथून तो चितू एकटाच रानांत पळाला, तो एका वाघानें त्या अरण्यांत मारिला, असें निश्चित समजण्यांत आलें. पश्चिमेकडे मुंबईच्या सरकारानें पूर्वींच फौजा पाठवून रायगड वगैरे कोंकणचे लहान मोठे किल्ले सर्व घेतले. असें असतां बाजीराव मात्र साहेबाचे हस्तगत व्हावयाचा राहिला, तेंही त्याच वर्षाच्या जुलै महिन्यांत सिद्धीस गेलें. तो प्रकार लिहिल्याचे पूर्वीं नागपूरकराचें कांहीं वर्तमान समजलें पाहिजे तें लिहितों.

१२. तो आपासाहेब नागपूरकर सिताबळदीचे लढाईनंतर इंग्लिशांच्या स्नेहानें पुनः आपल्या गादीवर बसल्यापासून त्यानें अनेक प्रकारें विपरीत वर्तणुकी गुप्तपणें केल्या. त्यांत गोंड नामें कोणी रानवट लोक यांस बंडें उठवावयाची मसलत

दिली. आणि आपण इंग्लिशांस किल्ले द्यावयास बाजीरावासही ह्मणत असे कीं, 'तुमची कुमक असल्यास आह्मी इंग्लिशांस उलटून गोष्ट सांगूं.' हें सर्व प्रकरण इंग्लिशांच्या वकीलास विदित झालें होतें. त्यावरून बाजीराव यानें गणपतराव सुभेदार त्याजबरोबर फौज पाठविली असतां त्यावर इंग्लिशांचीं पलटणें जाऊन त्याची वर्धा नदीचे कांठीं गांठ पडून एप्रिलाचे ४ थे तारिखेस त्याचा पराभव झाल्यानंतर तो आपासाहेबही नागपुरीं इंग्लिशांनीं कैद केला.

१३. त्यापूर्वींच बाजीराव नागपुरच्या मुलखीं आश्रयार्थ वर्धा नदीचे पश्चिमेस जाऊन उतरला असतां, त्यास इंग्लिशांच्या एका टोळीच्या भयानें तेथूनही दुसरेकडे उठून जाणें प्राप्त झालें. ते समयीं सेवनीपाशीं इंग्लिशांच्या दुसऱ्या कोणे एके टोळीची गांठ पडली, तेव्हां त्याच्या लोकांचा नाश होऊन जे त्याजवळ शिपाई व जहागीरदार उरले होते, ते बहुतेक आपआपल्या ठिकाणास गेले.

१४. यानंतर बाजीरावानें नर्मदा पार उतरून जावयाची मसलत केली, परंतु सर्वत्र इंग्लिशांचा बंदोबस्त आहे, असें पाहून मग अशीरगडाकडे जाऊन माल्कम् साहेब इंदुराजवळ लष्करसुद्धां होता, त्यास प्रार्थनापूर्वक पत्र लिहून पाठविलें. नंतर



बाजीराव पेशवे.



माल्कम् साहेब.

जुलै महिन्याचे ३ रे तारिखेस त्याची व साहेबाची भेट होऊन तो राज्याची आशा सोडून इंग्लिशांचे स्वाधीन झाला, ते समयीं ठरलें कीं, त्यानें एखादे क्षेत्रीं इंग्लिश देतील तो खर्च खाऊन राहावें. तेव्हां त्या माल्कम् साहेबानें कृपा करून त्याचा भाऊ अमृतराव यास प्रतिवर्षी आठ लक्ष रुपये कंपनी सरकारांतून पोंहचत आले, तसेच

यासही द्यावे असें केलें. ही गोष्ट कलकत्त्याचा मुख्य गव्हर्नर जनरल साहेब याच्या मनास येऊन त्यानें त्या बाजीरावास बंगाल्याकडे कानपुरापाशीं बिठूर नामें क्षेत्र आहे, ती जागा राहावयाची नेमिली. त्या ठिकाणास मराठे 'ब्रह्मावर्त' ह्मणतात. त्रिंबकजी डेंगळा याचे पाठीस इंग्लिशांची टोळी लागून तो खानदेशामध्यें अहीरगांवाजवळ धरिला, तो तत्काळ बंगाल्यांत चरनागड नामें बळकट किल्ला आहे, तेथें बंदींत घातला. नागपूरकर आपासाहेब यास कैद करून बंगाल्यांत पाठवितांना तो कांहीं सवड पाहून पळाला, त्यानें शीक लोकांचे मुलखीं जाऊन आश्रय धरिला. तो कपटी व अविचारी व पराक्रमहीन ह्मणून साहेब लोक त्याची गणना करीत नाहींत.

१५. असें उत्तरेकडे वर्तमान असतां एप्रिलचे ११ वे तारिखेस इंग्लिशांनीं साताऱ्याचा राजा मोठ्या समारंभानें गादीवर बसविला. त्यास मुलूख पश्चिमेस सह्याद्रीपासून वरता पंढरपुरापलीकडे कांहींसा व दक्षिणोत्तर वारणा नदी व निरानदी यांची मर्यादा करून दिला. त्या मुलखांत बाजीरावाचे कांहीं उतरलेले पायदळ लोक सुमारें साडेचार हजार व तेरा तोफा इतक्यांसहित गणपतराव सुभेदार उपद्रव करीत असे, तें समजून मद्रासेचा कोणी जनरल मन्रो नामें साहेब मोठा विख्यात होता, त्यानें कर्नाटक सरसुभा घेतला; त्या साहेबानें तेथून उत्तरेस जाऊन सोलापुरच्या किल्ल्यापाशीं त्याची गांठ पाडून युद्ध करून त्या गणपतरावाचे बहुतेक लोक मारून त्यांस हांकून दिलें; नंतर थोडक्याच दिवसांनीं तो किल्लाही घेतला. याप्रमाणें संपूर्ण दक्षिण मुलूख इंग्लिशांच्या सत्तेंत आल्यावर मग तेथील जहागीरदार वगैरे कोणी इंग्लिशांस अनुसरून होते, व कोणी तद्विपरीत होते, त्यांस कोणकोणत्या प्रकारें देण्याघेण्याच्या योगें वाढवावें, किंवा बळहीन करावें, त्या योजनेचा विचार इंग्लिश करूं लागले. प्रथम बुंदीचा राजा रजपूत याचा पहिल्यापासून इंग्लिशांशीं स्नेह होता, त्याला पूर्वीं शिंद्यास खंडणी द्यावी लागत असे तें चुकलें; व शिंदे आणि होळकर यांनीं बळात्कारें जो त्याचा मुलूख घेतला होता, तो त्यास पुनः प्राप्त झाला. असाच भोपाळचा रजपूत राजाही पूर्वीं इंग्लिशांच्या उपयोगीं पडलेला, त्यास अष्टा व इच्यावर व सेहार व दोवाहा व देवापाना, असे पांच परगणे व माळव्यांतील जप्त केलेला विंचूरकरांचा कांहीं मुलूख, आणि सुजावलपूर परगण्यांतील कांहीं भाग, व किल्ला इसलामनगर नामें शिंद्याकडे असे, त्याबद्दल दुसरा कांहीं मुलूख देऊन तें स्थान त्यास दिलें. निझाम यास बाजीरावाचें देणें सहा कोटी रुपये होतें, तें फिटावयासाठीं त्याला पेशव्यास दहा लक्षांचा मुलूख द्यावा लागत होता तो न लागला; व पेशवा किंवा त्याचे लोक त्या निझामाचे राज्यांतील बारा लक्षांचा मुलूख इंग्लिशांशीं व मराठ्यांशीं युद्ध लागे तोंपर्यंत वहिवाटीत

होते, तो त्याचा त्यास प्राप्त झाला; याखेरीज होळकर व नागपूरकर यांच्या मुलखांतील सहा लक्षांचा सुमारें मुलूख इंग्लिशांनीं त्यास दिला. तेव्हां त्या युद्धाचे पूर्वीं जें त्या राजास मिळत होतें, त्यापेक्षां अठ्ठावीस लक्ष रुपये अधिक मिळूं लागले असतील अशी अटकळ होते. दक्षिणेंत जितकीं वेतनें व अग्रहारें व इनामें पुरातन चालत आलीं होतीं, तीं इंग्लिशांनीं तशींच चालविलीं, आणि जहागीरदारही बहुतेक तसेच रक्षिले. कोल्हापूरकरास पहिल्यापेक्षां विशेष, चिकोडी व मनोळी हे दोन परगणे मिळाले. याखेरीज जे कोणी इंग्लिशांचा पक्ष धरिलेले गृहस्थ लोक होते, त्यांस अनेक प्रकारें संतुष्ट केलें. दुसरें, जे सरकारचे कारभारी नेमणुकेवांचून बाजीरावाजवळ उगेच आश्रय मात्र धरून राहिलेले असत त्यांस, व नाना फडनविसाचे वेळेपासून जे मोठे मोठे गृहस्थ दरिद्री झालेले होते त्यांस, योग्यतेनुसार कोणास कांहीं जमिनी व कोणास कांहीं वेतनें देऊन एल्फिन्स्टन् साहेबानें सुखी केलें. तसेच कितीएक सरदारही दरिद्रानें पीडिलेले पाहून त्यांस कांहीं निर्वाहाच्या कल्पना योजिल्या, व पुण्यामध्यें सर्व हिंदू लोकांस आपआपल्या रीतीप्रमाणें गणितादि विद्या शिकावयाची शाळा घातली. इंग्लिशांनीं युद्धयत्नें करून मराठी राज्य संपादिलें असतां, कोणाचेंही वाईट न होय अशी कल्पना योजून त्या राज्यांतील संपूर्ण प्रजेस सुखकारक अशा वर लिहिलेल्या मर्यादा करून ठेविल्या, यांचे मुख्य कर्ते महासमर्थ परम दयावंत असे इंग्लिशांचे गव्हर्नर जनरल मार्क्विस् हेस्टिंग्स् साहेब त्यांचे सहाय तत्समानशील मोठे नामांकित एल्फिन्स्टन् साहेब, हे पुरुष सुकीर्तिसाधनाविषयीं दक्ष, यांनीं हिंदूंच्या मुलखांतील संपूर्ण प्रजेचें हित साधिलें, त्या योगें त्यांचें स्मरण लोकांच्या मनांतून भ्रष्ट न व्हावें.



एल्फिन्स्टन् साहेब.



समाप्त.

# ऐतिहासिक पुस्तकें.

| | किं. | ट. ख. |
|---|---|---|
| **ऐतिहासिक गोष्टी व उपयुक्त माहिती**—भाग १ ला. ... ... | ·।।।· | ०- |
| **ऐतिहासिक गोष्टी व उपयुक्त माहिती**—भाग २ रा. ... ... | ·।।।· | ०- |
| **गुजराथ देशाचा इतिहास.** २९ विषय. यांमध्यें भूमिवर्णन, गुजराथेंतील प्राचीन इतिहास वगैरे २९ मुख्य विषय आहेत. शेवटीं राज्यतुलना हा एक भाग दिला आहे. सांप्रतच्या गायकवाडसरकारच्या राज्याची यामध्यें बरीच इत्थंभूत माहिती दिली आहे ... ... ... | १। | ०= |
| **पृथ्वीराज चव्हाण**—( आवृत्ति ४ थी ) हें पुस्तक चंदभाटकृत पृथ्वीराजरासानामक ग्रंथाच्या आधारें लिहिलें आहे. यांत दिल्लीचे शेवटचे क्षत्रिय महाराज पृथ्वीराज चव्हाण यांचा इतिहास लिहिलेला असून पृथ्वीराजानें केलेला दिग्विजय, जयचंद राठोड याच्या राजसूययज्ञाला आणलेला अडथळा व स्वयंवरसमयीं संयोगतेचें केलेलें हरण वगैरे मनोहर विषय असून भाषाशैली अनुपम आहे. ... ... ... | ·।।· | ०- |
| **राजस्थानचा इतिहास**—हा इतिहास कर्नल टॉड यांच्या 'अनाल्स आफ् राजस्थान' या ग्रंथाच्या आधारें लोकहितवादी यांनीं लिहिला आहे. क्षत्रियांच्या व रजपुतांच्या वीर्यपराक्रमांचे इतिहास वाचावयास फार मनोरम व अद्भुत असून त्यांच्या योगानें अंतःकरणांत एक प्रकारचा उत्साह उत्पन्न होतो. त्यांतही मेवाड अथवा उदेपूर येथील इतिहास तर अशा प्रकारच्या वीर्यपराक्रमांची केवळ खाणच आहे. मेवाडची राजधानी चितूरगड याजविषयीं समस्त एतद्देशीयांस एवढा अभिमान वाटतो कीं 'गडमें गड चितोरगड और सब गडय्या है' ही ह्मण सर्वत्र सारखी प्रचारांत आहे. ... ... ... ... ... ... | २।। | ०≡ |
| **चितुरगडचा वेढा**—(आवृत्ति ३ री) ह्यांत भाग ११ आहेत, व त्यांतील विषयः—१ उपक्रम. २ रजपूत. ३ त्रिपुरसुंदरी आणि भुवनसुंदरी. ४ माधवसिंगाला देहांत प्रायश्चित्त. ५ अकबराला ठार मारण्याचा दुसरा प्रयत्न. ६ गुलाबबाईचा मानी स्वभाव आणि अकबराचें विलक्षण शौर्य. ७ कालयवन अकबर बादशहा आणि कालभैरव प्रतापसिंह ह्यांची खडाजंगी. ८ त्रिपुरसुंदरीचें अग्निकाष्ठभक्षण. ९ अखेर अग्निकुंडांत गुलाबबाईची पूर्णाहुति. १० गुणदोषवर्णन. ११ समारोप. इत्यादि विषय आहेत. ... ... ... ... ... ... ... | ·।≡ | ०- |
| **छत्रपति संभाजी महाराज**—(आवृत्ति २ री) अथवा "राजाचें दुष्कर्म राजाला भोंवतें आणि प्रजेलाही भोंवतें." यांत अविचारी थोर पुरुषांस कसकशीं दुःखें भोगावीं लागतात त्याचें विवेचन सुरेख केलें आहे. ... | १। | ०- |

| | किं. रु. | ट. ख. |
|---|---|---|
| **भरतपूरचा वेढा**—ह्यांत दहा प्रकरणें आहेत. जाट लोकांच्या आणि इंग्लिश लोकांच्या शौर्याचें आणि पराक्रमाचें वर्णन आहे. आणखी विशेषेंकरून, हिंदुस्थानाचें राजकारण एकुणिसाव्या शतकांत कसें होतें, ह्याचें धोरण ह्या पुस्तकाच्या अवलोकनानें लक्षांत येईल. ... ... | ·।- | σ- |
| **मराठ्यांच्या संबंधानें चार उद्गार**—ह्यांत मराठ्यांच्या संबंधीं प्राचीनकाळची माहिती मोठ्या प्रयासानें मिळवून तिच्या सत्यासत्यतेबद्दल प्रमाणें दाखविलीं आहेत. आरंभीं मराठा शब्दाची व राष्ट्राची उत्पत्ति देऊन पुढें मराठ्यांच्या संबंधीं अर्वाचीन ऐतिहासिक माहिती दिली आहे. | १। | σ=॥ |
| **राजगुरु दादोजी कोंडदेव आणि छत्रपति शिवाजीमहाराज**—ह्यांत दादोजी कोंडदेव यांनीं शिवाजी महाराजांस केलेला राजकीय प्रकरणीं बोध दिला आहे. ... ... ... ... ... ... | ·।= | σ- |
| **वनराजाचें चरित्र**—एक ऐतिहासिक गोष्ट. ... ... ... ... | ·।· | σ॥ |
| **वसईचा मोहरा**—श्रीमंत पहिले बाजीराव साहेब पेशवे यांचे कनिष्ठ बंधु शूरवीर चिमणाजी आप्पा ह्यांनीं हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर तावत्कालपर्यंत अजिंक्य होऊन बसलेल्या पोर्तुगीज लोकांपासून वसईचा किल्ला कसा घेतला, ह्याचें ह्यामध्यें सुरेख वर्णन केलें आहे. ... | σ=॥ | σ॥ |
| **श्रीमंत पहिले बाजीराव बल्लाळ पेशवे यांचें चरित्र.** ... ... | ·॥· | σ- |
| **सवाई माधवराव पेशवे.** ... ... ... ... ... ... | σ≡ | σ- |
| **सवाई माधवराव पेशव्यांचा दरबार** आणि त्या वेळचे पहिले इंग्रज रेसिडेंट **सर चार्लस मालेट.** ह्या पुस्तकांत श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांचा दरबार व त्या वेळचे पहिले इंग्रज रेसिडेंट सर चार्लस मालेट यांची माहिती ग्रथित केली आहे. पेशव्यांच्या दरबारांत इंग्लिशांचा प्रवेश केव्हां व कसा झाला, आणि त्यांच्या संबंधानें मराठ्यांवर काय परिणाम घडून आले हें समजण्यास हें पुस्तक एक उत्तम साधन झालें आहे. यांत दिलेलीं सवाई माधवराव, नाना फडणविस व सर चार्लस मालेट यांचीं चित्रें पुणेंदरबाराच्या तत्कालीन मि० वेल्सनामक चित्रकाराच्या अस्सल चित्रांवरून घेतलेलीं आहेत. पुस्तकाचे कर्ते प्रसिद्ध ग्रंथकार रावबहादूर दत्तात्रय बळवंत पारसनीस हे आहेत. ... ... ... ... ... ... ... ... ... | ·॥· | σ- |

पुस्तकें मिळण्याचा पत्ता.—

**तुकाराम जावजी,**

**निर्णयसागर छापखान्याचे मालक,**

**घर नंबर २३, कालबादेवी रोड, मुंबई.**